# नवभारत

वर्ष ४८ । अंक ७-८-९ । एप्रिल-मे-जून १९९५

ब्रह्मविद्या-मंदिर
पो. पवनार, वर्धा ४४२००१
15-11-1976

शंकररावांचे जीवन
सेवकत्व
साधकत्व
आणि लोकनेतृत्व
या तीन गुणांची
त्रिपदा गायत्री आहे।

बाबाची
शुभकामना।
राम हरि

## शंकरराव देव विशेषांक







अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ४८ । अंक ७-८-९ । एप्रिल-मे-जून १९९५.
चैत्र-वैशाख-ज्येष्ठ, शके १९१७.
**शंकरराव देव विशेषांक**

वार्षिक वर्गणी १२० रुपये.
या अंकाची विशेष किंमत रु. १००.

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक सहमत असतीलच, असे नाही.

## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* **नवभारत**, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

**अध्यक्ष व विश्वस्तः**
मे.पुं. रेगे

**संपादकः**
मे.पुं. रेगे

**साहाय्यक संपादकः**
अ.र. कुलकर्णी, एस्.डी. इनामदार,
अ.ना. ठाकूर

**संपादकीय पत्रव्यवहारः**
मे.पुं. रेगे
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वाराः प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहारः**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वाराः दी प्राज्ञ प्रेस, वाई - ४१२ ८०३ (जि. सातारा)

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाचा मंडळाच्या "नियतकालिकांचा स्थायी निधी" योजनेत समावेश केला असला तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.

अनुक्रमणिका

## लेखक-परिचय

❖ **देवदत्त दाभोलकर** – लोकशाही समाजवादी समाजाच्या निर्मितीशी संबद्ध चळवळींचे अभ्यासक. शैक्षणिक, सामाजिक विषयांवर विपुल लेखन. समाज प्रबोधन संस्थेचे एक संस्थापक-सदस्य.
'शांतिनिकेतन', ४३ गुरुकृपा हाऊसिंग सोसायटी, गोडोली, सातारा, ४१५ ००१.

❖ **वृंदा दाभोलकर** – निवृत्त प्राध्यापिका, मौनी विद्यापीठ, गारगोटी (जि. कोल्हापूर). सामाजिक विषयांवर, विशेषतः स्त्रियांची स्थिती व समस्या या विषयावर नियतकालिकांमधून लेखन. संतशिरोमणी तुकाराम यांच्यावर हिंदी भाषेत एक ग्रंथ प्रकाशित. 'अच्युतधाम', साळोखेनगर, कोल्हापूर ४१६ ००७.

❖ **उषा पी. शरण** – उषा मोहनी या नावाने 'अपंगत्वार विजय' या पुस्तकाचे लेखन; अंध व अंध-बहिऱ्या व्यक्तींसाठी कार्य; ब्रेल लिपीमधील *विज्ञान भारती* या हिंदी भाषिक नियतकालिकाचे संपादन.
पिलखी निवास, राजगीर (नालंदा), बिहार ८०३ ११६.

*(या अंकात अनेक दिवंगत मान्यवरांचे लेखन पुनर्प्रकाशित केले आहे. त्या लेखकांचा परिचय पुढे दिला आहे.)*

❖ **दादा धर्माधिकारी** – गांधी विचार, सर्वोदय विचार यांचे श्रेष्ठ कोटीचे अभिजात भाष्यकार. *सर्वोदय दर्शन*, *स्त्री-पुरुष सहजीवन* आणि अनेक ग्रंथांचे कर्ते.

❖ **पु.ह. पटवर्धन** – स्वातंत्र्य संग्रामातील एक नामवंत सेनानी. सानेगुरुजींच्या पश्चात आचार्य जावडेकरांसोबत *साधना* साप्ताहिकाचे संपादन. राष्ट्र सेवा दल, भूदानयज्ञ आंदोलन यासारख्या विधायक चळवळींशी घनिष्ठ संबंध.

❖ **अप्पा पटवर्धन** – 'कोकण-गांधी' म्हणून ओळखले जात. गांधीप्रणीत रचनात्मक कार्यात अग्रेसर पथदर्शक कार्य. सिंधुदुर्ग जिल्ह्यातील कणकवली येथील गोपुरी आश्रम या प्रयोगशील रचनात्मक कार्य करणाऱ्या आश्रम संस्थेच्या रूपाने एक नमूना सादर केला. आयुष्याच्या अखेरच्या पर्वात भंगीमुक्ती व चलनशुद्धी या दोन गोष्टींसाठी भारतभर प्रचारयात्रा व मूलग्राही तत्त्वचिंतनात्मक लेखन.

❖ **श्री.रा. टिकेकर** – मागील पिढीतले ख्यातनाम पत्रपंडित व सव्यसाची लेखक.

❖ **हमीद दलवाई** – कथालेखक, कादंबरीकार; व्यावसायिक पत्रकार. समाजवादी चळवळीतील एक निष्ठावंत कार्यकर्ते. उत्तर आयुष्यात मुस्लिम जातीयवादी राजकारण व मनोधारणा यांची परखड मीमांसा करण्यासाठी प्रसिद्ध. मुस्लिम सत्यशोधक मंडळ या मुस्लिम समाजाचे प्रबोधन व सुधारणा कार्य करणाऱ्या संघटनेचे प्रवर्तक.

# नवभारत

एप्रिल-मे-जून १९९५

## अ नु क्र म



अनुक्रमणिका








# संपादकीय निवेदन

*नवभारत* व श्री. शंकरराव देव यांचा विशेष ऋणानुबंध आहे. श्री. हरिभाऊ मोहनी व श्री. शंकरराव देव यांच्या प्रेरणेने व प्रयत्नांमुळेच *नवभारत*चे प्रकाशन स्वातंत्र्य मिळाल्या मिळाल्या ऑक्टोबर १९४७ मध्ये सुरू झाले. पहिली दहा वर्षे, शंकररावांनीच जोपासलेल्या, 'सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला' या ध्येयवादी प्रकाशन संस्थेच्या वतीने *नवभारता*चे प्रकाशन होत होते. *नवभारता*ला एका खुल्या वैचारिक व्यासपीठाचे जे रूप प्राप्त झाले, तो अपघात नव्हता. एका उदात्त दृष्टीचा व प्रौढ, सुजाण, दूरदर्शी भूमिकेचा तो परिपाक होता. श्री. शंकरराव देव, आचार्यद्वय शं.द. जावडेकर व स.ज. भागवत, श्री. हरिभाऊ मोहनी यांची ती समाईक दृष्टी व भूमिका होती. या मित्र-वर्तुळात शंकररावांचे विशेष स्थान होते. शंकररावांच्या संघटनकौशल्यावर व नेतृत्वावर त्यांच्या मित्रांची मोठी भिस्त होती. शंकररावांनी *नवभारता*ची व्यावहारिक जबाबदारी उचलली नसती, तर *नवभारता*चा जन्म झालाच असता असे नाही; पण त्याच वेळी, हे विसरणे गैर होईल की, *नवभारता*ची भूमिका व स्वरूप निश्चित करण्यात शंकररावांचा वाटा बरोबरीचा होता.

*नवभारता*च्या पहिल्या अंकात 'संचालकांचे मनोगत' या मथळ्याच्या लेखात शंकररावांनी एका अर्थी महाराष्ट्रातील बुद्धिजीवी वर्गापुढे, विचारवंतांपुढे स्वतःच्या भावना अतिशय मोकळेपणाने व्यक्त करीत सर्वांना आवाहन केलेले आढळते. आम्ही *नवभारता*च्या दिवाळी १९९१ च्या अंकात तो लेख पुनर्मुद्रित केला होता. तरीही, शंकररावांना *नवभारता*च्या वतीने आदरांजली वाहताना त्यातील काही भाग येथे उद्धृत करणे अनुचित होणार नाही. शंकररावांनी लिहिले आहे :

'व्यक्तीचा विकास, समाजाची धारणा व उत्कर्ष यांचा समन्वय घालून जीवनातील जे सत्य, शिव व सुंदर यांचा साक्षात्कार करून घेण्याचा मार्ग कोणता, ते दाखविण्याचा यथामति, यथाशक्ति प्रयत्न करणे हे *नवभारता*चे कार्य आहे. *नवभारत* हे पवित्र कार्य "सर्वेषां अविरोधेन" करीत राहील. सर्व सत्पुरुषांच्या शुभाशीर्वादाची कामना आहे. कर्मयज्ञ होईल तर तो मिळेल अशी श्रद्धा आहे.

"सत्यसंकल्पाचा दाता भगवान"

'समाजाचा विकास त्याच्या संस्कृतीत प्रतिबिंबित झालेला असतो. मनुष्यमात्राच्या अंतःकरणामध्ये सत्य, सौंदर्य, साधुत्व या मूल्यांच्या अंतिम प्रेरणा सतत उसळत असतात. त्यामधून संस्कृतीचे स्वरूपही विकसित होत जाते. सामाजिक जीवन कितीही गुंतागुंतीचे असले तरी, त्यामध्ये एकजीवपणा असतो. ह्या एकजीवतेची सतत वाढ करीत गेल्यानेच सामाजिक जीवनाला समृद्धी लाभते. संस्कृतीला हळूहळू उमलत जाणाऱ्या सहस्रदल कमलाची उपमा देता येईल. समाजाच्या वाढत्या विकासाचे हे स्वरूप ध्यानी घेऊन समाजातील सर्व प्रेरणांचा आणि सर्व चळवळींचा शक्य तेवढा समन्वय करीत राहिले पाहिजे... (असा) समन्वय करता आला, तर महाराष्ट्राचे सांस्कृतिक सामर्थ्य अधिक वाढेल, निष्कारण विरोधामुळे वाया जाणारी शक्ती वाचविता येईल आणि मतभेद राखूनही सामाजिक सुधारणेच्या कामात सहकार्य वाढविता येईल.'

महाराष्ट्रीय विचारवंतांपुढील समस्या, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर उपस्थित झालेले आव्हान यांविषयी शंकररावांनी लिहिले, 'महाराष्ट्राचे भौतिक दारिद्र्य आणि सामाजिक विषमता यांमुळे महाराष्ट्रीय विचारवंत आणि सामान्य जनता यांमध्ये भीषण अंतर पडलेले आहे. हे अंतर तोडल्याशिवाय महाराष्ट्राची सामाजिक शक्ती वाढणे शक्य नाही... भावी संस्कृतीच्या निर्मितीसाठी नानाविध भौतिकशास्त्रांचे ज्ञान, आर्थिक संघटनांची विद्या आणि लोकशाहीचे तंत्र आपणास हस्तगत करावे लागेल. महात्मा गांधींचा सत्याग्रह, मार्क्सचा समाजवाद आणि युरोपातील बुद्धिवाद, तसेच व्यक्तिस्वातंत्र्य, लोकशाही इत्यादी तत्त्वे या सर्वांचा महाराष्ट्रीय विचारवंतांनी ऊहापोह केला पाहिजे. मात्र त्या तत्त्वांना तेथे जडलेली विकृती नष्ट करून त्यांच्या मूलभूत स्वरूपातही ती महाराष्ट्रात पेरली जातील व शुद्ध स्वरूपात विकास पावतील असा प्रयत्न झाला पाहिजे. आणि महाराष्ट्राच्या संस्कृतिविषयक विचारांत योग्य दिसेल ती भर घातली पाहिजे'.

पहिल्या अंकाच्या प्रारंभी 'संचालकांचे मनोगत' व्यक्त करताना शंकरराव देव म्हणतात, "मला अशी आशा आहे की, *नवभारत* जेथे जाईल तेथे तेथे सात्त्विक सुखाची व शांतीची दिवाळी उजाडेल. "बहुजन हिताय बहुजन सुखाय" अशा जीवनात जे सत्य, शिव

अनुक्रमणिका

व सुंदर आहे, त्याला प्रकाशित व प्रकट करून, त्याचा साक्षात्कार करून घेण्याला महाराष्ट्रातील स्त्री-पुरुषांना मदत करणे हे *नवभारता*चे कार्य आहे. या महान व मंगल कार्यात *नवभारता*ला अनुभवी विद्वानांनी आपले साहाय्य व सहकार्य द्यावे अशी मी या कार्याला आरंभ करीत असताना त्यांना श्रद्धाविनयपूर्वक विनंती करतो".

शंकरराव देव यांनी 'मनोगता' मध्ये पुढील आशा प्रकट केली : 'विशिष्ट सांप्रदायिक दृष्टी न ठेवता सांस्कृतिक उपासनेची व्यापक दृष्टी राखण्याचा आम्ही निर्धार केला आहे. या कार्यात महाराष्ट्रातील सर्व विचारवंतांचे साहाय्य मिळेल अशी आम्हास आशा आहे.'

शंकररावांच्या व्यक्तित्वाचा हा पैलू अप्रकाशितच राहिलेला आहे. शंकररावांच्या 'मनोगता'ला उद्देशून आम्ही *नवभारता*च्या दिवाळी १९९१ च्या अंकात लिहिले होते : 'इतकी उत्कट श्रद्धा इतक्या सरळपणे व्यक्त करण्याची ताकद आज फारच थोड्यांत असेल. स्वतःचे जीवन, त्याचा सर्व अपुरेपणा जमेस धरूनही, ह्या श्रद्धेने घडविले आहे असा आत्मप्रत्यय असल्याशिवाय अशा मोकळेपणे ती व्यक्त करता येणार नाही. तिचा थोडा स्पर्श जरी आपल्याला झाला तरी आपले जीवन अधिक निरोगी होईल'.

शंकरराव *नवभारता*चे संपादन करणाऱ्यांच्या तसेच त्याचे प्रकाशन करणाऱ्यांच्या पितृस्थानीच आहेत. त्यांनी *नवभारता*चे म्हणून जे कार्य सांगितले आहे ते पार पाडण्यात सर्वांचे सहकार्य मिळविण्याचा, व सर्वांच्या सहकार्याने, 'अविरोधेन' ते पार पाडण्याचा यथाशक्ती प्रयत्न करून त्यांचे ऋण फेडण्यास आम्ही प्रतिबद्ध आहोत.

* * *

महाराष्ट्र देशावर प्रेम करणाऱ्या व महाराष्ट्राविषयी विलक्षण निष्ठा प्रकट करणाऱ्या शंकररावांना आज महाराष्ट्र विसरला आहे. काँग्रेसची त्यांनी अनेक वर्षे सेवा केली; महाराष्ट्रात १९२० नंतरच्या गांधीयुगात तिचे समर्थ नेतृत्व केले. बहुजनसमाजातील नेत्यांना व त्यांच्या मागे असलेल्या समाजाला काँग्रेसमध्ये आणले. महात्मा गांधी, सरदार पटेल, जवाहरलाल नेहरू यांची नाराजी वा रोष पत्करूनही सर्व मराठी भाषिकांचे एक संयुक्त महाराष्ट्र राज्य व्हावे यासाठी अनेक वर्षे अथक प्रयत्न केले. त्या काँग्रेसनेच, काँग्रेसवर आज प्रभुत्व असलेला बहुजनसमाजीय नेतृत्वाने, आणि संयुक्त महाराष्ट्राचा अभिमान आहे असे मोठ्या आवेशाने सांगणाऱ्या अन्य पक्षीय नेत्यांनी त्यांचे स्मरण ठेवले नाही. अपराध शंकररावांचा नाही. प्रामुख्याने तो महाराष्ट्रीय सुशिक्षित बुद्धिजीवी वर्गाचा आहे.

शंकररावांचे राजकीय कर्तृत्व निर्विवाद आहे. एक ना एक दिवस देशाच्या स्वातंत्र्यलढ्यात महाराष्ट्राच्या पातळीवर त्यांनी जी कामगिरी पार पाडली, संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीसाठी त्यांनी ज्या खस्ता खाल्ल्या त्यांची न्याय्य दखल घेतली जाईल, अशी आम्ही आशा बाळगतो. तसे जर घडून आले नाही, तर मराठी भाषिक समाजाच्या बौद्धिक-सांस्कृतिक ऱ्हासाची ती गोष्ट द्योतक असेल.

पण शंकररावांकडे केवळ एक संघटनाकुशल राजकारणी नेता म्हणून पाहणे एकांगी ठरेल. त्यांच्या पिढीतील अनेकांप्रमाणे स्वातंत्र्य संपादनाच्या राजकारणात उतरण्यामागची त्यांची प्रेरणा आध्यात्मिक होती. राजकारणी नेता व साधक या दोन भूमिकांचा व्यवहारात स्वतःच्या व्यक्तित्वात पूर्ण समाधानकारक समन्वय साधणे, वा या दोन भूमिकांमध्ये अभेद प्रस्थापित करणे, ही कर्मकठीण गोष्ट आहे. यात आपण सफल किती झालो व अपयशी किती ठरलो याचे स्वच्छ भान इतर कोणाहीपेक्षा शंकररावांना अधिक होते असे म्हणणे वावगे होणार नाही. त्यांनी स्वतःच्या आत्मचरित्राच्या संदर्भात स्वतःच *दैव देते पण कर्म नेते* हा शब्दप्रयोग करावा ही गोष्ट फार बोलकी, प्रांजळ व हृद्य आहे.

आचार्य जावडेकर व आचार्य भागवत यांना महाराष्ट्र व्यासंगी विद्वान व विचारवंत म्हणून ओळखतोः शंकररावांची अशी ओळख महाराष्ट्राला नाही. त्यांचे विस्मरण ज्यांना झालेले नाही अशाही व्यक्तींच्या लेखी शंकरराव हे राजकारणी नेते, कुशल संघटक, प्रभावी वक्ते म्हणूनच अधिक परिचित आहेत. त्यांनीही विचारवंत म्हणून स्वतःची प्रतिमा कधी प्रक्षेपित केली नाही. एका प्रकारे आचार्यद्वयांच्या छायेत राहणे त्यांनी पत्करले. सर्वोदयाच्या, भूदान-ग्रामदानाच्या चळवळीत पूर्णपणाने समर्पित झाल्यावरही, आचार्य विनोबा भावे व आचार्य दादा धर्माधिकारी यांचे अग्रेसरत्व त्यांनी मान्य केले. या कारणाने त्यांचे वैचारिक लेखन तसे आजवर उपेक्षितच राहिले आहे. मरणोत्तर सासवड आश्रम विश्वस्त मंडळाने त्यांच्या वैचारिक लेखनाची *साध्य आणि साधने*, *गांधीजी आणि लोकस्वराज्य*, व *भारताची स्वराज्य-साधना* अशी तीन पुस्तके प्रसिद्ध केली. *नवभारत* मधून त्यांनी १९४७ ते १९५७-५८ या काळात वेळोवेळी लेखन केलेले आढळते. त्यांचा व्यासंग, त्यांची वैचारिक बैठक व विचारवंत म्हणून त्यांचे सामर्थ्य यांचा आश्चर्यकारक प्रत्यय त्यांचे लेख व ग्रंथ वाचताना येतो.

अनुक्रमणिका

वैचारिक क्षेत्रात जागृतीचे, प्रवोधनाचे, लोकशिक्षणाचे कार्य करणाऱ्या अनेक संस्थांचे शंकरराव प्रवर्तक व मार्गदर्शक होते. गांधीजीप्रणीत रचनात्मक कार्य करणाऱ्या अनेक संस्था त्यांनी स्थापन केल्या याची माहिती आजच्या पिढीला नाही. कदाचित मागच्या दोन पिढ्यांना नाही. वैचारिक प्रबोधन घडवून आणण्याच्या हेतूने त्यांनी स्थापन केलेल्या संस्था व त्यांचे कार्य, रचनात्मक कार्यासाठी उभारलेल्या संस्था व त्यांचे कार्य यांचे १९२० नंतरच्या ५०-५५ वर्षांच्या महाराष्ट्राच्या बौद्धिक व भौतिक जीवनातील योगदान व त्याची मौलिकता यांचा सम्यक् आढावा/मूल्यमापन कधी तरी साक्षेपाने केले जाण्याची गरज आहे. *उच्चार्थसाधक शंकरराव* (सासवड आश्रम विश्वस्त मंडळ, सासवड, जि. पुणे, १९७८) या ग्रंथात श्री. भाऊ धर्माधिकारी यांनी या संस्था, त्यांच्या स्थापनेमागील शंकररावांची दृष्टी व कार्यविषयक योजना, त्यांनी केलेले कार्य यांचा स्थूल परिचय दिला आहे.

आरंभीच्या काळात महाराष्ट्राच्या तीन विभागांपैकी मध्यविभागासाठी अखिल भारतीय चरखा संघाचे प्रतिनिधी म्हणून शंकररावांवर जबाबदारी टाकण्यात आली. ती त्यांनी अनेक वर्षे समर्थपणे पार पाडली. खादी कार्याच्या निमित्ताने प्रत्येक जिल्ह्यात कर्तबगार माणसे शंकररावांनी शोधली आणि जोडली. महाराष्ट्रात विधायक कार्य करण्यासाठी १९८१ साली महाराष्ट्र सेवा संघ स्थापन करण्यात शंकररावांची महत्त्वाची भूमिका होती. १९४८ नंतरच्या काळात महाराष्ट्र सेवा संघ ही गांधीजीप्रणीत रचनात्मक कार्य, विशेषतः खादीग्रामोद्योगाचे कार्य करणारी मध्यवर्ती संस्था राहिली आहे.

प्राचीन काळच्या ऋषींचे आश्रम, आश्रमीय जीवन व आध्यात्मिक साधना यांचे आकर्षण शंकररावांना तरुणपणापासून अखेरपावेतो होते. सासवड आश्रम या संस्थेची स्थापना १९३४ साली शंकररावांनी पुढाकार घेऊन केली. गांधीजींच्या विचार व कार्याला वाहून घेतलेल्या श्रीमती प्रेमा कंटक यांनी आरंभापासून त्यांच्या मृत्यूपर्यंत आश्रमाची धुरा समर्थपणे सांभाळली. उत्तर आयुष्यात शंकररावांनी काशीस 'साधना केंद्रा'ची सर्व सेवा संघाच्या विद्यमाने १९५९ साली स्थापना केली. या केंद्रामध्ये इतर परिवारांसह एक सामूहिक जीवन जगून 'वसुधैव कुटुंबकम्' हे वचन स्वतःच्या दैनंदिन जीवनात मूर्त करण्याची साधना सर्वोदयी कार्यकर्त्यांनी करावयाची शंकररावांची कल्पना होती. दादा धर्माधिकारी यांच्या भाषेत तीन-चार वर्षे "या प्रयोगात शंकररावांनी आपला सारा जीव ओतला". दिल्ली-पेकिंग मैत्री यात्रा हा १९६३ साली हाती घेतलेला आंतरराष्ट्रीय उपक्रमही शंकररावांच्या सामूहिक आध्यात्मिक साधनेचाच भाग होता, व याच भूमिकेतून या यात्रेचे त्यांनी प्रवर्तन केले होते.

वैचारिक प्रबोधन व जागृतीच्या उद्देशाने शंकररावांनी ज्या संस्था/उपक्रम राबविले – त्यात 'स्वराज्य' पत्र चालविणे, 'सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला' ही राष्ट्रवादी ध्येयनिष्ठ प्रकाशन संस्था नावारूपाला आणणे, *नवभारत* मासिकाचे चालकत्व स्वीकारणे, गांधी विचार परिषदेची स्थापना करणे, गांधी स्मारक निधीतर्फे वीस खंडांमध्ये 'गांधी विचार दर्शन माले'ची आखणी करणे, समाज प्रबोधन संस्थेच्या स्थापनेत पुढाकार घेणे, टिळक महाराष्ट्र विद्यापीठामध्ये भारतीय धर्म-तत्त्वज्ञान-संस्कृति मंडळाची सुरुवात करून देणे, यांचा समावेश होतो.

श्री. गोविंदराव कोरगावकर धर्मादाय संस्था व तिच्या अंतर्गत 'भ्रातृ सेवा संघ' यांच्या स्थापनेत व कार्यात शंकररावांची विशेष दृष्टी होती. कोल्हापूर येथील दानशूर व्यापारी (कै.) श्री. प्रभाकरपंत कोरगावकर यांनी त्यांच्या वडिलांच्या नावाने केलेल्या संपत्तिदानामधून ही संस्था स्थापन करण्यात आली. शिक्षणप्रसार, ग्रामीण जीवनाची पुनर्घटना, अस्पृश्योद्धार, आश्रमीय जीवनाची केंद्रे अशा विविध स्वरूपाची कामे संस्थेतर्फे करण्यात आली. ह्या सोबत या संस्थेतर्फे, समर्पित वृत्तीने एका उदात्त जीवननिष्ठेला अनुसरून कार्य करणाऱ्या समाजसेवकांना मानवेतन देणे, अशा समाजसेवकांचा एक भ्रातृ-संघ निर्माण करणे आणि विभिन्न विचारप्रणालींना अनुसरून महाराष्ट्रात राजकारण- समाजकारण करणाऱ्या व्यक्तींचे दरवर्षी संमेलन भरवून त्यावेळी सडेतोड पण स्नेहशीलवृत्तीने विचारविमर्श घडवून आणणे ही दोन कामेही करण्यात आली. शंकररावांच्या व्यक्तित्वाच्या सर्व पैलूंना सामावून घेऊन त्यानुसार विविधांगी कामांना चालना देणारी ही संस्था होती.

या अनेकविध संस्थांची स्थापना करतेवेळी, तसेच त्यांच्या कार्यासंबंधी वेळोवेळी शंकररावांनी त्यांचे मनोगत प्रकट करणारी अनेक पत्रे लिहिली. त्यातील काहींचा समावेश श्री. भाऊ धर्माधिकारी यांनी *उच्चार्थसाधक शंकरराव* या ग्रंथात केला आहे. शंकररावांची चौफेर दृष्टी, विचारांचा सर्वांगीणपणा व खोली, त्यांच्या मनाचा उदारपणा व सहिष्णुभाव, त्यांचे कर्तृत्व व संघटना-कौशल्य, महाराष्ट्रीय समाजाच्या सर्वांगीण उत्थानासाठीची त्यांची आंतरिक तळमळ व अविरत धडपड यांचे दर्शन त्या पत्रांमधून, प्रासंगिक निवेदनांमधून होते.

आणि या सर्व गोष्टी त्यांनी केल्या त्या काळात त्यांचे मुख्य कार्य वेगळे चालूच होते. १९२० ते १९५२ या काळात काँग्रेसच्या वेगवेगळ्या पातळ्यांवरील कार्याचा भार ते सांभाळीत होते. १९३७ नंतर काँग्रेसच्या वरिष्ठ नेतृत्वात त्यांचा समावेश होता. शेवटी चार वर्षे तर ते सरचिटणीस होते. १९५२ ते १९६४ पावेतो सर्वोदय चळवळीत ते पूर्णवेळ मोठ्या जबाबदारीची पदे सांभाळीत होते व नेतृत्वाचा भार पेलत होते.

* * *

शंकररावांच्या संचालकत्वाच्या काळातही *नवभारत* आर्थिक अडचणीत सापडले होते. गेले चार-पाच वर्षे *नवभारत*चे प्रकाशन वेगवेगळ्या कारणांनी अनियमित झाले होते. त्यात आर्थिक अडचण हा एक मोठा घटक आहेच. या कारणाने शंकररावांच्या जन्मशताब्दीचे वर्ष उलटून गेल्यावर आज या विशेषांकाच्या रूपात त्यांना आम्ही आदरांजली वहात आहोत, याची अपराधी जाणीव आमच्या ठायी आहे.

शंकररावांच्या षष्ट्यब्दीपूर्तीच्या प्रसंगी *नवभारत*ने भूदानयज्ञ आंदोलन विशेषांक प्रसिद्ध केला होता. त्या अंकात शंकररावांना जवळून ओळखणाऱ्या काही मान्यवरांचे व्यक्तित्वदर्शनपर लेख प्रसिद्ध झाले होते. त्यापैकी काही या अंकात समाविष्ट केले आहेत. त्यांच्या मृत्यूनंतर हमीद दलवाई यांनी *समाज प्रवोधन पत्रिके*मध्ये त्यांच्या खास शैलीत लिहिलेला एक छोटा लेखपण येथे समाविष्ट केला आहे. आचार्य दादा धर्माधिकारी यांनी *गांधीजी आणि लोकस्वराज्य* या शंकररावांच्या लेखसंग्रहास लिहिलेली प्रस्तावना म्हणजे शंकररावांच्या व्यक्तित्वाचे मार्मिक रसग्रहणच आहे. ती प्रस्तावनाही येथे पुनर्मुद्रित केली आहे.

या अंकासाठी प्रा. देवदत्त दाभोलकर यांनी शंकररावांच्या व्यक्तित्वाचा व चरित्राचा सहृदय पण तटस्थ वृत्तीने वेध घेणारा लेख खास लिहिला. श्रीमती वृंदा दाभोलकर व श्रीमती उषा पी. शरण (पूर्वाश्रमींच्या उषा मोहनी) शंकररावांसोबत भूदान/सर्वोदय कार्याच्या काळात स्वीय सचिव म्हणून राहिल्या होत्या. कुटुंबातले वडीलधारे माणूस म्हणून त्यांना शंकरराव कसे अनुभवाला आले त्याचे त्यांनी वर्णन केले आहे. *नवभारत*साठी आमच्या विनंतीला मान देऊन या सर्वांनी लेखन केले याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत.

शंकररावांनी स्वत:विषयी केलेले काही लेखन, त्यांची काही पत्रेही आम्ही पुनर्मुद्रित केली आहेत. श्री. भाऊ धर्माधिकारी शंकररावांचे दीर्घकाळ निकटवर्ती होते. मुख्यत्वेकरुन त्यांनी संपादित केलेल्या *उच्चार्थसाधक शंकरराव* या ग्रंथातून ती घेतली आहेत. श्री. भाऊ धर्माधिकारी व सासवड आश्रम ट्रस्ट यांचे आम्ही आभारी आहोत.

खुद्द शंकररावांनी *नवभारत* मधून जे विविध विषयांवर प्रसंगानुरूप लेखन केले त्यापैकी काही येथे संकलित केले आहे. महात्मा गांधींचे त्यांच्या जीवनातील स्थान अनन्यसाधारण होते. गांधीजींवरील चार टिपणवजा लेख येथे एकत्र केले आहेत. त्यांनी गांधींना कसे समजावून घेतले ते त्यामधून स्पष्ट होईल. लोकशाही, सर्वोदय, भूदानयज्ञ आंदोलन, अहिंसक क्रांती या विषयांवरील त्यांचे काही लेख, प्रा. अ.भि. शहा यांच्या विनोबाप्रणीत सर्वोदयाच्या विचारप्रणालीवरील आक्षेपांच्या प्रत्युत्तराच्या ओघात शंकररावांनी विज्ञानवादी-इहवादी जीवनदर्शनाची चिकित्सा करणारी प्रसिद्ध केलेली लेखमाला, आणि भगवद्गीतेवरील लोकमान्य टिळक, श्री. अरविंद व महात्मा गांधी यांच्या भाष्यांची तौलनिक समीक्षा करणारी लेखमाला यांचाही या अंकात समावेश केला आहे. शंकररावांच्या विचारव्यूहाचे पुरेसे चित्र या सर्व लेखनामधून वाचकांसमोर येईल असा विश्वास वाटतो.

*साध्य आणि साधने* हा शंकररावांचा तत्त्वविवेचनात्मक ग्रंथ आहे. त्याचा परामर्श घेतल्याशिवाय शंकररावांना वाहिलेल्या *नवभारत*च्या विशेषांकाला पूर्णता आली नसती. 'संपादकीया'च्या रूपाने शंकररावांच्या या ग्रंथाची आम्ही प्रकाशित केलेली समीक्षा जिज्ञासू वाचकांना शंकररावांचा हा मूळ ग्रंथ व इतरही त्यांचे लेखन अभ्यासण्यास प्रवृत्त करील असा विश्वास आम्ही बाळगतो.

* * *

या विशेषांकाची देखणी अक्षरजुळणी व छपाई 'मुद्रा'चे श्री. सुजित पटवर्धन व त्यांचे सहकारी यांच्या सहकार्याने होऊ शकली. त्यांचेही आभार.

*– मे.पुं. रेगे*

# शंकरराव देवांचा साध्यविचार : प्राथमिक चर्चा

मे.पुं. रेगे

कै. शंकरराव देव हे निष्ठावान गांधीवादी कार्यकर्ते म्हणून प्रसिद्ध होते. त्यांच्या निष्ठेचा जसा कस लागला तसा फारच थोड्यांच्या निष्ठेचा लागला असेल. पूर्णपणे समर्पित असे जीवन ते जगले. पण कार्यकर्ते म्हणून जरी ते पहिल्या रांगेतले होते; तरी, गांधीवादी विचारवंत म्हणून त्यांची ओळख नव्हती. आचार्य स.ज. भागवत, आचार्य शं.द. जावडेकर आणि दादा धर्माधिकारी ह्यांची नावे गांधीवादी विचारवंत म्हणून लोकांनी घेतली असती. पण त्यांचे *साध्य आणि साधने** हे पुस्तक जर कुणी वाचले, तर देव हे केवळ कार्यकर्ते नव्हते, तर आपण नेमके काय करीत आहोत, त्याच्या प्रामाण्याचे, मूल्याचे अधिष्ठान काय आहे हे गंभीरपणे आणि तपशीलात जाऊन तपासणारे चिंतनशील विचारवंत होते हे त्याला सहज आढळून येईल.

ह्या लेखात मी ह्या पुस्तकाचे परीक्षण केलेले नाही. एका लेखाच्या आवाक्यापलीकडचा तो विषय आहे. पण साध्याविषयीच्या त्यांच्या विचारांची प्राथमिक चर्चा मी केली आहे.

देवांना अभिप्रेत असलेले हे साध्य काय आहे? देवांच्या शब्दांत ते असे आहे:

"सर्वात्यैकसिद्ध ऋषीच्या पवित्र व प्रेमळ अंतःकरणातून सर्व प्राणिमात्रांबद्दल मैत्री-भावना प्रगट" करणाऱ्या पुढील प्रार्थनेत ते प्रकट झाले आहे :

सर्वेऽत्र सुखिनः सन्तु। सर्वे सन्तु निरामयाः।।
सर्वे भद्राणि पश्यन्तु। मा कश्चिद् दुःखमाप्नुयात्।।

हेच साध्य ज्ञानेश्वरीतील प्रसिद्ध पसायदानात मूर्त झाले आहे आणि रामराज्याच्या कल्पनेत त्याचाच आविष्कार झाला आहे असे त्यांचे म्हणणे आहे. 'रामराज्य म्हणजे राम या खास व्यक्तीचे राज्य अशी मूळ कल्पना नाही. रामराज्य या शब्दाने एका विशिष्ट आदर्श समाजरचनेचा बोध होतो.' (पृ. ३). ह्या समाजरचनेचे सार पुढील श्लोकात येते :

संतुष्टाः सर्वसिद्धार्था निर्भयाः स्वैरचारिणः।
नराः सत्यव्रताश्चासन् रामे राज्ये प्रशासति।।

सर्व लोक स्वैराचारी होते. म्हणजे दण्डशक्तीचा वापर करून त्यांना सन्मार्गावर ठेवणारी शासनव्यवस्था समाजात नव्हती. तिची आवश्यकता नव्हती. कारण, लोक आत्मशासक होते; ते सत्यव्रत होते. म्हणजे धर्माला अनुसरून नित्य वागणारे होते. त्यामुळे कुणाला इतरांपासून भय नव्हते; ते निर्भय होते, आणि सर्वसिद्धार्थ होते. सर्व पुरुषार्थांची त्यांना प्राप्ती होत असे व त्यामुळे ते तृप्त होते.

तेव्हा पूर्णपणे सुसंवादी, न्यायी पण न्यायाच्या पलीकडे असलेल्या बंधुभावावर किंवा आत्मौपम्य वृत्तीवर आधारलेला, ज्यातून शासनव्यवस्था गळून पडली आहे असा समाज असे ह्या साध्याचे थोडक्यात वर्णन करता येईल.

प्राचीन काळी हे साध्य म्हणून स्वीकारले गेले असो, नसो आदर्श समाजाचे रूप असे असते ही सर्वमान्य कल्पना होती. आधुनिक काळात आदर्श समाजाची जी कल्पना मार्क्सवादाने मांडली तिचा तोंडवळा आणि आशय असाच आहे हे देवांनी दाखवून दिले आहे. लेनिनचे पुढील दोन उतारे ते ह्या संदर्भात उद्धृत करतात :

"सामाजिक व्यवहाराच्या ज्या आधारतत्त्वांचा आज शेकडो, हजारो वर्षांपासून धर्मप्रवचनातून केवळ वाचिक उपदेश केला जात आहे, त्या तत्त्वांप्रमाणे वागण्याची सवय शनैः शनैः या आदर्श समाजातील लोकांना लागेल. त्यांचे श्रम इतके सहाय्यक होतील की ते स्वेच्छेने, स्वतःच्या शक्तीप्रमाणे काम करतील... सामुदायिक श्रमाने निर्माण केलेली संपत्ती प्रत्येकाला त्याच्या श्रमांच्या प्रमाणात विभागून देण्याची जरुरी उरणार नाही. प्रत्येकजण आपल्या गरजेप्रमाणे घेण्यास स्वतंत्र राहील. अशा समाजात व्यक्तीचा विकास समाजाच्या सुखासाठी केलेल्या सेवेतून होईल."

आणि

"साम्यवादी समाजव्यवस्थेत भांडवलशाहीने केलेला प्रतिक्रियात्मक विरोध मोडून काढण्यात आला आणि भांडवलदार वर्ग नाहीसा झाला, समाजातील वर्गसंस्था लुप्त झाली म्हणजेच सरकार ह्या संस्थेचा अस्त होतो व खऱ्या स्वातंत्र्यसूर्याचा उदय

---

* *साध्य आणि साधने* : लेखक : शंकरराव देव, प्रकाशक : सासवड आश्रम ट्रस्ट, १९८४, मूल्य रु. ४०.

अनुक्रमणिका

होतो. मगच निरपवाद लोकशाहीची सत्यार्थाने प्रस्थापना होईल व अखेर समाजातील सर्व स्त्री-पुरुष स्व-तंत्र झाल्यामुळे या लोकशाहीचेही काही काम न राहिल्यामुळे ती अंतर्धान पावेल."

तेव्हा आदर्श आणि साध्य म्हणून स्वीकारण्यात आलेल्या साम्यवादी समाजव्यवस्थेत शासन किंवा सरकार असे काही असणार नाही, पण असा समाज पूर्णपणे सुसंवादी असेल, प्रत्येक जण अंतःप्रेरणेने इतरांशी सहकार्य करील आणि समाजाची धारणा करीत असताना स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास आणि मुक्त आविष्कार साधेल.

प्राचीन किंवा भारतीय आदर्श आणि आधुनिक मार्क्सवादी आदर्श ह्यात बरेच साम्य असले तरी, एक महत्त्वाचा भेद आहे हे ध्यानात घेतले पाहिजे. प्राचीन आदर्शात धर्म हे मध्यवर्ती तत्त्व आहे. धर्म म्हणजे व्यक्तीने समाजाच्या संदर्भात आणि विश्वाच्या संदर्भात जे आचरण करणे योग्य आहे ते आचरण. जेव्हा सर्वजण अंतःस्फूर्तीने धर्माचे पालन करतात, तेव्हा समाजात सुसंवाद असतो. प्रत्येकाला धर्माशी सुसंगत असलेल्या अर्थ-काम ह्या पुरुषार्थांची प्राप्ती होते आणि सर्वजण 'संतुष्ट, सर्वसिद्धार्थ' असतात, पण जेव्हा काही कारणाने माणसांत अर्थ-कामाविषयीचा मोह निर्माण होतो, तेव्हा माणसांची वृत्ती द्विधा बनते, धर्म आणि अर्थ-काम ह्यात द्वंद्व उभे रहाते आणि धर्माचे नेहमीच पालन होते असे नाही. अशा स्थितीत लोकांना धर्माचे आचरण करायला भाग पाडण्यासाठी दंडशक्तीचा वापर होणे इष्ट ठरते. पारंपरिक हिंदू सिद्धांताप्रमाणे धर्माचा क्रमाने अधिकाधिक लोप होत जातो. 'कृत, त्रेता, द्वापर व कली ही चार युगे समाप्त झाली म्हणजे पुन्हा सत्ययुगाचा (कृतयुगाचा) उदय होतो' असे हे कालचक्र फिरत रहाते.

एक प्रश्न उपस्थित करणे आवश्यक आहे. सत्ययुगातील समाजस्थिती आदर्श असली तरी, ती साध्य आहे असे परंपरेत मानले गेले आहे का? म्हणजे माणसांनी प्रयत्न करून जी घडवून आणावी, सिद्ध करावी अशी ती आहे असे मानण्यात आले आहे का? ह्याचे उत्तर नकारार्थी द्यावे लागेल. व्यक्तीची स्वतःची प्रकृती व समाज आणि विश्व यांतील तिचे स्थान ह्यावर व्यक्तीचा धर्म अवलंबून असतो, ह्यांनी तो निश्चित होतो हे सत्य आहे; पण व्यक्तीच्या स्वतःच्या जबाबदारीची व्याप्ती स्वतःचा धर्म कोणत्याही परिस्थितीत परिपूर्णतेने पाळणे एवढ्यापुरतीच आहे. अशा रीतीने वागण्याचा प्रयत्न करणाऱ्या व्यक्तीच्या उदाहरणाने आणि उपदेशाने इतर काही माणसे धर्म पाळायला अधिक प्रमाणात प्रवृत्त होतील ही शक्यता अर्थात आहेच; पण त्रेतायुगात जेव्हा धर्म तुलनेने क्षीण आणि शबल झालेला असतो, तेव्हा प्रयत्न करून शुद्ध धर्माची सवंध समाजात पुनः स्थापना करणे, सत्ययुग पुन्हा प्रस्थापित करणे हे व्यक्तीचे (किंवा व्यक्तीसंघाचे) ध्येय, साध्य नसते, ही तिची (किंवा त्याची) जबाबदारी नसते. ही तिच्या सामर्थ्यापलीकडची गोष्ट आहे. सत्ययुगाची पुनःस्थापना कालक्रमाने घडून येईल, आणि येईलच; पण व्यक्तीची जबाबदारी स्वतःचे आचरण शक्य तितक्या प्रमाणात शुद्ध धर्माशी सुसंगत असे असेल हे पहाण्यापुरती असते.

पण देवांची भूमिका वेगळी आहे. ते म्हणतात, "... पुन्हा सत्ययुगाचा उदय होणार आहे हे लक्षात ठेवणे जरूर आहे. या दृष्टीने प्रयत्नाला देव मानून सत्ययुगाच्या स्थापनेसाठी प्रयत्न करणे योग्य होईल". म्हणजे

संतुष्टाः सर्वसिद्धार्था निर्भयाः स्वैरचारिणः।

नराः सत्यव्रताश्चासन्...

(लोक संतुष्ट, ज्यांनी सर्व पुरुषार्थ सिद्ध केले आहेत असे, निर्भय, अंतःप्रेरणेने वागणारे व सत्यव्रत असे जे होते) ती परिस्थिती प्रयत्नसाध्य असून ती परत निर्माण करण्याचा यत्न करीत रहाणे हे सर्वांचे कर्तव्य आहे. येथे अर्थात देव परंपरेला 'आधुनिक' वळण देत आहेत.

ह्या संदर्भात दुसरा एक मुद्दा देव मांडतात. समाजातील सर्व व्यक्ती अंतःप्रेरणेने आणि पूर्ण सुसंवादाने एकमेकांशी वागतात ही परिस्थिति कशी काय शक्य होते? देव म्हणतात, "अशा प्रकारचे उच्च कोटीचे स्वातंत्र्य, सहकार्य व संवादित्व समाजात तेव्हाच नांदू शकेल, जेव्हा त्या समाजातील व्यक्तींचा परस्परांबरोबरचा व्यवहार शुद्ध प्रेमाच्या पायावर चालेल". (पृ. ७). असे शुद्ध प्रेम म्हणजे परस्परांविषयीचा बंधुभाव होय असे कुणी मानेल, पण बंधुभाव पुरेसा नाही असे देवांचे म्हणणे आहे. बंधुभावात "द्वैत गृहीत असल्यामुळे त्यात एक मोठा दोष व धोका आहे. जेथे द्वैत आहे, तेथे भय आहे व भयांतूनच संघर्ष निर्माण होतो. भाऊ एकमेकांवर प्रेम करतात हे खरे पण ते एकमेकांचा द्वेष करतात हेही तितकेच खरे... तेव्हा जगात प्रेम व शांती स्थापावयाची तर मानवाला बंधुत्वाच्या द्वैतभावनेतून पार एकत्वाच्या भावनेत गेले पाहिजे, आणि या दृष्टीने हिंदुधर्मातील अद्वैत वा आत्म्याचे एकत्व सर्वश्रेष्ठ व सर्वोपयोगी ठरते... सर्व लोक आपल्यांत आणि आपण सर्व लोकांत ही भावना ज्या पुरुषात दृढ झाली त्याच्या बाबतीत स्वार्थ व परार्थ असे दोन अर्थ उरतच नाहीत... 'तू आपल्या शेजाऱ्यावर आपल्याप्रमाणेच प्रीती कर' किंवा 'लोकांनी आपणाशी जसे वागावे असे आपणास वाटते तसे आपण त्यांच्याशी वागले पाहिजे' या व यासारख्या ख्रिस्ताच्या आज्ञा अथवा महाभारतातील –

'यदन्यैर्विहितं नेच्छेदात्मनः कर्म पूरुषः ।
न तत्परेषु कुर्वीत जानन्नप्रियमात्मनः ।।'

हा उपदेश या आत्मौपम्य दृष्टीचेच एक अंग (आहे.)" (पृ. ७-९) पण एवढेच नव्हे. "आपणास जे वर्तन दुःखकारक तेच दुसऱ्यांना दुःखकारक म्हणून आपण दुसऱ्याशी दुःखदायक वर्तन करू नये हे बोलूनचालून नकारात्मक तत्त्व आहे. म्हणून ते आदर्श समाजातील लोकव्यवहाराचे नियामक असू शकत नाही. आपल्याला जे सुखकारक वाटते तेच लोकांना सुखकारक होईल म्हणून लोकांना जो व्यवहार सुखकारक होईल तोच व्यवहार आपण केला पाहिजे ह्या भावरूप तत्त्वाचे अधिष्ठान त्यांच्या व्यवहाराला असले पाहिजे." (पृ. ९-१०)

देव आणखी म्हणतात, "यावरून दुसरी एक गोष्ट आपोआपच सिद्ध होते. ती ही की, या आदर्श समाजातील आदर्श पुरुष... 'यत्र वा अस्य सर्वात्मैवाभूत्' (हे सर्व म्हणजे आपला आत्माच आहे अशी ज्याची स्थिती आहे असा)... या कोटीचा असला पाहिजे. ज्या समाजात असे पुरुष जितके अधिक तितका तो समाज आदर्शावस्थेच्या नजीक जाईल व त्याची ही आदर्शावस्था अधिक टिकेल." (पृ. ९) तेव्हा देवांची भूमिका काहीशा वेगळ्या रीतीने अशी मांडता येईल : स्वार्थ आणि परार्थ हा भेद पुसून टाकून सर्वांचे कल्याण साधण्यासाठी समबुद्धीने झटणे ही खरी नीती होय. ज्याची दृष्टी अद्वैतात स्थिर झाली आहे, व म्हणून जो आत्मौपम्य बुद्धीने जगतो त्यालाच ही नीती पाळता येणे शक्य असते आणि अशा रीतीने जगणे हा त्याच्या ह्या वृत्तीचा स्वाभाविक आविष्कार असतो. अशा माणसांचा बनलेला समाज हा आदर्श समाज असतो आणि असा समाज – संतुष्ट, सर्वसिद्धार्थ, निर्भय, 'स्वैरचारी', सत्यव्रत माणसांचा समाज – आपल्या प्रयत्नांनी सिद्ध करणे आणि सिद्ध झाल्यावर टिकवून धरणे हे माणसांचे परमसाध्य आहे.

देवांनी याज्ञवल्क्याचे वचन उद्धृत केले आहे : "यत्र वा अस्य सर्वमात्मैवाभूत् तत्... केन कं मन्वीत, तत्केन कं विजानीयात्?" ह्याचा नेहमीचा अर्थ असा की, हे जे सर्व आहे तो मीच आहे अशी ज्याची दृष्टी झाली आहे तो लौकिक अनुभवापलीकडे गेलेला असतो. अनेक पदार्थ आहेत, अनेक जीवात्मे आहेत, त्यांतील मी एक आहे, ह्या सर्वांच्या सुखदुःखमय अशा भिन्न अवस्था आहेत, त्यांच्यापासून मला माझी साध्ये प्राप्त होतात, योग्य ती कर्मे करून ही साध्ये मी सिद्ध करतो, असे करणे हे माझे कर्तव्य आहे असे जे जगाविषयीचे आणि स्वतःविषयीचे आपले दर्शन असते त्याच्या पलीकडे अद्वैती गेलेला असतो. अस्तित्व आणि नाश, सुख आणि दुःख अशा सर्व द्वंद्वांपलीकडचा, शुद्ध एकतेचा, आनंदमय असा अनुभव हे त्याचे नित्य स्वरूप असते. तो मुक्त असतो. साध्ये आणि कर्तव्ये ह्यांच्या पलीकडचे असे त्याचे अस्तित्व असते.

असा अनुभव, अशी अवस्था असते असे देव मानतात की नाही ह्याचा विचार येथे करायचे कारण नाही. प्रस्तुत विवेचनात त्याचा ते निर्देश करीत नाहीत. अद्वैती दृष्टीचा माणूस म्हणजे आपण आणि इतर यांच्यातील भेद जो मानीत नाही, जे इतर म्हणून भासतात ती आपलीच रूपे आहेत, ते म्हणजे आपणच आहोत असे जो मानतो असा माणूस. भिन्न माणसांची, त्यांच्या भिन्न अवस्थांची जाणीव त्याला असते; पण त्याबरोबरच ही भिन्न माणसे म्हणजे आपणच आहोत अशी जाणीवही त्याला असते; तो भेदांच्या पलीकडे गेलेला नसतो. भेदांच्या जगात राहून त्याने भेदांचे निरसन केलेले असते. भेद असून नसल्यासारखे असतात. तो अर्थ-साधनेपलीकडे गेलेला नसतो. त्याला स्वार्थही असतो आणि परार्थही असतो. पण त्याच्या दृष्टीने परार्थ हे स्वार्थाचेच रूप असते. म्हणून ज्या स्वाभाविकपणे, 'रागतः' तो स्वार्थ साधतो त्याच स्वाभाविकपणे तो परार्थ साधतो, किंवा अधिक नेमकेपणे बोलायचे तर सर्व भूतांचे हित, ती आपलीच रूपे आहेत हे जाणून तो समबुद्धाने साधीत असतो आणि सर्व भूतातील एक ह्या नात्याने ह्यातून त्याचेही हित साधले जाते. रागतः आपले हित साधणे आणि कर्तव्यबुद्धीने इतरांचे हित साधणे हा भेद त्याच्याबाबतीत उरलेला नसतो.

पारंपरिक अद्वैती आध्यात्मिक विचाराला देव एक कलाटणी देत आहेत असे दिसते. सर्व भेदांच्या पलीकडे असलेली केवल अवस्था हे पारंपरिक दृष्टीने परम सत्य आहे आणि अशी अवस्था प्राप्त करून घेणे हे परम साध्य आहे. हे सत्य आणि साध्य देव स्वीकारतात की नाही ही गोष्ट येथे अस्पष्ट रहाते. जे परमसत्य ते येथे घोषित करतात ते हे की, आपण म्हणजे परमात्माच आहोत आणि इतर सर्व ही परमात्म्याची, म्हणजे आपलीच रूपे आहेत. तेव्हा एका दृष्टीने भेद राहतात आणि एका दृष्टीने त्यांचे निरसन झालेले असते. हेगेलच्या पद्धतीने हे असे मांडता येईल : (आपल्याहून) इतर पण जो वेगळा/कुणी नसतो; (ॲन् अदर व्हू इज नॉट ॲनादर). ह्यामुळे ह्या परम सत्याच्या चौकटीत भिन्न जीवात्मे आणि त्यांच्या भिन्न अवस्था राहतात, आणि त्यापासून आपल्याला आपली साध्ये मिळतात. उदा., आजारी माणसावर उपचार करणे, लहान मुलाला शिकविणे, इ. पारंपरिक अद्वैताप्रमाणे ज्याला केवल अनुभव प्राप्त झाला आहे असा माणूस कर्तव्याच्या पलीकडे जातो. देवांना अभिप्रेत असलेला सिद्ध नेहमीच कर्तव्याच्या परीघात रहातो, पण सिद्ध








आणि साधक यांच्यांत कर्तव्यबुद्धीच्या संदर्भात एक फरक असतो. मूलभूत नैतिक नियम असा मांडता येईल : स्वतःचे इष्ट साधताना सर्व माणसांच्या (अधिक व्यापक दृष्टीने भूतमात्रांच्या) समान कल्याणाला समान महत्त्व दिले जाईल अशा रीतीने ते साधले गेले पाहिजे. साधकाला हा नियम जाणीवपूर्वक मनात बाळगून आपल्या इच्छावासनांना आवर घालावा लागतो; जे करावेसे वाटत नाही ते करायला स्वतःला उद्युक्त करावे लागते. साधक ह्या नियमाच्या अधिपत्याखाली असतो. सिद्ध, म्हणजे आत्मौपम्य दृष्टीत जो स्थिर झाला आहे, असा माणूस उत्स्फूर्तपणे, स्वयंप्रेरणेने ह्या नियमाला अनुसरून वागतो. ही त्याची स्वभाववृत्ती झालेली असते. ह्या नियमाचे बंधन त्याच्यावर नसते; पण त्याच्या मुक्त विहारात हा नियम पाळला जात असल्याचे दिसून येते. तेव्हा 'कर्तव्य' ह्या संकल्पनेत जी बंधनकारकता अंतर्भूत असते तिचा अभाव सिद्धाच्या संदर्भात असला तरी, कर्तव्य केले जाण्यात 'जे घडणे योग्य होते ते घडले' हा जो आशय आहे तो सिद्धाच्या आचरणात मूर्त झालेला असतो.

सारांश, देव सकृद्दर्शनी तरी पारंपरिक भारतीय अद्वैती विचारात दोन अंगांनी बदल करतात. एक, अद्वैती सिद्धाला ते अखेरपर्यंत कर्तव्याच्या परीघात ठेवतात. दोन, अशा सिद्धांचा बनलेला समाज स्थापन करणे हे मानवी साध्य आहे आणि म्हणून तो स्थापन करण्याचे प्रयत्न करीत रहाणे ही माणसांची नैतिक जबाबदारी आहे ही भूमिका ते स्वीकारतात.

'अर्वाचीनांची आदर्श समाजाची कल्पना' असे जिचे देव वर्णन करतात ती आपण वर म्हटल्याप्रमाणे आणि त्यांनीच दाखवून दिल्याप्रमाणे मार्क्सप्रणीत कल्पना आहे. ती अर्वाचीनांची प्रातिनिधिक कल्पना आहे असे म्हणता येणार नाही. सत्ययुगातील समाज ही प्राचीन भारतीयांची प्रातिनिधिक कल्पना होती, पण असा समाज हे मानवी साध्य आहे आणि ते सिद्ध करण्याचे प्रयत्न करणे हे माणसांचे कर्तव्य अशी कल्पना नव्हती. अर्वाचीन काळात आणि प्राचीन काळातही आदर्श मानवी समाजाची अनेक काल्पनिक चित्रे (युटोपिआ) रंगविण्यात आली आहेत. प्लेटोचे *रिपब्लिक* हा कदाचित् सर्वात परिचित असा युटोपिआ आहे. भांडवली अर्थव्यवस्थेत जी निर्घृणता, नैतिक कोडगेपणा, दारिद्र्य, माणसांचे अमानुषीकरण इ. आढळून येतात त्यांना विटलेल्या अनेकांनी 'समाजवादी' युटोपिआ रंगाविलेले आहेत; पण हे युटोपिआ साध्ये म्हणून मांडलेली किंवा स्वीकारलेली नसतात. माणसांच्या ज्या आकांक्षा, प्रेरणा, गरजा, इ. ह्यांना वास्तव समाजव्यवस्थेत वाव लाभत नाही त्यांची परिपूर्ती एका काल्पनिक समाजात करण्यात आलेली असते. ह्याबरोबरच प्रत्यक्ष अस्तित्वात असलेल्या समाजव्यवस्थेचे मूल्यमापन करणारे मानदंड असेही त्यांचे स्वरूप आणि स्थान असू शकते.

पण मार्क्सप्रणीत साम्यवादी समाज हा त्याच्या दृष्टीने युटोपिआ नाही. असा समाज म्हणजे मानवी इतिहासाची अनिवार्य अशी फलश्रुती आहे; ते मानवी इतिहासाचे पूर्ण साफल्य आहे; पण ह्याबरोबरच ते माणसाचे साध्यही आहे. ते सिद्ध करणे ही माणसांवर सोपविण्यात आलेली इतिहासदत्त अशी कामगिरी आहे; विशेषतः श्रमजीवी वर्गावर सोपविण्यात आलेली, आणि ती पार पाडण्यात तो अटळपणे यशस्वी होणार आहे.

ह्या सिद्धांतामागे मार्क्सने मानवी प्रकृतीविषयी स्वीकारलेले एक गृहीत आहे. माणसाची, एक प्रकारचा प्राणी असलेल्या माणसाची एक विशिष्ट प्रकृती आहे. ह्या प्रकृतीला एक सामाजिक अंग असते. किंवा अधिक यथार्थपणे बोलायचे तर मानवी प्राण्याची, व्यक्तीची विशिष्ट प्रकृती सामाजिक-वैयक्तिक अशी असते. सामाजिकता ही मानवी व्यक्तीच्या प्रकृतीत भिनलेली असते. ह्याबरोबरच अनेक शारीरिक-मानसिक गरजा, प्रेरणा, कौशल्ये, शक्ती ह्यांनी ही प्रकृती घडलेली असते. ह्या प्रकृतीच्या मुक्त आविष्कारात चांगले मानवी जीवन सामावलेले असते; पण येथे इतर प्राणी आणि माणूस ह्यांच्यामधील एक मूलगामी फरक ध्यानात घेतला पाहिजे. एखादा कुत्रा किंवा घोडा घेतला तर जेव्हा त्याची पूर्ण वाढ झालेली असते तेव्हा त्याची स्वतःची, त्या प्रकारचा प्राणी म्हणून असलेली विशिष्ट प्रकृती पूर्णपणे प्राप्त झालेली असते व कुत्रा किंवा घोडा म्हणून त्याचे जे जगणे असते त्यात ती व्यक्त होत असते. पण माणूस स्वतःची प्रकृती इतिहासात विकसित करून, सिद्ध करून प्राप्त करून घेत असतो. एका बाजूने ही प्रकृती त्याला लाभलेली असते. दुसऱ्या बाजूने तिचा इतिहासाद्वारा विकास घडवून आणून त्याला ती साधावी लागते.

माणसाच्या सामाजिकतेमुळे माणूस नेहमी समाज करून रहातो. आदिम मानवी समाजात माणसाची प्रकृती त्याच्या सामाजिकतेत सुप्त किंवा लुप्त असते; विशिष्ट, स्वतंत्र व्यक्ती असे आपले स्वरूप आहे ही जाणीव माणसांना नसते. पण ह्यामुळे आदिम समाजात (भेदांच्या अलिकडचा असा) सुसंवाद असतो. हा मानवी इतिहासाचा प्रारंभ आहे. माणसाचे वैशिष्ट्य असे की, प्राणी म्हणून त्याच्या ज्या गरजा-वासना असतात त्यांचे समाधान योग्य त्या भौतिक वस्तूंचे उत्पादन करून तो करतो, आणि हे उत्पादन करण्यासाठी उत्पादन-साधनांची निर्मितीही करतो. ह्यातून मानवी इतिहासाच्या प्रक्रियेला प्रारंभ होतो. ह्या प्रक्रियेचा तपशील, तिचे अनेक टप्पे ह्यात येथे शिरायचे कारण

नाही. स्थूलमानाने असे म्हणता येईल की, जेव्हा उत्पादन-साधनांच्या साहाय्याने उत्पादनाला सुरूवात होते, तेव्हा समाजाचे दोन मुख्य वर्गांत विभाजन होते. उत्पादन-साधनांची मालकी ज्याच्याकडे आहे असा मालक-वर्ग आणि ज्याच्याकडे अशी मालकी नसते पण जे उत्पादन-साधनांच्या साहाय्याने श्रम करून उपभोग्य वस्तूंचे उत्पादन करीत असतो असा श्रमजीवी वर्ग. ह्या वर्गाने उत्पादन केलेल्या वस्तूंची मालकी मालक-वर्गाकडे जाते. श्रमजीवी वर्गाला फक्त देहधारणापुरता वाटा उत्पादित वस्तूंमध्ये मिळतो. वर्गीय समाजव्यवस्था अशा शोषणावर आधारलेली असते. आदिम समाजात मानवी जाणीव जरी अस्पृष्ट असली तरी समग्र, अखंड असते आणि म्हणून अशा समाजात सुसंवाद, सामंजस्य असते. वर्गीय समाजात माणसांची जाणीव ते ज्या वर्गाचे असतात त्याने निश्चित झालेली असते. ती वर्गीय जाणीव असते व म्हणून खंडित आणि त्यामुळे विकृत असते. भिन्न वर्गांची व्यवस्था असे समाजाचे रूप बनते. हे वर्ग केवळ भिन्न नसतात. ते परस्परविरोधी असतात; त्यांच्यामधील नाते हे कलहाचे, विग्रहाचे नाते असते. कारण शोषक-शोषित ह्या स्वरूपाचे ते नाते असते. पण ह्याबरोबरच वर्गीय समाजाला एक विधायक, भावात्मक बाजूही असते. त्याच्यात पूर्वीपेक्षा तुलनेने अधिक समर्थ अशा उत्पादन-साधनांचा वापर होत असल्यामुळे उत्पादन वाढलेले असते. ह्यातील मुख्य वाटा जरी मालक-वर्गाकडे जात असला तरी, श्रमजीवी वर्गालाही त्याच्यात काही वाटा मिळतो. ह्यामुळे सबंध समाजाची जीवनधारणा तुलनेने अधिक चांगली होते.

मानवी अस्तित्व हे नेहमी शारीरिक-मानसिक असे दुहेरी असते. विश्वाविषयीच्या आणि माणसाविषयीच्या संकल्पना, नैतिक व धार्मिक-आध्यात्मिक मूल्ये, सौंदर्यात्मक आदर्श, कायदे, सुसंस्कृतपणाचे आदर्श इत्यादींतून आणि त्यांना अनुसरून होणारा सामाजिक-सांस्कृतिक व्यवहार ह्यात हे मानसिक अस्तित्व मूर्त झालेले असते. ह्या मानसिक निर्मितीला विचारप्रणाली (आणि तिला अनुसरून होणारा व्यवहार) म्हणूया. वर्गीय समाजात निर्माण करण्यात आलेली आणि स्थिर झालेली विचारप्रणाली ही त्या समाजात प्रभुत्वाच्या स्थानी असलेल्या मालकवर्गाच्या हितसंबंधांशी सुसंगत आणि त्यांना पोषक अशी असते. पण काही काळ तरी हे हितसंबंध सबंध समाजाच्या हिताशी जुळणारे असल्यामुळे ती सबंध समाजाकडून प्रमाण म्हणून स्वीकारली जाते. पण जेव्हा मालकवर्ग आणि इतर समाज, विशेषतः श्रमजीवी वर्ग ह्यांच्या हितसंबंधातील विरोध स्पष्ट होऊ लागतो, तेव्हा ती सबंध समाजावर लादावी लागते. विशेषतः शासनव्यवस्था किंवा सरकार हे प्रभू-वर्गाच्या हातातले अशी दडपशाही करण्याचे प्रमुख साधन असते. वर्गीय समाजात कधी ना कधी श्रमजीवी वर्गाचा प्रचलीत व्यवस्थेला असलेला विरोध प्रकट होऊ लागतो व तो सरकारकडून दडपला जातो. तेव्हा वर्गीय समाज हा नेहमी हिंसेवर आधारलेला समाज असतो. ह्या हिंसेचे मूळ शोषणात असते आणि त्याला होणारा प्रतिकार आणि प्रतिकाराची दडपणूक असे ह्या हिंसेचे स्वरूप असते. शोषितांची हिंसा ही शोषण आणि अन्याय ह्यांच्या विरुद्ध असहाय्यतेने केलेल्या प्रतिषेधाच्या स्वरूपाची असते, तर शोषकांची हिंसा ही अन्यायाच्या संरक्षणासाठी केलेली आक्रमक हिंसा असते.

इतिहासाच्या अखेरच्या टप्प्यावर समाजात अजस्र यंत्रांच्या साहाय्याने करण्यात येणारे प्रचंड प्रमाणावरील उत्पादन होत असते. मूठभर भांडवलदार वर्गाची ह्या उत्पादनसाधनांवर मालकी असते. ह्याशिवाय समाजात एकच वर्ग उरलेला असतो आणि तो म्हणजे स्वतःच्या श्रमशक्तीशिवाय दुसरे कोणतेही उत्पादन-साधन ज्यांच्याजवळ नसते असा अफाट श्रमजीवी वर्ग. कामगारांना जगण्यासाठी आणि प्रजोत्पादन करून वृद्ध कामगारांच्या जागी तरुण कामगार उपलब्ध करून देण्यासाठी जेवढे आवश्यक आहे तेवढे वेतन मालकवर्ग देतो. उरलेले उत्पादन तो बळकावतो आणि ह्यातून त्याचा नफा त्याला मिळतो. पण ह्या रचनेत एक अंतर्विरोध आहे. कारण, कामगार-वर्ग बहुसंख्य असतो. जे प्रचंड उत्पादन होत असते ते कुणीतरी विकत घेतल्याशिवाय मालक-वर्गाला त्याचा नफा मिळणार नसतो. हे ग्राहक म्हणजे कामगार पण ते दारिद्र्याच्या सीमेवर जगत असल्यामुळे त्यांच्याकडे क्रयशक्ती नसते. उत्पादित माल पडून रहातो. मालकांना नफा मिळत नाही आणि उत्पादन हे मालकांच्या नफ्यासाठी होत असल्यामुळे ते कुंठित होते.

ह्या परिस्थितीत कामगार वर्ग उठाव करतो, सरकारी पोलीस आणि सैन्य हे आता कामगारवर्गाचा भाग झाल्यामुळे त्याच्या बाजूचे असते, त्यामुळे उठाव यशस्वी होतो, कामगार वर्ग राजकीय सत्ता काबीज करतो व आपल्या हाती घेतो, उत्पादनाची साधने (कारखाने इ.) मालकवर्गाकडून हिसकावून घेऊन समाजाच्या मालकीची करतो. ही इतिहासातील अखेरची क्रांती होय. आता, मूठभर भांडवलदारवर्गाचा अवशेष सोडला तर समाजात एकच वर्ग उरलेला असतो. म्हणजे समाजाचे वर्गीय विभाजन संपुष्टात आलेले असते. समाजात वर्गच उरलेला नसतो. वर्गीय समाजाचा अंत झालेला असतो. ह्यापुढे उत्पादन हे भांडवलदारवर्गाच्या नफ्यासाठी न होता सबंध समाजाच्या मानवी गरजा, वासना, इच्छा ह्यांचे समाधान करण्यासाठी, माणसांच्या कल्याणासाठी होणार असते. जो भांडवलदारवर्ग उरलेला असतो त्याचाच फक्त

अनुक्रमणिका

ह्या व्यवस्थेला विरोध असतो. ह्या विरोधाचा पूर्ण बीमोड करून नायनाट करण्यासाठी कामगार-वर्ग सर्व राजकीय सत्ता आपल्या हाती घेतो; कामगारवर्गाची हुकूमशाही सर्व समाजावर लादतो. पण ही तात्पुरती अवस्था असते. जेव्हा अवशिष्ट भांडवलदारवर्गाचा विरोध पूर्णपणे नष्ट करण्यात येतो, तेव्हा समाजात वर्गच उरत नाहीत. शासनव्यवस्था किंवा सरकार ही संस्था समाजातील प्रमुख वर्गाचे प्रभुत्व सर्व समाजावर लादण्यासाठी आणि ह्या वर्गाच्या हितसंबंधांचे संरक्षण आणि संवर्धन करण्यासाठी अस्तित्वात आलेली असते. जेव्हा समाजात वर्गच उरत नाहीत तेव्हा तिचेही प्रयोजन संपुष्टात आलेले असते आणि मग सरकार सुकून जाते व गळून पडते.

आता जो समाज उदयाला आलेला असतो तो साम्यवादी समाज होय. त्याच्यात शासनसंस्था नसते. म्हणजे कायदे करणारे आणि भौतिक बळ वापरून कायद्यांची अंमलबजावणी करणारे संघटण त्याच्यात नसते. त्याची आवश्यकता नसते. कारण विशिष्ट वर्गाचे घटक म्हणून माणसांच्या हितसंबंधांत जो विरोध असतो तो आता मावळलेला असतो. आदिम समाज जसा सुसंवादी असतो तसा साम्यवादी समाजही, मानवी व्यक्तीच्या मूलगामी सामाजिकतेमुळे, सुसंवादी असतो. ह्या दोहोतील फरक एवढाच – आणि हा कमालीचा फरक आहे – की आदिम समाजात व्यक्तींची मानवी प्रकृती सुप्त, अस्फुट असते, तर साम्यवादी समाजात ती पूर्णपणे विकसित आणि प्रस्फुट अशी असते. प्रत्येक व्यक्तीची वैशिष्ट्यपूर्ण, पृथगात्म अशी प्रकृती असते आणि तिचे जीवन म्हणजे ह्या प्रकृतीचा मुक्त आविष्कार असतो. प्रत्येक व्यक्तीचा असा आत्माविष्कार दुसऱ्या व्यक्तीच्या आत्माविष्कारातून भिन्न असतो. पण त्यांत भेद असला तरी विसंवाद असत नाही; सुसंवादच असतो. माणसाला साजेशा कृत्यातून आणि वर्तनातून – निसर्गाच्या स्वरूपाचा शोध घेणे, कलाकृतींची निर्मिती, इतरांशी, (माणसांशी, प्राणीवनस्पतीशी) सुसंवादी, आनंदमय, सूक्ष्मपदरी नाती जोडणे इ. – हा आत्माविष्कार होत असतो. असा मुक्त आविष्कार करणारा प्राणी हे माणसाचे खरे स्वरूप आहे आणि रक्तबंबाळ इतिहासाची किंमत देऊन त्याने ते स्वतः आणि स्वतःसाठी सिद्ध केलेले असते.

अशा समाजाची स्थापना करण्यात मानवी इतिहासाची सांगता होते आणि ते माणसांचे अंतिम साध्यही आहे. आणखी दोन गोष्टींचा निर्देश येथे करणे आवश्यक आहे. वर्गीय समाजात, उदा. भांडवलशाही समाजात, व्यक्तींची जाणीव मूलतः वर्गीय असते. व्यक्ती ज्या वर्गाचा घटक असते त्याचे हितसंबंध आणि त्याला पोषक असलेली मूल्ये ह्यांनी ती प्रामुख्याने घडविलेली असते. मानवी व्यक्ती म्हणून व्यक्तीची जी समग्र जाणीव असते तिची जागा खंडित व विकृत वर्गीय जाणिवेने घेतलेली असते. हे खरे असले तरी मानवतेची समग्र जाणीव व्यक्तीच्या मानसातून पूर्णपणे लोप पावलेली नसते. व्यक्तीच्या जीवनात ह्या समग्र जाणिवेचा अनेक प्रकारे आविष्कार होत असतो. एक आविष्कार असा की इतिहासाचा ओघ मानवजातीच्या अंतिम मुक्ततेच्या दिशेने अनिवार्यपणे वहात आहे आणि कामगार वर्ग हा ह्या मुक्तीचे साधन आहे हे ओळखून इतर वर्गातील काही व्यक्ती कामगार वर्गाच्या ह्या ऐतिहासिक कार्याशी एकरूप होतात, स्वतःचा वर्ग सोडून देऊन जणूकाय कामगार बनतात आणि मानवी विमोचनाच्या अंतिम लढ्यात निष्ठेने, सर्वस्व पणाला लावून उतरतात. अशा व्यक्ती आणि कामगार वर्गातील आपल्या इतिहासदत्त कार्याची स्पष्ट आणि स्थिर ओळख असलेल्या सदस्य व्यक्ती ह्यांचा मिळून बनलेला साम्यवादी (कम्युनिस्ट) पक्ष हा कामगार वर्गाचे क्रांतीसाठी, आणि नंतरच्या साम्यवादी समाज स्थापन होईपर्यंतच्या मध्यंतराच्या काळात, नेतृत्व करतो. कामगार वर्गाच्या हुकूमशाहीचा जो मध्यंतराचा कालखंड आहे त्याच्यात हा पक्ष कामगार वर्गाच्या वतीने राजकीय सत्ता वापरीत असतो.

ही एक गोष्ट झाली. दुसरी गोष्ट साम्यवादी समाजात भौतिक वस्तूंचे उत्पादन कसे चालते ह्या प्रश्नाशी संबंधित आहे. ह्या प्रश्नाचे एक मार्क्सवादी उत्तर असे की समाजाची धारणा व्हायची तर उत्पादन चालू राहिले पाहिजे हे ओळखून मानवी जीवनाचे दोन विभाग मानले पाहिजेत. एक विभाग म्हणजे अनिवार्यतेचे अधिराज्य (किंग्डम ऑफ् नेसेसिटी) आणि दुसरा विभाग म्हणजे स्वातंत्र्याचे अधिराज्य (किंग्डम ऑफ् फ्रीडम). प्राणी म्हणून आपण निसर्गाचे काही देणे लागतो आणि हे देणे द्यावेच लागते. उदा. अन्नाचे उत्पादन, वितरण, भक्षण करावे लागते, निवारे बांधावे लागतात. इ. हे अनिवार्यतेचे अधिराज्य. हे देणे आपल्याला दिलेच पाहिजे हे ओळखून व्यक्ती आपण होऊन आपल्या दिवसाचा काही भाग उत्पादन कार्याला आपले योगदान म्हणून देईल. त्याच्यावर सक्ती करावी लागणार नाही. वैज्ञानिक-तांत्रिक प्रगतीमुळे हा काळ अतिशय कमी असेल आणि त्यात जाचक श्रम फारसे असणार नाहीत. शिवाय उत्पादन इतके मुबलक असेल की वितरण कसे करावे, कोणाला केवढा भाग देणे न्याय्य ठरेल हे प्रश्नच उपस्थित होणार नाहीत. आपल्या जरुरीइतके माणसे घेतील आणि वस्तू पुढे मिळण्यात अडचणी निर्माण होतील ह्या भीतीने संचय करण्याइतका लोभ बाळगण्याचे कारण उरणार नाही. उत्पादनप्रक्रियेतील आपला वाटा उचलला

की उरलेल्या काळात माणूस आपला मुक्त आत्माविष्कार करायला मोकळा राहील. हे स्वातंत्र्याचे अधिराज्य होय.

हे ह्या प्रश्नाचे एक मार्क्सवादी उत्तर आहे. पण अस्सल मार्क्सवादी उत्तर कदाचित वेगळे असेल. ते हे की साम्यवादी जीवनसरणीत भौतिक उत्पादन आणि मुक्त आत्माविष्कार असे दोन अलग कप्पे असणार नाहीत. भौतिक उत्पादन हे प्रामुख्याने शारीरिक असते आणि आत्माविष्कार हा प्रामुख्याने मानसिक असतो अशी स्वाभाविकपणे कल्पना करण्यात येईल. पण शारीरिक आणि मानसिक असे दोन अलग प्रांत कल्पिणे हा वर्गीय समाजाचा अवशेष आहे. मानवी अस्तित्व हे एकाच वेळी शारीरिक – मानसिक असे असते. साम्यवादी जीवनसरणी एकसंध असल्यामुळे सामाजिक-वैयक्तिक हे द्वंद्व जसे तिच्यात असणार नाही त्याप्रमाणे शारीरिक-मानसिक हे द्वंद्वही असणार नाही. सर्वच व्यवहार एकचा वेळी शारीरिक आणि मानसिक असे दोन्ही, म्हणजे एकाच वेळी उत्पादनाचे *आणि* आविष्काराचे (निर्मितीचे) असे असतील. उदा. समाजात इतकी माणसे आहेत, प्रत्येकाला अमूक एवढ्या क्षेत्रफळाचा निवारा लागेल तेव्हा एकंदर अमूक इतक्या क्षेत्रफळाची घरे बांधूया आणि मग प्रत्येकाला ऐसपैस जागा रहायला मिळेल अशा रीतीने घरे बांधली जाणार नाहीत. तर प्रत्येक व्यक्तीला तिच्या विशिष्ट पद्धतीने जगण्यासाठी ज्या प्रकारचे घर हवे असेल तसे घर बांधण्यात येईल. ह्या बांधण्यात तिचा (आणि इतरांचा) सहभाग असेल. त्या घराच्या रचनेत त्या व्यक्तीचे व्यक्तिमत्त्व साकारलेले असेल. ते घर बांधणे आणि त्याच्यात रहाणे हा तिच्या आत्माविष्कारांचा भाग असेल. साम्यवादी जीवनसरणीचे तपशीलवार वर्णन करणे आज अशक्यप्राय आहे. तिचा स्थूल आराखडा काय तो आज देता येईल.

प्राचीन, भारतीय साध्याविषयीची संकल्पना आणि अर्वाचीन, मार्क्सवादी साध्याविषयीची संकल्पना यांत खूपच साम्य आहे यांत शंका नाही. देव म्हणतात, "आदर्श समाजाची ही दोन चित्रे निरनिराळ्या कुंचल्यांनी व निरनिराळ्या रंगांनी चितारलेली असली तरी त्यामागील कलावंतांचे अंतःकरण व कल्पना एकच आहे हे सहज दिसून येईल." (पृ. ४-६) एक साम्य असे की ही दोन्ही सामाजिक साध्ये आहेत. दोन्ही संकल्प चित्रांप्रमाणे एका विशिष्ट स्वरूपाचा किंवा अवस्थेतील समाज हे साध्य आहे. व्यक्तीने स्वतःची एक विशिष्ट अवस्था किंवा स्थिती सिद्ध करावी – उदा. सुख किंवा कल्याण इ. – असे ह्या साध्याचे स्वरूप नाही. अर्थात् समाज व्यक्तींचा बनलेला असतो आणि एका विशिष्ट स्वरूपाची समाजस्थिती हे जर साध्य असेल तर तिच्यात जे सुसंवादीपणे वावरू शकतील आणि जे ती टिकवून धरतील अशी माणसे निर्माण करणे, म्हणजे माणसांच्या स्वभावाला असे वळण देणे हा त्या साध्याचा अनिवार्य भाग असेल. पण मूळ प्रश्न 'साध्य असलेली समाजस्थिती कशी आहे?' हा आहे. 'आदर्श स्वरूपाची मानवी व्यक्ती कशी असते?' ह्या प्रश्नाचे उत्तर दिल्याशिवाय पहिल्या प्रश्नाचे उत्तर देता येणार नाही हे खरे असले तरी पहिला प्रश्न हा मूळ प्रश्न आहे. माणसाच्या सामाजिकतेचे उत्कट भान असा प्रश्न विचारण्यामागे आहे यात शंका नाही.

प्राचीन काळी हे भान होते ह्याचे कारण ऋत-तत्त्वाने नियत अशा विश्वचक्राचा भाग असलेल्या, धर्माने नियत अशी (चातुर्वर्ण्यातल्या) समाजचक्राचा घटक असलेली व्यक्तीच आपले साध्य, म्हणजे पुरुषार्थ संपादन करू शकते अशी दृष्टी होती. अलग व्यक्तींचा समूह म्हणजे समाज अशी व्यक्तीवादी कल्पना नव्हती. मार्क्समध्ये ही दृष्टी होती ह्याचे एक कारण म्हणजे त्याची हेगलियन पार्श्वभूमी. पण दुसरे कारण म्हणजे व्यक्तीवादी भांडवलशाही समाजपद्धतीत कोणती अवस्था अस्तित्वात येते ह्याचे उत्कट दर्शन त्याला होते.

पण '(योग्य) मानवी साध्य काय आहे?' हा प्रश्न व्यक्तिवादी दृष्टीतून विचारता येईल आणि सामान्यपणे तो असाच विचारण्यात आला आहे. उदा. 'साध्य काय आहे?' – म्हणजे 'अंतिम व परिपूर्ण असे साध्य काय आहे?' – हा प्रश्न जेव्हा ॲरिस्टॉटल आपल्या नीतिशास्त्रावरील ग्रंथात विचारतो तेव्हा मानवी व्यक्तीचे साध्य काय आहे असाच त्याचा अर्थ असतो. माणूस समाज करून रहाणारा प्राणी आहे. नगरराज्यात (पोलिस) मध्येच माणसाची धारणा होऊ शकते; माणूस जगू शकतो आणि *चांगले* मानवी जीवन नगरराज्यातच व्यतीत करता येते हे ॲरिस्टॉटलला मान्य आहे. किंबहुना ॲरिस्टॉटलमुळेच हा एक सर्वमान्य सिद्धांत झाला. पण हे जे चांगले जीवन आहे ते व्यक्तीने जगायचे असते. चागले राज्य किंवा चांगला समाज म्हणजे चांगल्या वैयक्तिक जीवनाला पोषक असलेला समाज. ह्या चांगल्या वैयक्तिक जीवनांत काय सामावलेले असते? एकतर माणसाच्या स्वाभाविक इच्छा-वासनांचे संयमाने केलेले, दमन आणि अतिरेक यांमधील सुवर्णमध्य गाठणारे समाधान, माणसांच्या नैसर्गिक, शारीरिक व मानसिक शक्तींचा विकास आणि ह्या विकसित शक्तींचा सुयोग्य वर्तमान आविष्कार. एका बाजूने हे वर्तन सामाजिक असते. नगरराज्य, कुटुंब इ. सामाजिक संस्थांचे प्रशासन-व्यवस्थापन करणे असे ह्या वर्तनाचे स्वरूप असते. दुसऱ्या प्रकारचे वर्तन म्हणजे विकसित मानसिक शक्तीचा आविष्कार चिंतनाच्या, साक्षात्काराच्या (कॉन्टम्प्लेशन) स्वरूपाचा असतो. माणसाची सर्वश्रेष्ठ मानसिक शक्ती म्हणजे








विवेकशक्ती (रीझन) होय. तिचा विकास झाला की ती विश्वाच्या आदिमतत्त्वाचे साक्षात् ग्रहण करते. हे ज्ञान हे माणसाचे परमोच्च श्रेय आहे. हे ज्ञान प्राप्त होणे म्हणजे वैयक्तिक मोक्ष लाभण्यासारखे आहे. चांगल्या जीवनाचा आशय असा असतो. ज्या व्यक्तिजीवनात हा आशय पुरेशा समृद्धतेने असतो ते जीवन सुखी असते असे ॲरिस्टॉटल म्हणतो. ह्या स्वरूपाचे सुख हे माणसाचे साध्य असते. थोडक्यात असे म्हणता येईल की, माणसाचे साध्य समाजाच्या चौकटीतच गाठता येते आणि गाठावे लागते. असे असले तरी ह्या साध्याचा आशय वैयक्तिक असतो.

जेव्हा ग्रीक नगरराज्ये विस्कटली आणि प्रत्येक पुरुषाचा (अर्थात दास नसलेल्या पुरुषाचा) नगराच्या कारभारात सहभाग असतो ही व्यवस्था इतिहासात जमा झाली, तेव्हा मानवी साध्य जवळजवळ पूर्णपणे वैयक्तिक बनले. उदा., स्टोइक-पंथी तसेच एपिक्युरस-पंथी जे मानवी साध्य म्हणून रेखाटले आहे ते 'स्वयंपूर्ण' किंवा 'स्वतंत्र' व्यक्ती ह्या स्वरूपाचे आहे. सद्‌गुणी माणसाची वृत्ती समधानतेची, समत्वाची असते. बाह्य सामाजिक, भौतिक परिस्थिती कशीही असो हे समत्व ढळत नाही. सद्‌गुणी, शहाणा माणूस समाधानी असतो. पण आपल्या इच्छा-वासनांची तृप्ती ह्या स्वरूपाचे हे समाधान नसते. त्या तृप्त होवोत, न होवोत त्याच्या समाधानी वृत्तीत फरक पडत नाही. हे समाधान आंतरिक असते. त्याच्या दृष्टीने बाह्य परिस्थिती जितकी बाह्य असते, तितक्याच स्वतःच्या इच्छा-वासना ह्याही बाह्यच असतात. त्यांच्या संबंधातही शहाणा माणूस तटस्थ असतो. आपल्या स्थितप्रज्ञाच्या आदर्शासारखा हा पाश्चात्य आदर्श आहे. उदासीन आणि म्हणून स्वतंत्र. देवांनी प्राचीन आदर्श म्हणून ज्याचा उल्लेख केला आहे तो स्थितप्रज्ञांचा समाज नाही, तर आत्मौपम्य दृष्टी आणि सर्वभूतहितरती ज्यांचा स्थायीभाव आहे अशा व्यक्तींचा तो समाज आहे. अशी व्यक्ती प्राणिमात्राच्या हिताला महत्त्व देते, ते साधू पहाते म्हणून ती उदासीन नाही, स्थितप्रज्ञ नाही; पण (स्वतः धरून) सर्वांच्या हिताला ती *सारखेच* महत्त्व देते ह्या अर्थाने ती स्थितप्रज्ञ आहे. स्थितप्रज्ञाता हे सर्वभूतहितरतीचे एक अंग आहे.

अर्वाचीनांचे म्हणून मार्क्सवादी साध्याचा निर्देश देवांनी केला आहे हे आपण पाहिले. असे करणे पक्षपाती आहे असा आरोप येऊ शकेल. कारण, आधुनिक विचारधारा ही मुख्यत्वे व्यक्तिवादी आहे आणि चांगले व्यक्तिजीवन हे तिने प्रतिपादिलेले साध्य आहे. मार्क्सचा विचार हा तिचा प्रतिवाद करणारा आणि तिला दुरुस्त करू पहाणारा असा आहे. पण देवांच्या भूमिकेचे समर्थन करता येईल. ह्या शतकाच्या तिसऱ्या दशकात प्रस्थापित भांडवलशाही अर्थव्यवस्थेत जबरदस्त आणीबाणी निर्माण झाली होती. एका बाजूला अजस्र यंत्रांच्या साहाय्याने प्रचंड प्रमाणावर उपभोग्य वस्तूंचे उत्पादन करण्याची क्षमता होती. दुसऱ्या बाजूला ह्या उत्पादनाला उठाव नसल्यामुळे उत्पादन कुंठित होत होते. मोठ्या प्रमाणावर बेकारी, दारिद्र्य, उपासमारीने खंगलेली माणसे, मुले-बाळे असे दृश्य दिसत होते. भुकेलेल्या मुलांच्या तोंडात दूध घालण्याऐवजी दुधाचे लोट मिसिसिपी नदीत ओतावे लागत होते. हा क्रूर उपरोध भांडवलशाही अर्थव्यवस्थेच्या केंद्रस्थानीच असल्याचे दिसत होते. आणि म्हणून ही टिकून राहील अशी व्यवस्था नाही हे स्पष्ट झाल्यासारखे वाटत होते. पण एवढेच नव्हते. संपत्ती-सत्तेचे केंद्रीकरण, कमालीची सामाजिक, आर्थिक विषमता ह्या गोष्टी तर भांडवलशाही व्यवस्थेत होत्याच; पण शिवाय ह्या सर्व व्यवस्थेचे स्वरूपच विपरीत, अमानुष असल्यासारखे दिसत होते. प्रचंड प्रमाणावरील यांत्रिक उत्पादन आणि वितरण यांनी जीवन ग्रासल्यासारखे झाले होते. हे मानवी जीवनाचे मध्यवर्ती, जवळजवळ सर्वव्यापी क्षेत्र बनले होते. ज्यात माणसांना आपली माणुसकी जाणवते आणि ज्यात तिचा परिपोष होतो असे जीवनाचे भाग – उदा., कौटुंबिक जीवन, सांस्कृतिक जीवन – ह्यांना गौण स्थान लाभत होते. सामाजिक परंपरेकडून प्राप्त झालेली, अप्रस्तुत पण चिवट बांडगुळे असे त्यांचे स्वरूप उरले होते. मानवी जीवनाचा तोलच ढळला होता.

ह्या साऱ्या प्रश्नांना मार्क्सवादी उपपत्तीत आणि व्यवहारात मध्यभागी स्थान होते आणि त्यांची समाधानकारक रीतीने सोडवणूक करण्याचा मार्ग मार्क्सने दाखवून दिला आहे, असा मार्क्सवाद्यांचा दावा होता. ह्यामुळे विसाव्या शतकात अनेक विचारी, संवेदनशील व्यक्तींच्या निष्ठांना मार्क्सवादाने समर्थपणे आवाहन केले; वैचारिक आणि भावनिक निष्ठांना. विशेषतः आशिया आणि आफ्रिका खंडातील साम्राज्यांतर्गत वसाहती म्हणून नांदणाऱ्या प्रदेशांतील तरुणांना, आपल्या परिस्थितीचे मार्क्सने सम्यक् विश्लेषण केले आहे, तिचा अर्थ उलगडून दाखविला आहे आणि तिच्यातून मार्ग कसा काढायचा ह्याचे बिनचूक दिग्दर्शन केले आहे असे आढळून आले. शिवाय सोव्हिएट राष्ट्रसंघाच्या स्थापनेनंतर एका आदर्शलक्षी तत्त्ववेत्त्याने मांडलेले विचारजाल असे मार्क्सवादाचे स्वरूप राहिले नाही. हे सिद्धांत एका विशाल लोकसमूहाच्या समग्र जीवनव्यवहाराचे नियमन करायला समर्थ आहेत, त्यांच्या अधिष्ठानावर एक स्थायी, प्रगतीशील अशी सामूहिक जीवनसरणी आधारता येते असे चित्र दिसले. मार्क्सवाद हा एकंदरीत प्रमाण असा विचारव्यूह आहे हे ह्या वस्तुस्थितीने सिद्ध केले.

विसाव्या शतकाच्या दुसऱ्या आणि तिसऱ्या दशकात बुद्धिमान, कर्तबगार, संवेदनशील व्यक्ती मार्क्सवादाकडे आकर्षित झाल्या

ही समजण्यासारखी गोष्ट आहे; पण 'मार्क्सवादी' म्हणवणाऱ्या राजवटीचे खरे स्वरूप १९३० पासून स्पष्ट होऊ लागल्यानंतरही ह्यांतील अनेक मार्क्सवादाला का चिकटून राहिले हे कोडे आहे. ह्याची खोल मानसशास्त्रीय आणि समाजशास्त्रीय कारणे असणार. ह्या कारणाचा एक भाग असा की, ज्यांना भांडवलशाहीतील निर्घृणपणा आणि कोडगेपणा ह्यांचे उत्कट दर्शन झाले होते त्यांना पर्यायी, व्यवहार्य जीवनसरणी तीव्रतेने हवी होती आणि अशी जीवनसरणी उपलब्ध करून देतो हा मार्क्सवादाचा दावा अमान्य करणे त्यांच्या जीवावर आले होते.

ते काही असो. स्वतः देवांना मार्क्सवादी (म्हणवणाऱ्या) राजवटीविषयी काही भ्रम नव्हता. ते म्हणतात, "(रशियातून) भांडवलशाही नष्ट झाली यात संशय नाही... भांडवलशाहीच्या चितेतून साम्यवाद मात्र निर्माण झाला नाही. तिच्या जागी एक राज्यकर्ती नोकरशाही निर्माण झाली आहे..... रशियातील सध्याच्या हुकूमशाहीने सर्व विरोध मोडून काढला असून स्टॅलिन सर्वसत्ताधारी व रशियाचा मालक बनला आहे... कामकऱ्यांच्या हुकूमशाहीवरून... एका व्यक्तीची हुकूमशाही... रशियात प्रकट झाली आहे... इतर भांडवलशाही देशांप्रमाणे रशियातही अकष्टार्जित उत्पन्नावर परभृत निरुद्योगाचे चैनी जीवन घालविणे शक्य झाले आहे... बर्नहॅमच्या मताप्रमाणे रशियातील वरचे शेकडा ११ ते १२ टक्के लोक ५० टक्के राष्ट्रीय उत्पन्नाचे मालक आहेत." (पृ. ५९-६१)

तेव्हा साम्यवादी साध्य देवांना मान्य असले तरी, मार्क्सवादी (मानला गेलेला) मार्ग हे साध्य सिद्ध करून देणारा मार्ग नव्हे हे त्यांना स्पष्ट आहे; पण अर्वाचीनांनी बऱ्याच प्रमाणात स्वीकारलेल्या दुसऱ्या एका साध्याचा, म्हणजे साध्याविषयीच्या संकल्पनेचा देवांनी विचार केलेला नाही. हे व्यक्तिवादी साध्य आहे. ह्या साध्याला सोयीसाठी 'उदारमतवादी साध्य' असे म्हणूया. ह्याचे एक रूप म्हणजे सुखवादी उपयुक्ततावाद्यांनी प्रतिपादन केलेले साध्य. ही उपपत्ती थोडक्यात अशी मांडता येईल: समाज हा व्यक्तींचा समूह असतो. निसर्गनियमाप्रमाणे प्रत्येक व्यक्तीला फक्त स्वतःच्या सुखाची – सुखप्राप्तीची आणि दुःखपरिहाराची – इच्छा असते. तेव्हा प्रत्येक व्यक्तीचे साध्य म्हणजे स्वतःचे जास्तीत जास्त सुख हे असते. मानवी व्यक्ती विवेकशील (रॅशनल) असल्यामुळे ती एकतर सुखाबरोबरच सुखाची साधने असलेल्या वस्तूंचीही – मालमत्तेची – इच्छा करते. व्यक्तीच्या साध्यात सुखाबरोबरच सुखसाधनेही समाविष्ट असतात. विवेकशीलतेचा दुसरा परिणाम असा की, माणूस कमीत कमी दुःखाची किंमत देऊन (एकंदरीत) जास्तीत जास्त सुख प्राप्त करून घेण्याची इच्छा करतो. हे माणसांचे साध्य असते. आपण स्वतः अलगपणे केलेल्या श्रमांनी जेवढे सुख आपल्याला लाभेल त्यापेक्षा इतरांशी सहकार्य करून संयुक्तपणे केलेल्या कष्टांचे फळ म्हणून जे सुख निष्पन्न होईल त्यातील आपला वाटा म्हणून आपल्याला लाभणारे सुख कितीतरी अधिक असेल हे माणसे अनुभवाने शिकतात. ह्यातून परस्परांच्या सहकार्यातून उभ्या राहणाऱ्या सामाजिक संस्था – कुटुंब, कारखाने, बाजार, राज्य, इ. – निर्माण होतात. जशा संस्था किंवा संघटना यांच्यामध्ये ज्या व्यक्ती सहभागी होतात त्यांच्या भिन्न जबाबदाऱ्या किंवा कर्तव्ये आणि त्यांना मिळणारे लाभ मुक्रर करणारे संकेत, नियम, कायदे असतात. उदा., नवरा-बायको, मालक-मजूर, विक्रेता-ग्राहक, मंत्री-अधिकारी-नागरिक, इ. ह्या कर्तव्यांचा कुणाकडून भंग झाला, तर त्याला ह्या नियमांनुसार वेगवेगळ्या प्रकारे शासन मिळावे अशीही तजवीज असते. असे शासन नसेल तर ह्या नियमांना काही प्रामाण्य रहाणार नाही. ह्यामुळे समाजात शासनसंस्था निर्माण होते. म्हणजे असा विचार करून माणसे शासनसंस्था निर्माण करतात व अनुभवांच्या वळावर तिच्यात सुधारणा करीत जातात.

प्रत्येक माणूस स्वतःच्या अधिकात अधिक सुखाची इच्छा धरीत असल्यामुळे अशा सामाजिक संस्थांत सहभागी असलेल्या व्यक्तींमध्ये जबाबदाऱ्या-कर्तव्ये आणि सुख (इच्छांचे समाधान) ह्यांचे वाटप करण्याविषयीचे जे संकेत-नियम असतात त्यांचा कल हे वाटप शक्य तितके समान असावे असे घडवून आणण्याकडे असतो. प्रत्यक्ष समाज पाहिला तर आपल्याला वेगळे चित्र दिसते. उदा., आजपर्यंत तरी कुटुंब पुरुषप्रधान होते आणि कौटुंबिक व्यवहारातून जे सुख निर्माण होते त्यात पुरुषांचा वाटा कितीतरी अधिक आणि स्त्रियांचा कितीतरी कमी अशी स्थिती होती. तसेच, बाहेरच्या मोठ्या समाजात सत्ता आणि संपत्ती ही जी सुखसाधने आहेत त्यांची भिन्न वर्गांमध्ये अतिशय विषम अशी वाटणी होती. पण ही विषमतेची स्थिती टिकून राहू शकत नाही. ज्या व्यक्तींना सुख कमी प्रमाणात मिळते त्या असंतुष्ट रहातात. हा असंतोष संघटित झाला की, विषम प्रस्थापित घडीला त्यातून आव्हान मिळते. समाजात अस्थैर्य निर्माण होते. अशा अस्थिर परिस्थितीत आपले सुख पूर्वीप्रमाणे अनिर्बंधपणे साधता येत नाही असा अनुभव आल्यामुळे वरिष्ठ वर्गातील माणसे तडजोडीला तयार होतात आणि कनिष्ठ वर्गाला सामाजिक सुखात पूर्वीपेक्षा अधिक वाटा द्यायला तयार होतात. हा समंजसपणा त्यांनी दाखविला नाही. तर संघर्ष होतो आणि कनिष्ठ वर्ग बहुसंख्य असल्यामुळे अशा संघर्षात अखेरीस त्यांचा विजय होतो आणि सामाजिक सुखातील पूर्वीपेक्षा अधिक वाटा ते हिसकावून घेतात.








तेव्हा न्यायाचे असे वेगळे, स्वतंत्र तत्त्व मानायचे कारण नाही. प्रत्येक मानवी व्यक्ती स्वसुखार्थी आणि विवेकशील असल्यामुळे अनेक व्यक्तींनी परस्परांशी सहकार्य केले, तर त्यामुळे प्रत्येक व्यक्तीला (आणि म्हणून आपल्यालाही) कितीतरी अधिक सुख लाभू शकेल हे तिला पटते. अशी सहकार्याची अवस्था अस्तित्वात आली, म्हणजे समाज अस्तित्वात आला की तो टिकून रहायचा तर कष्ट आणि सुख ह्यांचे वाटप शक्य तो समान असले पाहिजे, हे विवेकशील माणसांना (हळूहळू) पटत जाते. अशा व्यवस्थेत एखादी व्यक्ती स्वार्थामुळे सुखाचा अधिक वाटा बळकावू लागली, तर त्यामुळे ती व्यवस्था विस्कळीत होईल, म्हणजे कुणालाच पूर्वीप्रमाणे सुख साधता येणार नाही, ह्यात सर्वांचे अहित आहे, म्हणून आपलेही आहे हे विवेकशील माणसे ओळखतात आणि म्हणून अशा कृत्याला प्रतिबंध करण्यासाठी ते करणाऱ्याला शिक्षा लाभेल अशी व्यवस्था करतात. हे न्यायाचे तत्त्व होय. न्याय म्हणजे समता नव्हे, तर सर्वांना आपापले महत्तम सुख सुरक्षिततेने साधता यावे अशी सामाजिक व्यवस्था. उदा., एखाद्या माणसाला सुखात अधिक वाटा दिल्यामुळे सर्वांना एऱ्हवी मिळाले असते त्यापेक्षा अधिक सुख मिळेल असे जर सर्वांना दिसून आले, तर सर्व स्वसुखार्थी समंजस माणसे अशा वाटपाला तयार होतील आणि ही विषम व्यवस्था न्यायाशी सुसंगत असेल.

माणसाच्या प्रेरणा, आकांक्षा इत्यादींविषयीचे, म्हणजे माणसाच्या नैसर्गिक प्रकृतीविषयीचे हे रांगडे, कोडगे असे चित्र आहे. अद्वैत आणि आत्मौपम्य बुद्धी मानणाऱ्या देवांनी किंवा माणसाची मूलभूत आणि अंतर्व्यापी सामाजिकता मानणाऱ्या मार्क्सने उभ्या केलेल्या चित्राच्या पूर्णपणे विरोधी असे ते चित्र आहे; पण जिला थोडक्यात 'भांडवलशाही' म्हणण्यात येते त्या 'आधुनिक' समाजव्यवस्थेमागचे ते अधिकृत चित्र आहे. व्यवहारी माणसाला पटेल असे ते चित्र आहे. (पण अगदी व्यवहारी माणसालाही देवांचे किंवा मार्क्सचे चित्र 'आदर्श' म्हणून पटेल.) जॉन स्टुअर्ट मिलनी त्याचा रांगडेपणा सौम्य करून त्याला प्रगल्भ (सोफिस्टिकेटेड) असे स्वरूप दिले. उदा., आपण नैतिक दृष्टीने माणसांकडे पहातो तेव्हा औदार्य, परदुःखाविषयी कळवळा, (अहंकाराचा स्पर्श नसलेला) स्वाभिमान, निष्ठा इ. सद्गुणांना स्वतःचे मूल्य आहे असे मानतो. आगपेट्यांवरची लेबले गोळा करण्यात फुरसतीचा वेळ घालविणाऱ्या माणसापेक्षा ज्ञानसाधनेला वाहून घेतलेला माणूस श्रेष्ठ आहे, असा आपला निर्णय असतो. स्वतःचे अधिकात अधिक सुख साधण्याची काय ती प्रेरणा असलेल्या माणसांच्या जीवनात अशा निर्णयांना काही स्थान असणार नाही असे आपल्याला स्वाभाविकपणे वाटते; पण हे गुण समाजात जास्तीत जास्त सुख निर्माण करण्यासाठी अत्यंत उपयुक्त असल्यामुळे त्यांना सुखसाधने म्हणून मूल्य आहे, त्यांचा प्रसार समाजात होणे ह्या कारणामुळे इष्ट आहे, तो घडवून आणण्याचे साधन म्हणून आपण त्यांची प्रशंसा करतो असा युक्तिवाद करून मिल आपल्या अशा नैतिक निर्णयांचे उपयुक्ततावादी समर्थन करतात. एकाकी, स्वसुखार्थी व्यक्तींचा जमाव असे समाजाचे चित्र आपल्यापुढे नसते. अनेक सामाजिक संस्था आणि संघटना ह्यांची गुंतागुंतीची वीण असल्यासारखा समाज आपल्याला दिसतो. माणसे ह्या संस्थांशी, कुटुंबाशी, भाषिक समूहाशी, गावाशी, 'राष्ट्रा'शी तादात्म्य पावलेली असतात, ह्या संस्थांशी आणि त्यांच्या घटकांशी त्यांचा जो संबंध असतो तो बाह्य नसतो, तो त्यांच्या व्यक्तित्त्वाचा भाग असतो. ही वस्तुस्थिती मिल मान्य करतात; पण समाजात असे संघटन आणि अशी व्यवस्था असणे हे सर्वांच्या अधिकात अधिक सुखाला अनुकूल असते, असा अनुभव माणसांना आल्यामुळे समाजाची अशी घडी बसत आली आहे असे स्पष्टीकरण ते देतात. मिल यांच्या लिखाणात आधुनिक समाजाचे एक स्वप्न साकारलेले आहे असे म्हणता येईल. हे स्वप्न असे की, स्वसुखार्थी व्यक्तींचा समूह अशा आद्य स्वरूपाच्या मानवी समाजाचे, माणसांची विवेकशीलता आणि त्यांना येणारे अनुभव यांच्या मिश्रणातून बनलेल्या मानसिक रसायनाने एका वेगळ्या स्वरूपाच्या समाजात परिवर्तन होईल. ह्या समाजातील व्यक्ती स्वाभिमानी, एकमेकांच्या प्रतिष्ठेची आणि स्वातंत्र्याची कदर करणाऱ्या, आणि वैशिष्ट्यपूर्ण अशा मानवी शक्तींचा विकास आणि आविष्कार साधण्याला वाहून घेणाऱ्या अशा असतील. ही किमया घडून येणे शक्य असो वा नसो, अद्वैती देव हे व्यक्तिवादी चित्रच समूळ नाकारतात. त्यांचा निर्णय थोडक्यात असा : "धन (म्ह. सुखसाधने) माणसातील स्वार्थ चेतविते व त्याला स्वशोधनापासून दूर नेते. धनलालसा, संचयाची हाव व स्वतःच्याच वासनांची ओढ यांमुळे तो व त्याचे बांधव यांच्यामध्ये अपरिहार्य विग्रह निर्माण होतो व तो त्यांना आपले शत्रू लेखू लागतो. माणसाचा आत्मा सर्वात आहे; पण माणूस जेव्हा आत्म्याला पारखा होतो, तेव्हा तो आपल्या बांधवांशी असलेले खरे नाते तोडतो. व्यक्तीतील समष्टिबुद्धी नष्ट होईल, तर व्यक्तीचे पतन व नाश झाल्यावाचून रहाणार नाही." (पृ. १४)

उदारमतवादी साध्याची दुसरी मांडणी कांटने केलेली आहे आणि नैतिक कर्ता ह्या माणसाच्या स्वरूपाला अधिक न्याय देणारी अशी ती आहे. ही मांडणी थोडक्यात अशी : प्रत्येक माणूस स्वतःच्या कल्याणाची ते आपले साध्य आहे अशी कल्पना


अनुक्रमणिका

करू शकतो आणि ते साधण्याचा प्रयत्न करू शकतो. म्हणून माणूस, मानवी व्यक्ती स्वतःच एक साध्य असते (एण्ड इन् हिमसेल्फ). ह्यातून माणसांना वागविण्याचा एक नियम लाभतो. तो असा की, कुणाही माणसाला कधीही केवळ साधन म्हणून वापरता कामा नये. तर तो स्वतः एक साध्य आहे (म्हणजे स्वतःचे कल्याण साधू पहाणारा कर्ता तो आहे, ह्या वस्तुस्थितीशी सुसंगत ठरेल) अशा रीतीने त्याला वागविले पाहिजे. सर्व माणसांचे मिळून एक साध्यांचे राज्य (साध्यांची व्यवस्था) बनते. ह्याचा सदस्य असलेली प्रत्येक मानवी व्यक्ती एक स्वतंत्र (स्वायत्त) कर्ता असते. स्वतःचे कल्याण साधू पाहाणारा कर्ता असे तिचे स्वरूप असल्यामुळे कोणते कृत्य केले असता आपले कल्याण यशस्वीपणे साधले जाईल, हे ठरवायला व ते कृत्य करायला ती मोकळी असली पाहिजे. व्यक्ती जर केवळ वस्तू असती, तर तिला सामान्य नियमांना अनुसरून वेगवेगळ्या घटना घडल्या असत्या – निसर्गातील इतर वस्तूंना घडतात तशा – आणि अशी वस्तू असताना तिला जाणीवही असती, तर आपल्याला आणि आपल्या हातून काय घडते आहे आणि ते कसे घडते आहे हे ज्ञान तिला असते. 'आपल्याला काय घडेल?' हा प्रश्नही तिला पडला असता; पण 'आपण काय करावे?', 'मी काय करू?' हा प्रश्न तिला पडला नसता. हा प्रश्न माणसाला पडतो ह्याचा अर्थ असा की, आपण काय करावे हे निश्चित करायला आणि ते निश्चित केल्यावर तसे करायला माणूस मोकळा असतो. कर्ता म्हणून माणूस स्वतंत्र असतो.

आता 'साध्यांच्या राज्या'तील प्रत्येक सदस्य स्वतःचे कल्याण अशारीतीने साधायला स्वतंत्र असतो. तेव्हा ह्या राज्यात जर सुसंगती, सुसंवाद नांदायचा असेल, तर प्रत्येक व्यक्तीने आपले कल्याण काही नियमांना अनुसरून साधले पाहिजे आणि हे नियम (निर्बंध) जर व्यक्तीच्या स्वातंत्र्याशी सुसंगत असायचे असतील, तर ते व्यक्तीने स्वतःच स्वतःसाठी घालून दिले पाहिजेत. आणि *प्रत्येक* कर्त्या व्यक्तीने ते स्वतःसाठी घालून दिले पाहिजेत. हे नैतिक नियम किंवा निर्बंध होत. ह्याचा अर्थ असा होतो की, नैतिक नियम हे प्रत्येक माणसाने स्वतःसाठी आणि त्याच वेळी इतरांसाठीही घालून दिलेले असतात. ते घालून देताना माणूस सार्वभौम असतो आणि पाळताना त्यांच्या अंकित असतो. असा अंकित असतो तेव्हाही स्वायत्त असतो. कारण, नियम पाळण्याचे ठरवून तो पाळीत असतो.

नैतिक समाजाचे स्वरूप कांटने स्पष्ट केले आहे. अशा समाजातील प्रत्येक व्यक्ती स्वतंत्र कर्ता असते. म्हणजे ती एक स्वतंत्र कर्ता आहे अशा रीतीने तिला सर्व संदर्भात वागविणे योग्य आहे. ह्यामुळे समाजातील सर्व व्यक्तींचा मूळ दर्जा समान असतो. प्रत्येक जण नैतिक नियमांच्या समान अंकित असतो त्याचप्रमाणे ते घालून देणारा 'शासक' ह्या पवित्र्यात 'सार्वभौम' असतो. ही सार्वभौमता सर्वांमध्ये सम प्रमाणात विभाजित असते. माणूस स्वतःच्या कल्याणाकडे आणि त्याच्या साधनेकडे अशा सार्वत्रिक दृष्टिकोनातून पाहू शकतो, एकमेकांशी समान असलेल्या अनेकातील एक आपण आहोत अशा रीतीने स्वतःकडे आणि इतरांकडे पाहू शकतो. ह्यात माणसाची विवेकशीलता सामावलेली असते.

जाता जाता, विवेकशीलता (रॅशनॅलिटी) ह्या माणसाच्या अंगी असलेल्या शक्तीमुळे (फॅकल्टी) माणसाची स्वतःच्या कल्याणाविषयीची संकल्पना कशी संस्कारित होते हे पाहिले पाहिजे. जागृत झालेल्या त्या त्या इच्छेच्या समाधानातील सुख, अशा सुखांची मोठ्यात मोठी बेरीज म्हणजे माणसाचे कल्याण असे सुखवादी उपयुक्ततावाद्यांप्रमाणे कांट मानीत नाही, तर माणसाच्या विवेकशक्तीत सामावलेल्या मनःशक्तींचा – उदा., संकल्पनाशक्ती, कल्पनाशक्ती, इ. ह्यांचा – विकास आणि त्यांचा ज्ञानसाधना, कलानिर्मिती इ. व्यवहारातील आविष्कार हा मानवी कल्याणातील परमोच्च घटक आहे असे तो मानतो. थोडक्यात, विवेकशील प्राणी ह्या माणसाच्या प्रकृतीला साजेसे जीवन म्हणजे चांगले जीवन, ज्याच्यात माणसाने आपले कल्याण साधले आहे असे जीवन होय, अशी त्याची भूमिका आहे. अशा रीतीने जगण्याला भौतिक साधनेही आवश्यक असतात म्हणून चांगल्या जीवनात भौतिक साधनांच्या अर्जनाला, संपत्तीच्या अर्जनाला, स्थान असते. कांटची चांगल्या जीवनाविषयीची – साध्याविषयीची – कल्पना ॲरिस्टॉटलच्या कल्पनेशी वरीचशी मिळती-जुळती आहे; पण ह्या दोहोत महत्त्वाचा भेदही आहे. ॲरिस्टॉटलच्या कल्पनेप्रमाणे चांगले जीवन हे मूलतः व्यक्तीचे चांगले जीवन आहे. एका अंगाने चांगला समाज चांगल्या वैयक्तिक जीवनाला साधनीभूत आहे. चांगल्या वैयक्तिक जीवनाची पार्श्वभूमी म्हणून तो असतो; चांगल्या जीवनाच्या शक्यतेची तो अट आहे, पण तिचा घटक नव्हे. दुसऱ्या अंगाने तो घटकही आहे. ह्या अर्थाने की चांगल्या वैयक्तिक जीवनाचा एक भाग सामाजिक जीवनाचे चांगल्याप्रकारे व्यवस्थापन करण्यात गुंतलेला असतो. समाज हा चांगले जीवन जगणाऱ्या माणसांच्या अंगी असलेल्या काही सद्‌गुणांच्या आविष्काराचे क्षेत्र असते; पण ह्या दृष्टीने सुद्धा समाज हे चांगल्या जीवनाचे एक प्रकारचे साधन-माध्यम असते. चांगले जीवन (किंवा साध्य) हे वैयक्तिकच असते.








ह्याच्या उलट कांटला मान्य असलेले चांगले जीवन किंवा साध्य हे भक्कमपणे सामाजिक आहे. साध्यांच्या राज्याचा सदस्य – स्वायत्त मानवी कर्त्यांच्या समाजाचा सदस्य – म्हणूनच व्यक्ती चांगले जीवन जगू शकते. असा सदस्य म्हणून जगायचे तर माणसाचे प्रत्येक कृत्य हे सर्व माणसांच्या स्वायत्ततेची समान प्रमाणात कदर करणारे असे असावे लागते. म्हणजे जे नियम करण्यात आपापल्या कल्याणाची साधना करणारे कर्ते म्हणून सर्व व्यक्तींची सहमती असेल अशा नियमांना म्हणजे नैतिक नियमांना अनुसरूनच व्यक्तीने प्रत्येक कृत्य केले पाहिजे आणि अशाच कृत्यांच्या द्वारे आपले साध्य – उदा., आपले सुख, आपल्या शक्तींचा विकास आणि आविष्कार, संपत्ती, इ. – साधले पाहिजे. कांटची ठाम भूमिका अशी आहे की, जर अनैतिक कृत्यांनी एखाद्याने ही साध्ये साधली तर त्यांना काहीच मूल्य नसते; उलट ती दुरिताची रूपे असतात. मी माझ्या प्रतिभेची जोपासना करून उत्कृष्ट काव्यरचना केली, ह्या काव्याचे इतके भावात्मक मूल्य आहे, पण मी अनैतिक मार्गाने ही जोपासना केली, तिचे इतके ऋणात्मक मूल्य आहे, भावात्मक मूल्यातून ऋणात्मक मूल्य वजा केले की, जी बाकी उरेल तितके एकंदरीत मूल्य माझ्या प्रतिभेच्या विकासाला आणि त्यातून झालेल्या काव्यनिर्मितीला आहे, असा मूल्यात्मक हिशोब मांडताच येत नाही. जी मानवी साध्ये आहेत, चांगल्या मानवी जीवनाचा जो आशय आहे त्याला नीतीनिरपेक्ष असे मूल्य असूच शकत नाही. नैतिक कृत्यांच्या द्वारा जर ही साध्ये साधलेली असली, तरच त्यांना मूल्य असते. साध्यांची साधना नैतिक कृत्याद्वारे होणे ही ह्या साध्यांना मूल्य असण्याची अनिवार्य अट आहे.

'खरे बोलावे', 'चोरी करू नये', 'दिलेले वचन पाळावे', इ. जे 'चिरंतन' नैतिक नियम म्हणून आपण व्यवहारात मानतो (आणि जे नेहमीच पाळतो असे नाही) ते नियम कांटला अभिप्रेत असलेले नैतिक नियम आहेत. ह्या नियमांच्या जाळ्यातून जी नैतिक चौकट उभी रहाते तिला अनुसरून, तिच्याशी सुसंगत ठरेल अशा रीतीने माणसांनी आपली साध्ये साधण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ही दिलेली, प्राप्त झालेली – उदा., देवाकडून – चौकट नव्हे. तर ती विवेकशील माणसांनी निर्माण केलेली आणि टिकवून धरलेली अशी चौकट आहे. ती निर्माण करण्यात आणि टिकवून धरण्यात माणसाच्या विवेकशीलतेचा आविष्कार होतो. ही विवेकशीलता फलद्रूप होते आणि म्हणून ती असण्यात आणि तिला अनुसरून वागण्यात माणूस विवेकशील प्राणी हे स्वतःचे स्वरूप सिद्ध करीत असतो, ते प्रत्यक्षात मूर्त करीत असतो आणि म्हणून असे वर्तन हा माणसाच्या कल्याणाचा भाग असतो; आणि आपण वर पाहिले त्याप्रमाणे माणसाच्या समग्र कल्याणाचा पायाभूत भाग असतो. उदा., मी जर चोरी केली तर दुसऱ्याच्या मालमत्तेचा भाग मी परवानगीशिवाय घेत आहे असा त्याचा अर्थ होतो; स्वतःच्या कल्याणाची साधना करणारी स्वायत्त व्यक्ती म्हणून तिला ज्या साधनांची जरुरी असते त्याच्यातील एक साधन मी हिरावून घेतले आहे असे माझ्या कृत्याचे स्वरूप आहे. हे माझे कृत्य एक स्वायत्त, स्वतःच्या कल्याणाचा साधक असलेला कर्ता ह्या त्याच्या स्वरूपाशी, दर्जाशी विसंगत आहे. स्वायत्त कर्ते म्हणून सर्व व्यक्ती जिच्यात एकमेकांची कदर करतात अशी जी 'साध्यांच्या राज्याची चौकट आहे तिचा भंग ह्या कृत्याने होतो. ह्या सर्व व्यक्तींनी स्वेच्छेने (विवेकशील व्यक्ती म्हणून) ही चौकट टिकवून धरलेली असते. तिचा मी स्वेच्छेने भंग करतो तेव्हा माझ्यापुरती ही चौकट मी पुसून टाकलेली, नाहीशी केलेली असते, आणि हे अनैतिक आहे.

कांटच्या दृष्टिकोनातून चांगले मानवी जीवन कसे असेल? चांगला माणूस एकतर नैतिक चौकट पाळेल. ह्या चौकटीशी सुसंगत रीतीने तो आपल्या शक्तींचा विकास आणि आविष्कार करील. ह्याशिवाय इतरांना अशा रीतीने जगण्याला साहाय्य करील. (कारण, इतरांनी आपल्याला असे साहाय्य करावे असे आपल्याला वाटते, तेव्हा आपणही इतरांना सहाय्य करावे हे विवेकाला धरून आहे.)

पण आता एक मोक्याचा प्रश्न उद्‌भवतो. तो मार्क्सने कांटला विचारला असता. प्रश्न असा की, 'साध्यांचे राज्य' – जिच्यात प्रत्येक मानवी व्यक्तीची स्वतःचे कल्याण साधू पहाणारा विवेकशील स्वायत्त कर्ता म्हणून समान कदर आहे अशी व्यवस्था – ही वस्तुस्थिती आहे का? जेथे गुलामगिरीची पद्धत आहे किंवा भूदासाची पद्धत आहे किंवा उच्चनीचतेवर आधारलेली जातिव्यवस्था आहे तेथे ही वस्तुस्थिती नाही. हे उघड आहे. पण जेथे औपचारिकदृष्ट्या सर्व व्यक्ती स्वतंत्र आणि समान आहेत असे मानले जाते अशा समाजातही जर काही व्यक्तींची परिस्थिती वास्तवात जर इतकी हलाखीची असेल की वाटेल त्या अटीवर, मोबदल्यावर काम करण्याशिवाय त्यांना गत्यंतर नसते, तर असा समाज हा 'साध्यांचे राज्य' ह्या वर्णनाला पात्र होईल का? ह्या प्रश्नाला कांटचे उत्तर असे की, 'साध्यांचे राज्य' ही संकल्पना प्रत्यक्षात मूर्त झालेली असो वा नसो, जणू काय ती वास्तव आहे अशी कल्पना करून योग्य वर्तन कोणते आणि अयोग्य कोणते ह्याचा निर्णय मी केला पाहिजे. समाजातील प्रत्येक व्यक्ती इतर प्रत्येक व्यक्तीच्या स्वायत्ततेची समान कदर करून जर प्रत्येक प्रसंगी वागत असती तर एखाद्या विशिष्ट प्रसंगी ती जशी वागली

असती तसे वागणे म्हणजे नीतीने वागणे. ही नैतिक वर्तनाची व्याख्या आहे, किंवा त्याचा निकष आहे. हा निकष प्राप्त झाल्यानंतर नैतिक वर्तन म्हणजे कोणत्या प्रकारचे वर्तन हे मी ठरवू शकतो आणि त्याप्रमाणे वागू शकतो. ह्यासाठी साध्यांचे राज्य पृथ्वीवर वास्तवात अवतरले पाहिजे असा आग्रह धरायचे कारण नाही.

पण हे उत्तर पूर्णपणे समाधानकारक नाही हे उघड आहे. ह्या उत्तराचा आशय असा की, जगातल्या सर्व लोकांनी सर्व प्रसंगी नीती पाळली, तरच मी नीती पाळीन अशी अट कुणी घालणे योग्य नव्हे. इतर लोक कसे वागतात ह्याच्या निरपेक्ष मी माझी नीती पाळली पाहिजे, हे म्हणणे योग्य आहे. पण जगात जर काही व्यक्तींच्या स्वायत्ततेची अवहेलना किंवा गळचेपी होत असेल तर ही अनैतिक परिस्थिती आहे. तिचे निराकरण करून तिच्या जागी नीतीशी सुसंगत अशा परिस्थितीची स्थापना करणे हे नैतिक कर्त्यांचे कर्तव्य ठरते. म्हणजे साध्यांचे राज्य हे नीतीचे केवळ गृहीत कृत्य नाही; ते नीतीचे साध्यही आहे. कांटच्या विचारापलीकडे जाणारा हा विचार आहे. ही भर मार्क्सने घातली आहे.

पारंपरिक भारतीय नैतिक विचारात गांधीजींनी अशीच भर घातली आहे. एक परमात्मा माझ्यात आणि इतर सर्व माणसात (प्राणिमात्रातही) व्यक्त झाला आहे हे सत्य आहे. हे सत्य जाणून मी आत्मौपम्य बुद्धीने, सर्वांना सम मानून, सर्व भूतांच्या हितासाठी झटले पाहिजे. हे माझे कर्तव्य आहे. उदा., ब्राह्मण आणि शूद्र हा भेद असत्य आहे आणि दोघांना सम मानून त्यांच्या हिताची समान कदर मी केली पाहिजे. पण ब्राह्मण आणि शूद्र हा भेद जर असत्य असेल, तर माझ्या मनातून मी तो पुसून टाकणे पुरेसे होणार नाही. तो वास्तवातून, सर्व सामाजिक व्यवहारातून पुसून टाकला पाहिजे. जणू काय सर्व माणसे समान आहेत अशा रीतीने वागणे म्हणजे नीतीने वागणे हा नीतीचा एक भाग झाला. सर्व माणसांना समान स्थान वास्तवात लाभेल अशी व्यवस्था घडवून आणणे हा नीतीचा दुसरा, अटळ भाग आहे.

आजपर्यंतच्या भारतीय आणि पाश्चात्य नीतिशास्त्रात नीती ही वैयक्तिक साधनेच्या स्वरूपाची मानली गेली होती. तिचे साध्य वैयक्तिक होते, सामाजिक नव्हते. त्यात मार्क्स आणि गांधी ह्यांनी सामाजिक साधनेची भर घातली. ह्यामुळे जे संकल्पनात्मक आणि औपपत्तिक प्रश्न उपस्थित होतात, त्यांची विस्तृत चर्चा उपलब्ध वाङ्मयात झालेली नाही. प्रस्तुत पुस्तकातील विवेचनाद्वारा ह्या प्रश्नांना देवांनी चांगले तोंड फोडले आहे. त्यांत मार्क्सवाद्यांच्या हातून घडलेल्या व्यवहाराचे त्यांनी परीक्षण केले आहे आणि ते आवश्यक होते. कारण, ह्या बाबतीत अधिकृत मार्क्सवादी भूमिका काय राहील? जोपर्यंत साध्यांचे राज्य हे नीतीचे गृहीत कृत्य वास्तवात उतरलेले नाही तोपर्यंत खऱ्या नीतीने कुणाला वागता येणार नाही. जी नीती समाजात प्रचलीत असेल ती दिखाऊ, ढोंगी आणि अनीतीला पोषक अशी असेल. उदा., भुकेलेल्या, असहाय माणसाने, ज्याच्याकडे एवढे गडगंज आहे की त्याला त्याचे काय करावे हे कळत नाही अशा श्रीमंत माणसाच्या मालकीची भाकर त्याच्या परवानगीशिवाय घेतली तर ती चोरी ठरते; पण त्याने जी संपत्ती जमविली आहे ती चोरी ठरत नाही. तेव्हा रूढ नीती पाळण्याचे बंधन सामाजिक साधकावर नाही. उलट साम्यवादी समाज अवतरल्यावर जी नीती पाळली जाईल तिच्याप्रमाणे आज वर्तन करणे अप्रस्तुत ठरेल. ह्यातून एकच पर्याय उपलब्ध रहातो. इतिहासाच्या गतीच्या नियमांचे ज्ञान प्राप्त करून घेऊन, त्याच्या साध्याशी तादात्म्य पावून हे साध्य शक्य तितक्या जलद गतीने, सुरळीतपणे सिद्ध होण्यासाठी जे जे करणे आवश्यक आहे असे दिसून येईल ते करण्यात संपूर्ण नीती आहे. हे करताना रूढ नीतीची मर्यादा मानण्याचे कारण नाही. ह्यातून कोणत्या प्रकारचा अघोरी व्यवहार झाला हे आता सर्वांना माहीत आहे.

प्रश्न थोडक्यात असा आहे. सामाजिक साध्यावर आधारलेली नीती आपण स्वीकारली, तर वैयक्तिक साध्यावर आधारलेल्या रूढ नीतीत कोणती भर घालावी लागेल? आणि हे करताना रूढ नीतीला कोणत्या प्रकारे मुरड घालावी लागेल? त्या प्रश्नांचे तपशीलवार आणि काळजीपूर्वक विवेचन देवांनी ह्या पुस्तकात केले आहे. त्याचा सारांश देणे कठीण आहे. हे मूळातूनच वाचावे असे आहे.

❀ ❀ ❀

अनुक्रमणिका

# विभाग पहिला

शंकरराव देव यांचे व्यक्तित्व व कार्य यांच्यासंबंधी त्यांना कमीअधिक जवळून जाणणाऱ्या निवडक व्यक्तींचे लेखन या विभागात समाविष्ट केले आहे. प्रा. देवदत्त दाभोलकर, प्रा. वृंदा दाभोलकर व श्रीमती उषा पी. शरण यांचे लेख या अंकासाठी लिहिलेले आहेत. शंकररावांच्या व्यक्तित्वाचे विविध पैलू प्रकाशात यावेत, आणि सामग्र्याने त्यांचे दर्शन घडावे हा हेतू बाळगून लेखनाची निवड केली आहे.

अनुक्रमणिका

# शंकरराव

## दादा धर्माधिकारी

बऱ्याच वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. भूदानाचे एक शिबीर नैनीतालच्या पलीकडे भीमताल येथे घेण्यात आले होते. त्या वेळी कै. शंकररावही त्या शिबिराचे अधिष्ठाते म्हणून उपस्थित होते. त्यांचे शरीर अगदी मरगळीला आल्यासारखे झाले होते. दोन फर्लांगदेखील चालणे त्यांना जड जात होते. शिबिराच्या जागेजवळच एक बराच उंच डोंगर होता. त्याचे नाव कर्कोटक. एके दिवशी साऱ्या शिबिरार्थींनी त्या डोंगरावर सहलीकरिता जाण्याचे ठरविले. शंकररावांची स्थिती अर्थातच डोंगराच्या पायथ्यापर्यंतदेखील जाण्यासारखी नव्हती. पण त्यांचा हुरूप दांडगा! आमच्याबरोबर तेही निघाले. त्यांच्यावरोबर सुनंदा अत्रे (आता सौ. सुनंदा मोहनी) होती. शंकरराव फर्लांगा-फर्लांगावर विश्रांती घेण्यासाठी थांबत. असे ते काही फर्लांग चालले आणि त्यानंतर त्यांनी मध्ये विश्रांती घेण्याचे सोडून दिले व न थांबता चालू लागले आणि आमच्या बरोबरच शिखरावर पोहोचले. त्या डोंगरात पाणी फार दुर्मिळ होते. हिरवागार डोंगर असला तरी पाण्याच्या दऱ्या भलत्याच खोल होत्या! अशा त्या डोंगराच्या मध्यभागी अगदी निर्जन ठिकाणी एक साधूची टुमदार कुटी होती. चांगली सिमेंटची आणि त्यात तो साधु मोठ्या आनंदाने आणि आवश्यक त्या सुखसोयींनिशी राहात होता. तसा तो सडाच होता. पण त्याने पाणी व फराळाचे देऊन आमचे आतिथ्य केले. हे सारे त्याला कसे उपलब्ध झाले असेल याचा विचार शंकरराव करू लागले व म्हणाले, "मला या जीवनाचे आकर्षण आहे".

हे झाले शंकररावांचे एक दर्शन. दुसरा प्रसंग : उरुळीकांचनला राहात असताना शंकरराव दररोज सकाळी पुणे-सोलापूर राजमार्गावर फिरावयास जात असत. एकदा ठेच लागून पडले. मांडीचे हाड मोडले. काही बैलगाडीवाल्यांच्या लक्षात ते आले. त्यांनी शंकररावांना काळजीपूर्वक आश्रमात पोहोचविले. नंतर शंकरराव पुण्याला एका नावाजलेल्या सर्जनच्या नर्सिंग होममध्ये बरेच दिवस होते. आम्ही भेटायला रोज जात असु. काही दिवसांनी आम्ही त्या सर्जनना विचारले, "का हो! शंकररावांना लंगडत लंगडत तरी चालता येईल का?" सर्जन म्हणाले, "मुळीच नाही. कुबड्या घेऊन काही पावले जेमतेम टाकता येतील". आम्हांला शंकररावांची कीव आली! पण पुढे काही काळाने उरुळीला गेलो असता चमत्कारच पाहिला! शंकरराव हातात काठी घेऊन झपाझप पावले टाकीत मैल-दीड मैल रोज फिरत असत. हे शंकररावांचे दुसरे दर्शन. त्यांच्या जीवनात बरेच संकटाचे प्रसंग आले व प्रतिकूल परिस्थिती तर जणू काय त्यांच्या पाचवीलाच पूजलेली होती. प्रतिकूल परिस्थितीत ते अनेकदा व्याकुळही होत, पण नामोहरम कधीच झाले नाहीत. विलक्षण निर्धार व निग्रह त्यांच्या ठिकाणी असे. त्यांच्या मृत्यूनंतर लगेच श्री. एस्.एम्. अन्त्यदर्शनास आले असताना प्रेमाताई त्यांना म्हणाल्या, "एक पुरुषार्थी जीवन समाप्त झाले!" तेव्हा एस्.एम्. म्हणाले, "मनस्वी म्हणा!" ते खरे आहे. शंकरराव संस्कृतातील अर्थाने मनस्वी होते आणि मराठी अर्थानेही मनस्वी होते. हा त्यांचा उभयार्थाने मनस्वीपणा त्यांच्या सार्वजनिक जीवनात अनेकदा प्रत्ययाला आला आहे. कित्येकदा लोकांनी त्या मनस्वीपणाचे कौतुक केले तर कित्येकदा तो त्यांना खुपलाही. येरवड्याच्या तुरुंगात फटक्यांची शिक्षा झाली, त्या वेळचे शंकररावांचे धीरोदत्त वर्तन सर्वश्रुतच आहे.

विद्यापतीने आपल्या 'पुरुष-परीक्षा' या ग्रंथात

वीरः सुधीः सुविद्यश्च पुरुषः पुरुषार्थवान्।
तदन्ये पुरुषाकाराः पशवः पुच्छवर्जिताः।।

असे पुरुषाचे लक्षण केले आहे. त्यापैकी पुरुषार्थवान हे लक्षण शंकररावांना लागू पडते, हे सगळ्यांनाच मान्य होण्यासारखे आहे. शंकररावांच्या ठिकाणी निष्ठा व निश्चय यांचे बळ भरपूर होते. जी गोष्ट एकदा पटली, तिच्यासाठी सर्वस्वाची कुरवंडी करावयास ते तत्पर असत. त्यांच्या अंगी अद्भुत समर्पणशक्ती होती. स्वीकारलेल्या कामाच्या मागे ते झपाटल्यासारखे लागत असत. त्यामुळे त्यांच्या स्वभावात एक प्रकारचा कडवेपणा आला होता. करारीपणा आणि खंबीरपणा हे कडवेपणाचेच सहोदर गुण आहेत. सुरुवातीसुरुवातीला त्यांच्या त्या खडबडीत, रखरखीत व उग्र व्यक्तिमत्त्वाचा मला वचक वाटत असे. त्यांच्यापासून मर्यादित अंतरावर राहण्यातच खैर वाटत असे. परंतु काही

*गांधीजी आणि लोकस्वराज्य*, या शंकरराव देव यांच्या पुस्तकाला लिहिलेली प्रस्तावना साभार पुनर्मुद्रित.

अनुक्रमणिका

प्रसंगी त्यांच्या अंतरंगात दडलेला गोडवा व प्रेमळपणा यांचा प्रत्यय मला आला. त्यांच्या सौहार्दाचा व स्नेहाचा अनुभव मला आला आणि शंकररावांचे एक वेगळेच दर्शन घडले. त्यांना दोन-तीन प्रसंगी जाहीरपणे अश्रू गाळताना मी पाहिले आहे. घटना परिषदेच्या वेळी ते व मी दोघेही दिल्लीत होतो आणि त्यापूर्वीही गांधी सेवा संघात त्यांच्या सान्निध्याचे प्रसंग अनेक येत असत. बजाजवाडीत ते श्री. धोत्र्यांकडे उतरत असत आणि अगदी सहजपणे बजाजवाडीतील मुलांच्या फुटबॉलच्या खेळात सवंगडी म्हणून सामील व्हायचे. तरी पण विनोबांच्या भूदान चळवळीमध्ये शंकररावांचे जे दर्शन झाले, ते अगदी निराळेच होते. भूदानातून अगदी वेगळ्या शंकररावांचा प्रादुर्भाव झाला होता आणि ते त्यांचे दर्शन भव्य व मनोहारी होते.

तरी पण शंकरराव सुधी व सुविद्य असतील असे मात्र कित्येक बुद्धिमंतांना वाटत नसे. याचे कारण शंकरराव हे आचारप्रभव पुरुष होते. कर्मातून त्यांच्या प्रज्ञेला अंकुर फुटत असत. त्यांची ज्ञानग्रहणाची पद्धती प्रत्यक्ष शिक्षण पद्धतीची होती. जिज्ञासा प्रदीप्त झाल्यावर ते वाचनही त्या अनुरोधाने उदंड करीत. त्या विषयाचा साधक बाधक विचार करणारी जेवढी पुस्तके मिळतील, तेवढी ते अगत्यपूर्वक वाचीत असत. जिज्ञासेच्या पोटी "पंडितैः सह मित्रताम्" हा छंदही त्यांना लागला होता. आचार्य जावडेकर, आचार्य भागवत यांच्याशी तर त्यांचे घनिष्ठ संबंध होतेच, पण 'समाज प्रबोधन' सारख्या संस्था स्थापून त्यांनी अनेक क्रियाशील व मनीषी आणि विद्वान यांचे सहकार्य मिळविले होते. ज्ञानार्जनाच्या बाबतीत शंकरराव साक्षेपी होते. ज्ञानार्जनाचा त्यांचा हव्यासही त्यांच्या जिज्ञासेला अनुरूप असाच होता. अंगीकृत चळवळीच्या किंवा कार्याच्या अगदी बुडाशी जाऊन त्याची सांगोपांग चिकित्सा व चर्चा करण्याचा त्यांचा स्वभाव होता.

एरव्ही शंकररावांचा आदेश व त्यांच्या भाषेतील आक्रमक ओज पाहून असे वाटायचे, की ते अहिंसेचे प्रतिपादनदेखील दात-ओठ खाऊन व मूठ वळवूनच करीत असावे. अहिंसेचे अनेक बेफाम पुरस्कर्ते तसे करीतही असत. परंतु ज्यांनी शंकररावांना कोरगांवकर संमेलनात त्यांच्यावर होणाऱ्या चौफेर हल्ल्यांच्या वेळी बघितले असेल, त्यांना असे आढळून आले असेल, की शंकररावांमध्ये स्वमताविषयी बळकट निष्ठा असली तरी आग्रह नव्हता; जिद्द असली तरी हट्टीपणा नव्हता. त्यांच्या काही मित्रांनी त्यांचे वर्णन 'मठ्ठ आणि घट्ट' या शब्दांत केले आहे. ते घट्ट होते म्हणजे विचारपूर्वक स्वीकारलेली मते सहजासहजी सोडीत नसत. म्हणजे ते चंचल नव्हते. आपल्या निष्ठेला चिकटून राहात असल्यामुळे ते घट्ट वाटायचे आणि त्यामुळेच मठ्ठही वाटायचे. कारण इतरांना त्यांचा राग येई व असे वाटे, की हा माणूस दुसरी बाजू समजून घ्यावयाला तयारच नाही, आग्रही आहे. पण ते खरे नव्हते. दुसऱ्याची बाजू समजून घेताना स्वतः विचारपूर्वक स्वीकारलेली बाजू कितपत बळकट आहे, हा विचारही त्यांच्या मनात येत असे. पण याचा अर्थ असा नाही, की दुसरी बाजू कळायला त्यांना वेळ लागत असे. त्या अर्थाने ते 'मठ्ठ' किंवा 'ठोंब्ये' नव्हते. उलट जीवनात जसजशी स्थित्यंतरे होत गेली, तसतशी त्यांची सुप्त प्रज्ञा फाकत गेली. त्यांच्या जीवनात, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा सतत विकास झालेला आढळतो. हे जिवंतपणाचे लक्षण आहे.

स्वातंत्र्योत्तर काळात त्यांची प्रज्ञा मुख्यत्वेकरून तीन घटनांच्या संदर्भात विशेष विकास पावलेली दिसते. एक भूदान आंदोलन, दोन संयुक्त महाराष्ट्राची चळवळ आणि तीन दिल्ली-पेकिंग मैत्री-यात्रा. दिल्ली-पेकिंग मैत्री-यात्रेच्या वेळी मधून मधून मी त्यांच्या यात्रेत सामील होत असे. त्यांच्या सहयात्रिकांत मायकेल स्कॉट हा साधुवृत्तीचा पण बुद्धिमान आणि मननशील यात्रिक होता. त्या यात्रेत शंकरराव जे नित्य-नूतन आणि साजुक विचार मांडीत असत, ते विचार व त्यांची भाषा पाहून स्कॉट व त्याचे विदेशी मित्र थक्क होऊन जात असत! भूदान यज्ञाच्या चळवळीत विनोबांच्या प्रतिभेचे नवनवोन्मेष प्रकट होत असत. त्यांतील सर्वात महत्त्वाचा म्हणजे विनोबांनी सत्याग्रहाच्या विकसित स्वरूपाचे केलेले विशद भाष्य. विनोबा म्हणायचे की, हिंसेचा विकास उग्र, उग्रतर व उग्रतम अशा हिंसेत होतो; पण अहिंसेचा विकास तर सौम्य, सौम्यतर व सौम्यतम अशा अमोघ अहिंसेतच झाला पाहिजे. त्यामुळे अनेक कुशाग्र बुद्धीच्या प्रज्ञावंतांना वाटायचे, की "हा विनोबा गांधींच्याही पुढे जाण्याचा आव आणतो. 'कानामागून आला आणि तिखट झाला!' याने गांधींच्या मार्गाचा अधिक्षेप आरंभिला आहे". शंकररावांनाही आरंभी आरंभी तसेच वाटे पण त्यांच्या स्वभावाप्रमाणे विषयाच्या मुळाशी जाण्याचा क्रम सुरू झाला आणि शेवटी विनोबांचेच म्हणणे कसे बिनतोड होते, या निष्कर्षावर ते पोहोचले.

प्रस्तुत प्रबंध काळजीपूर्वक वाचल्यानंतर सूज्ञ वाचकांना याची साक्ष पटेल. या प्रबंधातील विवेचन त्यांच्या विदारक बुद्धिमत्तेची साक्ष देईल. राज्यसंस्था, शासन व अहिंसक प्रतिकार इत्यादी विषयांचे जे मूलग्राही, सूक्ष्म व विचारप्रवर्तक आणि विद्वत्ताप्रचुर विवेचन शंकररावांनी केले आहे, ते वाचून अनेक वाचकांना त्यांच्याविषयीचे स्वतःचे मत बदलावे लागेल. विनोबांनी 'एकनाथांची भजने' या आपल्या पुस्तकाला जी प्रस्तावना जोडली

आहे त्या प्रस्तावनेत या मुद्याचे सूत्रात्मक संक्षिप्त पण समर्पक विवेचन केले आहे. शंकररावांनी त्यावर विस्तृत व सखोल भाष्य केले आहे. प्रतिपक्षाबद्दल प्रेम व आत्मीयता जितकी उत्कट असतील तितकाच प्रतिकार स्नेहमय व उत्कट असेल. म्हणजे त्यांच्यातील प्रतिकाराचा अंश कमी कमी होत जाऊन सहकाराचा अंश वाढत जाईल. प्रेमाच्या प्रक्रियेचे हे वैशिष्ट्य आहे. अहिंसात्मक प्रतिकार जरी सुरुवातीला प्रतिकूल असला तरी त्याचा विकास अनुकूल प्रतिकारांत होत जातो. प्रतिकार शब्दाचा अनुरूप वर्तन, अनुकूल वर्तन असाही अर्थ होतो. आपल्या प्रेमाचा प्रतिकार कसा करावा तेच मला कळत नाही, अशा अर्थानेही प्रतिकार शब्द वापरण्यात येतो. येथे प्रतिकार म्हणजे प्रत्युपकार, परतफेड.

आल्बर्ट स्वाइत्झरने गांधींवर असा आरोप केला आहे की, सत्याग्रहासारख्या पारमार्थिक साधनाचा व्यावहारिक क्षेत्रांत प्रयोग करून गांधींनी जमिनीच्या चार पावले वर चालणारा परमार्थाचा रथ खाली ओढून त्याचे पावित्र्य संपुष्टात आणले! या आक्षेपाचा समाचार शंकररावांनी ज्या तर्कशुद्ध शैलीने घेतला आहे, ती मोठी वक्तृत्वपूर्ण वाटते! शंकररावांचे म्हणणे असे, की लौकिक व्यवहारात प्रयोग केल्यानंतर ज्या साधनाचे शुचित्व कमी होत असेल, ते साधन शुद्ध नाही, सोवळे आहे. जे साधन शुद्ध असते ते ओवळे होते एवढेच, अशुद्ध होत नाही. शुद्ध साधनाचा प्रयोग लौकिक क्षेत्रात केला तर लौकिक क्षेत्र शुद्ध होईल. त्याचे अशुचित्व कमी होईल. हा शुद्धीकरणाचा प्रयोग व्यावहारिक क्षेत्रात करून गांधींनी त्याचे व्यापकत्व वाढवले. हे गांधीजींचे मानवीय इतिहासाला अपूर्व योगदान आहे. (शब्द माझे, आशय शंकररावांचा.)

कुठल्याही घटनेची किंवा आव्हानाची प्रतिक्रिया शंकररावांच्या मनावर मोठी तीव्र स्वरूपाची होत असे. निकराचा हल्ला झाला तरी ते डगमगत नसत, पण स्वकीयांच्या आक्षेपाने ते विषण्ण होत असत. परंतु त्यांच्या विषादाला इतरांविषयीच्या जुगुप्सेचे स्वरूप सहसा येत नसे. कारण ते प्रयोगनिष्ठ पुरुष होते. हाती घेतलेल्या कामाचा त्यांना ध्यास लागत असे. आपल्या प्राचीन परंपरेत चिंतन हे सत्यनिष्ठ, ऋतनिष्ठ असावे असा एक संकेत आहे. सत्यनिष्ठ म्हणजे आत्मनिष्ठ व ऋतनिष्ठ म्हणजे वस्तुनिष्ठ. लोकशाहीच्या संदर्भात या प्रबंधांतून शंकररावांनी 'पुरुषाच्या सत्त्वाचे' जे सूक्ष्म विवेचन केले आहे त्यावरुन वाचकांना त्यांच्या या भूमिकेची साक्ष पटेल.

तसे तर शंकररावांनी आपल्या आयुष्यात अनेक प्रयोग केले. पण त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या विकासाच्या दृष्टीने आणखी एक महत्त्वाचा प्रयोग म्हणजे काशी येथील साधना केंद्रात त्यांनी केलेला सामुदायिक कुटुंबाचा प्रयोग होय. या प्रयोगाचे स्वरूप कॉम्यून, किवुत्झ किंवा आश्रम या प्रयोगांहून भिन्न होते. अहिंसेच्या वाटचालीचे ते पुढचे पाऊल होते. कौटुंबिक मूल्यांचा प्रयोग सामुदायिक जीवनात कसा करता येईल हे त्यांचे उद्दिष्ट होते. त्या सामुदायिक कुटुंबाच्या पितृस्थानी शंकररावच होते.

त्याचवेळी कृष्णमूर्तींशी त्यांचा सलगीचा संबंध आला. 'संपूर्ण कृती' (टोटल ॲक्शन) बद्दल त्यांची मोठी उद्‌बोधक चर्चा होत असे. विनोबा, श्रीअरविंद व भगवान रमणमहर्षी यांच्या वाङ्मयाचा अभ्यास ते करीतच होते. या व्यतिरिक्त काशीचे सुप्रसिद्ध विद्वान पं. अनंतशास्त्री फडके यांची ब्रह्मसूत्र भाष्यावर दररोज सकाळी प्रवचने योजिली होती. शंकराचार्यांच्या 'ज्ञान हे वस्तुतंत्र असते' या विधानाचा त्यांच्यावर बराच परिणाम झाला. सदर प्रयोगामुळे शंकररावांचे व्यक्तिमत्त्व एका नवीन आयामाने संपन्न झाले. त्यांच्यांतील वात्सल्य प्रकट झाले!

अशा रीतीने शंकररावांच्या प्रतिभेचा निरनिराळ्या घटनांच्या व प्रसंगांच्या संदर्भात जो आविष्कार झाला त्याचे स्वरूप त्यांच्या या लिखाणावरून काही प्रमाणांत लक्षात येते. प्रेमाबाईंच्या सौजन्याने या प्रबंधाचे लक्षपूर्वक वाचन करण्याचा सुयोग घडून आला. शंकररावांच्या व्यक्तिमत्त्वातील एक वेगळेच वैशिष्ट्य या ग्रंथात प्रगट झाले आहे. त्यांची सुप्त प्रतिभा येथे उमलली आहे!

¤ ¤ ¤

# श्री. शंकरराव देव : "दैव देते आणि कर्म नेते"

(एका बृहदात्म चरित्राची 'स्व'रूपरेखा)

**देवदत्त दाभोलकर**

*दैव देते पण कर्म नेते* हे शंकरराव देव यांच्या उपलब्ध हस्तलिखितावरून सिद्ध केलेले त्यांचे आत्मचरित्र ३० डिसेंबर १९७६ या दिवशी प्रसिद्ध झाले. त्याचे संपादन प्रेमा कंटक यांनी केले आहे.

शंकररावांचा जन्मदिवसः ३० जानेवारी १८९५. त्यांचे निधन ३० डिसेंबर १९७४ या दिवशी झाले. शंकरराव आपल्या निवेदनात लिहितातः

"जे मी लिहून ठेवले होते त्याच्यावर सुरुवातीला ३ ऑक्टोबर ५६ अशी तारीख लिहून ठेवलेली आहे आणि लिखाणाचा प्रारंभ '१९२० साली महाराष्ट्राच्या सार्वजनिक राजकीय जीवनात एक प्रभावी आणि परिणामकारक वक्ता व एका नवीन राजकीय तत्त्वज्ञानाचा पुरस्कर्ता म्हणून मी प्रवेश केला.' या वाक्याने झाला आहे" (पृ. ५४).

निवेदनाचा शेवट शंकरराव खालीलप्रमाणे करतातः

"परिणाम : ही 'कथा' लिहिली गेली :-

एका जीवाच्या आयुष्यातील –

**'दैव देतें पण कर्म नेतें'** (जाड ठसा मुळाप्रमाणे)

या खेळाची."

या निवेदनाच्या खाली ते लिहिलेल्या दिवसाची व स्थळाची नोंद आहे. ती अशी –

२.४.१९७०, कौसानी.

**शीर्षक**

शंकररावांनी आपल्या आत्मचरित्राला हे शीर्षक द्यावे याचे अनेकांना दुःख झाले आहे. शंकररावांचे असे करणे बहुतेकांना विचित्र व त्यांनी स्वतःवरच अन्याय करणारे आहे असेही बहुतेकांना वाटले आहे. या शीर्षकाचा काहीसा उलगडा करण्याचा प्रयत्न संपादिका प्रेमा कंटक यांनी आपल्या "ग्रंथाची मांडणी" या प्रास्ताविकात केला आहे. त्या लिहितात : (पृ. अक्षरी नऊ)

"श्री. शंकररावांच्या आयुष्यात वारंवार असे प्रसंग आले आहेत की, एखाद्या महान उद्दिष्टासाठी त्यांनी प्रचंड साक्षेप करावा व ते उद्दिष्ट हाती येताना यशाचे श्रेय त्यांना न मिळता ते अन्य व्यक्तीस मिळावे! शंकररावांना काही काळ अज्ञात राहणे भाग पडावे! याला त्यांनी 'दैव देते पण कर्म नेते' असे म्हटले आहे. मुंबईसहित संयुक्त महाराष्ट्राच्या निर्माणासाठी त्यांनी भगीरथ प्रयत्न व तेही वर्षानुवर्षे सतत केले! कार्य सिद्धीस गेले पण यश त्यांना न मिळता उलट 'निंदा जनी त्रास अपमान उपहास अर्थी विपर्यास' हे सर्व क्लेश भोगावे लागले. त्या अग्निदिव्यातून बाहेर पडताना (अशी दिव्ये पण याहून कमी तीव्रतेची त्यांना पूर्वीही करावी लागली होती) त्यांना मनस्वी मानसिक कष्ट झाले. जिवंतपणी पदोपदी विष पिण्याचा अनुभव पचविणे सोपे नसते".

प्रेमा कंटक यांनी या शीर्षकाचा अन्वयार्थ असा लावलेला आहे. शंकररावांच्या निकटवर्ती म्हणून त्यांच्या या मांडणीचे महत्त्व आहेच; परंतु, तरीही शंकररावांच्या एकूण जीवनसाधनेचे हे सम्यक् व सर्वदर्शी आकलन आहे असे वाटत नाही. हे आकलन शंकररावांना स्वतःचे स्वतःलाही झालेले नसावे इतके गुंतागुंतीचे असे त्यांचे व्यक्तिमत्त्व होते. त्यांचे चरित्र हा केवळ तपशिलाच्या मांडणीचा किंवा वरवरच्या आकलनाचा विषय नाही. मानसशास्त्रीय विश्लेषणाची ताकद असणाऱ्या एखाद्या समर्थ चरित्र लेखकाला आव्हान वाटावे अशा तोलामोलाचे त्यांचे व्यक्तिमत्त्व आहे. परंतु आज तरी त्या कुवतीचा लेखक नजरेसमोर येत नाही व कधी काळी निर्माण झाला तरी, त्याला तशी आवड व सवड असली पाहिजे.

हे असे का वाटते हेच काहीशा विस्ताराने व शक्य तितके शंकररावांच्याच शब्दात मांडावे हा या लेखाचा हेतू आहे. लेखाच्या उपशीर्षकातील " 'स्व'रूपरेखा" हा शब्द हा आशय मनात ठेवून योजलेला आहे. 'बृहदात्म' मागे काही छटा आहेत. शंकररावांनी (श्री. भाऊ धर्माधिकारी यांच्या साहाय्याने) महात्मा गांधींच्या वेळोवेळींच्या वचनांच्या आधारेच गांधीजींचे चरित्र लिहिले आहे. त्या ग्रंथाला त्यांनी *गांधीजींचे बृहद् आत्मचरित्र* असे यथार्थ शीर्षक दिले आहे. त्या ग्रंथाच्या शंकररावांनी लिहिलेल्या "ऋणमुक्ति" या प्रस्तावनेत व नंतरच्या अवतरणांच्या निवडीत व मांडणीतही स्वतः शंकररावांचे अंतरंगही अप्रत्यक्षपणे प्रकट होते असे आढळून येते.








'बृहदात्म' या विशेषणात जीवनसाधक म्हणून शंकररावांनी केलेल्या कणखर प्रयोगांविषयींचा आदरही माझ्या मनात अध्याहृत आहे. हे शीर्षक सुचावयाच्या आधी "परम-अर्थाचे साधक शंकरराव" असेच शीर्षक माझ्या मनात घोळत होते. माझ्या मनातील आशय नेमक्या पद्धतीने प्रकट करावयाचा तर परम-अर्थाचे हा शब्द अचूक कसा लिहिता येईल याचाही माझ्या मनाशी मी विचार करत होतो. तो माझ्या मनातील गुंता अजूनही सुटलेला नाही. नसो.

**विनोबा-पुरस्कार**

विनोबाजी अधिक नेमकेपणाने शंकररावांच्या अंतरंगात शिरले आहेत. *दैव देते व कर्म नेते* या शंकररावांच्या आत्मचरित्रासाठी लिहिलेल्या आपल्या पुरस्कारात ते म्हणतात :

"शंकररावांचे जीवन
सेवकत्व
साधकत्व
आणि लोकनेतृत्व
या तीन गुणांची
त्रिपदा गायत्री आहे".

**शंकररावांची भूमिका**

शंकररावांचे स्वतःविषयीचे आकलन कसे होते?

*दैव देते आणि कर्म नेते* या आत्मचरित्राच्या परिशिष्टात १९५४ मध्ये केव्हातरी शंकररावांनी स्वमुखाने सांगितलेल्या स्वतःच्या भूमिकेचा समावेश आहे. ती 'भूमिका' अशी (पृ. ३७३) :

"सर्वभूतहितासाठी कर्तव्यकर्मे करीत असता निर्विषय व निर्विकार अशा आत्मानंदाची अनुभूती मिळवीत जीवनाचा प्रवाह शांत मनःस्थितीत व्यतीत करावा हा प्राचीन ऋषींचा आदर्श डोळ्यासमोर आहे. प्राचीन ऋषींच्या जीवनापासूनच मला आध्यात्मिक जीवनाची प्रेरणा मिळाली आहे. अर्वाचीन काळच्या चौघा अध्यात्मवीरांनी स्फूर्ती दिली आहे. श्रीरामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, स्वामी रामतीर्थ व श्रीअरविंद घोष. ज्ञानेश्वरीचाही खोल परिणाम मनावर झाला आहे. सार्वजनिक जीवनाची प्रेरणा लोकमान्य टिळकांपासून मिळाली. जीवनपद्धतीचा आदर्श महात्मा गांधींनी शिकविला. हल्ली श्री. कृष्णमूर्तींची विचारसरणी व जीवनदृष्टी मनास पटत आहे."

२९ मार्च १९७० या दिवशी *गांधीजींचे बृहद् आत्मचरित्र* (खंड पहिला) या ग्रंथाला 'ऋणमुक्ति' या शीर्षकाखाली प्रस्तावना लिहिताना शंकरराव लिहितात : "गांधीजींचे माझ्यावर फार मोठे ऋण आहे याची जाणीव माझ्या अंतःकरणात सदा जागृत आहे. गांधीजींचे हे ऋण फेडावयाचे तर सामान्य माणसापुढे हा त्यांचा संदेश – म्हणजे, श्रद्धा व चिकाटी असेल, तर सामान्य माणसालाही सिद्ध करता येणार नाही असा एकही पुरुषार्थ जगात नाही, हा त्यांच्या जीवन चरित्रातून निघणारा संदेश – ठेवून त्यातून आपण मुक्त होऊ असे मला बऱ्याच काळापासून वाटत आले आहे. या ग्रंथामागची प्रेरणा ही आहे (पृ. अक्षरी आठ)".

शंकररावांनी या ठिकाणी ही या त्यांच्या ग्रंथामागची प्रेरणा आहे असे म्हटले आहे. परंतु खरे तर ही त्यांच्या एकूण जीवनसाधनेचीच प्रेरणा – गांधीजींना अभिप्रेत असलेल्या सर्व तपशिलासह – राहिलेली आहे. त्या तपशिलाचाही निर्देश 'ऋणमुक्ति' या निवेदनात अन्यत्र आहे.

शंकरराव लिहितात : "आजच्या मानवाच्या भौतिक आणि नैतिक जीवनात जी खाई पडली आहे ती कशी भरून काढावयाची हा मानवाच्या पुढे यक्ष प्रश्न आहे. या प्रश्नाचे पूर्ण उत्तर मिळावयाचे, तर त्याच्या सबंध सामाजिक जीवनाचा पाया नैतिक मूल्ये हा बनला पाहिजे; ही आजच्या युगाची मागणी आहे. गांधीजींचे जीवन म्हणजे या महान प्रश्नाचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न होता". (ऋणमुक्ति : पृ. अक्षरी चार)

हे उत्तर शोधण्याचे प्रयत्न म्हणजेच 'सत्याचे प्रयोग' व हे प्रयोग इतर वैज्ञानिक प्रयोगांइतकेच विज्ञाननिष्ठ असू शकतात ही शंकररावांची धारणा असावी. ते तसे स्पष्टपणे म्हणत नाहीत परंतु गांधीजींनी आपल्या आत्मचरित्राला 'सत्याचे प्रयोग' असे नाव का दिले असावे या संदर्भात लिहिताना ते तसे सूचित करतात. ते लिहितात :

"वैज्ञानिक काळाचा एक महान गुण हा आहे की, मूळ सत्याचा शोध करून त्याचा अनासक्तिपूर्वक व निरपेक्ष मनाने स्वीकार करावयाचा. ज्ञान हे वस्तुतंत्र आहे, पुरुषतंत्र नाही. वैज्ञानिक युगाचा दुसरा एक गुण हा की, विश्व हे जसे 'आहे' तसा त्याचा स्वीकार करावयाचा आणि तदनुसार स्वतःच्या विचारात आणि आचारात संगती साधावयाची. गांधींच्यात हे दोन्ही गुण असल्याचे दिसते". (ऋणमुक्ति : पृ. अक्षरी सहा)

गांधीजींना ही मांडणी काटेकोरपणे तशीच्या तशी मान्य झाली असती की नाही हा वादाचा, अधिक विवेचनाचा, विषय होऊ शकेल. परंतु स्वतः शंकररावांच्या भूमिकेचे सूचन या मांडणीतून मिळू शकते.






एरवी आधीच्याच पृष्ठावर शंकरराव म्हणतात : "गांधीजींचे सत्य म्हणजे साऱ्या सृष्टीशी सायुज्य हे होते. त्यांचे 'सत्याचे प्रयोग' हे अहिंसेच्या वा प्रेमाच्या मार्गाने विश्वाशी ऐक्य अनुभवण्याचे प्रयोग होते". (ऋणमुक्ति : पृ. अक्षरी पाच)

मानसशास्त्रीय आकलनाची आवश्यकता वाटते ती अशा सखोल संदर्भात. असे आकलन गांधीजींच्या बाबतीतही समर्थपणे झाले आहे असे (Erik Erikson ची आठवण ठेवूनही) म्हणता येत नाही.

गांधीजींच्या प्रयोगांचे त्यांना भावलेले तीन विशेष शंकरराव सांगतात (ऋणमुक्ति : पृष्ठे : अक्षरी सहा व सात) :

१) गांधीजींच्या सामाजिक जीवनाची प्रयोगशाळा सारे जीवन ही होती. त्या प्रयोगशाळेत 'ईश्वरा'पासून 'आहारा'पर्यंत सर्व विषय अंतर्भूत होते.

२) गांधीजींच्या जीवनप्रयोगांचा सखोलपणा व व्यापकता त्यांनी राजकीय क्षेत्रासारख्या गलिच्छ क्षेत्रातही नैतिक व धार्मिक मूल्यांचा प्रवेश करविण्याचा जो प्रयोग केला त्याने सिद्ध होते.

३) गांधीजींच्या जीवनप्रयोगांचा आणखी एक विशेष म्हणजे आपण एक सामान्य माणूस आहोत व ते प्रयोग सामान्य माणसासाठी करीत आहोत याची त्यांना जाणीव होती. मानव तितका समान म्हणून जे एका माणसाला करता येते ते दुसऱ्या माणसाला करता येणे शक्य आहे, अशी त्यांची वैज्ञानिक श्रद्धा होती. आपल्या सामान्यपणाची जाणीव असूनही ईश्वराचे साक्षात् दर्शन हे ध्येय त्यांनी आपल्यापुढे अखंड ठेवले होते. आपल्याप्रमाणे प्रत्येक माणसाला हे ध्येय प्राप्त करण्याची क्षमता आहे असे ते मानीत होते.

गांधीजींचे जीवन म्हणजे महान नैतिक तत्त्वावर आधारलेल्या सामान्य माणसाच्या जीवनाचा उत्कृष्ट नमुना झाला आहे, अशी शंकररावांच्या मनाची धारणा होती (ऋणमुक्ति : पृ. अक्षरी सात). या संदर्भात शंकरराव स्वतःकडे सामान्य माणूस म्हणूनच पहात होते.

आपण सामान्य माणूसच आहोत ही गांधीजींची मनोधारणा प्रामाणिक असली तरी 'सत्या'ला धरून नव्हती हे सगळे विश्व ओळखून होते. शंकररावही त्याच पद्धतीचे सामान्य 'असामान्य' माणूस होते. गांधीजींचे ते ऋणाईत होते. त्यांचा स्तर वेगळा होता; परंतु आपली मनःप्रकृति तशीच घडावी व आपली जीवनसाधनाही त्याच पद्धतीची व्हावी ही त्यांची तळमळ होती. या ताणाखालीच काही काळ ते मोडून पडले. गांधीजींनाही हे ताण अखेरपर्यंत सहजपणे पेलवले असे म्हणणेही वस्तुस्थितीला धरून होणार नाही. परंतु अनेकांच्या लौकिक यशापेक्षा अशी अपयशे अधिक गौरवशाली असतात.

अखेरच्या वर्षात गांधीजी तर पूर्णपणे खचलेले होते. स्वातंत्र्य मिळाले त्या दिवशी ते दिल्लीपासून, त्या सोहळ्यापासून दूरच राहिले. निदान राष्ट्राला काही संदेश तरी द्या, तुमचा संदेश नसला तर ते बरे दिसणार नाही, या विनवणीला देखील : 'बरे दिसणार नसेल तर नको दिसू देत' असे उत्तर त्यांनी दिले. "तेव्हा गांधीजींच्या तोंडून 'है नही कोई संदेश, होने दो खराब', एवढेच हृदयविदारक उद्‌गार निघाले!!" असे शंकररावांनी या संदर्भात लिहिले आहे (*भारताची स्वराज्य-साधना* : पृ. १३४). हताश, एकाकीपणाची ती भावना होती. असा एकाकीपणा नेत्याला अपयशाच्याच वेळी जाणवतो असे नाही. दुर्घट परिस्थितीला नेता म्हणून तुम्हाला ज्यावेळी सामोरे जावयाचे असते त्यावेळी असा एकाकीपणा वाटणे अटळ असते.

शंकरराव आपल्या जीवनात अशा परिस्थितीतून गेले होते. त्यामुळे *गांधीजींचे वृहद् आत्मचरित्रा*चा पहिला खंड गांधीजींच्या ज्या अवतरणाने संपला आहे त्यात मला, त्या निवडीमध्येही शंकररावांचेच प्रतिबिंब भासमान होते. ते अवतरण असे :

"ता. २७ ऑगस्ट (१९३१) रोजी सायंकाळी ७ वाजता सिमला येथे हा दुसरा समेट झाला व लंडनला जाण्याचा माझा मार्ग मोकळा झाला, तेव्हा पूर्वी कधी उद्‌भवले नाही एवढे मानसिक दौर्बल्य मला एकदम प्रकर्षाने जाणवू लागले; सिमल्याहून मला नेणाऱ्या आगगाडीत मी बसलो तेव्हाही हे दौर्बल्य माझ्यात तसेच राहिले. मी लंडनला जायला निघालो तो ईश्वर माझा एकमेव वाटाड्या मानून. तो एकमेव निष्ठा मागणारा स्वामी आहे. आपल्यावाचून दुसऱ्या कोणाची सत्ता तो चालू देत नाही. म्हणून आपले सारे दौर्बल्य त्याच्यापुढे खुले करून, रिक्त हस्तांनी आणि संपूर्ण शरणागतीच्या भावनेने जर आपण त्याच्यापुढे उभे राहिलो, तर तो आपल्याला साऱ्या जगापुढे ताठ उभे राहण्याचे सामर्थ्य देतो आणि सर्व भयापासून तो आपले रक्षण करतो. लंडन येथे पुढे काय वाढून ठेवले आहे याचा विचार करताना, हिन्दुस्थानात 'सब कुछ ठीक' नाही, या दुसऱ्या समेटात आपली काही शोभा राहिलेली नाही आणि त्याच्या आठवणीही काही सुखद नाहीत हे जाणत असताना, नितान्त निराशेने माझे अंतःकरण भरून गेल्याशिवाय राहिले नाही. पुढचे क्षितिज मला पराकाष्ठेचे अंधकारमय दिसले. रिकाम्या हातीच मी परत येण्याचा फार मोठा संभव मला वाटला. दुर्बलतेच्या जाणिवेने अशीच मनाची अवस्था होत असते; पण माझा भगवंतावर विश्वास होता. त्यामुळेच या लंडनच्या भेटीकडे मी आशेने पाहू लागलो आणि मनाशी

मानले की, जर काँग्रेसकडून मिळालेल्या आदेशाशी मी वफादार राहिलो, तर यातून जो काही परिणाम निपजेल तो राष्ट्राला हितकारकच ठरेल; पण यावेळी मात्र मला अगदी एकाकी वाटत होते, आणि तरी मी एकाकी नव्हतो (पृ. ५७७-५७८)."

या परिच्छेदाने शंकररावांच्या मनात संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनातील त्यांच्या नेतृत्वाच्या कालखंडाच्या स्मृती जाग्या केल्या असतील असे मला वाटते. त्या परिच्छेदाच्या शेवटचे वाक्यदेखील सूचक परंतु तरीही संभ्रमात टाकणारे आहे. "आणि तरी मी एकाकी नव्हतो" असे म्हणताना गांधीजींच्या मनात "ईश्वर त्यांचा साथी होता" असे म्हणावयाचे असेल असा दाट संभव आहे. गांधीजींची ईश्वरावर ज्या प्रकारची श्रद्धा होती त्याच प्रकारची शंकररावांची होती का, हादेखील एक संशोधनाचा विषय होऊ शकेल. ते आध्यात्मिक वृत्तीचे होते परंतु तरीही त्यांच्या बुद्धीने त्यांना ईश्वराचा भावनात्मक आधार घ्यावयास प्रतिबंध केला असता असे वाटते. या दृष्टीने त्यांची एकाकीपणाची भावना अधिकच उदास आणि गडद असली पाहिजे. मूक अवस्थेत विकल होण्याच्या आधी सहा एक महिने ते आचार्य भागवतांना म्हणाले होते : "मी आतून शुष्क होत चाललेलो आहे. आणखी सहा महिन्यांनी मी हे देखील तुम्हाला सांगू शकेन असे वाटत नाही". आचार्य भागवतांनीच हे मला सांगितले. पुढे घडलेही तसेच. त्या विकल अवस्थेतून त्यांना बाहेर काढण्यासाठी जे. कृष्णमूर्तींनी प्रयत्न केले. त्यांच्या समोर बसून त्यांच्या खांद्यावर आपले दोन्ही हात गच्च ठेवून कृष्णमूर्ती त्यांना आग्रहाने सांगत होते. "You must speak old man. You must speak. You are lonely, old man, you must speak".

याने म्हणा वा अन्य कशाने म्हणा, परंतु शंकरराव या अवस्थेतून बाहेर आले. परंतु एकाकीपणाच्या या भावनेतून अखेरपर्यंत ते कधीही पूर्णपणे बाहेर आले नाहीत.

याचा अभ्यास, विश्लेषण हे मानसशास्त्राला, मानसशास्त्रज्ञांना एक आव्हान आहे. तसे ते सामान्य व्यक्तीच्या बाबतही राहिले असते; परंतु शंकररावांच्या विशेष व्यक्तिगत इतिहासाच्या संदर्भात तर या आव्हानाचे आकर्षण अभ्यासकाला विशेषच वाटावे.

**जीवनपट**

असे विशेष तरी शंकररावांच्यात काय होते?

शंकररावांचा जन्म एका सर्वसामान्य मराठी कुटुंबात झाला. त्यांची आई त्यांना इतरांकडून केवळ ऐकूनच माहिती होती, इतक्या अल्पवयात ते मातृसुखाला आचवले! त्यांचे वडील आचाऱ्याचा व्यवसाय करीत आणि त्या काळातील सर्वसामान्य आचाऱ्याप्रमाणे ते व्यसनाधीन होते.

शंकररावांचा शैक्षणिक प्रवास फार खडतर होता. अनेक ठिकाणी, अनेक प्रकारे त्यांना आपले शिक्षण चालू ठेवावे लागले. त्यासाठी घरोघरी माधुकरी मागून कदान्नावरही जगावे लागले; पण त्यांनी पदवी संपादन केली.

याच काळात कर्नाटकसिंह गंगाधरराव देशपांडे यांच्यामुळे त्यांचा महात्मा गांधींशी संबंध आला आणि ते बिहारच्या चंपारण्य भागात निळीच्या शेतमजुरांत विधायक काम करण्यासाठी गेले. गांधीजींच्या जीवनाशी आणि विचारांशी त्यांचा इथेच परिचय झाला. [वरील तीन परिच्छेद श्री. यदुनाथ थत्ते यांच्या *गांधी मार्ग मीमांसा*च्या शंकरराव देव विशेषांकातील (जानेवारी-फेब्रुवारी १९९५) लेखातून उद्धृत, पृ. ६८].

लहानपणीच्या व विद्यार्थीदशेतील अनुभवामुळे असेल किंवा मूलभूत प्रकृतीच्या प्रभावामुळे असेल परंतु ते सार्वजनिक कामाच्या असंख्य माणसांच्या गर्दीत जन्मभर वावरूनही एकाकीच राहिले. त्यांचे निकटवर्ती श्री. भाऊ धर्माधिकारी आपल्या लेखात (*गांधी मार्ग मीमांसा* – देव विशेषांक : पृ. ४७) लिहितात :

"शंकरराव तसे स्वभावाने रूक्षच वाटणारे. गांधीजी उग्र तपस्वी, महान राजकारणी पण किती प्रेमळ! लहान मुलांचे ते पापेसुद्धा घेत. आई-बापांचे वात्सल्य, मित्राची स्नेहार्द्रता, जन्माच्या जोडीदारिणीविषयी अनन्यता अशा अनुभवांचा शंकररावांना स्पर्शच झाला नाही हे त्यांचे दुर्दैव. पू. केदारनाथ, पू. विनोबा हे देखील शंकररावांप्रमाणे संसारात-व्यवहारात न पडलेले, पण त्यांना आईवडिलांच्या प्रेमाची पाखर मिळाल्यामुळेच की काय कोणास ठाऊक, ते दुसऱ्यांना प्रेम देऊ शकले व त्यांचे प्रेम विश्वापर्यंत फाकले. पण म्हणून मानवी अंतःकरणात सहज उद्भवणारा प्रेमांकुर शंकररावांच्या अंतःकरणात उगवलाच नाही असे मी तरी म्हणणार नाही. त्यांच्या सहवासात दीर्घकाळ राहिलेला मी, बाह्य प्रेमाचे आविर्भाव ज्यांना म्हणतात तसे अनुभवले नसले तरी, त्यांच्या हृदयाच्या ओलाव्याचा मी अनुभव घेतला आहे. तो अनुभव काही निवडक मित्रांनाही मिळाला आहे. शंकररावांच्या बाह्यतः रूक्ष वाटणाऱ्या या स्वभावामुळे त्यांच्या सहवासात या ना त्या निमित्ताने येणारी माणसे त्यांच्या फार जवळ जाण्याची इच्छा करीत नसत; त्यामुळे शंकररावही लोकांच्या प्रेमाला पारखे राहिले. माणसाच्या अंतरंगाचा त्याच्या मुद्रेवरही परिणाम होतो. शंकररावांची मुद्राही लोकांना जवळ करण्याजोगी नव्हती... शंकररावांनी आपल्या प्रचंड घडामोडीच्या आयुष्यात हजारो लोकांशी व्यवहार केले, पण एकही त्यांचा सुहृद झाला नाही".








१९१९ मध्ये वयाच्या चोविसाव्या वर्षी शंकरराव गांधीजींच्या चंपारण्यातील कामात सहभागी होण्यासाठी गेले. १९२१ मध्ये नवीन घटनेप्रमाणे घडलेल्या महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेसचे ते चिटणीस झाले. १९२२-२३ च्या मुळशी पेटा सत्याग्रहात त्यांना तुरुंगवास घडला व तेथे फटक्यांची शिक्षाही सहन करावी लागली. १९२४ मध्ये महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीतून ते निवृत्त झाले. त्यानंतर *स्वराज्य* पत्र त्यांनी वर्षभर चालवले. १९३० मध्ये ते महाराष्ट्रातील सत्याग्रह मंडळाचे अध्यक्ष – महाराष्ट्राचे डिक्टेटर – होते. त्यावेळी त्यांना दीड वर्ष कैदेची शिक्षा झाली. १९३१ मध्ये सुटका झाल्यानंतर ते महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष झाले. डिसेंबर १९३६ मध्ये फैजपूर येथे घेतलेल्या काँग्रेस अधिवेशनाचे ते स्वागताध्यक्ष होते. १९३८ मध्ये त्यांनी श्री. केशवराव जेधे यांना महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्षपद दिले. १९४० मध्ये वैयक्तिक सत्याग्रह करून तुरुंगांत. १९४१ मध्ये सुटका. ९ ऑगस्ट १९४२ रोजी पहाटे इतर राष्ट्रीय नेत्यांसह गिरफदार. जून १९४५ पर्यंत तुरुंगवास. १९४७ मध्ये मीरत काँग्रेसच्या अधिवेशनात काँग्रेसचे सरचिटणीस झाले. १९५१ मध्ये नाशिक काँग्रेस अधिवेशनाच्या वेळी ते अध्यक्षपदासाठी उभे राहिले. परंतु त्या निवडणुकीत त्यांना पराभव पत्करावा लागला. १९५२ मध्ये सर्वोदय समाज व सर्व सेवा संघ यांचे मंत्री झाले. सेवापुरी येथे सर्वोदयी कार्यकर्त्यांचे संमेलन भरले. त्यात पंचवीस लाख एकर जमीन दानात मिळविण्याचा संकल्प करण्यात आला. त्याला अनुसरून पहिली पदयात्रा पुरंदर तालुक्यात सुरू झाली. १९५४ पर्यंत संकल्पापेक्षा तीन लाख एकर अधिक म्हणजे २८ लाख एकर जमीन भूदानयज्ञात मिळाली. त्या वर्षी शंकररावांनी सर्व सेवा संघाचे मंत्रीपद सोडले.

याखेरीज मराठी भाषिकांचा अखंड प्रांत व्हावा व महाराष्ट्रीयांच्या विकासास मदत व्हावी म्हणून संयुक्त महाराष्ट्र परिषद स्थापन झाली. तिचे शंकरराव अध्यक्ष होते. हिंदी राष्ट्रीय कामगार संघ, *नवभारत* मासिक, समाजप्रबोधन संस्था यांचे ते संस्थापक होते, गांधी स्मारक निधीच्या स्थापनेपासून त्या निधीचे विश्वस्त व कार्यकारिणीचे सदस्य होते. काँग्रेसचे सरचिटणीस असताना निरनिराळ्या भाषिक संस्कृतींचा समन्वय घडवून आणावा म्हणून भारतीय संस्कृती संगमाची स्थापना केली. त्याचप्रमाणे, हिंदी राज्यघटनेप्रमाणे संघभाषा "हिंदी" हिचे स्वरूप नक्की व्हावे व तिचा विकास व्हावा यासाठी 'अखिल भारतीय हिंदी परिषद' स्थापन केली.

सन १९५४ सालानंतरही, विशेषतः संयुक्त महाराष्ट्र चळवळीतून शंकरराव निवृत्त झाल्यानंतरही त्यांचे विधायक कार्य चालूच होते. राजकीय पक्षासाठी आचारसंहिता घडविण्याच्या प्रयत्नात (१९६२) त्यांचा महत्त्वाचा पुढाकार होता. ('भाटघर आचारसंहिता' म्हणून तिचा निर्देश केला जातो. भाटघर येथे झालेल्या या बैठकीला महाराष्ट्रातील सर्व राजकीय पक्षांचे प्रमुख पुढारी उपस्थित होते. यशवंतराव चव्हाण, शंकरराव मोरे, मधु लिमये, कॉम्रेड डांगे, बी.सी. कांबळे ही नावे सहज आठवतात. विचारवंतही होते – त्यात धनंजयराव गाडगीळ प्रमुख होते). दिल्ली-पेकिंग मैत्रीयात्रा ही एक मोठी घटना त्यांच्या नेतृत्वाखाली त्यांच्या आयुष्यात घडून आली. या यात्रेतील अपयशाचा व इतर अनुभवांचा फार मोठा आघात शंकररावांच्या मनावर झाला व त्यानंतर त्यांच्या मानसिक विकल अवस्थेचा कालखंड सुरू झाला असे म्हणता येतील.

शंकररावांच्या जीवनपटाचा वाण राजकारणी दिसत होता; पण त्या पटाचे आडवे धागे जरी राजकारणाचे असले तरी, उभा ताणा मजबूत अध्यात्माचा होता असे श्री. भाऊ धर्माधिकारी यांनी म्हटले आहे. (उपरि : *गां.मा.मी.* पृ. ३०). शंकररावांच्या मनोरचनेचा हा भाग गुंतागुतीचा व विश्लेषणाला आव्हान देणारा आहे. त्याविषयी स्वतः शंकररावांना काय म्हणावयाचे आहे?

शंकरराव म्हणतात : (उपरि : *गां.मा.मी.* पृ. ३०-३१)

"एका खेडेगावात जन्माला आलेला मी, लहानपणीच इंग्रजी शिकण्यासाठी दैवयोगाने पुण्याला आलो. हे पुणे १९०७-०८ सालचे. त्या काळी सबंध भारतात चैतन्याची एक लाट संचारली होती. भारताचे ते पुनर्जागरण होते. त्यामागे असलेल्या प्रेरणेचा आधार भारताचे अध्यात्म हा होता. अध्यात्माचा मुख्य गुण आहे पूर्ण व्यापकता आणि संपन्नता. ज्या काळी मला बाहेरच्या जगाचे भान होऊ लागले त्या काळी देशाची परिस्थिती याच आध्यात्मिक चेतनेने उजळ होऊ लागली होती. त्या आध्यात्मिक परंपरेच्या अमृतावर मी मोठा झालो आणि त्या काळी अध्यात्माचे जे बीजारोपण माझ्या जीवनात झाले ते अगदी माझ्या अंतरात उतरून तेथे अंकुरित झाले. त्याचाच परिणाम आज सगळ्या जगाकडे पाहण्याची माझी दृष्टी बदलून गेली आहे. सारा संबंध आध्यात्मिक झाला आहे".

शंकरराव पुढे सांगतात :

**ब्रह्मतेजाचा ध्यास**

"माझा एक संकल्प त्या तरुण वयात, ब्रह्मतेजाची प्राप्ती करून घेणे हा होता. त्या काळी ते ब्राह्मण्य की ज्याने ब्रह्मतेजाची प्राप्ती होते, ते प्राप्त करण्याची मला भूक लागली होती. या








अनुक्रमणिका

ब्राह्मण्याचा जातीपातीशी संबंध नाही. सत्ता, सक्ती आणि संपत्ती यापासून सर्वथा अस्पृष्ट असणारे ते ब्राह्मण्य. आज लोक म्हणतात, शंकररावांनी मनात आणले असते, तर ते अमुक पदावर गेले असते. ते ऐकून मला हसू येते. कारण, अगदी प्रारंभापासूनच माझ्या मनात कोणतेही सत्तेमत्तेचे पद घेण्याची कधी अभिलाषा निर्माण झाली नाही. अशा प्रकारच्या अभिलाषांहून माझा तो संकल्प उच्च आणि मोठा होता. मात्र, पदग्रहणाच्या बाबतीत मी एक अपवाद केला होता; तो हा की, देशाच्या स्वातंत्र्याकरिता आणि सेवेकरिता ज्या काँग्रेसला मी स्वतःला समर्पित केले होते त्या काँग्रेसमध्ये कोणतेही पद आले, तर ते पद स्वीकारायचे. काँग्रेसमध्ये सुद्धा अशा पदाकरिता मी कधी चढाओढीत नाही उतरलो. फक्त एकदाच काँग्रेसच्या अध्यक्षपदाकरिता मी उभा राहिलो, याचा मला आज पश्चात्ताप वाटतो. त्या निवडणुकीला मी जर उभा राहिलो नसतो, तर काँग्रेसमधील माझे जीवन, माझ्या नम्र मताप्रमाणे, शुद्ध ब्राह्मण्याचा एक नमुना झाले असते आणि जीवनाच्या अंतापर्यंत मला त्याचा आनंद वाटला असता".

शंकररावांच्या या मूलभूत आध्यात्मिक प्रकृति-वृत्तीचे विश्लेषण कोणीतरी करावयास हवे. त्या वृत्तीला गांधीजींच्यामुळे एक आणखी महत्त्वाचे परिमाण लाभले. शंकरराव त्याविषयी सांगतात :

"तरुण वयात माझ्या मनात एकदा आले की, राजयोगाचा अभ्यास करावा. एवढ्यात गांधीजींचे दक्षिण आफ्रिकेतून हिन्दुस्थानात आगमन झाले. ते ॲनी बेझंटबाईंच्या होमरूल लीगचे अध्यक्ष झाले. तेव्हा लोकांना आश्चर्य वाटले. लोक त्यांना म्हणाले की, तुम्ही आपला मार्ग सोडून राजकारणात शिरत आहात, तेव्हा गांधीजी म्हणाले : 'मी जाणूनबुजून हे करतो आहे. कारण, राजकारणात सुद्धा सत्य आणि प्रामाणिकपणा मला आणावयाचा आहे. त्यासाठी ही संधी आहे'. लोकमान्य म्हणाले की, राजकारण हे साधु-संन्याशांकरिता नाही, तेव्हा गांधीजी म्हणाले : 'अशा रीतीने विचार करणे हे बौद्धिक जडतेचे लक्षण आहे'. गांधीजींचे हे शब्द कठोर होते, परंतु त्यांची जीवननिष्ठा प्रखर आणि प्रज्वलित होती म्हणून तेच असे बोलू शकले. त्यामुळे माझ्यापुढे ब्राह्मण्याच्या दृष्टीने जे जे प्रश्न होते – सत्ता, संपत्ती, हिंसा इ. – ते सगळे गांधीजींनी सोडविले आणि मी राजकारणाच्या क्षेत्रात उडी घेतली. गांधीजी जर नसते आणि त्यांनी ब्राह्मण्याकरिता राजकारणाची आणि जीवनाची सर्व क्षेत्रे ज्या रीतीने खुली केली तशी केली नसती, तर मी कुठे असतो ते ईश्वर जाणे!"

**गांधीजींचा प्रभाव**

गांधीजींच्या आपल्या जीवनावरील प्रभावाविषयी शंकरराव पुढे सांगतात :

"गांधीजी ही एक महान विभूती होती. सत्याची सत्यता आणि अहिंसेची अहिंसकता आणि त्यांचे गुण यांची वृद्धी, अभिव्यक्ती आणि विकास ज्या रीतीने त्यांनी पहिल्या प्रथम केला आणि जीवनाच्या प्रत्येक अंगाला लागू केला, ती रीत जगाच्या इतिहासात अपूर्व होती. त्यांच्या सहवासात मला जे काही लाभले ते आचरणात उतरविण्याचा मी प्रयत्न केला. जरी माझे क्षेत्र राजकीय होते तरी मी अत्यंत नम्रतेने सांगू इच्छितो की, त्या माझ्या संकल्पातील ब्राह्मण्याचा आदर्श जशाच्या तसा कायम राहिला आणि त्याकडे प्रगत होण्याचा प्रयत्न मी करीत राहिलो. सत्ता, संपत्ती आणि हिंसा यापासून सर्वथा दूर राहण्याचा माझा प्रयत्न अखंड चालू राहिला. मी काँग्रेस कार्यकारिणीचा सभासद होतो. चार वर्षे काँग्रेस संघटनेचा सरचिटणीसही होतो. एकूण बत्तीस वर्षे मी काँग्रेसचे काम केले. त्या कामी माझ्याकडून चुकाही घडल्या; पण माझ्या मनात कोणत्याही पदाची किंवा ऐहिक लाभाची लालसा कधीही उत्पन्न झाली नाही".

शंकरराव had hitched his wagon to a star. अध्यात्मसाधना हे त्यांचे मूळ ध्येय होते. गांधीजींचे मूळ ध्येय तेच होते. परंतु गांधीजींनी अध्यात्मसाधनेचा एक नवा मार्ग शोधून काढला होता. अध्यात्मसाधना भारतात लक्षावधी लोकांनी शतकानुशतके केली होती. परंतु दरिद्रीनारायणाची सेवा हीच खरी ईश्वरसेवा आहे आणि निःस्वार्थ बुद्धीने ही सेवा करणे हा केवळ समाजोन्नतीचाच नव्हे, तर आत्मोन्नतीचाही मार्ग आहे – किंबहुना आत्मोन्नतीचा तोच एकमेव मार्ग आहे – हे यापूर्वी केवळ स्वामी विवेकानंदांनीच सांगितले होते. गांधीजींनी यात सत्य, अहिंसा याच्या पालनाची पथ्ये सांगितली. सत्याग्रहाचे 'क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया' अशा कसोटीचे सत्याग्रहाचे तंत्र सांगितले व एकादशव्रतांचे पाथेय साधकाकडे दिले. नम्रतेचे मुलायम परंतु संरक्षक कवचही गांधीजींनी साधकाला दिले.

गांधीजींची साधना ही व्यक्तिगत साधना तर होतीच, परंतु ती सामुदायिक साधनाही होती: 'सर्वेऽत्र सुखिनः सन्तु' ही भावना तिच्या मागची प्रेरणा होती. या सर्वांमध्ये सर्व मनुजमात्रांचा समावेश होता. यात सुष्ट तर होतेच परंतु दुष्टही होते, पिळले जाणारे होते, त्याचप्रमाणे पिळवणूक करणारे होते. दुष्टांचा, शोषकांचा हृदयपरिवर्तनाने निरास करावयाचा, शस्त्राचाराने निर्दालन करावयाचे नाही, अशी यामागची भूमिका होती. अशी भूमिका घेणे हे मानवी स्वभावाच्या व समाजशास्त्रांच्या अनाकलनाचे,








बुद्धीच्या जडतेचे लक्षण समजावे की मानवाला त्याच्या आदर्श जीवनाकडे जाण्याचा एकमेव मार्ग दाखवणारे बौद्धिक सूक्ष्मतेचे गमक मानावे याचे उत्तर, असंख्य लोक, अशी अपेक्षा ठेवणे हे बौद्धिक जडतेचे निर्णायक लक्षण मानावे असेच देतील. दुसरे उत्तर सहसा कोणीच देणार नाही. कारण, त्या उत्तरात स्वतःच्या तदनुसार कृतीची अपेक्षा अटळपणे राहते. परंतु 'अक्रोधेन जयेत् क्रोधम्, असाधुं साधुना जयेत्' असेच बुद्धाचे सांगणे होते. Love thy enemy असे येशू म्हणाला होता. या दोघांना लाभलेल्या अनुयायांची संख्या, या मंगल भावनेचा स्पर्श प्रत्येकाच्या अंतःकरणाला आतून कुठे ना कुठे तरी होत असतो याचे गमक आहे. मानवाच्या अंतिम विकासाची ग्वाही देणारा तो निदान पाच हजार वर्षे सतत अस्तित्वात राहिलेला एक नाजूक परंतु तरीही वळकट आशातंतू आहे. मानवतेला हा एक मोठा दिलासा आहे.

गांधीजींनी हा आशातंतू अधिक नाजूक परंतु तरीही अधिक बळकट करण्याचा प्रयत्न व्यक्तिगत जीवनात केला; सत्याग्रहाच्या सार्वजनिक सामूहिक प्रयोगातही केला. यासाठीच ते राजकारणात उतरले. शंकररावांना ती भूमिका भावल्यामुळे ते गांधीजींचे अनुयायी झाले. राजकारणाचे अध्यात्मीकरण-शुद्धीकरण झाले पाहिजे हे टॉईनबीसारख्या जगाच्या इतिहासाच्या अभ्यासकाला वाटले, याचा त्यांना साहजिकच आनंद झाला व तो त्यांनी *गांधीजींचे वृहद् आत्मचरित्र* या आपल्या ग्रंथात आपल्या 'ऋणमुक्ति' या निवेदनात टॉईनबीचा परिच्छेद उद्धृत करून व्यक्त केला आहे (पृ. अक्षरी सात). (टॉईनबीचे अवतरण मुळात कोठून घेतले आहे याचा संदर्भ द्यावयाचे मात्र त्यांच्याकडून राहून गेले आहे.)

शंकरराव सांगतात :

"टॉईनबीने म्हटले आहे :

'राजकारण हे नीतिभ्रष्ट करणारे अगदी गलिच्छ क्षेत्र आहे. त्यामुळे अनेक संवेदनशील, शुद्ध व उदार आत्मे राजकारणापासून दूर राहतात. ही त्यांची घृणा जरी स्वाभाविक असली तरी, ती एक दुष्ट चक्र निर्माण करते. कारण, हे गलिच्छ क्षेत्र जोपर्यंत शुद्धचरित लोक त्यात प्रवेश करणार नाहीत तोपर्यंत शुद्ध होणे शक्य नाही. भौतिक सृष्टीवरचा माणसाचा काबू जसजसा वाढत आहे तसतसे हे कार्य अधिकच अगत्याचे होत चाललेले आहे. विशेषतः सज्जनांनी स्वतःची आध्यात्मिकता नष्ट होण्याचा धोका पत्करूनही या घाणेरड्या दलदलीत उडी टाकली पाहिजे. राजकारणातच खरोखर साधुत्वाची कसोटी आहे. गांधीजी समजून-उमजून राजकारणात शिरले. आध्यात्मिकतेचा अभाव असलेल्या गलिच्छ राजकीय क्षेत्रातील जीवनाला उन्नत करणे हा त्यांचा हेतू होता. गांधीजी त्या खातेऱ्यात गेले आणि ते खातेरे कसे निर्मळ करता येईल हे त्यांनी दाखविले, व अशा रीतीने मानवी इतिहासाच्या या आणीबाणीच्या काळी त्यांनी मानवजातीची महान सेवा केली'."

इतिहासतज्ज्ञ टॉईनबींनी मानवी इतिहासातील हा आणीबाणीचा काळ आहे हे ओळखले होते. मानवाची भौतिक प्रगती ज्या वेगाने झाली त्या गतीने मानवाच्या अंतःकरणाचा विकास झाला नाही, हे या समस्येचे मूळ कारण आहे, हेही परिस्थितीतील आणीबाणीचे अचूक निदान त्यांनी केले. गांधीजींनी जी जीवनसाधना आरंभली होती तिच्यातच या समस्येचे उत्तर शोधावे लागेल हेही टॉईनबींना पटलेले होते.

शंकररावांना हे सर्व आधीच पटलेले होते, असेच केवळ नव्हते. त्यांची स्वतःची त्या दिशेने जीवनसाधना चालू होती. गांधीजींच्या प्रयोगातील ते त्यांचे एक सहकारी-अनुयायी होते. राजकारणाचा ताणा व आध्यात्मिकतेचा बाणा यांनी त्यांना आपले जीवनवस्त्र विणावयाचे होते. ज्ञानेश्वर आणि समर्थ रामदास या वेगळ्या मनःप्रकृतीच्या संतांचे त्यांना एकाच वेळी आकर्षण वाटावे याचे त्यांचे त्यांनाही कुतूहल होते.* त्या रहस्याचे उत्तर शंकररावांच्या उभयान्वयी साधनेच्या मनःप्रकृतीतच शोधावे लागेल.

**मुळशी सत्याग्रह**

गांधीजींचे अनुयायी असणे ही सोपी गोष्ट नव्हती. अंध अनुयायी बौद्धिक जडतेमुळे विचारांच्या ताणापासून मुक्त असतात व कृतीच्या क्षेत्रात आपापल्या व्यक्तिगत मर्यादांच्या चौकटीत वावरत असतात. शंकरराव कृतीच्या निर्धारात उणे पडत नसत, परंतु त्यांची स्वतंत्र विचार व तदनुसार स्वतंत्र निर्णयात्मक कृती करण्याची वृत्ती होती. हे स्वातंत्र्य त्यांनी कधी गमावले नाही. परंतु आंतरिक कसोटीच्या प्रसंगी गांधीजींचे मार्गदर्शन ते स्वीकारीत असत. याची दोन वेगवेगळ्या स्वरूपाची परंतु महत्त्वाची उदाहरणे सांगता येतील. पहिले मुळशी सत्याग्रहाचे व दुसरे प्रेमा कंटक यांच्या संदर्भात त्यांच्यावर आलेल्या लोकापवादाचे.

शंकररावांना जेलमध्ये तीस फटक्यांची शिक्षा झाली. "सप् सप् एकामागून एक असे फटके मारण्यास सुरुवात झाली, तेव्हा

---

* "संस्कार ज्ञानेश्वरीचा व दीक्षा समर्थांची या दोन गोष्टींची परस्पर संगती कशी लावावयाची, हा प्रश्न मला आजही सुटलेला नाही. कदाचित् तरुणपणचा संस्कार व माझा राजकीय पिंड हे त्याचे एक कारण असण्याचा संभव आहे" असे शंकररावांनीच म्हटले आहे. (*दैव देते* – पृ. १५०).

मी प्रत्येक फटक्याबरोबर 'राम' असे म्हणे व मान एका बाजूकडून दुसऱ्या बाजूकडे वळवी. अशी रीतीने वीस फटके मारून झाल्यानंतर जोन्स (जेल सुपरिन्टेण्डेंट) साहेबांना काय वाटले कुणास ठाऊक! ते एकदम 'बस' असे म्हणाले... नंतर एकामागून एक पाच सहकाऱ्यांना फटके मारलेले पाहण्याची आणखी एक शिक्षा जेलच्या अधिकाऱ्यांनी आम्हाला दिली".

जेल सुपरिंटेन्डेंटने दिलेली शिक्षा अन्यायाची होती व म्हणून त्याने आपली चूक कबूल करून माफी मागितली नाही तोपर्यंत आमचा उपवास चालू राहील, अशी भूमिका घेऊन देव-दास्ताने यांनी जेलमध्ये अन्नसत्याग्रह सुरू केला.

गांधीजी या वेळी येरवडा जेलमध्येच होते. जेलच्या अधिकाऱ्यांनी गांधीजींना जेल सुपरिंटेंडेंट व इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस यांच्या उपस्थितीत देव-दास्ताने यांची भेट घेण्याची परवानगी दिली "आवश्यकता असेल तर आम्ही अनिश्चित काळपर्यंत उपवास चालू ठेवू शकू. कारण, आमचे वागणे सत्याला धरून आहे" अशी देव-दास्ताने यांची भूमिका होती. गांधीजींनी विचारले : "पण तुमचे वागणे चूक ठरले तर?" त्यांना उत्तर मिळाले : "तर मग मनुष्य या नात्याने आम्ही आमची चूक कबूल करू आणि उपवास सोडू."

या भूमिकेचा जेल सुपरिंटेंडेंटच्या मनावर चांगला परिणाम झाला व त्यानेही तशीच भूमिका घेतली. त्यातून सामंजस्याने हा प्रश्न सुटला व उपवास सोडला गेला. हा सत्याग्रहाच्या प्रयोगाचा एकपरीने विजय होता. परंतु सत्याग्रहाचे शस्त्र वापरताना किती सूक्ष्म दक्षता घेणे आवश्यक असते याचेही दर्शन या प्रकरणात झाले. ती अंगे अशी –

१) शंकररावांना फटके मारल्यानंतर जेलमध्ये असलेल्या दास्तानेंच्या कडून शंकररावांना "आमच्या सहानुभूतीची व मदतीची जरूर आहे का?" असा निरोप आला. त्याला शंकररावांनी "होय" असे उत्तर पाठवले. आपण असे उत्तर पाठविले याबद्दल शंकररावांनी नंतर खेद व्यक्त केला आहे. "तसा निरोप पाठवला नसता तर माझ्या आत्मबलाची खरी कसोटी लागली असती" असे त्यांनी म्हटले आहे.

२) या अन्न-सत्याग्रहींना सहानुभूती म्हणून आपण उपवास सुरू करावा का, या प्रश्नाच्या चर्चेत या सत्याग्रहींची कृती योग्य होती की नाही याविषयी आपल्याकडे काही तपशील नसताना सहानुभूतीचा उपवास करणे योग्य ठरणार नाही, असे गांधीजींचे मत होते. निष्पक्ष निर्वाळा देता येईल असा पुरावा हवा, अशी गांधीजींची अपेक्षा होती.

३) याशिवाय, सत्याग्रही या नात्याने आपण जेलच्या कठोर जीवनासाठी किंवा फटक्यासारख्या अन्यायासाठीही नेहमी तयार असले पाहिजे व म्हणून अशी शिक्षा दिली जाऊ नये या उद्देशाने केलेला अन्न-सत्याग्रह जेलच्या अधिकाऱ्यांच्या विरूद्ध हिंसेचाच एक प्रकार ठरेल, असेही गांधीजींचे मत होते.

४) जेल सुपरिंटेंडेंटच्या वृत्तीत तसा फार फरक पडला नाही. अन्न-सत्याग्रहात सत्याग्रहींची वजने घटली होती. सहानुभूतीने वॉर्डर व इतर कैदी त्यांच्याकडे पहात होते. आहारात काही सोयी-सवलती देत होते. शंकरराव लिहितात : "योग असा की, एक दिवस आम्हाला दूध व साखर दिली जात असताना जोन्ससाहेबांची स्वारी तेथे आली. हे काय चालले आहे असे त्यांनी शिपाई-वॉर्डरला विचारले. ठरल्याप्रमाणे दूध व साखर आम्हाला दिली जात आहेत असे समजताच त्यांच्या तोंडून 'This is putting premium on the fast' (उपवासाबद्दल ही बक्षिसीच दिसते – शंकररावांचे भाषांतर) असे उद्गार तुच्छतेच्या स्वरात बाहेर पडले! जोन्सचे ते शब्द एखाद्या कट्यारीप्रमाणे माझ्या हृदयाला कापीत गेले! शब्द कटु असले तरी त्यात सत्यांश आहे असे माझ्या मनोदेवतेने मला सांगितले. आम्ही होऊन पूर्वीच हे दूध बंद केले असते. तर बरे झाले असते असे मला वाटले" (उपरि : पृ. ११).

असे वाटणे ही सत्याग्रह्याच्या मनोदेवतेची सूक्ष्म निरीक्षणशक्ती आहे. 'अपमान, उपहास कारागृही वास' ही प्रतिक्रिया देणे ही शासनाची आणि समाजमानसाचीही रीत असते.

शंकररावांच्या मनोदेवतेने या सूक्ष्मतेची धार उत्तरोत्तर अधिकच वाढवीत नेली. असे आचरण आपल्या हितसंबंधांच्या आड येत आहे असे आढळले, तेव्हा शासनाने व जनमानसानेही आपली उपहास, अवहेलना, अपमान याची तीव्र उलट प्रतिक्रिया उमटविण्यात कसूर केली नाही.

गांधीजींची जीवनसरणी आपण अनुसरावी, अध्यात्म व व्यवहार यांची सांगड घालावी, 'आत्मनःमोक्षार्थं जगद्हिताय च' मध्येही जगद्हिताला अग्रक्रम द्यावा, अशी शंकररावांची मनोधारणा तयार झाली होती.

शंकरराव लिहितात : (*दैव देते* – पृ. १५९-१६०)

"१९२९ च्या ऑक्टोबरमध्ये मी येरवड्याच्या तुरुंगातून बाहेर पाऊल ठेवले ते आश्रमीय व आध्यात्मिक जीवनाची दीक्षा घेण्याचा संकल्प करूनच! पण या जीवनात प्रारंभी आचार्य भागवतांचा व नंतर प्रेमाताई कंटक यांचा सहयोग मिळून सासवड आश्रमाची स्थापना होण्याला सन १९३४ चा ऑगस्ट यावा लागला. याचे कारण मी तुरुंगातून बाहेर

अनुक्रमणिका

आलो तेव्हा देशातील परिस्थितीत विलक्षण वदल झाला होता हे होय!"

ते पुढच्याच परिच्छेदात लिहितात :

"सन १९३०-३४ सालच्या स्वातंत्र्याच्या लढ्यातून सत्याग्रही महाराष्ट्राचा जन्म झाला होता. १९३४ साली तुरुंगातून बाहेर आल्यानंतर महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचा मी अध्यक्ष झालो व महाराष्ट्रात काँग्रेसच्या इमारतीचा भक्कम पाया घालून त्यावर मजल्यावर मजले उठविण्याच्या कामाला तावडतोव प्रारंभ झाला. प्रांतभर काँग्रेसची रीतसर संघटना निर्माण करणे, मध्यवर्ती असेंब्लीच्या निवडणुका, फैजपूर काँग्रेसचे ग्रामीण अधिवेशन, नंतर प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणुका अशा रीतीने कामामागून कामे आम्हा कार्यकर्त्यांना अंगावर घ्यावी लागली व त्यात सर्व शक्ति-वुद्धी आणि वेळ खर्च होऊ लागली. सन १९२९ च्या अखेर तुरुंगातून वाहेर आल्यानंतर ज्या जीवनाची दीक्षा मी घेतली होती तिला अनुरूप असेच जीवन १९३० ते १९३४ च्या काळातील ठाणे, येरवडा व नाशिकच्या तुरुंगवासांत जितके शक्य होते तितके घालविण्याचा प्रयत्न मी केला होता. त्यामुळे १९३४ साली बाहेर आल्यानंतर आश्रमीय जीवनाची आंतरिक भूक अधिकच वाढली होती".

### सासवड आश्रम

या भावनेच्याच प्रभावाखाली शंकररावांनी ५ ऑगस्ट १९३४ रोजी सासवड येथे आश्रमाची स्थापना केली. प्रेमा कंटक ह्या यापूर्वी चार वर्षे गांधीजींच्या आश्रमात सेविका म्हणून राहिल्या होत्या. आचार्य भागवत व अन्य दोन सहकारी त्यांच्या बरोबर तेथे होते. शंकररावांच्या काँग्रेसच्या व राजकीय कामामुळे ते तेथे दीर्घकाळ असे कधीच राहू शकले नाहीत, परंतु तो आश्रम देवांचा आश्रम म्हणूनच ओळखला जाऊ लागला. ते लिहितात : "पक्षी फिरून अखेर घरट्यात परत यावा त्याप्रमाणे मानसिक शांती व समाधान यासाठी मी मधून मधून थोडा काळ आश्रमात जाऊन राहात असे". (*दैव देते* : पृ. १६०)

शंकरराव पुढे लिहितात :

"माझी आश्रमाची कल्पना प्राचीन भारतीय ऋषींच्या आश्रमाची होती. ऋषींच्या आश्रमातील शुचिता, ऋजुता व निष्पापता याचे प्रतीक हरिणी होय, असा बालपणापासून माझ्या मनावर संस्कार झालेला होता व तो आजही कायम आहे. तथापि क्रियाशील जीवनांत गांधीजीच गुरू असल्यामुळे सासवड आश्रमाच्या प्रवृत्ती साबरमती किंवा वर्धा-सेवाग्राम आश्रमांच्या नमुन्यावर वाढाव्यात हेही अपरिहार्य होते. सन १९४२ चा लढा सुरू होण्यापूर्वी सासवडात व आसपास अनेक विधायक प्रवृत्ती चालत. त्यात टिळक महाराष्ट्र विद्यापीठ व चरखा संघ यांचा पूर्ण सहयोग होता. त्या काळच्या सासवडाकडे पाहून 'शंकररावांना सासवडला वर्धा बनवावयाचे आहे', असे श्री. श्रीकृष्णदास जाजूजी एकदा म्हणाले होते". (उपरि : पृ. १६०)

श्रीकृष्णदास जाजूंना असे प्रशस्तिपत्रक द्यावे असे वाटले यात विशेष अर्थ आहे व ते अभिमानाने उद्धृत करावे असे शंकररावांना वाटले यालाही काही अर्थ आहे. शंकररावांच्या मनोधारणेत आध्यात्मिक वृत्तीने आपल्या इतर वृत्तींवर मात करावी असा जागरूक साधकाचा आग्रह होता. त्यामुळे अहंकार, असूया अशा भावनांवर ते नियंत्रण ठेवू शकत होते. परंतु त्या भावनांची सहचरी व पुरुषार्थाला प्रेरणा देणारी ईर्षा ही भावना मात्र त्यांच्या मनात सतत जागती असे. हा एक आंतरिक आध्यात्मिक ताण होता.

### प्रेमा कंटक सहजीवन

या आश्रमाच्या संदर्भात शंकररावांना आणखी एका समस्येला सामोरे जावे लागले. प्रतिस्पर्ध्याचे चारित्र्यहनन हे राजकारणात सर्वत्र एक प्रभावी हत्यार म्हणून वापरले जाते. अंतःकरणाची शुद्धता हेच ज्यांचे राजकीय सामर्थ्यही असते त्यांच्याविरुद्ध तर या शस्त्राचा वापर कटाक्षाने केला जातो. गांधीजींवरही असे अनेक प्रहार झाले. यामुळे तसे प्रहार शंकररावांच्यावरही झाले याचे नवल वाटावयास नको. विशुद्ध परंतु सामाजिक चाकोरीच्या बाहेर समजले जाणारे जीवन जर अशी व्यक्ती जगत असेल, तर अशा आरोपांनी सामान्य जनतेची दिशाभूल करणे अधिकच सोपे असते. शंकरराव व प्रेमा कंटक यांच्या आश्रमीय सहजीवनाबद्दल महाराष्ट्रात एक मोठाच प्रवाद त्या काळात निर्माण केला गेला होता व जोपासला जात होता. गांधीजींच्या विचार करण्याच्या पद्धतीतील सूक्ष्मता व मार्मिकतेचा उल्लेख करताना शंकररावांनी या गोष्टीचा निर्देश केला आहे. ते लिहितात : "महाराष्ट्रांत प्रेमाबाईच्या व माझ्या आश्रमीय सहजीवनामुळे पुण्यात वादळ उठले व वातावरण अगदी गुदमरून गेल्यासारखे झाले. तेव्हां प्रेमाबाईनीही त्या प्रसंगी गांधीजींचा सल्ला विचारला व जरूर तर महाराष्ट्र सोडण्याची आपली तयारी आहे असे त्यांनी गांधीजींना लिहिले. गांधीजींनी आपला सल्ला लिहून पाठवला. 'देवांचा संग तू सोडावा अशी आवश्यकता मला दिसत नाही. जो पर्यंत दोघांची मने निर्दोष आहेत व संग केवळ सेवेसाठीच आहे, तोपर्यंत तू देवांना सोडण्याची किंवा तुझे काम बदलण्याची कोणतीही आवश्यकता मला दिसत नाही."








(हे गांधीजींचे पत्र २३.५.१९३९ तारखेचे आहे. उपरि : पृ. १४५)

**गांधीजींचे मार्गदर्शन**

गांधीजींच्या विचारपद्धतीतील सूक्ष्मता व मार्मिकता यांचा प्रत्यय यात जसा येतो तसाच आपली विचारांची चौकट सांगितल्यानंतर त्या त्या व्यक्तीने "सत्या-असत्यासी मन केले ग्वाही" या पद्धतीने आपापले आचरण ठेवावे ही त्यांची मार्गदर्शनाची पद्धतही कळून येते.

शंकररावांनी ही घटना सांगताना आधी ज्या दुसऱ्या गोष्टीचा निर्देश केलेला आहे, ती घटनाही लक्षणीय आहे. ते सांगतात :

"*स्वराज्या*तील 'निदान धर्मयुद्ध करा' या लेखाबद्दल आमच्यावर पीनल कोडातील कलम १२१ खाली खटला भरण्यात आला. या कलमाखाली इस्टेट-जप्ती, फाशी, जन्मठेप अशा शिक्षा होत्या. यापेक्षा कमी शिक्षा देण्याचा अधिकार न्यायाधिशाला नव्हता.' ... शिक्षेच्या भयंकर स्वरूपामुळे आमच्या स्नेहीमंडळींना आम्ही आपला बचाव करावा असे वाटत होते; पण माझा स्वभाव अगोदरच ज्याला हट्टीही म्हणता येईल असा आग्रही व शिवाय तो प्रसंगही अगदी बाका व कसोटीचा होता! माझ्या निर्णयात मी काहीही बदल केला नाही हे सांगावयासच नको. माझे सहकारी श्री. हरोलीकरही अखेरपर्यंत पक्के राहिले. सर्व उपाय हरल्यावर मंडळींनी अखेर गांधीजींकडे धाव घेतली व त्यांनी आम्हाला शहाणपणाचा सल्ला द्यावा असे मागणे त्यांच्याकडे जाऊन त्यांच्यापाशी मागितले. महात्माजींच्या पत्रात एक अति-मार्मिक व उदात्त वाक्य होते, 'If he defends, it will not be dishonourable, but there is glory if he does not. But he need not bid for glory' (त्यांनी बचाव केल्यास त्यात लज्जास्पद असे काही नाही; पण बचाव केला नाही तर गौरवास्पद होईल; पण गौरवासाठी त्यांनी अकारण साहस करण्याची गरज नाही). (भाषांतर ग्रंथात दिलेले – शंकररावांचे! उपरि : पृ. १४४-१४५)

शंकररावांच्या चरित्राच्या 'स्वरूपरेखे'च्या आरेखनात असे अनेक प्रसंग विचारात घेण्यासारखे आहेत. उदाहरणादाखल घेतलेल्या या काही प्रसंगांतूनही त्यांची आध्यात्मिक वृत्ती, गांधीजींचे आंतरिक अनुयायित्व परंतु तरीही आपली स्वतंत्र प्रज्ञा चालविण्याची मनोवृत्ती, स्वयमेव मृगेन्द्रता अशा भावनेने भारलेले लोकनेतृत्व व (त्यांच्याच शब्दात असल्यामुळे आपण म्हणण्याचे धाडस करू शकतो असा) हट्टी, आग्रही स्वभाव इत्यादींचे त्यांच्या जीवनात चांगल्या अर्थाने जाणवणारे 'विलक्षण' रसायन आपण आकलन करू शकतो व त्यामुळेच एखाद्या सखोल मानसशास्त्रीय अभ्यासाला शंकररावांचे जीवनचरित्र हे एक आव्हान आहे असे वाटू लागते.

**सिद्धान्त-व्यवहार ताणतणाव**

गांधीजींशी आंतरिक सहानुभाव व स्वतःची स्वतंत्र प्रज्ञा यातील ताण शंकररावांना अनुभवास येत होता. सिद्धान्तनिष्ठ नेता आणि व्यवहारनिष्ठ जनता यामध्ये गांधीजींच्या नेतृत्वाच्या कालखंडात निर्माण झालेल्या ताणापेक्षा हा कितीतरी वरच्या स्तरावरील ताण होता. परंतु तो तसा होता व तो तसा ओळखण्यातच शंकररावांच्या स्वतंत्र प्रज्ञेचे अस्तित्व जाणवत होते. गांधीजी व जनता यांच्यामधील ताणाचे वर्णन शंकररावांनी पुढीलप्रमाणे केले आहे : (*भारताची स्वराज्यसाधना* : पृ. १०७-१०८)

"आपल्या कृतीचे पुढे निश्चित काय परिणाम होतील याची संपूर्ण कल्पना कोणाही मानवाला येऊ शकत नाही. हा न्याय गांधीजींनाही लागू आहे. तथापि गांधीजी जे पाऊल टाकीत होते त्यातील काही धोके निःसंशय त्यांना माहीत असले पाहिजेत. असे असूनही ज्याप्रमाणे भारतातील आपल्या सार्वजनिक जीवनाच्या प्रारंभी गांधीजींनी ऑल इंडिया होमरूल लीगचे अध्यक्षपद हेतुपूर्वक स्वीकारले त्याचप्रमाणे यावेळीही त्यांनी पूर्ण विचारांतीच काँग्रेसचे नेतृत्व स्वीकारले असले पाहिजे... होमरूल लीगचे अध्यक्षपद स्वीकारताना काढलेल्या निवेदनात गांधीजींनी असे म्हटले होते की, 'राष्ट्राच्या राजकीय जीवनात निरपवाद वा निर्भेळ सत्याचा व प्रामाणिकपणाचा अंतर्भाव करता येईल असा माझा विश्वास आहे... आपल्या सर्व राष्ट्रीय प्रवृत्तीत सत्य व अहिंसेचा स्वीकार केला जावा यासाठी मी आपल्या प्रयत्नांची शिकस्त करीन. असे होईल तेव्हाच सरकार व त्याने योजलेले उपाय याबद्दल आपल्याला भीती वाटणार नाही'. भारतात त्यावेळी जी परिस्थिती निर्माण झाली होती त्या परिस्थितीत आपण काँग्रेसचे नेतृत्व स्वीकारले तर आपली ही उद्दिष्टे राष्ट्रीय जीवनात उतरविण्याचे काँग्रेस हे उत्तम साधन होईल असे गांधीजींना वाटले असले पाहिजे. आपल्या सत्याच्या वा अहिंसेच्या शिकवणुकीमुळे जनतेमध्ये शांततामय प्रतिकार करण्याची शक्ती वाढेल व प्रतिकारातून जे स्वराज्य मिळेल ते आपल्या कल्पनेचे स्वराज्य नसले तरी, सध्याच्या पार्लमेंटरी स्वराज्यपद्धतीतील काही दोषांपासून तरी ते मुक्त असेल अशी त्यांची कल्पना असावी".

शंकरराव पुढे लिहितात – (उपरि : पृ. १०८)

"पण याचा प्रत्यक्षात एक असा परिणाम झाला की, काँग्रेसने गांधीजींच्या नेतृत्वाखाली स्वराज्यासाठी केलेला लढा शांततेचा असला तरी, गांधीजींच्या अहिंसेचा खोल अर्थ समजून लोकांनी

तो कधी स्वीकारला नाही, म्हणून काँग्रेसची अहिंसा विशिष्ट परिस्थितीत हिंसेची वैय्यर्थता पटल्यामुळे दुर्बलाने स्वीकारलेली अहिंसा राहिली. यामुळे स्वातंत्र्याच्या लढ्याची शक्ती निर्माण करण्याचे एक साधन म्हणून काँग्रेसमध्ये गांधीजींच्या रचनात्मक कार्यक्रमाला मान्यता मिळाली तरी, त्या कार्यक्रमाला स्वातंत्र्याच्या लढ्याचे साक्षात् साधन म्हणून कधी स्थान व महत्त्व मिळाले नाही. कायदेमंडळातील प्रतिकार अथवा अडवणूक आणि प्रत्यक्ष प्रतिकार म्हणजे कायदेभंग व कारागृहवास हीच काँग्रेसची विकल्पाने स्वातंत्र्य-संपादनाची दोन मुख्य साधने बनली. अशा रीतीने लोकांच्या दृष्टीने स्वराज्य किंवा स्वातंत्र्य हे आपले ध्येय ठरवून त्यासाठी परकीय सरकारशी लढणारी व त्याकरिता कारागृहवास व अन्य हालअपेष्टा सोसणारी काँग्रेस हीच मुख्य संस्था बनली. यामुळे काँग्रेसच्या (राजकीय) तेजापुढे रचनात्मक संस्थांचे तेज फिके पडले व त्या संस्थांच्या कार्याला दुय्यम किंवा गौण स्थान मिळून त्या काँग्रेसची उपांगे बनल्या."

या अनुभवाने गांधीजींची जशी निराशा झाली, तशी शंकररावांचीही झाली. राजकीय आणि विधायक अशा दोन्ही क्षेत्रात एकाच वेळी काम करणारे व त्यातही विधायक क्षेत्रातील कार्याचे महत्त्व अधिक मानणारे भारतातील सर्वच कार्यकर्ते अस्वस्थ होते. नेमके उत्तर कोणाकडेच नव्हते – प्रत्यक्ष गांधीजींच्याकडेही नव्हते. गांधीजींच्या उपस्थितीत डिसेंबर १९४७ मध्ये झालेल्या विचारमंथनाचे बरेचसे तपशील डी.जी. तेंडुलकरांच्या *महात्मा* या आठ खंडांच्या ग्रंथाच्या शेवटच्या खंडातील 'Voice in the Wilderness' या प्रकरणात मिळतात. चर्चा कोणत्या स्तरापर्यंत वर चढत होती किंवा त्या काळात वातावरण कधीकधी किती खाली घसरत असे, याचे प्रत्यंतर तेथे दिलेल्या गांधीजींच्या काही उद्‌गारावरून येऊ शकते (पृ. २२८-२२९).

## आदर्श आणि अनुभव

चर्चेच्या ओघात गांधीजी म्हणाले : "विधायक कार्यकर्त्यांचा संघ अस्तित्वात आला व तो सत्तेच्या राजकारणात उतरू लागला, तर ते सर्वस्वी विनाशकारक होईल. तसं नसतं तर मीच नसतो का राजकारणात शिरलो आणि नसता का शासन माझ्याच पद्धतीने चालवण्याचा प्रयत्न केला? आज ज्यांच्या हाती सत्तेची सूत्रे आहेत ते सहज बाजूला झाले असते आणि त्यांनी माझ्यासाठी जागा रिकामी केली असती. परंतु ते जोपर्यंत अधिकारावर आहेत तोपर्यंत राज्यकारभार ते आपल्या बुद्धीप्रमाणेच चालविणार. परंतु सत्ता हातात घेण्याचा माझा विचार नाही. स्वतः सत्ता ग्रहण करावयाचीच नाही अशी भूमिका घेऊन आणि जनतेची शुद्ध, निःस्वार्थ सेवा करून आपण मतदारांना मार्गदर्शन करू शकतो; व त्यांच्यावर प्रभाव पाडू शकतो. या मार्गाने शासनात सहभागी होऊन आपला जो प्रभाव पडू शकला असता त्याहून अधिक प्रभाव पडेल. मग कदाचित् अशा एका टप्प्यावर आपण येऊन पोहोचू की, ज्यावेळी मतदारच म्हणतील आम्हाला तुमच्याच हाती सत्ता द्यावयाची आहे; अन्य कोणाकडेही आम्हाला ही सत्ता सोपवावयाची नाही. ती वेळ आली की कदाचित् या भूमिकेचा फेरविचार करता येईल. बहुतेककरून त्यावेळी मी जिवंत नसेन; पण ती वेळ ज्यावेळी येईल त्यावेळी विविध विधायक प्रवृत्ती चालविणाऱ्या संघांतूनच अशी एखादी व्यक्ती पुढे येईल आणि सत्तेची सूत्रे आपल्या हातात घेऊ शकेल. असे घडेल त्यावेळी भारत एक आदर्श राज्य झालेले असेल."

यावेळी डॉ. झकीर हुसेन यांनी प्रश्न केला, "परंतु अशा आदर्श शासनव्यवस्थेचे उद्‌घाटन करण्यास आणि ती चालविण्यास तशाच आदर्श व्यक्तींची आवश्यकता लागणार नाही काय?"

गांधीजींनी उत्तर दिले : "शासनात न जाता आपण आपल्या निवडीच्या व्यक्ती शासनासाठी पाठवू शकतो. आज काँग्रेसमध्ये प्रत्येकजण सत्तेच्या मागे धावत आहे. ही मोठ्या धोक्याची पूर्वसूचना आहे. आज पुष्कळ काँग्रेसजन म्हणतात, 'पंडित जवाहरलाल नेहरूंना एवढा मोठा पगार मिळतो, मग आम्हाला का मिळत नाही?' "

अशा वातावरणात चर्चा चालू होत्या. शंकररावही त्या चर्चेत आपली मते मांडत होते. काही वेळी गांधीजींशी त्यांचे तीव्र मतभेदही झाले आहेत. तो तपशिलाचा भाग होईल. परंतु शंकररावांच्या मनोभूमिकेची तीन सूत्रे आपल्याला त्यात आढळून येतील.

१) गांधीजींच्या विषयी त्यांच्या मनात असलेल्या त्यांच्या पूज्यभावनेला कोठेही ढळ पोचलेला नाही.

२) जवाहरलाल हे गांधीजींनीच नियुक्त केलेले गांधीजींचे राजकीय वारस होते. विनोबा हे गांधीजींचे म्हटले तर गुरू म्हटले तर शिष्य किंवा वारस होते. विकलांग होत चाललेले विधायक कार्यकर्त्यांचे विविध क्षेत्रातील संघ कालबाह्य ठरू पहात होते व त्यांचे संघटन व नेतृत्व कोणीतरी करण्याची आवश्यकता होती. राजकीय पुढाऱ्यांना त्यात रस नव्हता. ही पोकळी कोणीतरी भरून काढावयास हवी होती; आणि कोणी तसे म्हटले नसले तरी, ही जबाबदारी आपल्यापर्यंत येऊन पोहोचणार व ती आपल्याला स्वीकारावी लागणार हे शंकररावांनी मनोमन जाणले होते. गांधीजींच्या निधनानंतर त्यांना ती तशी काही वर्षे स्वीकारावीही लागली.

३) शंकररावांनी गांधीजींकडून आत्मसात् केलेली भावना ही विधायक कार्याकडे केवळ एक लोकोपयोगी कार्य म्हणून पहात नसे, तर भारताच्या पुनरुत्थानाची आदर्श दिशा व स्वतःच्या आध्यात्मिक प्रगतीची साधना या दृष्टीने या कार्याविषयी दक्ष राही. या त्यांच्या मनोभूमिकेची जाण विनोबाजी, दादा धर्माधिकारी अशी काही निवडक मंडळी सोडली, तर अन्य फारच थोड्या जणांना होती.

गांधीजींनंतरच्या कालखंडात विधायक कार्य करणाऱ्या संघांना-संस्थांना शंकररावांनी नेतृत्व दिले, त्याचप्रमाणे विनोबाजींचे भूदान आंदोलन सुरू झाल्यानंतर त्यातही त्यांनी सहभाग घेतला, स्वतंत्र प्रभावी पदयात्राही काढली. भारत-चीन मैत्री यात्रेचे आयोजन हा असाच एक ध्येयवादी परंतु अंतिमतः फसलेला प्रयत्न होता.

**संयुक्त महाराष्ट्र आंदोलन**

संयुक्त महाराष्ट्राचे आंदोलन हे सर्वार्थाने शंकररावांची कसोटी घेणारे झाले. या कसोटीत व्यक्तिगत आध्यात्मिक साधनेच्या दृष्टीने ते यशस्वी झाले असे एक वेळ म्हणता येईल, परंतु नेता म्हणून त्यांचा पूर्णपणे पराभव झाला. 'मंगल कलश' आणण्याच्या त्यांच्या उद्‌गारांची हेटाळणी झाली. मुंबईतील हिंसक आंदोलनाच्या घडामोडींच्या वेळी त्यांनी जी भूमिका घेतली, ती त्यांच्या स्वतःच्या आध्यात्मिक सत्याग्रही वृत्तीला अनुरूप असली तरी, महाराष्ट्रीयांच्या दृष्टीने ती लोकविरोधात गेल्याने ते महाराष्ट्रीय जनतेच्या मनातून पूर्णपणे उतरले.

शंकरराव लिहितात :

"१९४६ साली सं. महाराष्ट्र परिषदेचा मी अध्यक्ष झालो व आंदोलनाचे नेतृत्व माझ्या शिरावर मी घेतले, त्यावेळी सं. महाराष्ट्राच्या वाटेवर अंतर्गत व बाह्य महान् अडचणींचे पहाड उभे होते." (*दैव देते* : पृ. २२५)

ते अन्यत्र सांगतात :

"सन १९४६ च्या जुलैमध्ये संयुक्त महाराष्ट्र परिषदेची स्थापना होऊन मी तिचा अध्यक्ष झाल्यानंतर चार महिन्यांच्या आतच मी काँग्रेसचा सरचिटणीस झालो व त्या पदावर पुढे चार वर्षे राहिलो. काँग्रेसमधील या माझ्या स्थानाचा महाराष्ट्राच्या एकीकरणासाठी, महाराष्ट्राच्या चार विभागांतील काँग्रेसजनांमध्ये व काँग्रेस कार्यकर्त्यांमध्ये उत्साह उत्पन्न करून त्यांची शक्ती या कामाला लावण्याच्या दृष्टीने पुष्कळ उपयोग झाला हे खरे; तथापि काँग्रेसच्या कारभारात या विभागीय काँग्रेस कमिट्यांमध्ये महाराष्ट्रासाठी नित्य व नैमित्तिक एकसूत्री धोरण, आंदोलन व फळी (front) निर्माण करण्यात खरे यश लाभले नाही, हे कबूल केले पाहिजे. ... अखिल भारताचे नेतृत्व तर दूरच पण अखिल महाराष्ट्राचे नेतृत्वही लोकमान्यांच्या नंतर कोणाला लाभले नाही. माझी काय किंवा इतरांची काय, या बाबतीत अशीच स्थिती होती. ... एक काँग्रेस संघटना नाही, एक नेतृत्व नाही व साध्याबद्दल एकजूट नाही. अशा अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत महाराष्ट्राचे एकीकरण व सं. महाराष्ट्राची स्थापना घडवून आणण्याचे दुस्तर काम करावयाचे होते." (*दैव देते* : पृ. २४३)

सर्व पक्षांच्या लोकांनी हे नेतृत्व शंकररावांच्याकडे का दिले असावे? शंकरराव या विषयी सांगतात :

"सं. महाराष्ट्राची मागणी अखेर पदरात पाडून घेण्याची मुख्य मदार काँग्रेसवर होती. महाराष्ट्रातील सर्व मतांच्या लोकांनी माझे नेतृत्व मानण्याचे ते एक मुख्य व महत्त्वाचे कारण होते, हेही येथे स्पष्टपणे सांगणे आता जरूर आहे. महाराष्ट्रातील सर्व राजकीय पक्षांचे व अपक्षीय पण मातब्बर मंडळींचे नेतृत्व करण्याच्या माझ्या अधिकाराबद्दल मला अवास्तव भ्रम नव्हता. (I was not under any illusion.) माझ्या गुणांच्या व कर्तृत्वाच्या मर्यादेची मला जाणीव होती. काँग्रेसकडून हे काम व्हावयाचे किंवा करून घ्यावयाचे तर महाराष्ट्रात माझ्याइतका उपयुक्त मनुष्य दुसरा नव्हता, हे ही सर्व मंडळी ओळखून होती. मी आता काँग्रेस सोडली असली तरी, प्रांतीय आणि भारतीय नेत्यांशी माझे पूर्वीचे असलेले निकट स्नेह-संबंध कायम होते. माझी दिल्लीपर्यंत 'पोहोच' होती. ... आणि श्रेष्ठ काँग्रेस वर्तुळात असलेल्या माझ्या स्थानामुळे लोकांनी माझ्याबद्दल ज्या अपेक्षा बाळगल्या होत्या त्या अनाठायी नव्हत्या हे पुढे दिसूनही आले." (*दैव देते* : पृ. २३२-२३३)

शंकरराव पुढे सांगतात :

"काही अपवाद व तेही काही अंशांनी सोडले, तर एकंदरीने परिषदेतील निरनिराळ्या पक्षांच्या मंडळींनी ही गर्भित जाणीव दीर्घकालपर्यंत पाळली, पण जसजसा काळ जाऊ लागला व मराठी जनतेतील संयुक्त महाराष्ट्राबद्दलच्या भावना उत्कट व तीव्र होत गेल्या व संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेसाठी जनता उतावीळ झाली, आणि त्यासाठी ती त्याग करण्यास व कष्ट करण्यास तयार आहे असे दिसले, तेव्हा अखेर अखेर काँग्रेसला पेचात न टाकण्याचे व तिच्याशी संघर्ष न करण्याचे धोरण सोडले गेले असे मला दुःखाने म्हणावे लागेल. याला कारण खरोखर परिस्थितीचे दडपण किती व स्वपक्षहितबुद्धी किती हा एक मनोविश्लेषणशास्त्राचा उत्तम विषय होऊ शकेल." (*दैव देते* : पृ. २३३)








'सर्वेषां अविरोधेन' या प्रकरणाचा शेवट वरील दोन परिच्छेदांनी होतो. त्याच पानावर खाली तळटीप आहे. ती अशी :

"नवी दिल्ली येथून संपूर्ण राज्यशकट चालविणारे कॉंग्रेसश्रेष्ठी यांचेकडून श्री. शंकररावांच्या, समजुतीने ध्येयप्राप्ती करून घेण्याच्या प्रयत्नांना अनुकूल उत्तर मिळेना, हेही एक कारण मुंबईतील लोकक्षोभ वाढविण्यास निमित्त झाले."

स्वतः शंकररावांच्या देखील मानसशास्त्रीय मनोविश्लेषणाला आव्हान देणारा हा कालखंड होता. साध्य आणि साधने यामधील संघर्षाचा हा समरप्रसंग होता.

शंकरराव सांगतात :

"हा प्रश्न स्नेहाने, सलोख्याने व समजुतीने सोडविणे हे माझे तर माझ्या सर्वोदयनिष्ठेमुळे महाव्रतच होते. 'सर्वेषां अविरोधेन' ही माझी या यज्ञातील दीक्षा होती. जे विरोधी होते त्यांच्या विरोधाचे स्नेहपूर्ण श्रद्धेने मतपरिवर्तन करणे हाच माझ्यापुढील एक मार्ग होता... माझी भूमिका मुख्यतः मध्यस्थाच्याच स्वरूपाची होती. ... माझ्या कामाला यत्किंचितही आक्रमकतेचे स्वरूप येणार नाही याची मी संपूर्ण दक्षता घेत होतो. नव्हे, तो माझा एक स्वभावच बनत होता." (*दैव देते* : पृ. २५४)

शंकरराव अशी दक्षता घेण्याचा प्रयत्न करत होते; पण उत्तरोत्तर परिस्थिति आटोक्याबाहेर चालली होती. मुंबई महाराष्ट्रात रहावी की नाही, हा कळीचा प्रश्न होता. फाझल अली कमिशनचा रिपोर्ट २ ऑक्टोबर १९५६ रोजी सरकारकडे सादर झाला आणि त्यात मुंबई महाराष्ट्रात नाही, हे 'उघडे' गुपित झाल्यानंतर घटनांनी गती घेतली व वातावरण प्रक्षुब्ध झाले. यावेळी संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनात व विशेषतः त्याच्या प्रचाराच्या मंत्रात व तंत्रात फट पडली होती.

शंकरराव लिहितात :

"विशिष्ट अडचणीतून मार्ग काढण्यासाठी सं. महाराष्ट्र परिषदेने आपले सर्वाधिकार मला देऊन आपले काम एक प्रकारे स्थगित केले होते; पण त्याचबरोबर परिषदेतील सर्व पक्षांना परिषदेचे ध्येय प्राप्त करून घेण्यासाठी शांततेच्या व लोकशाहीच्या मार्गाने काम करण्याचे स्वातंत्र्य दिले होते. याचा संपूर्ण फायदा निरनिराळे पक्ष व जनतेतील सामान्य कार्यकर्ते घेत होते. ... जनतेला या विषयाचे एका दृष्टीने वेड लागले होते. याचा परिणाम प्रचारातील संयम व विवेक सुटण्यात झाला. सं. महाराष्ट्र परिषदेचा सर्वाधिकारी म्हणून बाह्यतः मला मान्यता असली तरी, आंदोलनाची सूत्रे सैल झाली व त्यावर नियंत्रण राहिले नाही. ... याचा एक परिणाम असा झाला होता की, सर्वसामान्य जनता व कार्यकर्ते आणि मी यांच्यामध्ये मोठे अंतर पडत चालले होते. १५ नोव्हेंबर रोजी नरे पार्कवर झालेली कामगारांची सभा ही माझी मुंबई महाराष्ट्रातील जनतेशी संबंध ठेवणारी शेवटची सभा होती." (*दैव देते* : पृ. ३१४)

शंकरराव पुढे लिहितात :

"मुंबईतील लोकमत या प्रश्नावर अगदी तीव्र व वातावरण तप्त झाले होते. ... अशा वेळी मोर्चे, हरताळ यासारख्या गोष्टी करणे सर्व दृष्टींनी अहितकारक होते असे माझे मत होते." (*दैव देते* : पृ. ३२)

या दृष्टीने शंकररावांनी आपल्याकडून प्रयत्न केले. त्याचा तात्पुरता परिणाम एवढाच झाला की, हरताळ करण्याऐवजी विधानसभेवर मोर्चा नेण्याचे ठरले. १८ नोव्हेंबरचा मोर्चा शांततेने पार पडला. यावेळी त्यांच्या इच्छेविरुद्ध मोर्चा काढला गेला असताही शांतता राखण्याची जबाबदारी इतरांप्रमाणे आपणावरही आहे व आंदोलनातील आपले स्थान लक्षात घेता ती अधिकच आहे या जाणिवेने शंकरराव त्या दिवशी दुपारी त्या भागात फिरत राहिले.

पुढील तीन दिवस अत्यंत स्फोटक वातावरण राहिले. रविवार, दि. २० रोजी मुंबई कमिटीतर्फे त्रिराज्य योजनेला पाठिंबा देण्याकरिता चौपाटीवर जाहीर सभा घेतली गेली. या सभेचे अध्यक्षस्थान मोरारजीभाई स्वीकारणार व मुख्य वक्ते श्री. स.का. पाटील हे असणार असे जाहीर झाले. याने आगीत तेल ओतल्यासारखे झाले. लोकांनी चौपाटीवरच्या सभेत निंद्य प्रकार केले व ती सभा उधळून टाकण्याचा प्रयत्न केला. त्याच दिवशी शिवाजी पार्कवर भरलेल्या सभेत कॉम्रेड डांगे यांनी, "श्री. देवांचे सर्वाधिकारित्व आम्ही आता मानीत नाही" असे जाहीर करून सार्वत्रिक संपाचा आदेश दिला. सोमवारी सार्वत्रिक संप झाला व विधानसभेवर प्रचंड मोर्चा गेला. त्या निदर्शनाला उग्र व अतिरेकी स्वरूप प्राप्त झाले व सरकारच्या बाजूने जबर गोळीबार होऊन अनेक माणसे जखमी झाली व प्राणाला मुकली.

२० ता. च्या चौपाटीवरील सभेतील दंगलीचे वृत्त कळल्यावर शंकररावांनी प्रायश्चित्त म्हणून उपोषण सुरू केले. हरताळ करू नये अशी त्यांनी जाहीर विनंतीही केली होती. त्या रणधुमाळीत त्यांचा आवाज प्रभावी व्हावा असे नेतृत्व त्यांच्याकडे आता राहिले नव्हते. यानंतर पुन्हा ते कधी त्यांच्याकडे येईल अशी शक्यताही उरली नव्हती. शंकरराव आपली वॉटरलू हरले होते. परंतु शंकररावांच्या मनात त्या दिवसाची राहिलेली खंत वेगळीच होती. या सर्व घटनांचे वर्णन करणाऱ्या 'मुंबई पेटली' या प्रकरणाच्या शेवटी ते लिहितात :








"सोमवारी सकाळी चौपाटीवर घडलेल्या प्रकाराबद्दल मी प्रायश्चित्तरूप उपोषण सुरू केले. पण सोमवारी पुन्हा मोर्चा व हरताळ असल्यामुळे शातंताभंग होण्यासारखी भरपूर परिस्थिती होती. तेव्हा १८ तारखेप्रमाणे २१ तारखेलाही बाहेर पडून शांतताभंग टाळण्यासाठी मी माझेकडून शिकस्तीचे प्रयत्न करावयास हवे होते. पण आपण उपोषण करीत आहोत, तेव्हा आपले याविषयींचे कर्तव्य आपण करीत आहोत असा संभ्रम मला झाला व मी त्या दिवशी बाहेर पडून जनसमूहांतून व रस्त्यांतून फिरून शांतताभंग टाळण्याचे व लोकांना शांत ठेवण्याचे जेवढे प्रयत्न करणे शक्य होते तेवढे केले नाहीत. उपोषण सुरू झाले होते तरी ते मला सहज करता आले असते. मी तसे प्रयत्न केले असते तरी शांतता कितपत राहिली असती असा प्रश्न नैतिक कर्तव्यपालनाच्या बाबतीत उत्पन्न होत नाही." (*दैव देतें* : पृ. ३२३)

**एकाकी शंकरराव**

नैतिक कर्तव्यपालनाच्या दृष्टीने जीवनातील आपल्या प्रत्येक कृतीकडे पाहिले पाहिजे, ही शंकररावांची धारणा होती. त्यात त्यांची आध्यात्मिक साधनाही होती. नेतृत्व आपल्या हातातून गेले याचे दु:ख करण्याऐवजी नैतिक कर्तव्यपालनात आपण कमी पडलो याची खंत मनाला लागून रहावी, यातच शंकररावांच्या व्यक्तिमत्त्वाची उंची आहे व त्यांच्या जीवनाचे असामान्य असाधारण वैशिष्ट्यही आहे.

संयुक्त महाराष्ट्र परिषदेचे शंकरराव १९४६ ते १९५६ या कालखंडात अध्यक्ष होते. भूदान आंदोलन सुरू झाल्यानंतर त्यांनी भूदान आंदोलनातूनही कृतिशील महत्त्वाचा भाग घेतला. विनोबाजींचे नेतृत्व मानून परंतु स्वत:ची अशी स्वतंत्र पदयात्राही केली. त्या यात्रेत भूदानाचा संकल्पही पूर्ण केला. हे करीत असताना सर्वोदय व राजकीय कार्य यांचा परस्परसंबंध कसा ठेवावा किंवा काँग्रेसमधील आपले स्थान असताना सर्वपक्षीय नेतृत्व कसे करावे, ते करताना राष्ट्र व महाराष्ट्र यातील ताण कसे सांभाळावेत, काँग्रेस पक्ष राष्ट्रीय स्तरावर दुर्बल होऊ नये व महाराष्ट्रात तो दुभंगू नये व त्याचा जनतेशी अनुबंधही तुटू नये यासाठी काय करावे, अशा अनेक समस्या त्यांच्यापुढे उभ्या होत्या. ज्याच्याशी कृतीच्या व विचाराच्या क्षेत्रात एकत्रित विचार करून समान पातळीवर ज्याची साथ घ्यावी असा अन्य कोणी महाराष्ट्रात नव्हता. He was a lone lion. या एकत्रित स्तरावर ज्यांचे मार्गदर्शन त्यांना आदरणीय वाटले असते व कदाचित् उपयोगी पडले असते ते गांधीजीही निघून गेले होते. परंतु अध्यात्मनिष्ठा व व्यवहार यांचा समन्वय साधण्याचा प्रयत्न करीत राहणे हा गांधीजींचा जीवन संदेश त्यांनी आत्मसात् केला होता. राष्ट्रहित सांभाळावे, वर्गसमन्वयातून सर्वोदय हा आदर्श ठेवावा व मानवतेची सेवा करीत करीत त्यातच आपली आध्यात्मिक आंतरिक उन्नती साधावी ही गांधीजींच्या विचारपद्धतीची आचारसरणी होती. त्यांना व्यक्तिगत महत्त्वाकांक्षा, पदलालसा नव्हती. नाहीतर एक कालखंड असा होता की, ते मनात आणते तर महाराष्ट्राचे मुख्यमंत्री किंवा केंद्रीय स्तरावर महत्त्वाचे मंत्री होऊ शकले असते.

**हेचि फल काय...?**

असे असूनही शेवटी शेवटी ते मागे पडत गेले. लोक त्यांच्याविषयी उदासीन झाले. त्यांना विसरले. आज त्यांची आठवण काढावयाची झाली, तर मुद्दाम आवर्जून काढावी लागते. असे का व्हावे? संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनात त्यांच्याकडून लोकांनी केलेल्या अपेक्षा व लोकांचा झालेला तीव्र अपेक्षाभंग हे त्याचे कारण असू शकेल काय? लोकांनी चुकीच्याच अपेक्षा त्यांच्याकडून राखल्या होत्या, असे तर झाले नाही? आपल्या मूलभूत तत्त्वज्ञानालाच बाधक होतील अशा तडजोडी शंकररावांनी स्वीकारल्या नसल्या तर त्यांत जनतेच्या त्यांच्याकडूनच्या अपेक्षाच चूक होत्या एवढेच सिद्ध होते. तू आमचा नेता हो परंतु आमच्या मनासारखेच वाग असा हट्टाग्रह जनता अनेकदा धरते. गांधीजींच्याकडून जनतेने शेवटी शेवटी तशी अपेक्षा केली. वेगळ्या पद्धतीने मानवेंद्रनाथ रॉय यांच्याकडूनही केली. आणीबाणीच्या कालखंडात विनोबाजींच्या कडूनही. या तिघांनीही एका अर्थाने जनतेचा अपेक्षाभंग केला. परंतु त्या तिघांच्याही नावांना तेजोवलय लाभले व ते आजही टिकून आहे. शंकररावांच्यामध्ये तसा करिष्मा नव्हता व तसे वलय त्यांना कधीच लाभले नाही.

याचे नक्की विश्लेषण करता येत नाही. परंतु वृत्तीतील रुक्षता, वर्तनातील कर्कशता, सहज नम्रतेचा अभाव, हार्दिक बंधनाने अनुयायी, सहकारी जोडण्याची असमर्थता ही त्याची कारणे असावीत. या अशा कारणांच्या सत्यासत्यतेचा अभ्यास झाला पाहिजे व मानसशास्त्रीय विश्लेषणही केले जावयास हवे.

संयुक्त महाराष्ट्र आंदोलनाचा इतिहास हे याचे कारण होते असे म्हणावे, तर त्या कालखंडात वेळोवेळी सकारण-अकारण ज्यांनी जनतेचा रोष ओढवून घेतला त्यांची वलये कालान्तराने त्यांना परत प्राप्त झाली व जनता त्यांच्यावरील आपला रोष विसरली. नेहरूंच्या बाबत तर हे घडलेच, परंतु मोरारजीभाईंच्या बाबतही हे घडले. यशवंतराव चव्हाणांना तर एक नवे वलय प्राप्त झाले.






हे भाग्य शंकररावांच्या वाट्याला आले नाही. हे असे का घडावे?

*देव देते पण कर्म नेते* या आत्मचरित्रात 'मुखरस्तत्र हन्यते' अशा शीर्षकाचे शेवटी एक प्रकरण आहे. या मथळ्याविषयी त्याच पानावर (पृ. २२४) एक तळटीप आहे. ती अशी :

"हा मथळा पंचतंत्रातील पुढील श्लोकावरून घेतला आहे :

न गणस्याग्रतो गच्छेत् सिद्धे कार्ये समं फलम्।

यदि कार्यविपत्तिः स्यात् मुखरस्तत्र हन्यते।।"

तेथेच अर्थही दिला आहे : 'लोकांचा पुढारी होऊ नये. कार्यसिद्धी झाली तर सर्वांबरोबर पुढाऱ्यालाही सारखेच फळ मिळते; पण कार्य फसले तर पुढारी मारला जातो.'

**मुखरता**

हे शीर्षक शंकररावांनीच दिले, की अन्य कोणी दिले याविषयी मला कुतूहल आहे. तसेच, तळटीपेविषयीही आहे. मनोविश्लेषणाच्या दृष्टीने मला ते महत्त्वाचे वाटते. याचे अन्य महत्त्व असे की, मुखर या शब्दाचा संस्कृतमध्ये पुढारी असा ज्याप्रमाणे अर्थ आहे तसाच दुसरा अर्थ अनवधानाने बोलणारा वाचाळ असाही आहे. शब्द हा बाणासारखा असतो. तो सुटला की, मागे घेता येत नाही व त्याचे परिणाम चुकविता येत नाहीत. शंकररावांच्या आयुष्यात असे दोनदा घडले व ते त्यांना अतिशय महाग पडले. एक प्रसंग यशवंतरावांच्या विषयीच्या उद्गाराचा व दुसरा राष्ट्रसेवादलाच्या मेळाव्यात उपस्थित केलेल्या एका शंकेचा.

यशवंतरावांविषयीच्या उद्गाराचा प्रसंग शंकररावांनीच सांगितला आहे. (*दैव देते* : पृ. ३१९) पार्श्वभूमी संयुक्त महाराष्ट्राच्या मुंबईतील अंतिम ताणतणावाची आहे. शंकरराव लिहितात :

"(मुंबई विधिमंडळ काँग्रेस पक्षाचे नेते श्री. मोरारजी देसाई व काँग्रेस श्रेष्ठी विरोधी भाषण करण्यावर प्रतिबंध घालून व त्रिराज्य ठरावाच्या स्वीकाराचा Whip काढून) आपल्या स्वातंत्र्याची गळचेपी करीत आहेत याची चीड येऊन महाराष्ट्राचे आमदार राजीनामे देण्यास तयार झाले हे माझ्या मते महाराष्ट्राचे बळ होते. या बळावर महाराष्ट्राचा हेतू सिद्ध करण्याचा प्रयत्न करणे हे या मंडळींचे (श्री. मामासाहेब देवगिरीकर व श्री. यशवंतराव चव्हाण) कर्तव्य होते. महाराष्ट्र काँग्रेसपक्षात राजीनामे न देण्याच्या मताचेही काही लोक होते; पण त्यावेळी त्यांची संख्या फार कमी होती. श्री. देवगिरीकर आणि विशेषतः श्री. यशवंतराव यांनी राजीनाम्याच्या बाजूची भूमिका घेतली असती, तर ही संख्या आणखीही वाढली असती व सबंध काँग्रेसपक्ष भाषण व मत स्वातंत्र्यासाठी राजीनामे देण्यास तयार आहे, असे भव्य चित्र देशापुढे आले असते व त्याचा नैतिक परिणाम फार मोठा झाला असता! पण या दोघांनी उलटी कृती केली. राजीनामे देणाऱ्यांनी ते देऊ नयेत, असा प्रयत्न त्यांनी केला. तसेच, ज्यांनी दिले त्यांचे महत्त्व कमी करण्याचा प्रयत्न केला आणि या सर्वांवर कळस म्हणजे श्री. यशवंतराव यांनी हे राजीनामे म्हणजे महाराष्ट्र काँग्रेसमधील फूट आहे व त्यातून महाराष्ट्र काँग्रेसला वाचविले पाहिजे असे श्री. मोरारजीभाईंना जाऊन सांगितले, असे मला समजले. जे बल होते तीच दुर्बलता आहे असे मानणे व पक्षनेत्याला तसे भासविणे याचा मला राग आला. मी त्यावेळी उपोषण करीत होतो. श्री. भाऊसाहेब हिरे, नाना कुंटे व श्री. मामासाहेब देवगिरीकर यांच्याशी याविषयी चर्चा करताना मी त्या रागाच्या आवेशात 'यशवंतराव यांना आपल्यातून काढून टाका' असे चिडून म्हणालो. ही गोष्ट मामांनी यशवंतरावांना सांगितली. स्वाभाविकच त्यांना राग आला व उपोषणाच्या काळात मी त्यांना भेटीला बोलाविले होते; व त्यांनी येण्याचे कबूलही केले होते ते त्यांनी येण्याचे रद्द केले व पत्राने त्याप्रमाणे मला कळविले. संयुक्त महाराष्ट्राच्या कामात स्वतः सोसून, 'सर्वेषां अविरोधेन' इतकेच नव्हे, तर सर्वांना बरोबर घेऊन काम करावयाचे असे माझे धोरण होते व प्रयत्नही होते. त्यामुळे या कामात कोणावर रागावणे अगर चिडणे सहसा माझ्या हातून होत नसे; पण या वेळी ते झाले! त्यामुळे कार्याची हानी झाली! मला याबद्दल पश्चात्ताप होणे अगदी स्वाभाविक होते. मी श्री. यशवंतराव यांना बोलावून या दोषाबद्दल त्यांची क्षमा मागितली; पण त्यांनी ती मनापासून केल्याचा अनुभव मला पुढे आला नाही! या माझ्या दोषामुळे श्री. यशवंतरावांना मी गमावले याचे दुःख मला नेहमी आहे."

या घटनेशी श्री. नरूभाई लिमये यांचाही काही संबंध आला होता. ते आपल्या आत्मचरित्रात (*वीस चोक ऐंशी*, पृ. १७६) लिहितात :

"देव अस्वस्थ झालेले दिसले. त्यांनी चव्हाणांसाठी एक चिठ्ठी लिहून बंद पाकिटात मजजवळ दिली आणि 'ही लगेच यशवंतरावांना दे! फोडू नको, वाचू नको' असे सांगितले.

"मी चव्हाणांच्या बंगल्यावर गेलो. ब्लाईंड लेनमधील त्या बंगल्यात चव्हाणांना चिठ्ठी दिली. त्यांनी ती वाचून माझ्या हाती दिली. म्हणाले, 'वाच!' त्यात देवांनी चव्हाणांवर अन्याय केला असून त्याचे प्रायश्चित्त (उपोषणाने) घ्यावयाचे आहे, अशा

आशयाचा मजकूर होता. यशवंतराव म्हणाले, 'पहा, माझ्यावर अन्याय करून वर ब्रह्महत्येचे पातक माझ्या शिरी!' "

श्री. नरूभाऊ लिमये यांनी, त्यांच्या कानावर आलेले शंकररावांचे यशवंतरावांविषयीचे उद्‌गार – 'याला लिक्विडेट केला पाहिजे' असे होते, असे या ठिकाणी सांगितले आहे.

प्रत्यक्ष उद्‌गार कोणते होते हे सांगू शकणारे आता कोणीच हयात नाहीत. परंतु ते अत्यंत तिखट असले पाहिजेत ही गोष्ट स्पष्ट आहे. यशवंतराव ती जखम कधी विसरले नाहीत व त्यानंतरच्या कालखंडात यशवंतराव महाराष्ट्रात सर्वेसर्वा पदाला पोचल्याने शंकररावांना महाराष्ट्राच्या जीवनातून राजकीयदृष्ट्या वहिष्कृत व्हावे लागले.

**एकला चलो रे**

हा अघोषित वहिष्कार महाराष्ट्रातील काँग्रेसपक्षाच्या राजवटीत आजवर दूर झालेला नव्हता. संयुक्त महाराष्ट्रवादी अधिकारपदावर होते तेव्हाही तो होताच आणि शिवसेना, भाजप यांच्या राजवटीत तर त्यांना तो अघोषित ठेवण्याचे कारण नसले तरी, त्या घोषणे-अघोषणेचा विचारही करण्याचे कारण नाही, इतके त्यांना शंकरराव आज दुर्लक्षणीय वाटणे स्वाभाविक आहे. हिन्दुत्वाच्या राजकारणाला शंकररावांचा जो कडवा विरोध होता त्यातून ही उपेक्षा समजण्यासारखी आहे व ती शंकररावांनीही स्वतःचे एक महत्त्वाचे श्रेय म्हणूनच स्वीकारली असती.

समाजवादी मंडळींना मात्र ते इतके दुरावले नाहीत; परंतु त्यांना ते तितके जवळचेही वाटले नाहीत. मूलभूत तात्त्विक फरक हे याचे एक कारण तर होतेच, परंतु सातारला सेवादल मेळाव्याच्या प्रसंगी त्यांनी 'ही शिवशक्ती कोठे जाणार?' अशी तत्कालीन समाजवादी नेतृत्वाविषयी व्यक्त केलेली चिंता आणि त्यातूनच पुढे सेवादलाची स्वायत्तता हिरावून घेण्याची केलेली कारवाई या गोष्टीही या परिस्थितीला कारणीभूत होत्या. महाराष्ट्र काँग्रेसमध्ये स्थान राहिले नाही, महाराष्ट्रातील अन्य राजकीय पक्षांत मान राहिला नाही, जनमानसातून आदराची भावना ओसरली अशी महाराष्ट्रात शंकररावांची स्थिती झाली. पंडित नेहरूंच्या इच्छेविरुद्ध १९५१ मध्ये काँग्रेसच्या अध्यक्षपदाची निवडणूक त्यांनी लढविली व ते पडले. शंकररावांच्या कार्यकर्तृत्वाच्या काळात भारतीय स्तरावर नेहरू सर्वेसर्वा होते. ते क्षेत्रही शंकररावांना त्यामुळे अगदीच बंद झाले नसले तरी, अतिशय मर्यादित झाले.

शंकररावांची जीवनकथा ही एका अर्थाने अपयशांची मालिका आहे. परंतु जो साधनापथ ते चालू पहात होते त्यावरील उत्तुंग शिखरे सर करण्याच्या ईर्ष्येत शेवटच्या टप्प्यावर आलेली ती अपयशे आहेत. यातील वृत्तीचे व साहसाचे ज्यांना कौतुक नसते, त्याविषयी आदरभाव नसतो, त्यांच्या दृष्टीने ही शेवटची घसरण हास्यास्पदच ठरते. The ridiculous is only an inch short of the sublime, असा तो विदारक अनुभव असतो.

आतून तुटेपर्यंत आणि आतून तुटल्यानंतरही शंकरराव या साधनापथावरून विचलित झाले नाहीत, हे शंकररावांचे श्रेय आहे.

शंकररावांचे जीवन ही एक उदात्त शोकांतिका आहे. या शोकांतिकेतील रसाचा स्पर्श आपल्या मनाला होऊ देणे हे देखील आपल्या जीवनाला उन्नयन देण्याचे साधन होऊ शकेल.

तशी भावना व तशी दृष्टी यांची मात्र आवश्यकता आहे.

**संदर्भ ग्रंथः**

शंकरराव देव : *दैव देते पण कर्म नेते*, सासवड आश्रम विश्वस्त मंडळ, ३० डिसेंबर १९७६.

शंकरराव देव : *साध्य आणि साधने*, सा.आ.वि.मं,. १९८४.

शंकरराव देव : *गांधीजी आणि लोकस्वराज्य*, सा.आ.वि.मं., १९८१.

शंकरराव देव : *भारताची स्वराज्यसाधना*, सा.आ.वि.मं., १९८३.

शंकरराव देव : *गांधीजींचे वृहद् आत्मचरित्र खंड १*, सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, १९७०.

*गांधी मार्ग मीमांसा* : पू. शंकरराव देव जन्मशताब्दी विशेषांक, जानेवारी-फेब्रुवारी, १९९५.

नरूभाऊ लिमये : *वीस चोक ऐंशी* (आत्मचरित्र), कॉण्टिन्टेल प्रकाशन, १९८९.

*फैजपूर काँग्रेस सुवर्णमहोत्सव गौरव ग्रंथ*, १९८७, महोत्सव समिति.

D.G. Tendulkar : *Mahatma : Life of Mohandas Karamchand Gandhi* (Eight volumes), Publications Division, 1969 Edition.

☆☆☆

अनुक्रमणिका






# ध्येयनिष्ठ कर्मयोगी शंकरराव

**पु.ह. पटवर्धन**

भारतीय तिथीप्रमाणें माघ शु. ५ वसंतपंचमीस (अठ्ठावीस जानेवारी १९५५ ला) श्री. शंकरराव देव यांच्या वयाला साठ वर्षे पुरीं झालीं. त्यांचा षष्ट्यब्दिपूर्तिसमारंभ त्यांचे मित्र व चहाते यथोचित रीतीनें साजरा करतीलच. काँग्रेसजनांना व त्यांच्या पूर्वीच्या सहकाऱ्यांना त्यांनीं बजावलेल्या प्रदीर्घ सेवेचें व केलेल्या खडतर तपस्येचें या प्रसंगानें खासप्रकारें स्मरण व्हावे हें अगदीं स्वाभाविक आहे.

आज शंकरराव लौकिक अर्थानें राजकारणांत नाहींत. काँग्रेसचें किंवा दुसऱ्या कोणत्याहि राजकीय संघटनेचें नेतृत्व तर राहोच पण साधें सभासदत्वहि त्यांनीं पतकरलेलें नाहीं. ते आतां पूर्णपणें सर्वोदयवादी बनलें आहेत व अपक्ष भूमिकेवरून चाललेल्या भूदानकार्यासाठीं आपली शक्ति प्रामुख्यानें वेंचीत आहेत. नाहीं म्हणायला संयुक्तमहाराष्ट्र-आंदोलनाची धुरा मात्र ते अद्याप वाहात आहेत.

सार्वजनिक जीवनांत असा नेहमीं अनुभव येतों कीं, राजकीय पक्षांत काम करणाऱ्या नेत्यांचा बोलबाला असतो. राजकीय नेत्यांच्या हालचालींना व कार्यांना वर्तमानपत्रांत वरचेवर प्रसिद्धि मिळत असते. त्यामुळें राजकीय नेते लोकप्रियतेच्या दृष्टीनें "चलनी नाणें" असतें. राजकारणाच्या दैनंदिन प्रवाहांतून जो बाहेर पडतो त्याचा हळूंहळूं समाजाला विसर पडूं लागतो व कांहीं कालानंतर त्याच्यासंबंधीं संपूर्ण विस्मृति होते. शंकररावांसंबंधीं कांहीं प्रमाणांत असें होत असल्याचें आपण पहात आहोंत. पण त्यांनीं गेलीं तीन तपें केलेली देशसेवा इतकी अनेकविध आहे कीं, महाराष्ट्राला तरी त्यांचें विस्मरण होतां कामा नये.

### म. गांधींचें नेतृत्व

शंकररावांच्या सेवाजीवनाला १९१६ साली सुरुवात झाली असें म्हणतां येईल. गांधीजींनीं चंपारण्यांत बरोबर नेलेल्या कार्यकर्त्यांत महाराष्ट्रांतील जे दोन कार्यकर्ते होते त्यांपैकीं एक शंकरराव. अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत त्यांनीं स्वकष्टानें शिक्षण व संस्कार मिळविले. बडोद्यामध्यें ते शिकत होते त्यावेळीं श्री. विनोबाजी, भाईसाहेब धोत्रे व श्री. काकासाहेब गाडगीळ त्यांचे समकालीन विद्यार्थी होते. हा एक सहज घडलेला योगायोग होता. ह्या पिढींतील तरुणांवर लोकमान्य टिळकांच्या व्यक्तित्त्वाची छाप होती. शंकररावांच्या मनावरहि पहिले संस्कर लोकमान्यांचेच झालेले आहेत. प्रत्यक्ष कार्याला सुरुवात करतात न करतात तोच म. गांधींचा सहवास लाभल्यामुळें व त्यांच्या नेतृत्वाखालीं स्वयंसेवक म्हणून कार्य करण्याची संधि मिळाल्यामुळें गांधी-विचार-प्रणालीनें त्यांना प्रभावित केलें. लोकमान्य टिळकांच्या मृत्यूनंतर म. गांधींनीं सुरू केलेल्या असहकारपर्वात शंकररावांनीं जिवाभावानें उडी टाकली. पुढें 'केसरी'-सांप्रदायांतील मंडळींनीं म. गांधींच्या नेतृत्वाला विरोध करण्यास सुरुवात केली. तात्यासाहेब केळकरांसारखीं मातबर माणसें या विरोधकांत होतीं. अशा स्थितींत म. गांधींच्या नेतृत्वाला महाराष्ट्रांत मान्यता मिळवून देण्यासाठीं क्रांतिकारी वृत्तीच्या ज्या तरुण कार्यकर्त्यांनीं चिकाटीनें, ध्येयनिष्ठेनें व त्यागानें प्रयत्न केला त्यांमध्यें श्री. शंकरराव देव यांची प्रामुख्यानें गणना करावी लागेल. सन १९२० ते १९३५ या कालखंडांत राष्ट्रीय शिक्षण, खादी, अस्पृश्यतानिवारण, सत्याग्रह वगैरे कार्यक्रमांत चिकाटीनें व निष्ठेनें काम करून या सेवकांनीं महाराष्ट्रांत काँग्रेसला व म. गांधींच्या नेतृत्वाला लोकमान्यता मिळवून दिली. श्री. प्रेमाबाई कंटक यांनीं लिहिलेल्या 'सत्याग्रही महाराष्ट्रा'त या कालखंडाचें सविस्तर व सरस वर्णन आढळेल. श्री. शंकरराव देव या पुस्तकाचे नायक आहेत. पुस्तकाच्या प्रस्तावनेंतच लेखिका म्हणते : "अहिंसासिद्धान्ताला जीवनांत आणण्याचा महाप्रयत्न करणाऱ्या या जीवननिष्ठ सेवकाचें चरित्र लिहावें अशी उत्कट इच्छा मनांत प्रादुर्भूत झाली. मी त्यांची परवानगी मागितली. परंतु त्यांनीं दिली नाहीं. त्यांचें जीवन महाराष्ट्राच्या राजकारणाशीं एकरूप झालें असल्यामुळें त्यांचें विभक्त चरित्र लिहिणें त्यांना अयोग्य वाटतें. ते म्हणाले, 'महाराष्ट्र आजच्या स्थितीला पोहोंचला आहे त्याला मी एकटा कारण नसून तो शेंकडों मूक, श्रद्धाशील, सेवापरायण कार्यकर्त्यांच्या तपस्येचा प्रभाव आहे. तेव्हां चरित्र लिहावयाचें तर सर्वांचेंच लिहा'."

शंकररावांनीं व्यक्त केलेलें हें मत प्रांजळ व वास्तविक आहे. तें एक ऐतिहासिक सत्य आहे. सत्याग्रह-युगाच्या पहिल्या पर्वाची आठवण झाली कीं शंकररावांच्या बरोबरच त्यांच्या जोडीनें कार्य करणाऱ्या महाराष्ट्रांतील प्रमुख सेवकांचें स्मरण होतें. महाराष्ट्र

म्हणजे कार्यकर्त्यांचे एक मोहोळ आहे असें गांधीजी म्हणत. ब्रिटिश लष्करांत जाट, पंजाबी, गुरखा वगैरेंनीं आपल्या विशिष्ट पराक्रमानें जसें नांव कमावलें होतें त्याप्रमाणेंच आधुनिक भारताच्या स्वातंत्र्ययुद्धांत महाराष्ट्रानें एक स्वतंत्र स्थान मिळविलें होतें. महाराष्ट्रांतील देशसेवकांनीं कांहीं विशिष्ट गुण परंपरेनें प्रयत्नपूर्वक जोपासलेले आहेत. महाराष्ट्रांतील सेवकांना श्रमाचें व कष्टाचें कधींच वावडें नाहीं; शेंडी तुटो कीं पारंबी तुटो या जातीचा हट्टीपणा त्यांच्यांत आढळतो. अपयशानें ते चटकन् निराश होत नाहींत. मानानें व पैशानें ते बधत नाहींत. अंगीकारलेलें व्रत कितीहि खडतर असो ते पार पाडावें, त्यासाठीं मुकाट्यानें हाल सोसावे, व्यक्तिगत नफ्या-नुकसानीचा विचार स्वतःला शिवूं देवूं नये. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे यतिवृत्ति स्वीकारून राजकीय संन्यासी बनावें अशी ही परंपरा होती. महाराष्ट्राला कांहीं ईश्वरदत्त कार्य बजावावयाचें आहे, महाराष्ट्राचें "आनंदवन-भुवन" बनवावयाचें आहे अशी महाराष्ट्रांतील या देशसेवकांची श्रद्धा होती. रामदासांपासून चालत आलेला व टिळक, राजवाडे प्रभृतींनीं पुनरुज्जीवित केलेला राष्ट्रवादाचा हा एक खास पर्याय आहे. "महाराष्ट्र मेला तरी राष्ट्र मेलें। मराठ्यांविणा राष्ट्रगाडा न चाले।।" या सेनापति बापटांच्या वचनांतील भाव या ना त्या रूपानें या मंडळींच्या मनामध्यें तरळत असलेला दिले. या विचारामागें असलेली परंपरा लक्षांत ठेवणें फार आवश्यक आहे. नाहींतर हा एक संकुचित प्रांतीयवाद ठरेल. त्याचा आज कोणीहि निषेधच करील. पण या विचारांतील गर्भितार्थ एकराष्ट्रीयत्वभावनेशींच नव्हे तर विश्वबंधुत्ववादाशींहि अविरोधी आहे असें सेनापति व शंकरराव छातीवर हात ठेवून सांगतील. या सेवकांपैकीं कांहींचा प्रथम सशस्त्र क्रांतीच्या मार्गाकडे ओढा होता. पण पुढें यांपैकीं बहुतेकांनीं म. गांधींचें नेतृत्व स्वीकारावें हें स्वाभाविक होतें. म. गांधींच्या सत्याग्रही मार्गाला आवश्यक असणारी नैतिक भूमिका या मंडळींमध्यें बऱ्याच प्रमाणांत तयार होती. ही परंपरा अनेक कारणांमुळें महाराष्ट्रांतहि अलीकडे लोप पावत असलेली दिसते. पण गांधीयुगाच्या प्रारंभीं ही परंपरा चालविणारे अनेक कार्यकर्ते महाराष्ट्रांत होते.

**राजकीय नेतृत्वाचा पिंड**

तीस सालच्या विलपार्ले येथील सत्याग्रही-शिबिरांत मी शंकररावांना प्रथम भेटलों. दोन वर्षांची शिक्षा भोगून ते नुकतेच बाहेर आले होते. योगी अरविंदांप्रमाणें लांब केस व दाढी वाढलेली, शुभ्र खादी परिधान केलेली, मी त्यावेळीं पाहिलेली त्यांचीं मूर्ति, आजहि मला चांगली आठवते. राजकीय नेतृत्व व योगसाधना हीं दोन्हीं साधण्यासाठीं त्यांची धडपड तेव्हांपासून व्यक्त होत होती. त्या दिवसांचें स्मरण झालें कीं शंकररावांबरोबरच महाराष्ट्रांतील कांहीं थोर व्यक्ती डोळ्यांसमोर उभ्या राहतात. उदा. सेनापति बापट, दास्ताने, हरिभाऊ फाटक, वाळूकाका कानिटकर, विनायकराव भुस्कुटे, शंकरराव ठकार, अण्णासाहेव सहस्रबुद्धे, अप्पासाहेब पटवर्धन, भाऊसाहेब रानडे, आचार्य जावडेकर, आचार्य भागवत, नाथ धाणेकर, दादा चौधरी, आपटे गुरुजी वगैरे. या सर्वांमध्यें कांहीं गुण समान आहेत. स्वातंत्र्ययुद्धांत महाराष्ट्रीय बाणा ज्यांनीं दाखविला त्यांमध्यें या वीरपुरुषांची गणना आहे. साने गुरुजी, एस्.एम्. जोशी, शिरूभाऊ लिमये प्रभृति तीस सालीं आलेली मंडळी याच परंपरेंत बसतात. यांपैकीं सेनापति, दास्ताने व हरिभाऊ फाटक शंकररावांच्या आधींच्या पिढीचे, टिळकांपासून प्रत्यक्ष स्फूर्ति घेतलेले होते. शंकररावांच्या समकालीनांपैकीं अप्पासाहेब पटवर्धन व अण्णासाहेब सहस्त्रबुद्धे सेवकवृत्तीचे व विधायक कार्याला वाहून घेणारे, तर आचार्य भागवत, दादा चौधरी, आपटे गुरुजी प्रभृति राष्ट्रीय शिक्षणाला वाहून घेतलेले होते. शंकरराव मात्र प्रामुख्यानें राजकीय पक्ष-संघटनेच्या कार्यात रस घेणारे होते. राजकीय मतप्रचार व पक्ष-संघटना हाच त्यांचा आवडता व्यवसाय व बाणा होता, असें म्हणतां येईल. राजकीय नेतृत्व त्यांच्या पिंडांतच आहे. त्यामुळें गांधीजींचे नेतृत्व मान्य करणारा काँग्रेसपक्ष महाराष्ट्रांत निर्माण करणें हें आपलें ध्येय आहे अशी प्रथमपासून त्यांनीं आपल्या मनाशीं खूणगांठ बांधली होती. त्यांनीं त्या दृष्टीनें साक्षेपानें अहर्निश प्रयत्नहि केले. ३६ सालीं फैजपूरचें यशस्वी झालेलें काँग्रेसचें ऐतिहासिक अधिवेशन, ३७ च्या सार्वत्रिक निवडणुकींत काँग्रेसला महाराष्ट्रांत मिळालेलें घवघवीत यश व महाराष्ट्राचे प्रतिनिधि म्हणून काँग्रेस वर्किंग कमिटीमध्यें शंकररावांची झालेली नेमणूक, त्यांच्या यशाची ग्वाही देतील. शंकररावांच्या राजकीय जीवनांतील यशाचें हें शिखर होतें असें म्हटलें तर चूक होणार नाहीं. म्युनिसिपालिटीच्या रस्त्यावरील दिव्याखालीं अभ्यास करणाऱ्या दरिद्री पण होतकरू विद्यार्थ्यानें पुढें बहुमानाच्या सरकारी हुद्याची जागा मिळविल्याच्या किंवा फेरीवाला म्हणून कापड चोपड विकणारा एखादा नवकोट नारायण झाल्याच्या कथाहि आपण वाचतों. शंकररावांनीं राजकीय जीवनाच्या पहिल्या पंधरावीस वर्षांत मिळविलेलें यश इतकेंच विस्मयकारक व नेत्रदीपक होतें. मुळशी सत्याग्रहांत येरवड्याच्या कारागृहांत असतांना एकादशीचें उपोषण केल्याबद्दल हूं का चूं न करतां तीस फटके खाणाऱ्या शंकररावांनीं, लोखंडाचे चणे खाऊन व त्याच बाण्यानें कष्ट करून राजकीय नेतृत्व मिळविलें होतें. पण हें नेतृत्व व्यक्तिगत





नसून, महात्मा गांधी किंवा सरदार पटेल यांचे सुभेदार किंवा दुय्यम सहकारी म्हणून त्यांना प्राप्त झालें होतें. 'गीतारहस्या'सारखा ग्रंथ त्यांनीं रचला नाहीं. नामदार गोखल्यांसारखीं अर्थप्रचुर इंग्रजीं भाषणें त्यांनीं केलीं नाहींत. जाड्याभरड्या खादीची लुंगी परिधान करण्यांत त्यांना कमीपणा वाटला नाहीं. म. गांधींचें नेतृत्व परप्रांतीयाचें, अतएव महाराष्ट्राच्या अस्मितेला कमीपणा आणणारें आहे हा विचार त्यांच्या मनाला कधीं शिवला नाहीं. म्हणून महाराष्ट्रांतील मध्यमवर्गीयांनीं व सुशिक्षितांनीं त्यांची किती उपेक्षा व टवाळी केली आहे याची फारच थोड्यांना कल्पना असेल. त्यांच्या ऐन भरभराटीच्या काळांत देखील पुण्यांत रस्त्यांतून चालतांना 'कष्ट करा, कष्ट करा' म्हणून आरोळ्या देऊन त्यांची टवाळी केल्याचीं उदाहरणें घडलीं आहेत. पण अशा उथळ लोकनिंदेला त्यांनीं कधींच भीक घातली नाहीं. राजकीय नेतृत्वाला लागणारा आत्मविश्वास इतक्या भरपूर प्रमाणांत त्यांच्याजवळ आहे कीं लोकनिंदेची किंवा विरोधाची त्यांना कधीं पर्वा वाटत नाहीं.

फैजपूर-काँग्रेसनंतर श्री. केशवराव जेधे महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमेटीचे अध्यक्ष झाले. काँग्रेसपक्षाचें महाराष्ट्रांतलें नेतृत्व श्री. शंकरराव, श्री. केशवराव जेधे व श्री. काकासाहेब गाडगीळ या त्रिमूर्तीकडे आहे ही वस्तुस्थिति शंकररावांनीं निमूटपणें मान्य केली. राजकीय पक्षसंघटनेला लागणारें व्यवहारज्ञान मुंबईच्या श्री. स.का. पाटीलांइतकेंच शंकररावांना प्रथमपासून अवगत आहे. व्यक्तिनिष्ठ कडकडीत आचरण व राजकीय व्यवहारशास्त्र यांची सांगड घालण्याची कला त्यांना अवगत आहे म्हणूनच ते काँग्रेसपक्षाचें राजकीय नेतृत्व करूं शकलें. काँग्रेस वर्किंग-कमिटीवर महाराष्ट्राचे प्रतिनिधि म्हणून त्यांची नेमणूक झाल्यापासून त्यांना अखिल भारतीय स्थान प्राप्त झालें. त्यामुळें प्रांताचें नेतृत्व श्री. केशवराव जेधे व काकासाहेब गाडगीळ यांना बरोबरीचें स्थान देऊन करणें त्यांना अवघड वाटलें नाहीं.

### श्री. शंकरराव व काँग्रेस समाजवादी

३७ सालच्या अधिकार स्वीकारानंतर विधिमंडळांतील कामकाजाचें महत्त्व वाढूं लागलें. त्यामुळें विधायक कार्य व विधिमंडळांतील कार्य असें काँग्रेसकार्याचे दोन विभाग पडले. विधिमंडळांतील कामकाज दुय्यम समजलें जावें व विधायक कार्याचें नैतिक श्रेष्ठत्व मान्य केलें जावें असा देशभर प्रयत्न झाला. म. गांधी विधायक कार्याचें नेतृत्व करीत असल्यामुळें अधिकारस्वीकाराच्या पहिल्या कालखंडांत म्हणजे १९३८ ते १९४० या कालखंडात, हा प्रयोग बऱ्याच प्रमाणांत यशस्वी झाला. अधिकारस्वीकारल्यामुळे काँग्रेसच्या कार्यपद्धतीवर कांहीं मर्यादा निर्माण व्हाव्यात हें अपरिहार्य होतें. सरदार वल्लभभाई पटेल यांच्याकडे काँग्रेसच्या विधिमंडळांतील कार्याचें नेतृत्व होतें व काँग्रेस संघटनेचेहि तेच खरे सूत्रधार होते. यामुळें विधिमंडळांतील काँग्रेसकार्य दुय्यम न राहतां त्याच कार्याला प्रधान स्थान प्राप्त होऊं लागलें. राजकारणाचा मध्यबिंदु विधिमंडळाच्या कामाकडे सरकूं लागला. ही गोष्ट काँग्रेससंघटनेबाहेर असलेल्या गांधीवादी विधायक सेवकांना खटकूं लागली. काँग्रेसमध्यें नांवारूपाला आलेल्या कॉं. समाजवादी पक्षालाहि ही गोष्ट नापसंत होती. फैजपूरच्या ग्रामीण काँग्रेसचा प्रयोग करतांना महाराष्ट्रांतील काँग्रेसची अवघी शक्ति एकत्र आणण्याचा शंकररावांनीं प्रयत्न केला होता. फैजपूर काँग्रेसला मिळालेलें यश हें या प्रयोगाचेंच फळ होतें. काँग्रेस-संघटनेमध्यें नवा स्थापन झालेला कॉं. समाजवादी पक्ष अल्पसंख्यांक होता. पंडित नेहरूंनीं या पक्षाच्या कार्याला नैतिक पाठिंबा दिला होता. स्वातंत्र्ययुद्धांत गांधीवादी व समाजवादी यांनीं एकजुटीनें कार्य करावें असा दोघांचाहि हेतु होता. पण दैनंदिन राजकारणांत संघटनेच्या दृष्टीनें या दोन विचारांची सांगड घालणें, म्हणजे या उभयतांचें कार्य परस्परपूरक बनवणें सोपें नव्हतें. कॉं. समाजवादी पक्षाचें कार्य जसजसें वाढूं लागलें तसतसें काँग्रेस-संघटनेमध्यें संघर्ष वाढूं लागला. ३७ च्या सार्वत्रिक निवडणुकींत जुन्या ब्राह्मणेतर पक्षाचा पराभव झाला होता. या पक्षांतील अनेक होतकरू तरुण काँग्रेसच्या प्रभावानें व केशवरावजींच्या नेतृत्वानें प्रभावित होऊन काँग्रेसमध्यें आले होते. त्यांची पाळेंमुळें काँग्रेसमध्यें रुजलेलीं नव्हतीं. याचवेळीं काँग्रेस समाजवादी पक्षाचेंहि महत्त्व वाढूं लागल्यामुळें पक्ष म्हणून काँग्रेस-संघटनेंत त्यांना कसें नांदवावें ह्यालाहि उत्तर सांपडलेलें नव्हतें. ही परिस्थिति कमीअधिक प्रमाणांत सर्वच प्रांतांत होती, पण महाराष्ट्रांत ती विशेष कठीण होती. हिंदुसभा, ब्राह्मणेतरपक्ष, डॉ. आंबेडकरांची शे. का. फेडरेशन व कम्यूनिस्ट पक्ष ३७ च्या निवडणुकीमध्यें अयशस्वी झाले असले तरी या चारहि पक्षांचें केंद्र, नेतृत्व व संघटना प्रामुख्यानें महाराष्ट्रांत होती व त्यांचें प्रचारकार्य चालू होतें. या सर्व विरोधांना तोंड देण्यासाठीं काँग्रेसची संघटना बलशाली करणें आवश्यक होतें. त्यामुळें काँग्रेस समाजवादी पक्षासारख्या काँग्रेस-अंतर्गत संघटनेला नांदवून घेणें काँग्रेसनेत्यांना कठीण वाटलें असलें तर आश्चर्य नाहीं. यामुळेंच कॉं. वर्किंग कमिटीमध्येंहि पंडित नेहरू व सरदार पटेल असे दोन गट निर्माण झाले. काँग्रेस-संघटनेच्या बाहेर असलेल्या विधायक कार्यकर्त्यांना या मतभेदाची गंभीरता विशेष भासमान झाली नाहीं. पंडित नेहरू स्वतः कॉं. समाजवादी पक्षाचे कधीं सभासद नव्हते व कॉं. समाजवादी पक्षाची कार्यपद्धति

त्यांना पूर्णपणें मान्य नव्हती. तरी ही शक्ति काँग्रेसमध्येंच राहावी असा त्यांचा आग्रह होता. या संघर्षात काँग्रेस-संघटनेची जबाबदारी वाहणाऱ्या शंकररावांसारख्या गांधीवादी कार्यकर्त्यांवर विशेषच जबाबदारी येऊन पडली.

आचार्य जावडेकर यांनीं या कालखंडांत महत्त्वाची कामगिरी बजावलेली आहे. गांधीवादाचे भाष्यकार म्हणून त्यांची कीर्ति झाली. याच सुमारास काँग्रेसचें मुखपत्र असलेल्या 'लोकशक्ती'चे ते संपादक झाले. गांधीवाद आधुनिक पद्धतीनें समजावून सांगण्यासाठीं त्यांनीं ग्रंथरचना केली. आचार्य जावडेकर व आचार्य भागवत यांचा शंकररावांशीं घनिष्ट स्नेह होता. काँग्रेस-संघटनेचे आचार्य जावडेकर सैद्धान्तिक मार्गदर्शक बनले. आचार्य जावडेकरांचा समाजशास्त्राचा अभ्यास सखोल असल्यामुळें काँग्रेसअंतर्गत समाजवादी संघटनेचें त्यांनीं स्वागत केलें. काँग्रेसमधील गांधीवादी व समाजवादी यांना परस्परपूरक मानले पाहिजे ही पं. नेहरूंची वृत्ति आचार्यांना मान्य होती. शंकररावांना या दोन आचार्यांबद्दल अत्यंत स्नेहादर होता व ते त्यांच्याशी सैद्धान्तिक विचारविनिमय वरचेवर करीत. पण काँ. संघटना शक्तिशाली व प्रभावी करावयाची असेल तर ती एकमुखी असली पाहिजे असें त्यांना वाटत होतें. म्हणून सरदार वल्लभभाई पटेल यांचें नेतृत्व त्यांनीं पूर्णपणें मान्य केलें होतें. समाजवादी पक्षाचें प्रस्थ वाढावें हें त्यांना मुळींच मान्य नव्हतें. त्यामुळें काँग्रेसच्या दैनंदिन राजकारणांत ते अधिकारवादी बनले व सरदारसाहेबांचें अनुकरण करूं लागले. फैजपूरला स्वीकारलेलें सर्वसंग्राहक धोरण सोडून ते पक्षनिष्ठ बनले. ४२ च्या 'चले जाव' आंदोलनानंतर नगर किल्ल्यांतील स्थानबद्धतेंतून ते बाहेर आले तेव्हांपासून तर ही त्यांची भूमिका ते अभिनिवेशानें स्पष्टपणें मांडू लागले. काँग्रेसचें नेतृत्व एकमुखी असलें पाहिजे; एक कार्यक्रम, एक नेता, एक पक्ष ही त्यांची घोषणा बनली. सरदार पटेल, आचार्य कृपलानी व शंकरराव यांचें याबाबत एकमत झालें होतें. काँग्रेसअंतर्गत उपपक्ष काँग्रेसची शक्ति खच्ची करीत आहेत अशी त्यांची प्रामाणिक समजूत होती. पंडित नेहरूंची कार्यपद्धति व विचारधारा त्यांना कधींच पसंत नव्हती. आचार्य जावडेकरप्रभृतींचें मतहि त्यांना अमान्य वाटूं लागलें. भूमिगत समाजवादी नेत्यांचा झालेला बोलबाला त्यांना रुचला नाहीं. याच कालांत घटनासमितीवर त्यांची निवडणूक झाली व ते काँग्रेसचे सरचिटणीसहि झाले. यानंतर दोनतीन वर्षे त्यांचें वास्तव्य व मुख्य कचेरी दिल्लीला होती. महाराष्ट्रांतील सेवादलसंघटना समाजवादी बनत आहे, अतएव तिचें कडक नियंत्रण केलें पाहिजे असें धोरण त्यांनी नक्की केलें व त्यासाठीं श्री. एस्.एम्. जोशी प्रभृति सेवादल नेत्यांशीं दोन हात करण्यास त्यांना खंत वाटली नाहीं. पुढें आचार्य कृपलानींनीं काँग्रेसचें अध्यक्षपद सोडल्यानंतर त्यांचे जागीं आचार्य नरेंद्र देव यांची निवड व्हावी म्हणून महात्मा गांधींनीं केलेल्या सूचनेला विरोध करण्यांत शंकररावहि होते. अल्पमतवाल्या गटाचा प्रतिनिधी बहुमतवाल्यांवर लादणें लोकशाहीला सोडून आहे असें त्यांचें मत होतें. बऱ्याच प्रांतांच्या काँग्रेसच्या मुख्य प्रधानांचेंहि हेंच मत होतें. त्यानंतर पुढें काँग्रेस संस्थेचें विसर्जन करून तिला लोकसेवासंघ बनवावे या म. गांधींनीं केलेल्या सूचनेलाहि शंकररावांचा विरोध होता.

### अधिकाररूढ पक्ष व विधायक कार्यकर्त्यांची नैतिक शक्ति

भारतांत लोकशाही सुस्थिर व्हावयाची तर काँग्रेसला तुल्यबल असा एखादा दुसरा लोकशाही पक्ष देशांत निर्माण झाला पाहिजे असे अनेक पंडितांचें व समाजवाद्यांचें मत आहे. शंकररावांची या संबंधींची भूमिका अगदीं निराळीं आहे. दोन तुल्यबल पक्ष असल्याशिवाय लोकशाहीचा प्रयोग यशस्वी होणार नाहीं हा विचार त्यांना मान्य नाहीं. हिंदुस्थानच्या विशिष्ट परिस्थितींत दोन तुल्यबळ पक्ष कदाचित् निर्माणहि करतां येणार नाहींत असें त्यांना वाटतें. म्हणून काँग्रेस हा एकच पक्ष राहिला तरी चिन्ता करण्याचें कारण नाहीं, या पक्षाला नैतिक अंकुश लावणारी शक्ति निर्माण करण्यावर भर दिला म्हणजे झाले. विधायक कार्यांतून निर्माण होणारी नैतिक शक्ति राजसत्ता उपभोगणाऱ्या पक्षाचें नियंत्रण करील तेव्हांच लोकशाही यशस्वी होईल असा त्यांचा सिद्धान्त आहे. विधायक कार्यातून निर्माण होणाऱ्या नैतिक शक्तीचा एका परिमित मर्यादेबाहेर राजसत्तेवर अंकुश रहात नाहीं असा अनुभव आज अधिकारस्वीकारानंतर येत आहे. पण त्या अनुभवाला शंकरराव फारशी किंमत देत नाहींत. दुसरा राजकीय पक्ष स्थापन करण्यापेक्षां विधायक कार्याचें तेज प्रभावी करण्यानेंच लोकशाहींतील दोष नाहींसे करतां येतील अशी त्यांची श्रद्धा आहे.

म्हणजे १९३८ ते १९४८ या कालखंडांत ते अधिकारवादी बनले होते व सरदार वल्लभभाई पटेलांचें नेतृत्व त्यांनीं मान्य केलें होतें असें दिसेल. हें त्यांचें धोरण अप्रिय वाटलें तरी तें प्रामाणिक होतें हें विसरतां कामा नये. कोणताहि वैयक्तिक स्वार्थ वा मानाची जागा त्यांना हवी असती तर ती त्यांना सहज मिळवितां आली असती. आज ते काँग्रेसचे अध्यक्ष झाले असते किंवा एखाद्या प्रांताचें गव्हर्नर होऊं शकले असते. पण मुंबईसह संयुक्तमहाराष्ट्राचा आग्रह धरून त्यांनीं सरदार पटेल यांची इतराजी स्वीकारली. पुढें आपल्या हिंमतीवर काँग्रेसच्या अध्यक्षपदासाठीं

उभें राहून त्यांनीं निवडणूक लढविली. आचार्य कृपलानी व शंकरराव हे दोघेहि कट्टर गांधीवादी व सरदार पटेल यांचें एका काळचे विश्वस्त सहकारी होते. कृपलानी, शंकरराव व टंडन असा तिरंगी सामना होता. ही निवडणूक शंकरराव न लढते तर अधिक बरें झालें असतें असें त्यांच्या मित्रांना व हितचिंतकांना आजहि वाटतें. या निवडणुकींतील अपजयानंतर शंकररावांनीं काँग्रेस संस्थेतून आपलें अंग काढून घेतलें. नंतर सर्वोदयवादी पक्षसंघटना उभीं करण्याचा त्यांनीं कांहीं दिवस प्रयत्न केला पण तो यशस्वी झाला नाहीं. सर्व-सेवा-संघाचें पुढें ते मंत्री झाले. १९५२ पासून त्यांनीं स्वतःला भूदान-आंदोलनाला वाहून घेतलें आहे. गेलीं दोन वर्षे भूदानासाठीं ते देशभर पदयात्रा करीत आहेत.

### एकाकी आणि अनिकेत

गेल्या वर्षी मी त्यांना दिल्लींत भेंटलों त्यावेळीं मलेरियाच्या तापांतून ते नुकतेच उठले होते. त्यांची कंबर धरली होती. डोळे दुखत होते. ते क्षीणहि झाले होते. ‘अशा रोगग्रस्त स्थितींत भूदानासाठीं कां फिरतां, विश्रांति कां घेत नाहीं?’ असें मी त्यांना विचारलें. ते हंसले! मला त्यांचा भावार्थ कळला. ‘शारीरिक सुखदुःखाची पर्वा करणारा मी संसारी माणूस नाहीं, मी ध्येयनिष्ठ कर्मयोगी आहे’ असें जणूं त्यांना मला सांगावयाचें होतें!

शंकररावांच्यामध्यें असलेली ही खंबीर ध्येयनिष्ठा, कार्यप्रवणता व कष्ट करण्याची शक्ति आदर्श आहे. बाहेरून ते राकट व ओबडधोबड दिसले तरी त्यांचें अंतःकरण स्नेहपूर्ण व मैत्रीसाठीं आसुसलेलें आहे. असें असून त्यांच्या वांट्याला आलेली लोकप्रियता इतकी परिमित कां असावी याचें मला आश्चर्य वाटतें. आज सासवडचा आश्रम सोडला तर ते अनिकेत आहेत. पुण्यामध्यें स्वतःचा असा एखादा आश्रम किंवा राहण्याचें स्थानदेखील त्यांना नाहीं. त्यांच्याभोवतीं जिवाभावाचे कोणी मित्र दिसत नाहींत. तीन तपें खडतर सेवा करूनहि ते अगदीं एकाकी राहिले आहेत. पण अजून मनोमनीं संयुक्तमहाराष्ट्राचीं ते स्वप्नें पहातात व ‘आपण ह्या संयुक्तमहाराष्ट्राचें विनयाधान करूं’ अशी त्यांना महत्त्वाकांक्षा आहे. या सात्त्विक महत्त्वाकांक्षेमुळेंच निवृत्तीची किंवा संन्यासाची भाषा त्यांच्या तोडांत येत नाहीं. ‘नवभारता’सारखें मासिक असो, भूमिसमस्येचें संशोधनकार्य असो, कोरगांवकरट्रस्टच्या कामाचा विचार असो, अशीं अनेकविध कामें उभीं करण्याची त्यांना अजून उमेद आहे व त्यासाठीं ते अहर्निश कष्ट करीत आहेत.

### एक संवाद

लौकिक यश त्यांच्या वांट्याला आलें नसलें तरी आपल्या पूर्वीच्या धोरणाच्या किंवा कार्यपद्धतीच्या योग्यायोग्यतेसंबंधीं संशय त्यांच्या मनाला कधीं शिवला असेल असें वाटत नाहीं. भूदानकार्याचा प्रारंभ करून गांधीवादांतील क्रांतिकारी शक्ति विनोबाजी प्रगट करतील असें जणूं आपल्या तर्कशास्त्राने आपल्याला पूर्वीच समजलें होतें अशा आविर्भावानें ते नेहमीं बोलतात. श्री. जयप्रकाश नारायण विनोबाजींना येऊन मिळाले यांत आचार्य जावडेकरांची भविष्यवाणी खरी ठरली आहे असें मी त्यांना एकदां म्हणालों. लगेच त्यांनीं आपला मतभेद जाहीर केला. ते म्हणाले “गांधीवाद्यांनीं समाजवादी पक्ष आपली राजकीय फळी मानावी असें आचार्यांचे मत होतें. पण याच्या अगदीं उलट झालें आहे. समाजवाद्यांना नम्रपणें गांधीवादी विनोबांचे नेतृत्व मान्य करावें लागलें आहे”. शंकररावांच्या तर्कशास्त्राचा, वक्तृत्वाचा व मनोभूमिकेची साक्ष देणारा हा एक मासलेवाईक संवाद आहे. स्वतःचें धोरण प्रथमपासून अचूक व तर्कशुद्ध होतें अशी त्यांची आजहि बालंबाल खात्री आहे. शंकररावांच्या या तर्कपद्धतीमुळें त्यांच्याबद्दल तरुण मंडळींत अनेक वेळां गैरसमज निर्माण होतो. गेल्या महिन्यांत ठाणें जिल्ह्यात भूदानाच्या पदयात्रेंत एका विद्यार्थ्यानें त्यांना विचारलें, “पदयात्रेंत विनोबाजींची काय दिनचर्या असते?” शंकररावांनीं त्याला उत्तर दिलें : “त्यांच्या पदयात्रेंत त्यांच्याबरोबर मी कधीं गेलो नाहीं. तेव्हां मला त्यांचा कार्यक्रम काय असतो हें माहीत नाहीं”. हें उत्तर साधे आहे व त्यांनीं तें सहज दिलें. पण त्यामुळें ऐकणाऱ्याचें काय मत झालें असेल? असें प्रकार नेहमीं घडतात. त्यामुळें नवीन विचारांची तरुण मंडळी त्यांच्या फार जवळ जात नाहींत.

महाराष्ट्राचें नेतृत्व खऱ्या अर्थानें त्यांना कधीं प्राप्त झालें नसलें, महाराष्ट्रामध्यें समाजकार्याचा किंवा विधायक कामाचा एखादा नवीन संप्रदाय स्थापन करतां आला नसला, तरुण कार्यकर्ते भोवताली निर्माण करण्यांत त्यांना यश आलें नसलें तरी एक साधक, समाजसेवक व ध्येयनिष्ठ म्हणून त्यांनीं घालून दिलेला आदर्श अनुकरणीय आहे असेंच कोणीहि म्हणेल. शंकररावजींना दीर्घ आयुरारोग्य चिंतून संयुक्तमहाराष्ट्राचें शिल्पकार बनण्याचें व महाराष्ट्रांतील सांस्कृतिक विषमता नष्ट करण्याच्या कामीं परिणामकारक मार्गदर्शक बनण्याचें श्रेय त्यांना लाभो अशी प्रार्थना करतों.

✠ ✠ ✠








# श्री. शंकररावांची अध्यात्माची भूमिका

अप्पा पटवर्धन

श्री. शंकररावजी देव यांच्या सार्वजनिक जीवनाची सुरुवात (आमच्या माहितीप्रमाणे) १९१८ सालीं चंपारण्यांत गांधीजींच्या निमंत्रणावरून ते ग्रामसेवा करण्यासाठीं गेले तेथपासून झाली. तेव्हांपासून आज सदतीस वर्षामध्ये त्यांचें खाजगी जीवन असें राहिलेलेंच नाहीं. त्यांचें सारें जीवनच उघडें व सार्वजनिक स्वरूपांत चालत आलेलें आहे. एकदां मी त्यांचें तोंडूनच ऐकलें कीं, "आजवर माझा एकहि जाहीर कार्यक्रम खाजगी कारणापायीं रहित करावा लागलेला नाहीं." ऐन तारुण्यांतहि नोकरी, विवाह इत्यादि कोणत्याहि मोहाचा किंचितहि लेप त्यांचे मनाला शिवलेला नाहीं. एवढ्या काळांत (तुरुंगवास वगळून) सतत महिना, पंधरा दिवस तरी ते एका ठिकाणीं राहिले असतील असेंहि वाटत नाहीं. सार्वजनिक कार्य इतक्या तन्मयतेनें करणारा त्यांच्या तोडीचा दुसरा पुढारी शोधून काढणें दूरापास्तच आहे.

**'रहाणारे येरवड्याचे'!**

ते साऱ्या भारतभर अनेकदां फिरलेले असले, अ.भा. कॉंग्रेसचे व सर्वसेवासंघाचे ते वर्षानुवर्षे सरचिटणीस राहिले असले, तरी त्यांचा पिंड अस्सल महाराष्ट्रीय आहे. त्या महाराष्ट्राची घडण करण्यांतच गेली त्यांनीं तीन तपें खर्च केलीं व तें त्यांचें कार्य पुढेंहि अखंड चालूं रहाणार आहे. साऱ्या महाराष्ट्राचा त्यांनीं जातीनें वारंवार परिचय करून घेतलेला आहे. महाराष्ट्राच्या अकरा जिल्ह्यांच्या शें-सवाशें तालुक्यांमध्यें एकहि असा तालुका नसेल कीं जेथें शंकरराव अनेकवार जाऊन आलेले नाहींत, जेथील प्रत्येक कार्यकर्त्याला ते ओळखीत नाहींत. सारे कार्यकर्ते त्यांच्याच देखरेखीखालीं वाढलेले आहेत. शंकररावांचें एक विशाल, महाराष्ट्रीय कुटुंब सहजासहजीं जुळलेलें आहे आणि वाढत आहे.

त्यांचें आजवरचें बहुतेक जीवन राजकारणाच्या आखाड्यांतच व्यतीत झालें. जें काम, जी चळवळ हातीं घ्यावयाची ती संपूर्ण तन्मयतेनें चालवावयाची हा साऱ्याच उत्कट देशसेवकांचा स्वभाव असतो, तसा तो शंकररावांचाहि आहे. तन्मयतेबरोबरच त्यांचेमध्यें दांडगा आत्मविश्वासहि आहे. अत्यंत प्रतिकूल अशा परिस्थितीशीं वारंवार टकरा देऊनच त्यांनीं कॉंग्रेसच्या व गांधीजींच्या नेतृत्वाची दृढ छाप उभ्या महाराष्ट्रावर पाडली व साऱ्या प्रतिगामी शक्तींना नामोहरम केलें. साऱ्या प्रांताचा असा कायापालट झाल्याचें उदाहरण भारताच्या आधुनिक इतिहासांत अन्यत्र क्वचितच आढळेल. १९३० सालीं मिठाच्या सत्याग्रहाचें नगारे वाजूं लागले. त्यावेळीं ते नुकतेच दीडदोन वर्षे येरवड्याच्या तुरुंगांत काढून बाहेर आले होते. परंतु क्षणाचीहि विश्रांति न घेतां ते सत्याग्रहींची नोंद करीत महाराष्ट्रभर फिरत सुटले. त्यावेळीं सावंतवाडीच्या सभेमध्यें त्यांचा परिचय देतांना मी म्हटलें होतें कीं "ते रहाणारे येरवड्याचे. तूर्त फेरफटक्यापुरते आपलेमध्यें आलेले आहेत"! तें ऐकून तेहि हंसले! ते स्मित करतात पण त्यांना खदखदां हंसतांना पाहिल्याचें मला तरी स्मरण ताणूनहि आठवत नाहीं. हास्यापेक्षां ध्यास हाच त्यांच्या जीवनाचा स्थायीभाव म्हणावा लागेल. दैनिक प्रार्थनेबद्दल त्यांना प्रेम आहे पण त्यातील संगीतांत ते रंगून गेल्याची मला जाणीव नाहीं. एकदां खेळांत दंग होऊन पायाला दुखापत करून घेतल्याचा बोभाटा झाला होता खरा, पण तो खेळाचा प्रसंग विनसरावाचाच असावा; म्हणूनच पाय दुखावला! कसलें तरी प्रचारकार्य, चर्चा, वादविवाद, वक्तृत्व किंवा लेखनवाचन यांव्यतिरिक्त कशांत रंगलेले किंवा दंग झालेले ते आढळणार नाहींत.

**अध्यात्माचा पिंड**

त्यांचीं ऐन उमेदीचीं पंचवीसतीस वर्षे धकाधकीच्या राजकारणांतच खर्च झालीं हें खरें असलें तरी त्यांचा पिंड मात्र राजकारणाचा नव्हे. तो अध्यात्माचा आहे. राजकारणाच्या ऐन धुमश्चक्रीमध्येंहि सर्वसंगनिवृत्त होण्याची भावना त्यांच्यामध्यें उचंबळून येत असल्याचें त्यांच्या परिचित मंडळींना माहीत आहे. बाहेरून लढाऊ, चढाऊ कार्यक्रमांत गुंतलेले असतांनाहि आंतून त्यांचे खोल आत्मनिरीक्षण चालूंच असतें. धार्मिक वाङ्मय व तत्त्वज्ञान यांजकडे त्यांच्या मनाची सतत ओढ असते. टिळक, गांधी इतकीच त्यांच्या जीवनावर रामकृष्ण, अरविन्दांचीहि छाप पडलेली आहे. "मी विलायतेंत गेलों तरी माझें मूळ महाराष्ट्रांतच गुंतलेलें राहील" असें ते एकदां आपल्या सत्कारप्रसंगीं बोलले होते. त्यांत थोडा फरक करून आपण म्हणूं शकतों कीं ते ऐहिक चळवळीमध्येंच मग्न दिसत असले तरी त्यांची आद्य

अनुक्रमणिका






भूमिका पारलौकिकच आहे. आणि मला हें विशेष स्पष्टपणें तेव्हां जाणवलें, जेव्हां भूदानयज्ञाची भूमिका समजावून देतांना एकदां ते म्हणाले "मनुष्यजीवनाच्या सफलतेसाठीं धर्माची योजना नसून धर्मपालनासाठीं मानवी जीवनाची योजना आहे". ('आम्ही वैकुंठवासी आलों याची कारणासीं। बोलिलें जे ऋषी। साचभावें वर्ताया।।१।। तुकाराम)

**वास्तववादी**

परंतु शंकररावांचें वैशिष्ट्य हें आहे कीं ते अध्यात्मवादी आहेत तितकेच व्यवहारचतुर व वास्तववादीहि आहेत. आपल्याला कोठें पोंचायचें आहे हें जसें त्यांना कळलें आहे तसेंच आपण व आपल्या भोंवतालची मंडळीं कोठें आहो याचीहि त्यांना स्पष्ट जाणीव असते. माणसाची पारख – त्याची लायकी व वृत्ति यांची – ते चटकन् व अचूक करूं शकतात आणि न झेंपणाऱ्या, न पेलणाऱ्या ध्येयवादाच्या आहारी जात नाहींत. माझ्यासारख्याला तर कित्येकदां ते प्रमाणावाहेर वास्तववादी आहेत असेंहिं वाटतें.

असो, शंकररावांचे मी कितीहि गुणगान केलें तरी ते कोणी लोकोत्तर पुरुष आहेत असें मात्र मला म्हणावयाचें नाहीं. ते आम्हां-तुम्हां-सर्वसामान्य माणसांपैकींच आहेत. परंतु देशसेवेसाठीं पाहिजे असलेल्या साधनसंपत्तीचा त्यांचेपाशी सर्वांगपरिपूर्ण मिलाफ आहे. त्यांची शरीरयष्टीही मजबूत होती. अनेक वेळच्या खडतर तुरुंगवासांनाहि पुरून ती शाबूत राहिली. तथापि अलीकडे अलीकडेच त्यांची प्रकृति समाधानकारक रहात नाहीं. प्रकृतीतील हा विघाड त्वरित मागें पडून जावो. म्हणजें मग सर्वोदयी अखंड महाराष्ट्राच्या घडणीसाठीं श्री. शंकररावजी शतायुहि होऊ शकतील अशी उमेद वाळगण्यास हरकत नाहीं.

※ ※ ※

## शंकरराव देव यांचे काही अभ्यसनीय ग्रंथ

१. **साध्य आणि साधने**
२. **गांधीजी आणि लोकस्वराज्य**
३. **भारताची स्वराज्य-साधना**
४. **संयुक्त महाराष्ट्र** (आंदोलनविषयक कागदपत्रे व पत्रव्यवहार)
५. **दैव देते आणि कर्म नेते** (आत्मचरित्र)

---

शंकररावांनी प्रवर्तित केलेल्या संस्था व त्यांचे कार्य यासंबंधीचा मौलिक ग्रंथ –

**उच्चार्थसाधक शंकरराव**

भाऊ धर्माधिकारी

---

*प्राप्तिस्थान* : सासवड आश्रम विश्वस्त मंडळ, मु.पो. सासवड, जिल्हा पुणे.

अनुक्रमणिका

# भूदानयज्ञांतले अध्वर्यु

श्री.रा. टिकेकर

### 'अवघें राष्ट्रचि माझें घर'

"स्वसुखनिरभिलापः खिद्यसे लोकहेतोः" असें वर्णन सूर्यनारायणाचें किंवा राजपुरुपाचें करतात. आमचे श्री. शंकरराव देव चंडप्रतापी भास्कर नव्हेत अथवा मुकुटभारभृतांपैकीं त्यांची गणना नाहीं – तरी देखील त्यांना तें यथार्थतेनें लागूं पडतें. कारण त्यांचा प्रकृतिस्वभाव. स्वतःचा संसार असा नसतांना ते सदैव कार्यव्यग्र असतात; अखंड कर्मयोग त्यांनीं जसा काहीं आरंभिला आहे. मात्र तो संपूर्णतया संन्यासी वृत्तीनें. श्रीमदाचार्यांचा संन्यास व लोकमान्य टिळकांचा कर्मयोग यांचा मिलाफ श्री. शंकरराव देवांच्या जीवनांत झालेला आढळतो.

महाराष्ट्रांत लोकसेवारत त्यागी व निष्ठावंत असे ब्रह्मचारी अनेक आहेत. भारत-इतिहास-संशोधक मंडळाचे 'वहिश्चर'* प्राण असलेले महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार; नवीन समर्थ-विद्यालयाचे (जुने) प्रमुख पण सध्यां राष्ट्रसेवादलाचे 'वहिश्चर' प्राण भाऊ रानडे; कैवल्यधामाचे सूत्रवद्ध स्वामी कुवलयानंद इत्यादिकांशीं वागतांना आपणांस त्यांच्या कुटुंबीयांचीहि ओळख होतें. तसें श्री. शंकररावांचे वावतींत मात्र झालें नाहीं. त्यांच्या तोंडून स्वसंवंधीयांवद्दल, आपल्या घरच्या-दूरच्या नात्यागोत्यांवद्दल, उल्लेख वा विचार वाहेर पडल्याचें मला तरी ठाऊक नाहीं. जेव्हां पहावें तेव्हां शंकरराव कुठल्यातरी मोहिमेवर, कसल्या तरी चळवळीसाठीं – कोणत्या तरी महत्कार्याला वाहून घेतलेले असायचे. स्वतःचें घर ना दार, मग संसार कुठला! किंवहुना 'अवघें राष्ट्रचि माझें घर' अशा वृत्तीनेंच ते वागत आले आहेत, असें म्हणतां येतें.

### भूदानाकरितां भारतभर भ्रमन्ती

गेलीं तीनचार वर्षे त्यांचा भूदानयज्ञावावत दौरा चालूं आहे. तो या विधानास पुष्टि देणारा आहे. उंटाच्या पाठीवरून शेळ्या हांकण्याची रीत असलेल्या मारवाडांत; किंवा झोपडीच्या दारांतहि हत्ती झुलत असणाऱ्या आसामांत; (नवऱ्याच्या) डोकीवर मिरीं वाटण्याची 'सुलभ' योजना असलेल्या मलवारांत; उभ्या वर्षभरांत तीन तीन भरघोंस पिकें निघणाऱ्या सस्यशामल सुपीक प्रदेशांत – अथवा शेतकऱ्यांनीं सालभर राबूनहि अवघ्या दोनतीन महिन्यांपुरती जेमतेम गुजराण व्हावी असें पीक निघणाऱ्या खडकाळ निर्जल प्रदेशांत ते हिंडले. आमच्या 'घटनें'त नमूद नसलेल्याहि भाषा वोलणाऱ्या लोकांत त्यांनीं धडाक्यानें प्रचार केला. इतकी विविध प्रकारची त्यांची भ्रमन्ती असली तरी तिचें व त्यांचें ध्येय एकच होतें – भूदान! ज्या चळवळीसाठीं त्यांनीं मोहिमा काढल्या, त्या भूदानाचें त्यांनीं इतकें वेड लावून घेतलें आहे कीं प्रकृति ठीक नसतांहि, ते भटकत असतात. शरीरयंत्र कुरकुरत असलें तरी मन इतकें जबरदस्त कीं त्या कुरकुरण्याकडे लक्षच जात नाहीं. प्राचीन कालीन विद्यांच्या, रणपांडित्याच्या कांहीं कथा आपण ऐकतों, कीं कुणीं गर्भस्थ अर्भकानें म्हणे एखादी विद्या आत्मसात् केली, कुणाचें तर शिरविरहित शरीर तरवारीचे हात चालवीत राहिलें! तसें कांहीसें शंकररावांचें झाले आहे. लोकसमुदाय, मग तो सहस्त्रावधि-लक्षावधि नको, शतावधि अगर 'डझना'वधिहि असला तरी त्यांच्या ठिकाणीं सरस्वतीचा जसा कांहीं संचार होतो. भूदानाचें महत्त्व सांगून भू-'दान' मिळविण्यांत ते पटाईत झाले आहेत. तरीहि – भूदानयज्ञासाठीं ही "भिक्षा" नव्हे असें ते सुंदर रीतीनें पटवून देतात.

### 'सरस्वती'चा संचार

तामीळनाडूमधील अनुभव मला ठाऊक आहे. एका श्रीमंत गृहिणीनें त्यांना 'हस्तलिखित' मानपत्र दिलें. तेंच त्यांनीं सभेंत वाचून दाखविलें. मात्र त्यावर भाष्य फारच उत्कृष्ट केलें. प्रथमतः तें पत्र वाचून दाखविण्याचें प्रयोजन शंकररावांनीं असें सांगितलें कीं, "माझे मनोगत आणि आमच्या भूदान चळवळीचें वरोवर मर्म ओळखणारी ही पहिली तामीळ भगिनी आहे". इतकेंच नव्हे तर घरगुती दृष्टान्त देऊन त्या मानपत्राला त्यांनीं 'दही' म्हटलें आणि त्यांत "माझ्या पदरचें थोडें पाणी घालून त्याचें

[पूर्वप्रकाशन : *नवभारत*, वर्ष ८, अंक ५, फेब्रुवारी, १९५५.]

* वाहेर फिरणारे, हिंडणारे अशा अर्थीहि.








ताक करून" तुम्हां श्रोत्यांना "वाढणार" आहे असा निर्वाळा दिला.

एवढ्यानेंच भागलें असें नाहीं. त्या मानपत्रांत श्री. शंकररावांची साहजिकच थोडीशी स्तुति आली होती. "महात्माजींचे शिष्यवर" म्हणून संबोधन होतें – आणखीहि अशीं योग्य विशेषणें होतीं, तींहि ओघानेंच उच्चारित झालीं. हें तत्त्वनिष्ठ शंकररावांना पटलें नाहीं. म्हणून त्यांनीं खुलासा केला.

"आत्मस्तुति वाचून दाखविण्याचें पाप पत्करण्यास मी तयार झालों आहे. कारण या भगिनीनें तप करण्यास प्रवृत्त व्हावें म्हणून. तिला आमचें इंगित कळलें आहे पण तपाची जोड तिला अवश्य पाहिजे. स्पिरिट इज् स्ट्रॉंग – फ्लेश् इज् वीक्".

"बालादपि सुभाषितं ग्राह्यम्" या न्यायानें दोन-तीन प्रवचनांसाठीं श्री. शंकररावांनीं बालांचे सहज निघालेले उद्गार घेतले होते. एकच उदाहरण सांगतों. प्रसंग असा – शाळेंतील (हायस्कूल मधील) विद्यार्थ्यांना उद्देशून भाषण करावयाचें होतें. एका विद्यार्थ्याला त्यांनीं विचारलें : मधल्या सुट्टींत फराळाला काय आणलें होतेंस?

**उत्तर** : इडली

**प्रश्न** : ती सगळी तूं खाल्लीस ना?

**उत्तर** : होय. मीच खाल्ली.

**प्रश्न** : तूं इडली आणलीस तशीच सर्व मुलं आणतात कां?

**उत्तर** : नाहीं – कांहीं गरीब मुलं नुसती कांजी आणतात.

**प्रश्न** : त्यांची कांजी आणि तुमची इडली यांची 'अंगत-पंगत' करतां कां नाहीं कधीं?

**उत्तर** : केली असती; पण आई बदडील, त्याची काय वाट?

बस्स. श्री. शंकररावांना एवढा तंतु पुरेसा झाला. तेवढ्यानें त्यांनीं भूदानयज्ञप्रणालीचें सुंदर वस्त्र विणून श्रोत्यांपुढें लगेंच उभें धरलें. अशी 'जिवंत' नित्य व्यवहारांतील गोष्टींमुळें त्यांचीं व्याख्यानें नेहमीं प्रभावी, परिणामकारी होतात.

**'प्रतिवादी भयंकरः'**

कित्येक वेळां निर्जीव जड अशा 'वास्तूं'चाहि आधार आपल्या प्रवचनात ते घेतात. दिंदीगलचें जाहीर सभेंतलें सहजस्फूर्त भाषण माझ्या कानांत अजून घुमत आहे जसें कांहीं. दाक्षिणात्य देवळांचें वैभव – प्रचंड गोपुरें – त्यांची श्रीमंती याबद्दल बोलणें ओघानें आलें. दगडी मूर्तीसाठीं उंची कपडे – हिऱ्यामोत्यांचें, सोन्याचांदीचे दागिने; पंचपक्वान्नाचे ढीग – प्रशस्त दगडीं देवालयें – आणि जिवंत 'नारायण'ला धड आंगभर वस्त्र नाहीं; रहायला घर नाहीं आणि एक वेळ देखील पोटभर अन्न नाहीं!! हा कुठला धर्म? कोणत्या धर्मानें तुम्हांला हें शिकविलें? इत्यादि युक्तिवाद धर्ममार्तंडालाहि निरुत्तर करणारा होता. दाक्षिणात्यांत आजहि रूढ असलेले एक बिरुद – एक पदवी, हें वाक्पाटव पाहून कांहीं पंडितांनीं शंकररावांना चिकटविली : "प्रतिवादी भयंकरः"

वेळप्रसंगीं 'पर' धर्मग्रंथांतील आधार घेऊन आपला युक्तिवाद शंकरराव बिनतोड करतात. बायबलमधील एक वाक्य तर त्यांना फार उपयोगी पडें. "सुईच्या नेढ्यांतून जाणें उंटाला साधेल पण श्रीमंताला स्वर्गद्वारांतून प्रवेश मिळणें अशक्य!" म्हणून "श्रीमंत राहूं नका; आपलें धन, आपली दौलत, ईश्वराच्या लेंकरांत वांटून स्वर्गाचा रस्ता मोकळा करा कसे" असा असे त्यांच्या प्रवचनाचा रोख. श्रोतृवृंदांत 'ईसा'नुयायी असेल तर उत्तमच; नाहीपेक्षां सर्वधर्मी समानत्व प्रत्यक्ष आचरणांत उतरविलेलें लोकांना पटतें – असा अशा धर्माचाराचा उपयोग होतो.

तामीळनाडू, मलबार-केरळ हे दोन्ही दाक्षिणात्य प्रदेश खरे; पण तेथील भाषा – तामीळ व मल्याळी – अवगत नसतांहि श्री. शंकररावांचें वक्तृत्व प्रभावी ठरें याचें कित्येकांना आश्चर्य वाटें. त्यांची भाषणपद्धति साधी व सोपी होती. अशा दौऱ्याचे वेळीं त्यांची "छाया" म्हणून एक 'इटरवटर' (इंग्रजी इंटरप्रिटरचा औत्तरीय प्रतिशब्द) त्यांच्या बरोबर असे. हिंदी वाक्य श्री. शंकररावांनीं उच्चारावें कीं, लगेच त्याचा तर्जुमा तामीळी अगर मल्याळी भाषेंत त्या "छायेनें" करावा – अशी 'दुभाषी' व्याख्यानें तीं चालत. प्रत्येक वाक्यागणिक त्यांत खंड पडत असला तरी व्याख्यानाचा ओघ कुंठित होत नसे – तो प्रवाह हवातसा कमीअधिक करतां येत असे. मूळ वक्ता व त्याची छाया, यांना नित्याचा घडणारा हा एक अभ्यासच असे. पण म्हणतात ना 'असाध्य तें साध्य, करितां सायास, कारण अभ्यास' – तसेंच श्री. शंकररावांचें होई.

ह्या नित्यनेमाच्या अभ्यासानें, सारख्या बदलत्या देश-काल-परिस्थितीमुळें, भूदानाबाबत श्री. शंकररावांची तयारीहि चांगली झाली. त्यांच्या यात्रेचें मुख्य सूत्र असें कीं कुठेहि २४ तासांपेक्षां अधिक मुक्काम नसायचा. दररोज पहाटे – रामपाऱ्यांत – पुढील मुक्कामासाठीं 'कूच'. त्यामुळें नवे लोक. त्या नव्या लोकांबरोबर 'नवे' विचार; नव्या अडचणी; नवे युक्तिवाद – नवे विकल्प. पण आमचे शंकरराव 'नवनवोन्मेषशाली' तत्त्वप्रणालींचे जनक ठरत. जितक्या शंकाकुशंका, संकटें, काल्पनिक अडचणी, स्थानिक रीतीरिवाजांच्या 'खास' सबबी श्रोते त्यांच्यापुढें मांडीत तितक्यांचें समाधान करण्याचें, त्यांचेकडून "स्थितोऽमि गतसंदेहः" असें अभिवचन मिळविण्याचें कौशल्य श्री. शंकररावांना सहज साधें!

अनुक्रमणिका

**त्यागी जीवन व विशुद्ध आचरण**

अंगीकृत कार्यावरील गाढ निष्ठा, त्याचा सारखा निदिध्यास, 'कार्य वा साधयेत् – देहं वा पातयेत्' अशा हिरीरीनें तें साधण्याची हौस या सर्व गुणांमुळें शंकरराव देवांचा प्रचार प्रभावी ठरतो – त्यांची बावनकशी तळमळ स्पष्ट दिसते आणि कडक तत्त्वनिष्ठेचें, स्वार्थत्यागी वृत्तीचें कौतुक वाटतें. स्वतःला इतकें विसरणारा – स्वतःला असें पणाला लावणारा कार्यकर्ता फार विरळा.

'दांडी' यात्रेच्या समाप्तीपासून – म्हणजे उणेंपुरें पाव शतक मी श्री. शंकररावांना ओळखतों. त्यांच्या चळवळीचें निरीक्षण करतों, त्यांच्याशीं वाद-संवाद करतों. पत्रव्यवहारहि आमचा चालतों. त्यांच्याशीं मतभेदच पुष्कळ आहेत; ऐकमत्याच्या बावी थोड्या – तरी आमचा स्नेहसंबंध कायम आहे. बोलण्यालिहिण्यांत मोकळेपणा कधीं दुरावला नाहीं. अगत्य कमी झालें नाहीं.

श्री. शंकररावजींचें त्यागी जीवन, विशुद्ध आचरण, सर्वोदयी निर्बंधमय राहणी आणि प्रारंभींच म्हटल्याप्रमाणें लोकार्थ कष्टण्याची प्रतिदिनवृत्ति – या सर्वांमुळें त्यांच्याबद्दल मला नेहमीं आदर वाटतो. त्यांच्याशीं असलेले मतभेद स्पष्टपणें सांगण्यांतहि समाधान लाभतें.

त्यांनीं इतक्या लवकर 'साठी' गांठली असली तरी हातीं काठी अद्याप येऊं दिली नाहीं हें विशेष. त्यांच्यापाठीं पोरें लागतात. ती मात्र वेगळ्या अर्थानें. त्यांनीं असेंच कार्य आणखी करीत रहावें, नवजवानांना असेंच पाठीं लावून घ्यावें, त्यांना स्वच्छ व शुद्धाचरणाचें वस्तुपाठ द्यावे, हीच या वेळीं इच्छा व्यक्त करावयाची.

⌘ ⌘ ⌘

# शंकरराव देव

**हमीद दलवाई**

एकोणीसशे चव्वेचाळीस-पंचेचाळीस सालात मी शंकररावजींना प्रथम पाहिले. ते तेव्हा चिपळूणला जाहीर सभेकरिता आले होते. शंकररावजींच्या भाषणानेही मी फार प्रभावित झालो. त्यानंतर लगेच सातारा येथे राष्ट्र सेवा दलाचे महाराष्ट्रव्यापी शिबिर भरले. या शिबिराला मी उपस्थित होतो. एव्हाना आमच्यात राष्ट्र सेवा दल आणि काँग्रेस समाजवादी पक्ष यांच्याबद्दलच्या निष्ठा रुजल्या होत्या. या संघटनांवरील टीका जरादेखील सहन व्हायची नाही. शंकररावजी या शिबिराला उपस्थित होते. त्यांनी समाजवादाच्या कल्पनेवरच आपल्या भाषणात हल्ला केला. त्यानंतर अच्युतराव पटवर्धन बोलले आणि त्यांनी शंकररावजींना उत्तर देण्याचा प्रयत्न केला. परंतु शंकररावजींचे भाषण झाले तेव्हा अच्युतराव उपस्थित नव्हते. त्याना घाईघाईने कुणीतरी शंकररावजींच्या भाषणाचा सारांश सांगितला होता. अच्युतरावांचे भाषण तितके प्रभावी झाले नाही. परंतु आम्हा शिबिराला आलेल्या

[पूर्वप्रकाशन : *समाज प्रबोधन पत्रिका*, मार्च-एप्रिल १९७५.]








स्वयंसेवकांना मात्र शंकररावजींबद्दल अप्रीती वाटू लागली. त्या वयात वेगळा विचार ऐकून घेण्याइतकी सहनशक्ती नव्हती हे त्याचे खरे कारण होते.

संयुक्त महाराष्ट्राच्या काळात पुन्हा त्यांची सभा ऐकण्याचा योग आला. विशाल द्विभाषिकाची कल्पना त्यांनी आपल्या या भाषणात मांडली. 'संयुक्त महाराष्ट्राचा मंगल कलश जवाहरलालांकडून मला प्रेमाने आणावयाचा आहे' हे त्यांचे वाक्य मला अजून आठवते. त्या दिवशी शिवाजी पार्कचे मैदान सबंध भरलेले मी प्रथम पाहिले. माझ्या शेजारी श्री. भाऊसाहेब नेवाळकर आणि कॉ. जगताप उभे होते. भाऊसाहेबांनी मैदानावर दृष्टी टाकली आणि म्हणाले, "अनेक दिवसांनी ही मोठी सभा येथे झाली आहे".

शंकररावजींच्या त्या दिवशीच्या भाषणाने मी हलून गेलो हे मानले पाहिजे. सातार्‍याच्या भाषणाने निर्माण झालेले किल्मिष पार धुऊन गेले. मुंबईला संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत दंगली झाल्या तेव्हा त्यांनी उपोषण केले. आणि एकटे शांतता प्रस्थापित करण्यासाठी गिरगाव-ठाकुरद्वार भागातून फिरले. हळूहळू त्यांनी या चळवळीतून अंग काढून घेतले, तेव्हा पुन्हा त्यांच्याविषयीचा माझा आदर ओसरून गेला.

शंकररावजींचे हे दुरून झालेले मला दर्शन होते. त्यांचा-माझा प्रत्यक्ष परिचय झाला नव्हता. दरम्यान शंकररावजी सर्वोदयात गेले, त्यांनी भारत-चीन मैत्री यात्रा काढली, ते आजारी पडले, इत्यादी बातम्या वर्तमानपत्रांत वाचीत होतो. माझे कुतूहल त्यामुळे फारसे चाळवले गेले नाही. जगात अनेक घटना घडत होत्या, त्यांनीच माझे मन व्यापून टाकले होते. शंकररावजींना त्या वेळी माझ्या मनात कुठलीच जागा नव्हती.

आणि मग एक दिवस अचानक शंकररावजींची ओळख झाली. १९६७च्या मार्चमध्ये अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांच्याशी ओळख झाली. जातीय समस्येबद्दल मला अधिक माहिती मिळवायची आहे असे त्यांना कळल्यावर अण्णासाहेबांनी मला भेटीला बोलावले. ते म्हणाले की माझ्याबरोबर उरळीकांचनला का येत नाही? तेथे दादा धर्माधिकारी आणि शंकररावजीही आहेत. त्यांच्याशीही या प्रश्नावर चर्चा करा. तेव्हा मी अण्णांबरोबर त्याच दिवशी उरळीकांचनला गेलो. आम्ही तेथे पोचलो तेव्हा सायंकाळ झाली होती. तेव्हा असे ठरले की सकाळी फिरायला जाताना मी शंकररावजींबरोबर जावे आणि त्यांचे जातीय प्रश्नावरील विचार समजावून घ्यावे. परतल्यानंतर दादांबरोबर चर्चा करावी.

अगदी पहाटे मला कोणीतरी हलवून जागे करीत आहे याची जाणीव झाली. हलवणे इतके नाजूक होते की धड जागे होऊ नये आणि धड झोपही लागू नये असे मला वाटले. मी डोळे उघडले तेव्हा शंकररावजी मला हलवून जागे करीत आहेत हे माझ्या लक्षात आले. उठलो, तोंड धुतले आणि त्यांच्याबरोबर बाहेर निघालो. तेव्हा पुरते उजाडलेही नव्हते. रेल्वेरुळाच्या काठाकाठाने आम्ही चालू लागलो आणि शंकरराव माझ्याशी बोलू लागले. या वेळी मी फार मामुली बोललो. तेच बोलत होते. आम्ही जात असताना दादा फिरून परत येत होते. ते म्हणाले, "तुमचे चालू द्या. परतल्यावर मला भेटा".

शंकररावांच्या मते धर्मावरून भांडण होण्याचे काही कारणच नव्हते. लोकांनी आपल्यापुरता धर्म पाळावा म्हणजे झाले. हे कसे घडवून आणावे हा खरा प्रश्न होता. तसे ते सोपे आहे असे त्यांचे मत दिसले. मी म्हणालो, "गांधीजींना हा प्रश्न तसा सोडविता आला नाही". त्यांनी उत्तर दिले, "तोही गांधीजींच्या अहंकाराचाच एक भाग होता. गांधीजींना सर्व आपणापुढे लीन झालेले पहायची इच्छा होती". यातील काहीही मला पटले नाही. पण मी त्यांच्याशी युक्तिवाद केला नाही. एक तर शंकररावजी सर्व अब्स्ट्रॅक्ट परिभाषेत बोलत होते. आणि शिवाय माझी त्यांचा प्रतिवाद करण्याची हिंमत नव्हती.

त्यानंतर मी देशभर प्रवास केला. या प्रवासाकरिता आर्थिक मदत अण्णांनी मिळवून देण्याचे प्रयत्न केले, हे शंकररावजींना माहीत होते. ते वर्ष संपल्यानंतर मी 'मराठा' मधील नोकरी सोडून दिली आणि पूर्ण वेळ जातीय प्रश्नावर काम करू लागलो. या वेळी दंग्यांची एक लाट येऊन गेली. वर्धा येथे कोरगावकर सेवक संमेलन भरले. तेथे शंकररावजींच्या सूचनेवरून हिंदु-मुस्लिम प्रश्नावर चर्चा आयोजित करण्यात आली होती. स्थानिक काही मुसलमान व्यक्तींना बोलावण्यात आले होते आणि मग व्हायचे तेच झाले. खटके उडाले. मी म्हणालो, "अशा रीतीने आपण काही करू शकू असे मला वाटत नाही". त्या दिवशी प्रथमच मी शंकररावजींवर उघड टीका केली. मी अण्णांना नंतर विचारले, "माझे यात काही चुकले असे आपल्याला वाटते का?" अण्णा म्हणाले, "तुमची मते आहेत. तुम्ही ती मांडली यात काहीच चूक झालेली नाही". तरीही शंकररावांवर मी उघड टीका करायला नको होती असे मला वाटत राहिले.

शंकररावजींनी दुसर्‍या दिवशी मला चकित केले. त्यांनी म्हटले, "हमीदना या प्रश्नावर काम करावयाचे आहे. त्यासाठी आपण एक वेगळे फाऊंडेशन काढायचा प्रयत्न करू या.

अनुक्रमणिका

कोरगावकरांनी फाऊंडेशनकरता एक लाख रुपये द्यावेत असे मी त्यांना आवाहन करतो". शंकररावजीनी त्यानंतर या प्रतिष्ठानाचा ध्यास घेतला. मुंबईला त्यानंतर आमच्या अनेकदा बैठका झाल्या. माझ्याकडून त्यांनी सूचना मागविल्या. मी त्यात मदरसा शिक्षणाचे आधुनिकीकरण व्हावे असे म्हटले होते. शंकररावजी म्हणाले, "धर्मशिक्षण आपण का द्यावयाचे?" तेथे सोलापूरचे डॉ. अंत्रोळीकर उपस्थित होते. ते म्हणाले, "धर्म शिकल्याने काय विघडते? सर्व धर्म तर एकच तत्त्वज्ञान शिकवतात". शंकररावजी उत्तरले, "डॉक्टर, तुम्ही पक्के सनातनी आहात. धर्माची ही भाषा आता वंद करा".

शंकररावजींनी मला चकित करण्याची ही दुसरी वेळ होती. ते असे काही बोलतील असे मला काही वाटत नव्हते. वास्तविक मी जे बोलायचे ते ते बोलत होते. शंकरावजीं-बरोबर त्यानंतर माझ्या अनेकदा भेटी झाल्या. प्रतिष्ठानाची कल्पना प्रत्यक्षात येऊ शकली नाही. एक दिवस मुंबईला हरिभाऊ जोशींकडे गेलो असताना तेथे शंकररावजींचा मुक्काम होता. ते म्हणाले, "तुमचीच आठवण आता निघाली होती. प्रतिष्ठानाचे काही जमत नाही. जे थोडेसे पैसे जमा झाले होते ते वाटून टाकीत आहे. त्यातले एक हजार रुपये तुम्हाला द्यायचे आहेत". आणि त्यांनी एक हजार रुपयांचा चेक माझ्या हवाली केला.

एकदा कोथरूडला गेलो असताना ते मला म्हणाले, "आचार्य भागवतांना तुमची भूमिका मान्य नाही. पण मी त्यांना सांगितले, त्याला जे काम करायचे आहे ते त्याच्या पद्धतीने करू द्या. तुम्ही आपले मार्ग त्याच्यावर लादू नका". अहमदाबादला दंगा झाल्यावर समाज प्रवोधन संस्थेतर्फे मुंबईत एक चर्चा त्यांनी घडवून आणली. या चर्चेत अनेक मुसलमान बांधवांना आग्रहाने चर्चेकरिता त्यांनी बोलावले. त्यांनी चर्चेत भाग घेतला नाही. परंतु चर्चा दिवसभर ऐकत बसून राहिले.

एकदा यदुनाथ थत्ते म्हणाले, "शंकररावांचा आजारपणाचा खर्च कसा निभावतो हे कळत नाही. त्यांची आर्थिक ओढाताण आता या वयात होते आहे असे दिसते". ही गोष्ट मी नंतर मुंबईला परतल्यावर अ.भि. शहा यांच्या कानांवर घातली. शहांना मी म्हणालो, "तुम्ही यशवंतरावजींना लिहिलेत तर वरे होईल". शहा लागलीच तयार झाले. त्यांनी पत्रही लिहिले. चारच दिवसांत यशवंतरावजींच्या चिटणीसांचा दिल्लीहून शहांना फोन आला. ते म्हणाले, "मागे शंकरराव आजारी असताना त्यांना दोन हजार रुपये पाठविले होते. मला पैशाची गरज नाही असे म्हणून ते त्यांनी परत पाठविले. आता काय करायचे ते यशवंतरावांनी तुम्हालाच विचारले आहे". हे ऐकून आम्ही दोघे आश्चर्यचकित झालो. शंकररावजींना कोणी विचारीतही नाही हे म्हणणे वरोवर नव्हते हे यावरून दिसून आले. शंकररावजींच्या स्वभावाचा एक पैलूही त्यात दिसून आला. प्राचीन काळातील एखाद्या कोपिष्ट ऋषीप्रमाणे हे वागणे होते. पुन्हा मी आणि शहा यात पडलो नाही.

त्यानंतर अनेक दिवस शंकररावजींना भेटणे जमले नाही. परवा पुण्यात असताना दिलीप भंडारे सकाळी आला आणि म्हणाला, "शंकररावजी वारले". आम्ही दोघे त्यांचा मृतदेह राष्ट्रभाषा सभा कार्यालयात आणला होता तेथे गेलो. तेथे मोजकीच पण परिचित माणसे भराभर जमू लागली होती. एस्.एम्. होते, कॉ. वसंतराव तुळपुळे, काँग्रेसचे धारिया, व राम तेलंग वगळता वाकी कोणी दिसले नाहीत. प्रेतयात्रेतही निवडक तीनचारशेच माणसे उपस्थित होती. रस्त्याने माणसे कुतूहलाने वघत होती. काही माणसांनी विचारले, "कोण गेले?" आमच्यापैकी एकाने उत्तर दिले, "शंकरराव देव". विचारणाऱ्याचा चेहरा गोंधळला. त्याने काहीसे आठवण्याचा प्रयत्न केला आणि तो आपल्या वाटेने निघून गेला.

☒ ☒ ☒

अनुक्रमणिका

# दादांसमवेत

## वृंदा दाभोलकर

३० जानेवारी १९९५ रोजी शंकरराव देवांची जन्मशताब्दी वर्षाची सांगता होत असताना वाचनात चार-पाच लेख आले. सर्व लेख आवर्जून समग्रपणे वाचले आणि साहजिकच काही आठवणींना चांगलाच उजाळा मिळाला. अनेक अक्षरे मनात उभरू लागली. अनेक शब्द, घटना, प्रसंग डोक्यात दाटीवाटीने उमटून साकार होऊ लागले. *नवभारत* मासिकाचा एक विशेषांक शंकरराव देव जन्मशताब्दीनिमित्त निघत आहे, त्यानिमित्त मी त्यात लिहावे; "लिहाल का?" असे विचारण्यात आल्यावर तर समग्र संस्मरण शब्दबद्ध करण्याचा सुयोग आला आहे असे वाटून गेले. त्यांचे माझ्यावरील ऋण! ऋणमुक्त तर होता येतच नसते; किमान त्याचा निर्देश करण्याची संधी समोर चालून आली आहे असा आश्वासक दिलासा जाणवून गेला.

१९५३ सालची गोष्ट. शंकरराव देवांचा भूदान दौरा चालू होता. त्यांना त्यांचा पत्रव्यवहार इत्यादींसाठी एका स्वीय चिटणीसाची गरज होती. त्यासाठी मी त्यांच्यासमवेत दौऱ्यात सामील व्हावे असा प्रस्ताव आला. बेचाळीस वर्षापूर्वीची माझ्यातील एकोणीस वर्षाची तरुणी हा प्रस्ताव स्विकारण्यास चांगलीच उत्सुक होती; पण मुख्य म्हणजे आईनेही जोरकस पाठिंबा दिला. माझ्यातील त्या 'तरुणी'ला जागवून/उठवून बोट धरून माझ्यावरोबर चालती केली; व म्हणूनच त्यावेळची ही काही संस्मरणं आज लिहू शकल्ये.

आमच्या घरात काँग्रेस/शंकरराव देव/सर्वोदय/भूदान इत्यादींबावत अगदी अनभिज्ञताच होती. प्रत्यक्ष संबंध कधीच आला नव्हता. फक्त आईचा समाजकार्यात सहभाग असे म्हणून तिला थोडी थोडी माहिती असे. माझी स्वतःची जाण्याची तयारी होती. बाहेरचे जग पहावे – अनुभव घ्यावा अशी माझी ओढ होती. ही माझी वृत्ती/प्रेरणा आई पुरती जाणून होती; पण प्रश्न होता, "इतक्या लांब एकटीला पाठवायचे का?" काँग्रेस सदस्याच्या अगर कार्यकर्त्याच्या घरात हा प्रश्न कदाचित् उद्‌भवला नसता. कारण, त्या घरात वरील सर्व बावी सुपरिचित होत्या. माझ्या आईचा बाहेरच्या जगाशी चांगलाच संपर्क होता. आमच्या घरात काहीसे सेक्युलर पद्धतीचे वातावरण होते असे म्हणावे लागते. मात्र, मामा इत्यादी परिवारात दृष्टिकोन पूर्णतः विरोधातील असे. गांधीवाद हा विषय तेथे काहीसा कुचेष्टेचा, हेटाळणीचा असे! आमच्या घरी सर्व पक्षांच्या कार्यकर्त्यांची ऊठ-बस असे. त्या भागातील दिग्गज आचार्य भिसे, मुकुंदराव सावे, ताराबाई मोडक, गोदावरी परुळेकर इत्यादी अनेक जण आईला सुपरिचित होते; तेही आईला चांगल्यापैकी जाणत होते. त्यांच्या सारख्यांच्याच विधायक वर्तुळात आपल्या लेकीला पाठवायचे तर काही हरकत नाही, किंवा एकदा पाठवून पहायला तरी हरकत काय? माझ्यात व तिच्यात हीच चर्चा/रुजवात व समजूत होती. अण्णा (वडील) सर्व बावतीत काहीसे अलिप्त असत. त्यांची अनुमती होती. झाले. निर्णय ठरला. मी मुंबईस रवाना झाले. मात्र, आईला त्या रात्री डोळा लागला नाही. माझ्या दृष्टीने 'एक मोठा दिंडी दरवाजा' उघडला गेला होता. अर्थात् मनात हुरहुर होतीच.

मध्यप्रदेशातील महाकौसल भागात यात्रा चालू होणार होती. छत्तीसगडपासून सुरुवात होती. मी फक्त शंकररावांचा पत्रव्यवहार सांभाळायचा – यात्रेत प्रत्यक्ष 'चालून' सहभाग घेतलाच पाहिजे असे नाही, असे मला सांगण्यात आले होते. त्यामुळे 'चालण्या'साठी मनाची खास तयारी नव्हती. सामानाची जीप यायची होती. एकटीच मागे कशाला थांबायचे म्हणून मी यात्रेबरोबर चालण्यास सुरुवात केली; पण चालताना मी सतत मागे पडत होते. त्या दिवशी मग मनाशी पक्के ठरवले की, इतर मुलींप्रमाणे आपणही मस्तपैकी चालण्याचा अनुभव घ्यायचा. दुसरे दिवसापासून मी यात्रेत सरळ सहभागीच झाले. पहाटे चारला उठल्यावर साडेचार-पाच वाजता पदयात्रा सुरू होई. पहाटेचा थंडगार सभोवताल, नंतर सकाळची सोनेरी वेळ. अत्यंत आल्हाद वाटे. निसर्गसहवासाची लयलूट 'त्या तरुणी'ला वाटे. 'विविधतेने नटलेल्या' परिसराची प्रचिती जाणवे. वातावरण भूदानमय. रोज सरासरी दहा-बारा मैल चालणे होई. पहाटे चार ते रात्री दहा असा गच्च कार्यक्रम असे. प्रत्येक नवीन गावी नवीन बस्तान बसवून घेणे, खोली इ. नीट लावून घेणे, भूदानसभा, कार्यकर्त्यांच्या बैठका, चर्चा, भेटीगाठी, यानंतर पत्रव्यवहार इ. वेळ तर अगदी व्यग्र जायचा. रात्री मात्र एकेकदा घरची, आईची खूप आठवण यायची, त्यात घरनं पत्र आलं नाही, किंवा पत्राला उशीर झाला की, फारच अस्वस्थ

वाटत राही; धीर राहात नसे. एकतर मी आईवेडी, त्यात घरकोंबडी. व्होल्टेज एकदम खाली घसरल्यासारखे वाटे. भूदान पदयात्रेत चार-पाच मुली होत्या. माणिक मोहोनी, नाईक बहिणी व स्थानिक एकदोघीही होत्या. माणिक शंकररावांना 'दादा' म्हणत असे. मीही मग शंकररावांना 'दादा' म्हणून संबोधू लागले. दादांसमवेत दीड-दोन महिने होऊन गेले. या काळात दादांचा एकूण सर्व व्यवहार, वागणं प्रेमळ व समजुतीचं असे. पहिल्या भेटीतच माझ्याकडे जेव्हा त्यांनी लेखनसामग्री इ. ची अटॅची दिली त्याबरोबर पैशाचे पाकीटही दिले. नेमकी हीच पद्धत माझ्या वडिलांची होती. दुसऱ्याला 'मान्यता' दर्शविणे व तेही दुसऱ्यावर पूर्ण विश्वास टाकून. लहानांशी/तरुणाईशी समपातळीवरून सर्व वर्तन-व्यवहार करण्याच्या तयारीचा हा एक संकेत मला वाटे; नि इथे एक तार जुळली. पण अर्थात् तरीही दादांशी औपचारिकच संबंध होते. एक चांगली नोंद मी त्यांच्याबद्दल केली होती जरूर; पण त्यातून एखाद्या निष्कर्षाशी त्या नोंदीची जुळणी अद्याप झालेली नव्हती.

यानंतर एके दिवशी मला जोराचा ताप चढला नि मी चांगलीच आजारी पडले. एकूण माझ्या जीवनपद्धतीत चालू असलेला रूळबदल; त्यामुळे शारीरिक व मानसिक समायोजनामुळे आलेला शिणवटा यामागे असावा. पदयात्रा चालूच होती व म्हणून सोयीच्या दृष्टीनें मला भोपाळला हॉस्पिटलमध्ये हलविले. दोन/तीन दिवसाचे तेथील 'चारा-पाणी' मला थोडे महागातच पडले. कारण, तेथे केलेल्या जोरदार उपचारांनी/इंजेक्शन्स इ. मुळे मला कमालीची अशक्तता जाणवू लागली. यानंतर नागपूरला मोहोनींकडे काही दिवस वास्तव्य होते. नागपूरचे मोहोनी कुटुंब म्हणजे 'गांधीवादी' या दृष्टीने सुप्रतिष्ठित व सुविख्यात होते. 'दादा' म्हणूनही त्या संपूर्ण एकत्र व संयुक्त कुटुंबपरिवारात दादांना विशेष स्थान होते. दादांच्या व्यक्तिमत्त्वाचे/कर्तबगारीचे आणखीही काही पैलू आहेत याची पडताळास्वरूप खात्री मला त्या तेथील वास्तव्यात होऊ लागली होती. त्या घरात कमलाबाई होस्पेट यांचेही छानसे दर्शन मला घडले. कमलाबाई होस्पेट त्यांच्या भावंडांशी तसेच दादांशी हसत-खेळत, विनोदाने, गमतीने खूप बोलत असत. स्वतः शेंगा निवडत बसल्या असताना म्हणणार – "या आता सर्वांनी शेंगा निवडायला हात लावा". आश्रमी पद्धतीत तिखट वर्ज्य असे. त्यावर त्या म्हणणार – "तिखट का खायचं नाही? हिरवी मिरची किती छान लागते!" 'अस्वाद' या तत्त्वाच्या आविष्काराला छेद देणारे असेही काही उद्गार त्या काढणारच. मुक्त खेळकरपणा इथे चालू शकतो ही जाणीव झाली. कारण, त्यांच्या उद्गारावर इतरांकडूनही प्रतिसाद, वाद, संवाद घडत असे. समवयस्कांकडून होणारे व्यक्तिमत्त्वदर्शन एका वेगळ्याच पैलूंची भर टाकत असते ना!

आज या घटनांचे आणखीहि वेगळेच महत्त्व जाणवते. स्त्री-पुरुष समानतेबद्दल गांधीवादी/सर्वोदयी परिवारात भान व सुजाणपणा चांगलाच होता; पण त्यासाठी व्यवहारात महत्त्वाचे म्हणजे घरकामात पुरुषांचा सहभाग/सहयोग कसा निकडीचा हे जाणवून कोण देणार? मुख्यत्वे स्त्रीच. ही स्त्री हे कसे मोकळेपणाने मांडून राहिल्ये!

नागपूरला मोहोनींकडील वास्तव्यात माझा एक मोठा फायदा झाला. एक मोठी बहिण मिळाली. घडले असे – रात्री सोबत असावी या दृष्टीने माझी कॉट उषा(मोहोनी)च्या खोलीत हलविण्यात आली होती. या घरातील मला माहीत होती ती फक्त माणिक. रात्री माझ्या कपाळावरून हात फिरू लागल्यावर दचकले! "वृन्दा, कसं वाटतंय?" असे उषाचे शब्द ऐकल्यावर आनंदाश्चर्य वाटले. एकदम कोणी जिवाभावाचा स्पर्श भेटल्यासारखे झाले! दोघींच्यात पुढे परिचयामुळे जिव्हाळा वाढला. द्विपदवीधर ती व माझ्यासारखीच बिनखादीधारी पण! तिला धाकट्या बहिणीची व मला मोठ्या बहिणीची आस – दोन्ही भागल्या. तिने मला लिहिलेल्या यात्रेतील पत्रांतून दादांची मला ओळख घडली ती अशी – ती लिहिते – "दादांचे पाय दुखतात ते मला ठाऊक होतं, पण पाठीच्या त्रासाचं माहित नव्हतं. त्यांचं एक वाक्य मला नेहमी आठवतं, 'त्रास आणि कष्ट न कुरकुरता सहन करणं म्हणजे तपश्चर्या आहे'. आता या तपस्व्याला काय म्हणावं?" "त्यांनी माझ्याबद्दल पत्रांच्या शेवटी 'उषा फार संकोची आहे' हे वाक्य लिहिलं आहे. त्याची मला फार मजा वाटली. कारण, सर्वांनी आशीर्वाद लिहिले असते फार तर! It was original of him to write so. And I like originality!"

पुढे बिहारमध्ये खादीग्रामला माझ्यासमवेत उषा राहिली होती – आठ दिवस. व्हायरस विकाराने एकाएकी उषाला साफ दिसेनासे झाले. सर्व उपाय संपलेले. या सर्व धक्क्यातून सावरून बाहेर पडल्यावर तिला वातावरण-बदल हवा होता. त्यामुळे 'ओहोटी' नंतरच्या 'भरती' लाटेवर उभारी घेऊन आरूढ होण्यास तिला परिपोषकता मिळावी अशी तिच्या घरच्यांची कल्पना होती. दादांचे grandparenting व आम्हा दोघी समवयस्कांची मेतकूट साथसंगत असा बिहारमध्ये आठ दिवस एकत्र मुक्काम होता. एकमेकींमधील पिंडपेशींची गळामिठी पडली असावीसे वाटून गेले!

तेथे जयप्रकाशजी व त्यांच्या पत्नी प्रभादेवी यांचे दर्शन घडले!

नंतर भूदानयात्रेत दादांबरोबर सुनंदा (अत्रे) आली. तीही द्विपदवीधर. ती यापूर्वीही दादांबरोबर होती. मुख्यत्वे म्हणजे तिचे आईवडील दोघेही विधायक कार्यकर्ते होते. सर्वजण एका विधायक सर्वोदयी कार्यपरिवारातीलच होते. सुनंदा सरळ व लाघवी. सुरुवातीचे काही दिवस ओळख नसताना आम्ही एकमेकींना परकेपणाने जरा दुरुन मापन/मोजत असू कदाचित्. घरेलू वातावरणाची आस असणारा माझा स्वभाव. घरदार सोडून दूर परक्या बेटावर आपण येऊन पडलोय की काय अशा भावनेने खूप त्रास झाला त्या दिवसात! यथाक्रम मग हळूहळू परिचय वाढत जाऊन मोकळेपणा आला – नंतर तर अगदी गूळपीठ. सुनंदामुळेच मुख्यत्वे दादांशीही जवळीक वाढली. वातावरण खेळीमेळीचे असे बनलेले राही. दादांना मीही 'दादा' मानू लागले.

आम्हा दोघींच्यात अनेक विषयांवर चर्चा होई. विवाह, जोडीदाराबाबत अपेक्षा, तडजोडी, जुळविण्याच्या रूढ पद्धती, त्यातील अपुरेपणा; पण त्याचबरोबर अपरिहार्यता इ. अनेक विषय चर्चेला असत व वेळप्रसंगी त्यात दादांचा सहभाग असे. 'दाखवून घेणे' हा प्रकार मुलींवर किती अन्याय करणारा व उपमर्दकारक आहे – या संदर्भात दादांशी खूप बोलणे एकदा केव्हातरी झालेले आजही चांगलेच आठवते. त्यावर ते म्हणत – "एकदा ही पद्धती आपण मान्य केली – स्वीकारली – की मग ह्यात अन्य पर्याय जर उपलब्ध नाही, तर मग तोही स्वीकारला पाहिजे – त्याबाबत खळखळ करून काय उपयोग?" असो.

सुनंदा भजनं म्हणत असे. माझ्याप्रमाणेच दिलरुबा-वादनाचीही तिला इच्छा. माझ्यात तिच्यामुळे भजनवृत्ती वाढली असावी. पुढे माझ्या लग्नाच्या वेळी गारगोटीस तिने 'करवली' नात्याने घेतलेला पुढाकार, तिचा उत्साह अद्यापही आठवतोय!

दादांचा पत्रव्यवहार अफाट होता. राजनैतिक व रचनात्मक दोन्ही क्षेत्रांशी त्यांचा सततचा संपर्क असे. भारतभर सर्व प्रांतांमध्ये दौराही चालू असे. पुष्कळसा प्रवास रेल्वेनेही होई. पहिल्यांदा त्यांच्याप्रमाणेच माझेही प्रथम वर्गाचे तिकीट काढलेले होते. मला लगेच वाटून गेले – माझे प्रथम वर्गाचे तिकीट काढण्याची कांहीच गरज नाही. ही 'गाड्याबरोबर नळ्याची यात्रा' योग्य नव्हे. आपण तिसऱ्या वर्गाने प्रवास करणे उचित. मात्र; निर्णय एकदम घेतला नाही. प्रवास एकटीने करायचा तर सुरक्षिततेच्या दृष्टीने मी एकदोनदा अंदाज घेतला व नंतर दादांशी चर्चा करून ठरविले व त्यानुसार तिसऱ्या वर्गाने प्रवास करत असे.

भूदानयात्रेत तीन-चार महिने झाल्यानंतर मी घरी परतले. त्या काळात 'पद'यात्रेत मी काही लक्ष पाऊले चालून गेले. भूदानमय झाले. त्यावेळी संपूर्ण 'भूदानयात्रे'चे प्रात्यक्षिक दर्शविणारा एक 'टॅब्लो' बसवून गावातील सार्वजनिक गणेशोत्सवात पेश केला होता. शिवाय स्त्रियांच्या एका सभेत मी भाषणही प्रमुख वक्ता म्हणून ठोकले होते. भूदानामागची सर्व भूमिका व प्रणाली यांची मांडणी तर जाम जमली खरी, पण मुख्य म्हणजे श्रोत्यांची पकड घेणे व तीही सातत्याने – ही एक अत्यावश्यक मूलभूत कला असते हे भान नव्हते. माझ्या पुढील पस्तीस वर्षांच्या अध्यापन यात्रेत पत्राद्वारे दिले गेलेले भान चांगलेच उपयुक्त ठरले असावे.

घरी आल्यावर मिळवते बनण्याची निकड मला जाणवू लागली होती. या दृष्टीने आता कुठेतरी 'काम' करावे या दृष्टीने प्रकृतीला/प्रवृत्तीला मानवणारी कोणती संस्था/जागा याबाबत माझा शोध चालू होता. त्याबरोबरच बी.ए. ची परीक्षाही द्यायची होती. परीक्षेस बसण्याची सोय तर उपलब्ध होती; पण अभ्यास मात्र अगदी 'एकलव्यी' पद्धतीने करायचा होता. या सर्व दृष्टीने दादांशी विचारविनिमय सुरू होता. त्यांच्या आत्मचरित्रावरून (*दैव देते आणि कर्म नेते*) नंतर लक्षात आले की, त्यांचा शैक्षणिक प्रवास किती खडतर होता. मला वाटते म्हणूनच त्यांनी, स्वतः अनुभवलेली 'आच' असल्याने, योग्य असे कौन्सेलिंग केले. त्यांच्या पत्रांतून ते स्पष्ट होते.

– १ –

कायम पत्ता – बजाजवाडी,
वर्धा, मु. सेवाग्राम
२२-९-५३

सप्रेम आशीर्वाद,

तुझे १५ चे व १८ चे अशी दोन्ही सविस्तर पत्रे मिळाली. सेवाग्रामला आल्यापासून माझी प्रकृति व डोळे हळूहळू सुधारत आहेत; पण अद्याप पूर्वीसारखी शक्ति व उत्साह वाटत नाही. शिवाय काल व आज प्रबंध समतीच्या बैठका होत्या. त्यामुळे तुझ्या अपेक्षेप्रमाणे तुझ्या पत्रांना ताबडतोब उत्तरे पाठवू शकलो नाही. तुझ्या सविस्तर पत्रांना सविस्तर उत्तरे लिहावीत अशी इच्छा आहे, पण तसे करण्याला मनोवृत्ति अनेक कारणांमुळे तितकी अनूकूल झालेली नाही. तुझ्या मनातील विचार व तिकडील घडामोडीसंबंधी तू इतक्या विस्तृत रीतीने लिहिलेस याबद्दल तुला मनापासून धन्यवाद. गणपति उत्सवातील सर्वच कार्यक्रम

विशेषतः भूदानयज्ञाचा कार्यक्रम यशस्वी रीतीने पार पडले हे वाचून बरे वाटले. भूदानयज्ञाच्या कार्यक्रमाच्या यशात तू, तुझी धाकटी बहीण, तुझी आई तसेच कुसुम व इतर लहान मोठी मंडळी भागीदार आहात याबद्दल तुमचे सर्वांचे कौतुक केले पाहिजे. तू लिहितेस की, या कार्यक्रमाची मूळ कल्पना आईची. म्हणून तुझ्या आईची अशा सार्वजनिक कामाकडे अशी प्रवृत्ति असली पाहिजे, तसेच कल्पकताही. या प्रसंगी तू स्वतः भूदानयज्ञाची गाणी म्हटलीस हे वाचून तर मौजच वाटली. हा सभाधीटपणा तुझ्यात पूर्वीच होता की यात्रेतील अनुभवामुळे आला? स्त्रियांच्या सभेतील जे अनुभव तू लिहिले आहेस, त्यात एक गोष्ट मला बरी वाटली नाही. श्रोत्यांच्या बद्दल 'XXXX गुळाची चव काय' अशी जर वक्त्याची वृत्ति असेल, तर त्याला श्रोत्यांपासून स्फूर्ति कशी मिळणार? श्रोत्यांच्याबद्दल वक्त्याच्या मनात आदरभाव असला पाहिजे; पण एकंदरीने तीन महिन्यांच्या यात्रेने तू या विषयाच्या बाबतीत तिकडच्या भागात अधिकारी व्यक्ति बनलेली दिसतेस! माझ्या ठाणे जिल्ह्यातील यात्रेच्या पूर्वतयारीची ही नान्दी एकंदरीने मी शुभसूचकच समजतो.

यात्रेत पुनः माझ्याबरोबर येण्याबद्दल व यात्रेतील अभ्यासाबद्दल तू जे लिहिलेस ते समजले. त्यातील पुष्कळशा गोष्टी मी समजू शकतो; पण मी तुला त्याबाबतीत माझ्या मागच्या पत्रात लिहिलेच आहे. उत्तर प्रदेशाची यात्रा आजारपणामुळे रद्द करावी लागली आहे. पंजाबची यात्रा फक्त १३ दिवसांचीच आहे. त्या यात्रेत सत्यबाला बरोबर राहणार आहे. केरलाच्या यात्रेत सासवडच्या श्री. कमलाबाई एक महिना राहणार आहेत. पुढचा कार्यक्रम अजून नक्की नाही. तथापि मी तुला लिहिल्याप्रमाणे जरूर तर मी तुला हक्काने बोलवीन व मी असे समजतो, तूही येशील म्हणून. या बाबतीत सध्या अधिक लिहीत नाही.

फुलांची आवड व बागेतील काम यासंबंधी तू लिहिलेस ते वाचून गंमत वाटली. भूमातेची सेवा करावयाची म्हटले म्हणजे पुष्कळशा गोष्टींबद्दलची किळस व भीती काढून टाकली पाहिजे. सेवाधर्म हा गहन असतो असे म्हटले आहे.

नागपूरला १० ता. ला गेलो होतो, तेव्हा माणिक व उषा दोघीही अर्थातच भेटल्या होत्या. दोघींनाही मी आजारी असल्याने माझी सेवा करण्याची चांगलीच संधी मिळाली. अर्थात् दोघींनीही तुझी चौकशी केली. माणिकने तुला पत्र का लिहिले नाही असे तू विचारलेस. दिल्लीला असताना मी माणिकच्या पत्रात एक गोष्ट लिहिली होती ती तुला कदाचित स्मरत असेल. जेव्हा कोणाला आपण एखादे वचन देतो किंवा 'हो' म्हणतो, तेव्हा त्यात फारसे गांभीर्य नसते, आणि नकळत पुष्कळ असत्य आपल्या हातून घडते. सत्यनिष्ठा अंगी बाणावयाची तर अशी वचने देण्याचे जाणूनबुजून टाळले पाहिजे. पंजाबला जाताना कदाचित त्यांच्यापैकी कोणी भेटले, तर त्यांना आठवण देईन; पण तू स्वतः त्यांना का लिहित नाहीस?

सध्या अधिक नाही.

कळावे.

दादा

— २ —

ग्रामसेवाश्रम, कोल्हापूर
मु. पन्हाळा
२१-५-५४

सप्रेम आशीर्वाद,

तुझे ३० ता. चे पत्र मला योग्य वेळी मिळाले होते. तुझे मावशीच्या घरी पंधरा दिवस करमणुकीत व खेळात भुर्रकन् निघून गेले हे स्वाभाविकच आहे. माणसामध्ये अशी बालवृत्ति अखेरपर्यंत राहिली, तर जीवनाच्या दुःखाचे पारडे पुष्कळच हलके होईल म्हणून तुझ्या ह्या वृत्तीबद्दल तुझे अभिनंदन.

बोधगयेचे संमेलन फारच चांगले झाले. अंगीकृत कार्यासाठी जीवन समर्पण करण्याची स्फूर्ति लोकांना तेथे मिळाली, पण तुझ्या स्वभावाला हे किती रुचेल हे सांगवत नाही. तथापि झाले हे चांगले झाले असेच तुला वाटेल अशी माझी खात्री आहे. कारण, चांगल्याकडे सर्वच माणसांचा ओढा असतो. सुनन्दाचे वडिल तेथे तिला भेटल्यामुळे तिच्या बाबतीत तर दुधांत साखर असेच झाले असल्यास नवल नाही. शिवाय तिची प्रकृति तेथे चांगली राहिली. सध्या मी पन्हाळ्याला १० जूनपर्यन्त राहण्याचे ठरवून आलो आहे.

येथे सुनन्दाशिवाय श्री. हरिभाऊ मोहनी व सत्यबाला आहेत. श्री. हरिभाऊ व सत्यबाला २५ ता. ला परत जातील.

सासवडचे काम तू घेण्याबद्दल जे आपले मत कळविले आहेस ते सध्या ठीकच आहे. श्री. बापूराव शेंडे यांना तू पत्र लिहिलेस का? ज़रूर लिही. मी जून ११ ला पुण्याला जाण्यापूर्वी. तुझे पत्र गेले असेल तर मलाही त्यांचेशी बोलता येईल. पुण्याहून सासवड फक्त १९ मैलच आहे. कुणी सांगावे पुण्याच्या कामामुळे सासवडचे काम करण्याची शक्ति व वृत्ति तुझ्यात उत्पन्न होणार नाही? माणसांतील शक्ति त्याच्या त्यालाच समजत नाहीत. पत्राचे उत्तर पाठवशीलच.




तुझ्या आईस व वडिलांस नमस्कार.

कळावे.
दादा

– ३ –

आश्रम – सासवड, जि. पुणे
कॅम्प – वेळापूर
१६-७-५५

सप्रेम आशीर्वाद,

तुझे ता. १५ चे पत्र आज मिळाले. तुझ्या मागच्या पत्राचे उत्तर तू कदाचित अकलूजला यात्रेत चार दिवस रहाण्यासाठी येशील म्हणून दिले नव्हते. तुझा अभ्यास व यासंबंधी तू जे लिहिले ते समजले. त्यातील अडचण तू लिहिलीस ती समजली. ते लिहिलेस त्याप्रमाणे काही अंशाने ती खरी आहे. मुख्य प्रश्न दोन आहेत. एक जरुरीप्रमाणे तुला अर्धा वेळ (half time) देता येईल का? व तशी व्यवस्था केली असता भाऊला जी मदतीची जरुरी आहे ती पुरी होईल का? दुसरे की half time काम करून आर्थिक गरज पुरी पडणार नाही. त्यासाठी मासिक पगारापेक्षा तुला किती अधिक मदत करावी लागेल याची बरोबर कल्पना तू या पत्रात दिलेली नाहीस, ती कल्पना बरोबर आल्याशिवाय तुझ्या प्रश्नाचे 'हो' किंवा 'नाही' उत्तर देणे कठीण आहे. म्हणून पहिल्या प्रश्नाविषयी म्हणजे कामाविषयी तू श्री. भाऊशी बोलावेस, दुसऱ्या कामाबद्दल तू सुनंदा व जरूर आणखी कोणाला विचारून नीट हिशोब करून ठरवावे व कळवावे. तुमचा दोघींचा भाऊ व बापूराव यांच्याशी जो संबंध आला आहे तो लक्षात घेता तुम्ही अशा बाबतीत विना संकोच त्यांच्याशी बोलण्याला काहीच हरकत नाही. ते जे बोलतील किंवा सांगतील त्याचा आपलेपणाने विचार करावा म्हणजे त्याबद्दल परकेपणा न ठेवल्यामुळे विषाद किंवा दुःख वाटणार नाही. म्हणून तुला एवढ्या कामासाठी यात्रेमध्ये मला भेटण्याला येण्याची जरुरी नाही. मला वाटते हे काम पत्राने होऊ शकेल.

कालपासून सोलापूर जिल्ह्याची यात्रा सुरू झाली. आज वेळापूरला चि. कमलच्या भावाकडेच मुक्काम आहे. चि. कमल ही मुद्दाम त्यासाठी येथे आली आहे. येथून ती पुण्यालाच येणार आहे. माझी प्रकृति ठीक आहे. पुन्हा पत्र पाठवशीलच.

कळावे.
दादा

– ४ –

निसर्गोपचार आश्रम
उरुळी (जि. पुणे)
२८ जेष्ठ, ७९, १८-६-५७

सप्रेम नमस्कार,

काल सायंकाळी एकाएकी चि. वृन्दाचे वडील बन्धू – श्री. राम – येथे आले. रात्री येथेच होते. आज सकाळी ते मुंबईच्या वाटेवर पुण्यास परत गेले. त्यांचे चि. वृन्दाशी जे बोलणे झाले व ज्याचा सारांश तिने मला नंतर सांगितला व माझ्याशी त्यांचे जे बोलणे झाले त्यावरून तुम्हांस पत्र लिहावे असे मनात आले व म्हणून हे पत्र लिहीत आहे.

निरनिराळ्या निमित्ताने निरनिराळ्या वेळी आपली भेट झाली आहे, पण विशेष बोलण्याचे प्रसंग मिळालेले नाहीत. फक्त भिवंडीला भूदानाच्या शिबिराच्या वेळी तुम्ही तेथे आला असता तुमचे व माझे बोलणे झाले. पण त्याचाही विषय व प्रयोजन विशिष्टच होते. यामुळे ज्याने माणसाच्या जीवनदृष्टीचे व विचारसंपत्तीचे सम्यक् ज्ञान होईल असा तुमचा माझा परिचय झालेला नाही. चि. वृन्दाची आई म्हणूनच मी तुम्हाला ओळखतो.

तथापि तुमच्याविषयी जे काही मी ऐकले आहे व जे काही थोडे पहावयास मिळाले आहे, त्यावरून चि. वृन्दा ज्या जीवनदृष्टीचा व विचारप्रणालीचा स्वीकार करीत आहे, ते तुम्हीच लावलेल्या वृक्षाला आलेले फळ आहे असे तुम्ही मानीत असाव्यात व त्याचे तुम्हाला एकप्रकारे समाधान असावे असे मी मानतो. हे माझे मानणे बरोबर आहे असे मी समजण्याला दुसरे कारण असे की, तुम्ही चि. वृन्दाला पुनः माझ्याबरोबर येथे राहण्याला संमती दिलीत. मे च्या सुरुवातीला येथून डहाणूला जाण्यापूर्वी तिच्या पुढील जीवनाबद्दल विशेषतः नजीकच्या भविष्यकाळातील कामाबद्दल वृन्दा माझ्याशी बोलली होती व त्या विषयीचे माझे विचार इ. मते मी तिला सांगितली होती. डहाणूला गेल्यावर तू आपल्या आईशी यासंबंधी विचारविनिमय कर व तिच्या संमतीने जे ठरवावयाचे ते ठरव, असा त्यावेळी तिला सल्ला मी दिला होता. ७ ता. ला जेव्हा ती येथे आली, तेव्हा तिने तुमच्याशी झालेल्या विचारविनिमयाचे सार मला सांगितले. त्यावरून मी असे समजलो आहे की, सध्या तिचे जे विचार आहेत व ती जे नजीकच्या भविष्यकाळात करू इच्छिते त्याला तुमची संमति आहे, जे काही आता करावयाचे ते स्त्रीला तिच्या जीवनात व कार्यात ज्यामुळे स्थैर्य व शाश्वति मिळेल व त्याचे सातत्य टिकेल त्याचा पाया झाले पाहिजे, हे जे आपले मत तुम्ही तिला सांगितलेत

व ह्या बाबतीत विचार करावयाचे स्वातंत्र्य तुम्ही तिला दिलेत ह्या दोहोंशी मी पूर्ण सहमत आहे. मीही तिच्या बाबतीत व चि. सुनन्दाच्या बाबतीत त्यांच्या प्रकृतीला व प्रवृत्तीला सुसंगत अशा रीतीने पण याच दिशेने विचार करतो.

भूदान यात्रेच्या निमित्ताने १९५३ मध्ये प्रथम वृन्दाचा व माझा परिचय झाला. त्यानंतर निरनिराळ्या निमित्ताने तो वाढत गेला. गेले एक वर्ष तर ती सतत माझ्याजवळच राहिली. त्याचा स्वाभाविक परिणाम म्हणून व विशेषतः उपोषणाच्या काळात माझ्याबरोबर उरळीला जी ती माझ्याबरोबर राहिली त्यामुळे तिच्याबद्दल माझ्या मनात एक प्रकारचा स्नेहभाव उत्पन्न झाला आहे. म्हणून योग्य वेळी तुम्ही सुचविता त्याप्रमाणे तिच्या जीवनाबद्दल व कार्याबद्दल मी विचार करीन एवढेच मी तुम्हाला आता सांगू शकतो. तिची आई म्हणून तुमचा तिच्या बाबतीतील अधिकार असामान्य आहे. तसेच, तिचे स्वतःचे भविष्य ठरविण्याचे स्वातंत्र्यही तितकेच स्वयंपूर्ण आहे. म्हणून याबाबतीत तुमच्या साहाय्याने व संमतीने ती जे ठरवील किंवा स्वतंत्रपणे स्वतःच्या विवेकबुद्धीचा जो कौल मिळेल त्याप्रमाणे ती ठरवील त्याला माझी केव्हाही संमतीच राहील व माझ्या अल्पशक्तीप्रमाणे त्यात जेवढी मला मदत करता येईल तेवढी मी करीन. तुम्हाला पत्र लिहिण्याचा पहिलाच प्रसंग असल्यामुळे व तुम्ही जाणिवेने अशा गोष्टीचा विचार करणाऱ्या आहात म्हणून तुम्हाला अधिक लिहित नाही.

तुमच्या सवडीने पण या पत्राच्या उत्तराची मी अपेक्षा करतो. चि. वृन्दाच्या वडिलांना नमस्कार व इतरांना आशीर्वाद.

कळावे.
*शंकरराव*

महाराष्ट्र सेवा संघाच्या पुणे येथील कार्यालयात जेव्हा मला अर्धवेळ काम दिले गेले, तेव्हा सुनंदा व मी श्री. बापूराव शेंडे यांच्या घरी पेईंगगेस्ट म्हणून राहात होतो. माझा अभ्यास चालू असे. जवळच्याच प्रा. लागूंकडे इंग्लिशच्या क्लासलाही जाण्याची सोय जमविता आली. सूतकताई मी भरपूर करीत असे. ती एक कलाच आहे. या घरातील सर्वांशी अत्यंत जिव्हाळ्याचे संबंध जुळले, पण त्याचे अधिकतर श्रेय मी त्या कुटुंबातील सर्वांनाच जास्त देते. 'To give is to receive' असे म्हणतात. आमच्या बाजूने त्यांच्या पदरात काही पडले का? माहीत नाही.

**उरुळीकांचन – निसर्गोपचार – 'उपोषण' अनुभवही!**

उरुळीकांचनचा निसर्गोपचार आश्रम म्हटलं की आठवतात बाळकोबाजींची (विनोबाजी भावे यांचे बंधू) सुरेल भजनं! यांच्यामुळे दादांचेही येथे एक वेगळे नाते जडले, व विशेषतः बाळकोबाजींशी. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र आंदोलन शंकररावांनी १९५९ पर्यंत चालवले. त्या दहा वर्षे चाललेल्या आंदोलनात त्यांना अनेक दिव्यातून जावे लागले. त्यांचेपासून त्यांना मनस्वी मानसिक क्लेश झाले. मानसिक शांती व आत्मशुद्धीसाठी त्यांनी तीस दिवसांचा उपवास केला तो या आश्रमात. उपोषणानंतर त्यांनी दिलेल्या निवेदनात म्हटल्याप्रमाणे – "उपोषणामुळे हा आश्रम व आश्रमातील सेवक यांच्याशी कायमचा संबंध जडलाच आहे. ह्या संस्थेत सत्संग, आश्रमीजीवन व उपरिनिर्दिष्ट सेवेची सिद्ध असलेली साधने यांचा त्रिवेणी संगम झालेला आहे". "हे निवेदन मी लिहावे असे बाळकोबाजींनी पुनः पुनः आग्रहाने सांगितले. या सत्पुरुषाच्या शब्दाच्या शक्तीनेच ते निवेदन लिहवले." "बाळकोबाजींचा सत्संग हा ईश्वरी प्रसादच. गीतारहस्य व शांकरभाष्य स्वतःच्या अनुभवाच्या आधारे वाचून दाखवीत व त्याच्याद्वारा ब्रह्मविचार होई. बाळकोबाजींच्या ब्रह्मविचाराच्या गोष्टीतून लक्षात आलेली बाब म्हणजे – निव्वळ बौद्धिक ग्रहण शुष्क असते. ते हृदयाच्या माधुरीने रसमय व्हावे लागते. जेव्हा हे ग्रहण रसमय होते तेव्हाच अखंड चिंतन, मनन, निदीध्यास करणे सुलभ होते. नूतन साधनेसाठी बाळकोबाजींकडून हा एक मोठा मौलिक विचार मिळाला".

बाळकोबाजींच्या साधनेचा एक उपक्रम होता. त्यात आम्ही सक्रिय सहभागी होतो. तो उपक्रम असा – गावाबाहेर एक-दोन खंदक खोदलेले होते. तेथे गावकरी प्रातर्विधीसाठी येत. त्यानंतर सकाळी १० च्या सुमारास आम्ही तेथे जाऊन जवळचीच कोरडी माती खोदून, टोपल्यांमधून भरून, वाहून आणून त्या खंदकात टाकत असू. हा रोजचाच कार्यक्रम, अनेक दिवस चालू असल्याचे स्मरते. बाळकोबाजी व शंकरराव यांचा तो 'साधने'चा उपक्रम असला तरी, मी काही तशी 'साधक' नव्हते. म्हणून मला वाटत राही की, ह्यात लोकसंवाद-प्रक्रियेचा भाग कमी आहे, लोकप्रबोधनाच्या भागाऐवजी एकतर्फी सेवेचा हा प्रकार आहे. कारण 'शौच' करणारे कधीही आमच्या या कार्यात सहभागी झाले नाहीत. मात्र आज काही गोष्टी जाणवतात. सर्वोदयी समाजात 'मैला वाहून नेणे' या प्रथेला अशा खड्डापद्धतीने केव्हाच काटशह दिलेला आहे; पण अद्यापी काही ठिकाणी समाजात जुनी पद्धत चालूच आहे!









दुसरी गोष्ट म्हणजे घरोघरी 'संडाससफाई' हे काम, अपवाद वगळता, स्त्रियांच्या माथी लिहिलेले असते. 'कुटुंबजीवन' या विषयात मुलामुलींच्या मानसिकतेत केवढा पल्ला अद्याप आचरणात गाठावयाच्या निकडीचा आहे!

येथील वास्तव्यात निसर्गोपचारावर बरेच वाचन व प्रात्यक्षिक झाले. आहारातून आरोग्य, विविध नैसर्गिक उपचार पद्धती, 'उपवासा'चे या सर्वांत स्थान – ग्रामीण परिसराला याची उपयुक्तता. आपणही काही प्रयोग करून पाहावेत असे वाटल्यावर दादांशी चर्चा केल्यानंतर मी हि अकरा दिवसांचे उपोषण केले. एक अनुभव मिळाला/घेतला!

या काळात सर्वात महत्त्वाचे म्हणजे गांधीजींच्या चरित्राचे दादांसमवेत केलेले वाचन! मला वाटते, प्यारेलालजींनी ते लिहिलेले असावे. ८"x१०" आकाराचा मोठा ग्रंथ! रोज वाचून दाखविण्याचे काम माझ्याकडे होते. त्याचे चक्क 'रवंथ' होत असे. रोज नियमित थोडे थोडे करीत पूर्ण केले असल्याचे स्मरते!

**शिष्या तुकयाची – राजस्थानात तुकाराम अभंग**

राजस्थानमध्ये खादीग्रामोद्योग विद्यालयात काही दिवस मुक्काम होता. त्या काळात "संत तुकाराम : संक्षिप्त जीवनी तथा वाणी" ही एकशे आठ पानी पुस्तिका लिहून झाली, याचे काही श्रेय श्री. जवाहिरलाल जैन यांच्या 'योजकत्वा' लाही द्यायला पाहिजे. कारण, त्यांनी सुचविल्यावरूनच हा उपक्रम सुरू झाला.

तुकारामांच्या अभंगांचा त्यानिमित्त खूप अभ्यास झाला. राजस्थानात असल्यामुळे तेथे एकही मराठी शब्द वाचायला वा ऐकायला मिळत नसे. तेथील आत्रेयजी मात्र मराठी जाणणारे होते. तसेच, तेथील भवानीभाई संतवाङ्मयाचे व्यासंगी होते. या दोघांसमवेत या विषयावरच्या चर्चा रंगत व अगदी यथार्थ शब्द वा अर्थछटा यासाठी एकेकदा कशी शोधाशोध करावी लागे ते आठवते. तुकाराममय झाले होते.

या पुस्तिकेला शंकररावांनी दिलेली 'प्रस्तावना' सोबत आहे. त्यावरून त्यांच्या माणसे जोडण्याची, त्यांचे जाळे विणण्याची कल्पना येते. तसेच, विनोबाजींनी "शंकररावांचे जीवन 'सेवकत्व, साधकत्व आणि लोकनेतृत्व; या तीन गुणांची त्रिपदा गायत्री" असे म्हटले आहे, त्याचीही काहीशी झलक वा साक्ष या प्रस्तावनेत मिळते –

**– प्रस्तावना –**

एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति – अविभक्त विभक्तेषु – यह भारत की आध्यात्मिक एकता तथा समन्वययुक्त संस्कृति की विशेषता है। यही भारत की आध्यात्मिकता और सांस्कृतिक विरासत की संपन्नता का शाश्वत स्त्रोत है। प्रत्येक भारतवासी के स्वभाव तथा सत्त्व में यह बात दृढ होगी तो स्वतंत्र भारत अमर होगा। इतना ही नहीं, बल्कि विश्व में शान्ति और सुख की प्रस्थापना के काम में भी वह इस विरासत को विश्व की सेवा के लिये समर्पित कर सकेगा। वास्तव में किसी भी समाज की धारणा और एकता उसकी आध्यात्मिक और सांस्कृतिक एकता पर ही आधारित होती है, क्यों की स्नेह, सहिष्णुता और अनाक्रमणशीलता – ये इस एकता के गुण होते हैं। इसके विपरित आधुनिक राजनैतिक एकता जनता में अस्नेह, असहिष्णुता और आक्रमणशीलता इन अवगुणों के आविष्कार तथा पोषण का ही साधन बन गयी है।

यदि स्वतंत्र भारत की धारणा और संघटना को अभंग एकता की नींव पर खड़ी करना अभीष्ट है तो भारत की विभिन्न प्रादेशिक भाषा, साहित्य तथा संस्कृति के सौंदर्य का भारतवासियों को परिचय होना नितांत आवश्यक है। इस दिशा में छोटे से कदम के तौर पर आजादी के थोडे ही समय बाद मद्रास के मेरे एक स्नेही श्री. सत्यनारायण मोटूर और मैंने राष्ट्रपति डॉ. राजेंद्रप्रसाद तथा अन्य राष्ट्रीय नेताओं की अनुमति और सहयोग से "अखिल भारतीय हिन्दी परिषद" और "भारतीय संस्कृति संगम" इन दो संस्थाओ की स्थापना की।

१९५२ के सेवापुरी सर्वोदय सम्मेलन में सर्व सेवा संघ ने श्री. विनोबाजी के नेतृत्व में भूदान आंदोलन को भारत व्यापी बनाने का और दो वर्ष में पचीस लाख एकड़ जमीन भूदान में प्राप्त करने का संकल्प किया। इस संकल्प की पूर्ति के लिये बहुत से प्रांतों की मैंने पैदल यात्रा की। इस पदयात्रा में भारत की सांस्कृतिक एकता की और उसके संगम की आवश्यकता मुझे अधिक तीव्रता से महसूस हुई।

भूदान आंदोलन के कार्यकर्ताओ में आध्यात्मिक बंधु-भगिनी भाव अधिक बढ़े, इसके लिये विभिन्न प्रांतों के कार्यकर्ताओं के दीर्घ-कालीन शिबिरों का आयोजन करके उनमें स्वयं जाकर रहूँ, ऐसा एक विचार एक महीने के उपवास के बाद के शुद्ध चिंतन में मुझे सुझा। सर्व सेवा संघ के सहकारियों ने इस विचार का स्वागत किया। श्री सिद्धराजभाई ढढ्ढा के स्नेह परिणाम-स्वरूप जयपूर के पास शिवदासपुरा के खादी ग्रामोद्योग विद्यालय

अनुक्रमणिका

में राजस्थान के कार्यकर्ताओं का तीन सप्ताह का पहला शिबिर हुआ।

राष्ट्र की या विश्व की एकता की इमारत संतों की जीवनियों और आध्यात्मिक अनुभव से प्राप्त दैवी सम्पत्ति की नींव पर ही खड़ी रह सकती है, क्योंकि संतों के हृदय विश्व प्रेम से तथा सहिष्णुता की भावना से भरे हुये होते हैं। शिवदासपुरा के शिविर में रोज सायंप्रार्थना में तुलसीदास की रामायण का पाठ और संत मीरावाई तथा संत सूरदास के भजनों का कार्यक्रम खासतौर पर रखा था। शिबिर शुरू होने के कुछ दिन बाद विद्यालय के आचार्य श्री जवाहिरलालजी जैन ने सुझाया कि मेरे काम में मदद करने के लिये मेरे साथ आयी हुई श्री वृन्दा अभ्यंकर रोज सुबह की प्रार्थना में मराठी संत शिरोमणि श्री तुकाराम का एक अभंग मराठी में बोले और साथ साथ उसका हिन्दी अनुवाद भी कहे। संस्कृति-संगम, और वह भी संत-तीर्थ पर, यह कल्पना मुझे पसन्द आयी और चि. वृन्दा ने भी उसका आनंद और उत्साह से स्वागत किया। शिबिर के आखिर तक रोज सुबह चि. वृन्दा तुकाराम का अभंग मराठी में बोलती और उसका अभ्यासपूर्वक किया हुआ अनुवाद पढ़कर सुनाती थी। आवश्यकतानुसार कहीं-कहीं विस्तार से भी समझा देती थी।

उस संत-तीर्थ के पवित्र संगम पर शिबिरार्थी मनोयोगपूर्वक स्नान करते और सात्त्विक सुख का अनुभव करते थे – यह मेरे लिये तथा शिबिर के सब भाई बहनों के लिये भी अपने जीवन में एक संस्मरणीय प्रसंग सिद्ध हुआ। उसका अनुरूप स्मारक यह "संत तुकाराम : संक्षिप्त जीवन तथा वाणी" है। मुझे विश्वास है कि हिन्दी भाषी जनता इसका हृदयपूर्वक स्वागत करेगी।

*शंकरराव देव*

**दादांचा परिवार**

'नसोनी संसारी' असे जरी असले तरी, दादांचा परिवार फार मोठा होता. या परिवाराशी माझाहि कमीअधिक प्रमाणात, प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरीत्या संबंध आला. सर्व सेवा संघ, गांधी स्मारक निधी, हिंदी राष्ट्रीय कामगार संघ, महाराष्ट्र सेवा संघ, राष्ट्रभाषा सभा, कोरगावकर धर्मादाय संस्था, सेवक संघ, ग्रामसेवाश्रम, छात्रालये, मौनी विद्यापीठ, चरखा संघ, ग्रामोद्योग संघ, इत्यादी अनेक संस्था, तसेच नवभारत, समाजप्रबोधन संस्था, सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला अशा संस्था व त्यांचे कार्यकर्ते.

सासवड आश्रमात आचार्य भागवत व श्री. प्रेमाबाई कंटक यांच्याशी ओळख झाली. 'अति कडक' अशी दोघांबद्दल ऐकीव प्रतिमा होती; पण प्रत्यक्षात खूप स्नेहाचा, जिव्हाळ्याचा अनुभव आला. पुढे एकदा त्या डहाणूस आवर्जून घरी येऊन गेल्या. आश्रमात एकदोन महिने होते. नंतर ७० साली सासवडच्या मेळाव्यात मी मुद्दाम गेले होते, तेव्हा प्रेमाबाईंनी उत्स्फूर्त स्वागत करून आस्थेवाईक विचारपूस केली. श्री मौनी विद्यापीठात आचार्य भागवत यांचे – कुलगुरू असल्याने – कायम वास्तव्य असे, तेव्हा पुढेहि परिचय घनिष्ट होत चालू राहिला. पुढे कोरापूटला सर्वोदयी समाज/ग्रामराज्य प्रस्थापनेच्या कामात ठाण मांडून बसलेले अण्णासाहेब सहस्रबुद्धे, किंवा महाराष्ट्र पदयात्रेत परिचित झालेले रावसाहेब पटवर्धन, अनेक प्रश्नांवांवत स्पष्ट विचार, सूक्ष्म चिंतन नेमकेपणाने मांडणारे आचार्य दादा धर्माधिकारी, विमलाबाई ठकार, गोपुरी आश्रमातील आप्पासाहेब पटवर्धन, राजघाट (काशी) येथील अच्युतराव पटवर्धन, जे. कृष्णमूर्ती, कारवारचा रामदास आश्रम इत्यादी काही त्यांचे सहकारी, काही ज्येष्ठ संबंधी, मित्रपरिवारातील कित्येकजण आठवतात. आत्मकथेच्या निवेदनात उल्लेखलेली रमणमहर्षींबद्दलची प्रभावकथा आम्हाला त्यांनी एकतानतेने ऐकवलेली स्मरते.

एकतारीसह अचानक अवतरणारे शास्त्रीजी, मामा क्षीरसागर, बाबा रेडीकर काय किंवा "अभ्यास करणारी तू. म्हणून सायीखालचा साका घालते बघ तुझ्या कॉफीत!" असं म्हणणाऱ्या सासवड आश्रमातील माई काय, कित्येकजण डोळ्यासमोर येतात.

सारांश, अनेक व्यक्ति, अनेक संस्था, अनेक विधायक कार्यप्रवृत्ती, व्याख्याने, गोष्टी, चर्चासत्रं, सामाजिक, कौटुंबिक, ग्रामीण, आदिवासी इ. प्रादेशिक जीवन असे अवलोकनार्थ प्रचंड विस्तृत अवकाश मिळाले!

दर दिवशीची निरीक्षणं डायरीत नोंदवून ती पाने मी घरी पाठवीत असे! त्यातील काहीच आज उपलब्ध आहेत – काही निरीक्षणे –

"चारही दाक्षिणात्य भाषा एकमेकींना किती जवळच्या आहेत!", "केरळात साक्षरतेचे प्रमाण खूपच, मिशनऱ्यांमुळे का? या प्रदेशाचा 'स्वच्छता' हा खास विशेषच वाटतो. शेतकरी स्त्रिया पांढरे सफेद कपडे वापरतात!"

"बंगालीचे गुजराथीशी बरेच साम्य आढळते, लिपीसाधर्म्य म्हणून हिंदी-मराठीशी जवळची वाटते, तर काही अक्षरे मोडी लिपीसारखी इ."








"मद्रासला हिंदी प्रचार सभेचे श्री सत्यनारायणजींकडे उतरलो असता त्यांच्या दोन्ही मुली 'हिंदी' बोलू शकत होत्या, ह्याचे आश्चर्य वाटते."

१९५७ साली नोंदवलेली ही निरीक्षणे आज वाचताना गंमतशीर वाटतात!

**गारगोटी – श्री मौनी विद्यापीठात – "ठेव-उठाठेव"**

श्री मौनी विद्यापीठात गारगोटी येथे श्री. कोरगावकर सेवक संघाचे स्नेहसंमेलनास शंकरराव आले असताना डॉ. जे.पी. नाईक ह्यांनी ग्रामीण विद्यापीठाचा पंचवार्षिक आराखडा त्यांना विस्तृत स्पष्टीकरणासह समजावून सांगितला. त्यावर मी तर भारावूनच गेले. श्री मौनी विद्यापीठ हे कार्यक्षेत्र म्हणून मला खूप योग्य वाटते असे दादांना सांगितले. आचार्य भागवत यांना ही कल्पना सांगितल्यावर त्यांनी ती आनंदाने उचलून धरली. नंतर इथेच प्रा. मुकुंदरावांशी गाठ पडली. अधिक परिचयानंतर आम्ही उभयतांनी विवाह निर्णय घेतला. आम्ही दोघांनी विवाह करण्याचे ठरवले आहे ही गोष्ट शंकररावांना कळल्यावर त्यांना अतीव आनंद झाला. या कन्येचा विवाह माझी कन्या म्हणून करणार, अशी उत्स्फूर्त इच्छा व्यक्त केल्यावर डॉ. जे.पी. नाईक व डॉ. चित्राताई नाईक यांनी ही इच्छा लगेच उचलून धरली व त्यातून शंकरराव देवांसाठी आमच्या विवाहाचा एक खास सांस्कृतिक कार्यक्रम 'कण्वमुनींची मानसकन्या' या रीतीने श्री मौनी विद्यापीठाच्या महात्मा फुले सभागृहात मौनी विद्यापीठ परिवारातर्फे सोळा एप्रिल १९५९ रोजी साग्रसंगीत साजरा झाला. या कार्यक्रमाला माझ्या आईनेही मनापासून दाद दिली. ती हजर राहू शकली नाही; पण तिने स्वरचित छापील मंगलाष्टके पाठवली होती. ती सुनंदाने गायली. श्री. जे.एल. रानडे यांचे 'कण्वमुनींची मानसकन्या' हे सुरेल भावगीत झाल्यावर दादांचे भावपूर्ण भाषण झाले. तेथे उपस्थित प्राचार्य देवदत्त दाभोलकर (माजी कुलगुरू, पुणे विद्यापीठ) यांना उद्देशून ते म्हणाले –

"ही आमची ठेव (वृंदा) आज आपल्या स्वाधीन करतो".

त्यावर देवदत्त म्हणाले –

"आमची ही 'उठाठेव' (मुकुंद) आम्ही तुमच्या स्वाधीन करतो".

ही 'ठेव-उठाठेव' श्री मौनी विद्यापीठाने त्या दिवसापासून आजतागायत छत्तीस वर्षे शंकररावांचाच वारसा म्हणून पारिवारिक रसिकतेने सांभाळली.

मौनी विद्यापीठ परिवारात आल्यानंतर माझी शिक्षण क्षेत्रातच अध्ययनयात्रा सुरू झाली. शंकरराव देव हे कोल्हापूरच्या कोरगावकर ट्रस्टचे अध्यक्ष या नात्याने श्री मौनी विद्यापीठात वर्षातून काही काळ वास्तव्यास असतच. कारण, मौनी विद्यापीठाच्या तीन प्रमुख संस्थापक संस्थांपैकी 'गोविंदराव कोरगावकर ट्रस्ट' ही एक प्रमुख संस्थापक संस्था होती.

शंकररावांच्या आवडीच्या आयुर्वेद, आहार-प्रयोग, अध्यात्म, योगशास्त्र यावर मुकुंदरावांची त्यांच्याशी तासनतास चर्चा रंगत असे.

चीनच्या यात्रेला जाण्याअगोदर शंकररावांनी मला तेथे येणे जमेल काय म्हणून विचारले होते; पण लहान मुले असल्याने मला जाता आले नाही, याची आम्हा दोघांनाही चुटपुट लागली होती.

सर्वोदयी परिवाराशी आमचा असलेला संबंध घनिष्ठ होण्याचा योग पुढे अण्णासाहेब सहस्त्रबुद्धे यांच्यामुळे वाढला. यंदा सावरकुंडला (गुजरात राज्य) येथे गांधीजींचे १२५ वे जन्म वर्ष व विनोबाजींची शताब्दी नावे सर्व सेवा संघाच्या व सर्वोदयी कार्यकर्त्यांच्या संमेलनामध्ये 'प्रयोग परिवार'चा परिचय करून देण्यासाठी दाभोलकरांना खास आमंत्रण करून दोन तास या कार्यपद्धतीचे विवरण भारतातील सर्व सेवा संघ व सर्वोदयी कार्यकर्त्यांसमोर करण्याची संधी दिली होती. वयोमानानुसार नुकतीच मीही प्राचार्यपदातून निवृत्त झाल्यामुळे हजर होते. सभेच्या सुरुवातीसच 'आम्ही सर्वोदयी परिवाराशी शंकररावांतर्फे जोडले गेलेलो आहोत. कारण, मी त्यांचा जावई आहे व आगामी वर्ष शंकररावांचे जन्मशताब्दी वर्ष आहे', असे एक स्मरण व अभिवादन आपल्या विवरणास सुरुवात करण्यापूर्वी प्रा. दाभोलकरांनी करून शंकररावांना एकाअर्थी माझ्या वतीनेच अभिवादन केले होते. जीवनाच्या एका टप्प्यावर जमलेली नातीगोती किती रीतीने घट्ट बंध धरून उत्स्फूर्तपणे सामोरी येत असतात, याचा एक तरल आध्यात्मिक अनुभव मला तेव्हा मिळाला होता.

※※※

# 'दादा'

**उषा पी. शरण**

ती 'नवभारत'ची ठळक अक्षरांतील पाटी अजून डोळ्यासमोर येते आहे. कॉलेजातून सायकलवरून उतरताना सहजच तिकडे लक्ष जावयाचं. एका दुसऱ्या लहानशा पाटीवर अक्षरं होती – 'हरि कृष्ण मोहनी'. ते माझे काका, 'दांडी मार्च'चे शूर सैनिक, लेखक नी *नवभारत*च्या संपादक मंडळाचे एक सदस्य. त्यांच्यामुळे व माझ्या आत्याबाई – पद्मश्री कमलाताई हॉस्पेट – यांच्यामुळे आमच्याकडे नागपुरांत माननीय शंकरराव देव यायचे.

डॉक्टर इन्दुताई देव – शंकररावांच्या भगिनी – पण आमच्या संयुक्त परिवारांत यायच्या. त्या मला आवडायच्या. आपल्या भावास त्या 'दादा' म्हणत. त्यांचं बघून मी पण शंकररावांना 'दादा'च म्हणायची.

**मला हरिकाकांनी 'नको' म्हटलं –**

ते दिवस होते 'भूदान' आंदोलनाचे. माझा चुलत भाऊ दिवाकर विनोबांच्या यात्रेत पश्चिम बंगालमध्ये जाऊन आला होता. चुलत बहीण माणिक पण यात्रेत जाऊन आली होती. मलाही वाटलं की, 'आपणही का न जावं?'

तसं मी हरिकाकांना विचारलं पण. ते म्हणाले, "उषा, तू काही आदर्शवादी दिसत नाहीस. तू तर खादीचे कपडेही वापरत नाहीस. तू नको जाऊस".

मग मी दिवाकर-माणिकच्या आईकडे विचारायला गेले. म्हणाले, "सरस्वतीकाकू, मला दादांच्या बरोबर तामिळनाडूच्या यात्रेत जावंसं वाटतंय. पण मी खादी तर नाही वापरत. जरी हरिकाकांनी मला 'नको' म्हटलंय तरी, दादांनाच विचारायला काय हरकत आहे?" त्या म्हणाल्या "काही हरकत नाही. मी देईन तुला खादीच्या दोन साड्या". काकूच्या पाठिंब्याने उत्साह आला. आम्ही दोघी गेलो स्टेशनवर. सर्व प्रांजलपणे दादांना सांगितले. त्यांनीही मला माझी 'सेक्रेटरी'ची कामं समजावून सांगितली. यात्रेत मच्छरदाणी व पदयात्रेत उपयोगी पडेल असं पादत्राण, व सर्वांत महत्त्वाचं म्हणजे, लेखणी वगैरे बरोबर घेण्याची सूचना त्यांनी दिली.

मी आईला हे सर्व सांगायला नी तिची पण परवानगी घेण्यास गेले. आई मला न्याहाळू लागली. जसं काही खूप दिवसांनी मला बघत होती. मला तिनं विचारलं, "तुझे डोळे सुजल्यासारखे दिसतात. अजूनही तू रडतेस का?" हो, मला रडू यायचं. जास्त नाही पण डोळे पाणावयाचे, कारण मला माझ्या मीरावहिनींची आठवण सारखी यायची.

आजही कंठ दाटून येतो आहे. त्या अकल्पित गेल्या. ज्या दिवशी सुंदर लेकीला जन्म दिला त्याच दिवशी त्या आम्हाला सोडून गेल्या होत्या.

आई म्हणाली, "तुला बदल करायला हवा. जा. पण जपून पाऊल टाक".

**प्रस्थान**

नागपूर ते वर्धा, माझा एकटीनं केलेला तो पहिला प्रवास. रेल्वेच्या डब्यातली खिडकी उघडताना माझं बोट चेंगरलं होतं. आईची आठवण आली. वर्ध्याहून पुढचा प्रवास सुरू झाला. यात्रेत सासवडच्या आश्रमातल्या शकुन्तला चौधरींशी माझी सहज व पक्की मैत्री झाली. दादांच्या व भूदान यात्रेच्या निमित्ताने सुनंदा व वृन्दा या माझ्या जीवनभराच्या मैत्रिणी झाल्या.

**सेक्रेटरीचं काम व डायरी लेखन**

डायरी लिहिणं मला ठाऊक नव्हतं. पण आवडीनं व सहजतेनं शिकले. अनुशासनाचं महत्त्व मनाला पटत होतं. नियमितपणाने कांम करायला व रोज-रोज प्रार्थना करायला कधीमधी जीवावर यायचं. पण चालणं व तामिळनाडूच्या भूमीचं नित्य नवीन दर्शन मला मुग्ध करायचं. खेड्यात जाणं एकदम आवडायचं. यात्रेत ठिकठिकाणाहून येणाऱ्या यात्रिकांचा परिचय करून घेणं व तामिळ भाषेचे शब्द शिकण्याचं जणू वेड लागायला लागलं. कधी हिन्दी तर कधी इंग्लिश तर कधी अगदी चक्क हावभावांच्या भाषेत बोलण्याची पण मजा वाटत होती. यात्रेच्या त्या बावीस दिवसांत मी जे शिकले त्याचं श्रेय दादांना द्यायला मला आवडेल.

त्यांच्या भाषणांचे भाषान्तर करणारे दुभाषी अजून मला आठवतात. त्या जमिनीच्या दिलेल्या देणग्या. आज विचार करते की, हे भूदान आंदोलन यशस्वी झालं, की...








पण ते काहीही असो, त्या वेळी यात्रेत मला माहीत नव्हतं की, माझी अवलोकनाची शक्ती थोड्याच दिवसांनी लुप्त होणारी होती.

**अतीत सौंदर्य**

हो, मला मुळीच कल्पना नव्हती की, मी काही दिवसांनंतर एकदम दृष्टिहीन होणार होते!...

त्याहीमुळे बघितलेला तो हिन्दी महासागर नी ती कन्याकुमारीपासून धनुष्यकोडीची यात्रा, रामेश्वर नी मदुराईची अमाप सुंदर देवालये शब्दातीत सुंदर वाटतात.

यात्रेत सभांच्या रिपोर्टाशिवाय, दादांचं पत्र-लेखन व दुसरंही काही लिखाण मी केलं होतं. त्या दिवसांत दादा 'गीता, टिळक व गांधी' या ग्रंथाचं काम करत होते.

मला आठवतं, मी मुंबईच्या एका नर्सिंग होममध्ये होते, तेव्हा दादा मला भेटायला आले होते. उपचार चालले होते पण दृष्टीनी केला होता संप! तिनं ठरवलं होतं की आजन्मच करायचा हरताळ!!...

मला बघून दादांना काय वाटलं कोणास ठाऊक, पण तेव्हा मी म्हणाले, 'या नर्सिंग होममध्ये गोव्याच्या स्वातंत्र्य संग्रामाचे शूरवीर सैनिकही ट्रीटमेंट घेत आहेत'. तेव्हा त्यावर ते नुसते उद्गारले होते, 'त्यांच्यापेक्षाही तू शूरवीर आहेस'.

मला तसं म्हटलेलं नाही आवडलं. दादांच्या व्यक्तिमत्त्वात असं काही तरी होतं की ते आवडायचं नाही.

ऐकणारे कोणत्या मनःस्थितीत आहेत याचं भान काही वेळा त्यांना होत नसावं. पण कोणाचं थोडंसं पसंत नाही पडलं तरी काय माणूस टाकाऊ होत नाही. खूप मोठ्या संयुक्त परिवारात सर्वांनाच हा धडा आपोआप मिळतो. माझी आत्या, मातृ सेवा संघाची संस्थापिका. तिला तर हा धडा अंगवळणीच पडला होता. तिनं अनेक देशभक्तांच्या उपोषणांत त्यांची सेवाही केली होती. असंच एकदा मला तिचं वाक्य आठवतं. 'भनसाळीजींच्या – जे चिमूर-आष्टीच्या कांडात, 'भारत छोडो'च्या क्रान्तियुद्धांत सुप्रसिद्ध झाले होते – तोंडाला, ते कितीही दिवसांचा उपवास करोत, असा दुर्गंध नाही येत; जसा शंकररावांच्या उपोषणात, त्यांच्या तोंडाला.' पण असं म्हणताना ती स्वतः उपचारिका असल्यामुळे नुसतं सत्य विधान करायची. त्यात उपहास नसायचा. तिच्याप्रमाणे मलाही सर्व देशभक्तांच्या उपोषणांचा – त्या अहिंसक सत्याग्रहाचा – अत्यंत आदर वाटतो.

म्हणूनच संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनांत एका सभेनंतर दादांना लाठ्यांनी मारलं गेलं नी त्यांना बराच मुका मार लागला आहे, हे जेव्हा कळलं तेव्हा मला फार वाईट वाटलं. याचं कारण मी संयुक्त महाराष्ट्रवादी होते हे नाही. माझा विदर्भवादी पुढाऱ्यांशी पण काही विरोध नव्हता. पण आता भारतांत तत्त्वांशी विरोध करायला जास्त शुद्ध तत्त्वं येण्याचे दिवस संपणार की काय ही आशंका उत्पन्न झाली. आम्हा बायकांना राजनीतीपेक्षा माणुसकीची नीती सहज समजते.

**आमंत्रण**

दादांच्या बरोबर यात्रेत राहिल्याने त्यांच्याबद्दलची भीती कमी झाली होती. त्यांचं एक पत्र घरी आलं होतं. त्यांना विहारमध्ये लोकनायक जयप्रकाशजींच्या आश्रमात काम होतं. मलाही येण्याचं आमंत्रण होतं. वृन्दा त्यांना साथ देणार होती.

पण, मनात आले, हे आमंत्रण मी कसं बरं स्वीकारू शकेन? मला तर अजिबात दिसत नाही. बोलणं काय करायचं, कारण बोलणारा कोण नी कसा आहे याचा अंदाज येत नाही. बाप रे, मला तर लिहिता नी वाचताही येत नाही आता!

आईनं धीर दिला. वृन्देनं इतक्या चांगुलपणानी व सहजतेनी आश्वस्त केलं की, आमची स्वारी अशाही स्थितीत प्रवासाला तयार झाली! त्या वेळी जे मी केलं नी करवलं गेलं त्याचं अमाप महत्त्व अपंगांच्या पुनर्वसनात आहे. धैर्याने समाजाला तोंड द्यायला या प्रवासामुळे नी दादांच्या धोरणाने व धारणेने मी शिकू लागले.

हो, आता मला कळलं की दुसऱ्यांना 'डिक्टेशन' देणं नी आपले विचार व्यक्त करणं ही फार मोठी कला आहे. आपल्या विचारांची गती दुसऱ्यांच्या लिहिण्याच्या गतीशी जुळवणं म्हणजे एक तारांबळच आहे. दादांना ही कला अवगत होती!

हेही आठवतं की दादा यात्रेत आपल्या डोळ्यांमध्ये कोणतं तरी औषधं टाकायचे. आपली ग्रहणशक्ति वाढली म्हणजे काही न कळणाऱ्या गोष्टी आपोआप उमजू लागतात. त्यामुळे आज आश्चर्य वाटत आहे की, मी त्यांना कधीही विचारलं नाही की, डोळ्यांना कशामुळे त्रास होत होता.

**अपंगत्वावर विजय**

मी विचार करते – मला अंधत्व आलं म्हणून काय मी नेहमीसाठी अभागी झाले? मुळीच नाही. मला एकामागून एक देश-विदेशांच्या शिष्यवृत्त्या मिळत गेल्या. शिवाय आपोआप एक ध्येय डोळ्यासमोर दिसू लागलं. समाजातल्या उपेक्षित एका वर्गाची – अपंगांची – जागृति व समाजात त्यांचे स्थान वर व्हावे म्हणून धडपड. म्हणूनच की काय, ज्या वेळी मुंबईच्या जी.एस. मेडिकल कॉलेजच्या वसतिगृहामध्ये राहात असताना व के.ई.एम.

इस्पितळात ऑक्युपेशनल थेरॅपीचा अभ्यासक्रम पुरा करताना दादा मला भेटायला आले त्यावेळी, मी त्यांच्या पुढे एक प्रस्ताव मांडला. जे मी 'ऑक्युपेशनल थेरॅपी'च्या अभ्यासक्रमात शिकत होते नी जे अनुभवाने शिकले होते ते मला शास्त्रशुद्ध व तर्कसंगतीने मांडावयाचे होते. मला लिहावयाचे होतें एक पुस्तक – 'अपंगत्वावर विजय'. त्या सुमाराला दादा पुण्याच्या समाज प्रबोधन संस्थेचे अध्यक्ष होते. माझ्या प्रस्तावाचं स्वागत झालं. पुस्तक लिहिलं गेलं.

हो, पण या पुस्तकानं एक जादू केली. अमेरिकेत, बॉस्टनला 'टीचर्स ट्रेनिंग कोर्स फॉर द डेफ ॲन्ड डेफ-ब्लाइण्ड' करत असताना मला एक ब्रेल लिपीत पत्र आलं. लिहलं होतं इंग्लिश ब्रेल (स्पर्श) लिपीत. लिहिणारा सांगत होता, "सर्व पुस्तकांत मला तुमचं 'अपंगत्वावर विजय' हे पुस्तक आवडलं आहे. मी जरी मराठी जाणत नाही तरी ते मी वाचलंय. इतकंच नव्हे तर, त्या पुस्तकात इंग्लिश अक्षरे कशी स्पर्श लिपीत लिहिली जातात ते दिलंय. त्यावरुनच हे पत्र मी लिहितो आहे".

मला फारच नवल वाटले! पहिल्याच पत्रात त्यांनी स्पष्ट लिहिलं होतं की, त्यांचा माझ्याशी विवाहाचा प्रस्ताव आहे. किती दिवस मी उत्तर देणं टाळू शकणार? कारण एकामागून एक वर्षावच होऊ लागला! तो थांबण्यास नकारार्थी पत्र इंग्लिश टाइपरायटरवर लिहून अलाहाबादला पाठवलं. पण माझं पत्र गेल्याने पुनः पाठलाग सुरू झाला.

भारतांत येऊन विवाहबद्ध होऊन आज अनेक वर्षे झाली आहेत. दोघांनी मिळून संसारच नाही पण अनेक सामाजिक कामे हौशीनं केली आहेत. ब्रेल लिपी 'स्पर्श लिपी'च नाही तर फार हृदयस्पर्शी व सौंदर्याने नटलेली आहे.

आज दोघे मिळून 'विज्ञान भारती' या एकमेव हिन्दी ब्रेल विज्ञान त्रैमासिकाचं संपादकत्व करतोय. मनात दादांच्या-बद्दल आदरभाव व कृतज्ञता किती आहे हे शब्दांनी कसं सांगू...

❋ ❋ ❋

# ● *नवभारत* स्थायी निधी ●

*नवभारत*चे प्रकाशन नियमितपणे व स्थिर स्वरूपात करता यावे या दृष्टीने *नवभारत* स्थायी निधी उभारला जात आहे.

किमान एक हजार रुपये देणगी देऊन आपण *नवभारत* स्थायी निधीच्या उभारणीस हातभार लावावा असे आवाहन आम्ही करीत आहोत.

येत्या वर्षभरात, पहिल्या टप्प्यामध्ये, पाच लाखांचा स्थायी निधी उभारण्याचा संकल्प आम्ही सोडला आहे. आपणा सर्वांच्या सहकार्याने संकल्प पूर्ण होईल असा विश्वास बाळगतो.

स्थायी निधीस देणगी देणाऱ्या व्यक्तीस दोन वर्षे *नवभारत* भेट म्हणून पाठविण्यात येईल.

मे.पुं. रेगे — *अध्यक्ष*
सीताराम रायकर — *चिटणीस*
प्राज्ञपाठशाळा मंडळ

चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा).

# विभाग दुसरा

शंकररावांनी आत्मचरित्रपर केलेल्या लेखनावर आधारित *दैव देते आणि कर्म नेते* हा ग्रंथ प्रकाशित झालेला आहेच. त्या ग्रंथाच्या आधारे शंकररावांच्या व्यक्तित्वाचे व कार्याचे परिचय-परीक्षण प्रा. दाभोलकरांनी या अंकात अन्यत्र केले आहे. येथे शंकररावांनी स्वत:विषयी केलेले काही लेखन व त्यांची काही पत्रे समाविष्ट केली आहेत. त्या द्वारा आपणास थेट त्यांच्या हृदयात प्रवेश मिळतो असा अनुभव वाचकांना येईल.

# आत्म-निवेदन

("मेरी जीवन-यात्रा मैत्री-यात्रा" या शंकररावांच्या मैत्रीयात्रेत झालेल्या निवडक भाषणांच्या १९६३ *मध्ये प्रकाशित झालेल्या पुस्तिकेतून आत्म-निवेदनपर भाग निवडून अनुवाद करून येथे दिला आहे.*)

ज्याला रक्तसंबंधाचा परिवार म्हणतात अशा परिवाराचा मला फार कमी अनुभव लाभला आहे. त्यामुळेच माझ्यामध्ये काही उणीवा आहेत. व्यक्तिगत कौटुंबिक जीवनाचा अनुभव घेण्याची मला फारशी संधी मिळाली नाही, यात कदाचित ईश्वरी संकेत असण्याची शक्यता आहे. मला आई-वडील, वहीण-भाऊ अशा कौटुंबिक जीवनाचा लाभ मिळाला नाही. कुठल्या तरी दुसऱ्याच कुटुंबांनी मला आपला मानून माझे संगोपन केले. स्वतःच्या कुटुंवात वाढ होण्याचे सौभाग्य मला लाभले असते तर आज जसे माझे जीवन आहे त्याहून ते जीवन काही वेगळ्याच प्रकारचे झाले असते. माझ्या वालपणातच मला प्रेम आणि स्नेह मिळायला हवा होता, पण तो मिळाला नाही. या अभावाची पूर्ती दुसऱ्या कुटुंबांनी करण्याचा प्रयत्न केला आणि आजही तशीच स्थिती आहे. परंतु जीवनाच्या त्या प्रारंभिक अवस्थेत माझी मनःस्थिती अशी नव्हती की या इतरांच्या स्नेहाचा निर्विकल्प भावनेने, स्व-पर भावाच्या वर उठून, मी स्वीकार करावा. त्यामुळेच माझ्या सार्वजनिक जीवनात माझे जितके सहकारी आहेत – त्यांची संख्या काही कमी नाही – पण त्यांच्या-माझ्यामध्ये कौटुंबिक स्नेहसंबंध स्थापन होऊ शकलेला नाही. त्यामुळे माझ्या सार्वजनिक जीवनात आणि व्यक्तिगत जीवनात ही कायमची उणीव राहून गेली आहे.

कौटुंबिक प्रेम मला जसे मिळायला पाहिजे होते तसे मिळाले नाही खरे; पण मित्रांच्या स्नेहाचा जो लाभ मला झाला तो काही कमी नव्हता. तो स्नेह जर मला न मिळता तर आज मी जो आहे तोही राहिलो नसतो. माझा जीवन-प्रवाह कुठल्या दुसऱ्याच दिशेकडे वाहत गेला असता. शाळेत असल्यापासून कॉलेजच्या शिक्षणापर्यंत माझे दोन मित्र होते; आणि त्यांचा सहकार आणि आधार मला पुष्कळ मिळाला. त्यायोगे एक प्रकारे माझ्या जीवनाची दिशाच बदलली. पुढे जेव्हा मी सार्वजनिक जीवनात प्रवेश केला तेव्हाही पुनः मला दोन मित्र मिळाले – जे माझ्या सार्वजनिक जीवनाचा आधार होते आणि माझ्या जीवनाला रूप देणारेही होते. आचार्य शंकरराव जावडेकर, आचार्य भागवत आणि मी – आम्हा तिघांची मैत्री साऱ्या महाराष्ट्राच्या लोकांना माहीत आहे. या आम्हा तिघांच्या मैत्रीचे स्वरूप केवळ भौतिक नव्हते, वैचारिक (प्लेटोनिक) होते. आणि तिचे लक्ष्य सार्वजनिक सेवा आणि विशिष्ट उद्देशाची प्राप्ती हे होते. काही वर्षांपूर्वी माझ्या जीवनात एक महान संकट आले. त्या वेळी माझ्या सद्भाग्याने दादा धर्माधिकारी यांच्या मैत्रीचा मला लाभ झाला. दादांच्या मैत्रीचे स्वरूप प्रारंभापासूनच अहेतुक (निरुपचारिक) असे राहिले आहे.

जीवनाच्या प्रारंभीच्या दिवसांत मला आणखी एक महान उपलब्धी झाली. लहानपणीच मी इंग्रजी शिकण्याकरिता म्हणून माझे गाव सोडून पुण्याला आलो. पुणे म्हणजे १९०७-०८ चे पुणे. त्या काळी समस्त भारतात एक चैतन्याची लाट उसळली होती. तिचा आधार भारताचे अध्यात्म हा होता. हे अध्यात्म भारताचे वैशिष्ट्य आहे. भारताचा तो महान गुण आहे. त्या काळच्या पुनर्जागरणाचा आधार हे अध्यात्म असल्यामुळे इंग्रजांची सत्ता समाप्त झाल्यानंतरसुद्धा इंग्रज लोक आणि भारतीय यांचे संबंध मधुर राहिले आहेत. कोणत्याही प्रकारची कटुता आली नाही. जित आणि जेता असा भाव यत्किंचितही राहिला नाही. त्या काळच्या नेत्यांना त्याच वेळी प्रतीती झाली होती की, भारत आणि ब्रिटन यांचा जो संबंध आला आहे त्यात काही ईश्वरीय संकेत आहे. अर्थात त्या काळी आम्ही स्वतःला जहाल म्हणवून घेणारे लोक त्या दूरदर्शी नेत्यांच्या या प्रतीतीला हसत होतो.

ज्या काळी मला वाहेरच्या जगाची जाणीव होऊ लागली त्या काळी देशाची परिस्थिती अशा आध्यात्मिक चैतन्याने भारलेली होती. माझ्या आईचे दूध मला किती दिवस मिळाले मला माहीत नाही. मी फार लहान असतानाच ती निघून गेली. पण मला आध्यात्मिक परंपरेचे जे अमृत मिळाले त्यावरच मी वाढलो, आणि त्या वेळी त्या अध्यात्माचे जे वीजारोपण माझ्या जीवनात झाले तेच पुढे माझ्या अंतरात अंकुरित झाले. त्याचाच हा परिणाम आहे की, सगळ्या जगाकडे पाहण्याची माझी दृष्टीच

आज बदलून गेली आहे. सारा संबंध आध्यात्मिक झाला आहे. याकरिता सारा सृष्टिव्यापार चालविणाऱ्या त्या अनंत शक्तीचा मी कृतज्ञ आहे.

त्या काळी माझ्यात एक महान दोष निर्माण झाला. वेळीच कोणी चांगला गुरू जर मला मिळाला असता तर तो दोष माझ्यात आला नसता. तो दोष म्हणजे माझे जीवन संकल्पमय झाले. गीतेने म्हटले आहे – "संकल्पप्रभवान् कामान् त्यक्त्वा सर्वान् अशेषतः" – संकल्पातून निर्माण होणाऱ्या सर्व कामनांचा त्याग करून जग – त्या गीतावचनाकडे माझे लक्ष जितके जायला पाहिजे होते तितके गेले नाही. पण दुसऱ्या एका वचनाकडे मात्र माझे लक्ष गेले. ते वचन म्हणजे "यो यच्छ्रद्धः स एव सः" – जशी ज्याची श्रद्धा तसा मनुष्य बनतो. या वचनाने मला बरेच आकर्षित केले. आकर्षित केले एवढेच नव्हे तर माझ्या जीवनाला प्रेरणा देणारी शक्ती ते बराच काळपर्यंत झाले. याचा मी माझ्या जीवनात पुष्कळच अनुभव घेतला आहे, आणि अजूनही घेत आहे. अशा रीतीने माझे जीवन संकल्पमय बनले. तथापि त्याच भारतीय अध्यात्माची ही कृपाच म्हणायची की, मी जे संकल्प करी ते महान संकल्प असत. पुण्याला एक नाटक मंडळी होती. तिचे ध्येयवाक्य 'Not failure but low aim is crime' – हार नव्हे तर क्षुद्र लक्ष्य ठेवणे हा गुन्हा आहे – हे वाक्य सदोदित माझ्या चित्तात ठसलेले होते. आज अर्थात तसे मी मानीत नाही, पण त्या वेळी माझे बाल-मन होते, त्या मनावर या वाक्याचा फार मोठा प्रभाव पडला आणि त्यामुळे जे संकल्प करायचे ते मी मोठेच करी.

अशाच संकल्पांपैकी एक संकल्प ब्रह्मतेजाची प्राप्ती करून घ्यायची हा होता. आजकाल आपण जातपात मानीत नाही, पण त्या काळी माझ्या मनाला मी ब्राह्मणकुळात जन्माला आलो आहे ही जाणीव होती. तथापि माझा आदर्श ज्या ब्राह्मण्याचे लक्ष्य ब्रह्म-प्राप्ती आहे आणि जे सत्ता, शक्ती आणि संपत्ती यांच्या स्पर्शापासून सर्वस्वी अलिप्त आहे असे ब्राह्मण्य प्राप्त करण्याचा होता. या ब्राह्मण्य-प्राप्तीचा ध्यासच मला लागला होता. आज लोक जेव्हा माझा परिचय करून देताना कधी कधी सांगतात की "यांच्या मनात असते तर अमुक पद त्यांना सहज मिळू शकले असते; ते अमुक होऊ शकले असते, तमुक होऊ शकले असते", तेव्हा मला हसू येते. कारण सुरुवातीपासूनच माझ्या मनात हे पद घ्यावे किंवा अमक्या बड्या स्थानी पोचावे अशी महत्त्वाकांक्षा कधीच नव्हती. माझा आदर्श सर्वांहून उच्च आणि मोठा होता. ज्या अर्थी मी ब्राह्मणकुळात जन्म घेतला आहे त्या अर्थी सत्ता, शक्ती आणि संपत्ती ही मला सर्वथा निषिद्ध आहेत असे मी मानले होते. त्यांची प्राप्ती हे माझे व्रत किंवा माझ्या आकांक्षेचा विषय होऊच शकत नव्हते.

या संबंधात जीवनात फक्त एकच अपवाद होता. तो म्हणजे देशाच्या स्वातंत्र्यास्तव किंवा सेवेस्तव ज्या काँग्रेसला मी सर्वस्वी समर्पित झालो होतो तिच्यात कोणतेही पद स्वीकारण्याला मी बंधन ठेवले नव्हते. काँग्रेसमध्येसुद्धा कोणत्याही पदाच्या चढाओढीत मी कधी उभा राहिलो नाही. सेवा आणि परिस्थिती यांना अनुसरून जे पद सहजपणे माझ्यापुढे येईल ते मी स्वीकारीत असे. माझ्या काँग्रेसमधल्या जवळ जवळ ३०-३५ वर्षांच्या आयुष्यात फक्त एकच डाग याला लागला. तो म्हणजे काँग्रेस जीवनाच्या माझ्या अंतिम पर्वात मी काँग्रेसच्या अध्यक्षपदाच्या स्पर्धेत उतरलो. पुष्कळ दिवसांपासून मला वाटत आहे की, ही गोष्ट माझ्या हातून बरी नाही झाली. आज याबद्दल मला पश्चात्तापही होतो. त्या वेळी मी जर त्या स्पर्धेत पडलो नसतो तर काँग्रेसमधले माझे जीवन, माझ्या विनम्र मताप्रमाणे, शुद्ध ब्राह्मण्याचा एक नमुना झाला असता, आणि त्याचा आनंद आयुष्यभर मला चाखता आला असता.

लोणावळ्यात कैवल्यधाम नावाची योगाभ्यासाची संस्था आहे. तेथे स्वामी कुवलयानंद राहत होते. ते एके काळी माझे शिक्षक होते. त्या काळी, म्हणजे कॉलेज शिक्षण पूर्ण होताच, माझ्या मनात हा एकच विचार चालत असे की, त्यांच्याकडे जावे आणि राजयोगाचा अभ्यास करावा. एवढ्यात गांधीजी दक्षिण आफ्रिकेहून भारताला आले. येथे येताच त्यांनी डॉ. ॲनी बेझंट यांच्या ऑल इंडिया होमरूल लीग या संस्थेचे अध्यक्षपद स्वीकारले. लोकांना आश्चर्य वाटले. त्यांचे मित्र म्हणू लागले, 'आपण हे काय चालविले आहे?' देशापुढे आणि जगापुढे त्या काळी दक्षिण आफ्रिकेच्या अपूर्व लढ्याचा इतिहास होता. लोकांनी गांधीजींना सावध करण्याकरिता सांगितले की, आपण खरा मार्ग सोडून आपण भलत्याच मार्गाकडे चालला आहा. होमरूल लीगचा अध्यक्ष होणे म्हणजे प्रत्यक्ष राजकारणात पडणेच होते. त्या वेळी गांधीजींनी सांगितले की, मी समजून उमजूनच हे करीत आहे. कारण मला ही राजकारणात सत्य आणि प्रामाणिकपणा आणण्याची संधी मिळाली आहे. जेव्हा लोकमान्यांनी सांगितले की, राजकारण हे साधु-सज्जनांचे काम नव्हे, तेव्हा गांधीजी म्हणाले की अशा रीतीने विचार करणे हे बौद्धिक जडतेचे लक्षण आहे. गांधीजींच्या तोंडी हे शब्द फार कठोर होते, पण त्यांची जीवननिष्ठा प्रखर आणि प्रज्वलित होती, त्यामुळे ते असे म्हणू शकले. तेव्हा माझ्यापुढे ब्राह्मण्याच्या दृष्टीने जे जे प्रश्न होते – सत्ता, संपत्ती, हिंसा-अहिंसा इत्यादीचे – ते सर्व गांधीजींनी सोडवून टाकले

आणि मी राजकीय क्षेत्रात उडी घेतली. गांधीजी नसते आणि त्यांनी ब्राह्मण्याकरिता राजकारणाचे क्षेत्र, तशीच जीवनाची सर्व क्षेत्रे ज्या प्रकारे खुली केली तशी खुली केली नसती तर मी कसा झालो असतो, कुठे थारा घेतला असता ईश्वराला ठाऊक! अशा प्रकारे माझ्या जीवनाच्या प्रायः प्रारंभापासूनच गांधीजींशी माझा संबंध आला आणि तो त्यांच्या मृत्यूपर्यंत कायम टिकला.

गांधीजी ही एक महान विभूती होती. त्यांनी ज्या रीतीने सत्याच्या सत्यतेची, अहिंसेच्या अहिंसकतेची आणि तिच्या गुणांची वृद्धी, अभिव्यक्ती आणि विकास अगदी पहिल्याने केला आणि जीवनाच्या प्रत्येक पैलूला तो लागू केला, ती रीत जगाच्या इतिहासात अपूर्व होती. त्यांच्या सहवासात मला जे काही मिळाले त्याचा आचार करण्याचा मी प्रयत्न केला. जरी माझे कार्याचे क्षेत्र राजकीय होते तरीही मी अत्यंत नम्रतापूर्वक सांगू इच्छितो की, माझ्यापुढे त्या सच्च्या ब्राह्मण्याचा आदर्श सतत राहिला आणि तेथपर्यंत पोचण्याचा मी निरंतर प्रयत्न करीत राहिलो. सत्ता, संपत्ती आणि हिंसा यांच्यापासून दूर राहण्याचा प्रयत्नही अखंड चालू राहिला. मी काँग्रेस कार्यकारिणीचा सभासद झालो होतो, चार वर्षेपर्यंत तिचा प्रमुख मंत्रीही होतो. एकूण ३२ वर्षे मी काँग्रेसमध्ये काम केले. त्या वेळी माझ्या हातून पुष्कळशा चुकाही झाल्या. माझ्याकडून महान दोष घडले. परंतु माझ्या मनात कोणत्याही पदाची किंवा कसल्याही ऐहिक लाभाची कामना कधी उत्पन्न झाली नाही.

गांधीजी जिवंत असतानाच माझ्या मनात विचार येऊ लागले होते की, सार्वजनिक जीवनात सत्य-अहिंसेचा प्रयोग करण्याचे प्रयत्न जे गांधीजींनी केले, ते आपल्याला पुढे कसे नेता येतील? त्या दिशेने माझे चिंतन चालू असायचे आणि त्या चिंतनात माझे मित्र भाई धोत्रे हे माझे सहकारी असायचे. आम्ही गांधीजींशी या संबंधात काही विचारविनिमयही केला होता. फेब्रुवारी १९४८ मध्ये सेवाग्रामला एक बैठक या संबंधात घेण्याचे नक्की झाले होते. आणि, ३० जानेवारीला ती दुर्घटना घडली नसती, तर गांधीजी ३१ जानेवारीलाच सेवाग्रामकडे रवाना झाले असते आणि तेथे पुढच्या कामासंबंधीची काही रूपरेखा तयार करण्याला त्यांचे प्रत्यक्ष मार्गदर्शन मिळाले असते. पण ते घडले नाही.

गांधीजींच्या निर्वाणानंतर त्याच वर्षी मार्च महिन्यात स्व. राजेंद्रबाबूंच्या अध्यक्षतेखाली गांधीजींचे सहकारी आणि त्यांच्या विचारांशी सहमत असलेले देशभरचे प्रमुख पुढारी आणि कार्यकर्ते यांची एक मोठी बैठक सेवाग्रामला झाली. त्या बैठकीत पंडित जवाहरलालजी आणि विनोबाजीही सामिल झाले होते. त्या बैठकीतूनच सर्वोदय समाज निर्माण झाला आणि सर्व सेवा संघ बनविण्याचे ठरले. प्रारंभापासूनच मी सर्वोदय समाजाचा मंत्री झालो, आणि त्या बैठकीनंतर एका वर्षाने जेव्हा सर्व सेवा संघ बनला त्या वेळी एक वेळ अशी आली की, मला काँग्रेस की सर्व सेवा संघ या दोहोंतून एकाची निवड करण्याचा प्रसंग आला. सर्वोदय समाजात आणि सर्व सेवा संघात काम करणाऱ्या माझ्या सोबत्यांनी सांगितले की, तुम्ही काँग्रेसमध्ये आणि सर्व सेवा संघात दोन्ही ठिकाणी एकाच वेळी राहू शकत नाही. कै. श्री. किशोरलालभाई मश्रूवाला यांच्या हृदयाची विशालता अशी होती की, त्यांनी मधला मार्ग काढला. तो अहिंसेचा एक नमुना होता. सर्व सेवा संघाचा मंत्री होण्याचा प्रश्न होता. मी मंत्री व्हावे आणि त्याकरिता काँग्रेसच्या कार्यकारिणीचे सभासदत्व मी सोडावे असे सर्वांचे म्हणणे होते. किशोरलालभाईंनी माझ्याशी बोलणे केले. मी त्यांना सांगितले की, सर्व सेवा संघ आणि काँग्रेस दोन्ही ठिकाणी एकाच वेळी काम करण्यामध्ये मला जर कुठे विरोध आढळला, तर त्याच क्षणी मी काँग्रेस सोडीन. किशोरलालभाईंना तेवढे पुरेसे झाले.

एवढ्यात भूदान-यज्ञ सुरू झाला. त्या कामी मी माझा सारा वेळ आणि शक्ती लावली पाहिजे असे मला वाटले आणि तसे मी पंडितजींना लिहिले. जवळ जवळ दोन महिनेपर्यंत त्यांचे उत्तर आले नाही. शेवटी त्यांनी लिहिले की, उत्तराला विलंब का लागला ती स्थिती तुम्ही जाणू शकता, पण तुम्हांला सर्वोदयाच्या कामाकडे सारा वेळ द्यावासा वाटत असेल तर काँग्रेस वर्किंग कमिटीच्या सभासदत्वातून मी तुम्हाला मुक्त करतो.

तेव्हापासून सर्वोदयाच्या क्षेत्रात माझ्या शक्ति-बुद्धीप्रमाणे जेवढे मला समजले त्यानुसार त्याच मूळ संकल्पाच्या मार्गाला धरून, खऱ्या ब्राह्मण्याच्या विकासाच्या दिशेने पुढे जाण्याचा मी प्रयत्न करीत आहे. अगदी लहानपणापासून माझ्या मनावर वसिष्ठ आणि विश्वामित्र यांच्या कथेचा फार मोठा प्रभाव आहे. बरे म्हणा, वाईट म्हणा, पण ती वस्तुस्थिती आहे. माझे जीवन घडविण्यात अशा कथांचा भाग मोठा आहे. त्या कथांमुळे ब्राह्मण्य आणि ब्रह्मतेज यावर माझी श्रद्धा अधिक दृढ झाली आणि तो ध्यास सतत माझ्या मनात राहिला आहे.

राजकारणाला किंवा ऐहिक व्यवहाराला धर्मापासून भिन्न मानून जे लोक म्हणत होते की, धर्म काय आहे ते तुम्हाला समजत नाही, त्यांच्याप्रमाणेच जे लोक म्हणतात की हे अध्यात्म आहे आणि ते ऐहिक किंवा भौतिक जीवन आहे त्यांच्या बाबतीत मी, त्यांना अध्यात्म कळत नाही असे न म्हणता म्हणेन की, त्यांना ऐहिक जीवन काय आहे हेच कळत नाही. या संबंधात

आत्मज्ञान आणि विज्ञान यांचा समन्वय करण्याची गोष्टसुद्धा काहीशी खालच्या पातळीवरची आहे. समन्वय कोणामध्ये? दोन अलग अलग गोष्टी असतील त्यांमध्ये. ही गोष्ट आजचीच नाही, मागच्या काळातल्या अध्यात्माच्या मोठमोठ्या विद्वानांचीसुद्धा तीच मनोदशा होती. म्हणून तर पारमार्थिक सत्ता, प्रातिभासिक सत्ता, व्यावहारिक सत्ता इत्यादी गोष्टींचा जन्म झाला होता. पण सत्याचे अशा रीतीने वेगवेगळ्या टप्प्यांत विभाजन करणे म्हणजे सत्याची चिरफाड करणेच आहे. सत्य हे अविभाज्य आहे. पूर्वी मानवाच्या मनाला या गोष्टीची प्रतीती आली नव्हती, पण आज विज्ञानाने तशी प्रतीती येण्याला मदत झाली आहे. म्हणून एका छोट्या कुटुंबाचा मोठ्या कुटुंबाशी विरोध नाही; या सर्व परिवाराचे केंद्र जो अहम् त्याच्या व्यापकतेची जाणीव झाली की सर्व परिवारात एक साम्य स्थापित होईल, ऐहिक जीवनच अध्यात्माचे साधन होईल आणि अध्यात्म हे ऐहिक जीवनाचे फलित होईल.

आपण माणसे काही कार्यक्रमांच्या बंदीखान्यात बंदिस्त झालेलो आहोत. हे कार्यक्रम किती लोकांनी स्वीकारले, किती लोकांनी ते प्रत्यक्षात आणले यावर आपण कार्यकर्त्यांना मापतो. पण खरोखर पाहिले तर व्यापक सत्याचे विश्वात प्रकटीकरण अहिंसा, स्नेह, करुणा यांच्या द्वाराच होत असते. त्यांचे साधन म्हणून या देशाच्या आजच्या परिस्थितीत चरखा, भूदान-ग्रामदान, सफाई इत्यादी गोष्टी आहेत. परंतु कार्यक्रमांचे मूल्य तो स्नेहाच्या किंवा करुणेच्या अनुभूतीच्या आधारावर कितपत चालतो यावर अवलंबून आहे. नियमाने किंवा अनुशासनाने चालविले जाणारे कार्यक्रम विधायक नव्हेत, कारण त्यांत अहिंसा नाही, स्नेह नाही. त्यांत खरीखुरी सृजनशीलताही नाही. कोणत्याही कार्यक्रमाला रचनात्मक म्हटल्याने काही तो खऱ्या अर्थाने रचनात्मक होत नाही. रचनात्मक कार्यक्रम जीवनात कृतार्थता आणणारा असेल. तीच अहिंसा होय. मग ते काम पाणी पाजणे, बोलणे, केवळ भेटणे, असे कोणतेही असेल. ते परिस्थितीवर अवलंबून आहे. म्हणून व्यापक सत्याच्या अनुभूतीकरिता कोणत्याही दर्शनाचे, निष्ठेचे किंवा कार्यक्रमाचे बंदिवान आपण स्वतःला करता कामा नाही.

संकलक व अनुवादक :
**भाऊ धर्माधिकारी**

¤ ¤ ¤


## Form IV

(रूल नं. ८, रजिस्ट्रेशन ऑफ न्यूजपेपर्स सेंट्रल रूल्स १९५६ अन्वये प्रकाशित)

| | |
|---|---|
| **प्रकाशन स्थळ** | : प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| **प्रकाशन दिनांक** | : दरमहा १ तारीख |
| **मुद्रक** | : श्रीकृष्ण गजानन दीक्षित |
| **राष्ट्रीयत्व** | : भारतीय |
| **पत्ता** | : द्वारा, दी प्राज्ञ प्रेस, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| **प्रकाशक व संपादक** | : मेघश्याम पुंडलिक रेगे |
| **राष्ट्रीयत्व** | : भारतीय |
| **पत्ता** | : 'रागिणी', साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१. |
| **मालक** | : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१५ ८०३ (जि. सातारा) |

मी मेघश्याम पुंडलिक रेगे जाहीर करतो, की वर दिलेली माहिती माझ्या माहितीप्रमाणे व समजुतीप्रमाणे संपूर्णतः खरी आहे.

मे.पुं. रेगे
*प्रकाशक*


अनुक्रमणिका

# अंतरंगदर्शन

शंकररावांनी १९३४ ते १९६३ या काळात लिहिलेल्या काही पत्रांमधून शंकररावांनी स्वतःच स्वतःचे अंतरंगदर्शन घडविले आहे. ते मोठे हृद्य आहे. ही सर्व पत्रे श्री. भाऊ धर्माधिकारी यांनी लेखन- संपादन केलेल्या *उच्चार्थसाधक शंकरराव* या ग्रंथामधून येथे पुनर्मुद्रित केली आहेत. आम्ही श्री. भाऊ धर्माधिकारी व सासवड आश्रम विश्वस्त मंडळ यांचे आभारी आहोत.

– १ –

(शंकररावांचे धोत्रेजींना पत्र. अनेक कार्ये अंगावर घेतो याचे कारण मोह. याबद्दल त्यांना खंत आहे.)

५३४ सदाशिव, पुणे २
१९-१२-१९३४

श्री. भाई धोत्रे,
सप्रेम प्रणाम,

सध्या माझी एक मोठी चमत्कारिक स्थिती झाली आहे. ती आपणांस लिहिणे आवश्यक वाटल्यावरून लिहीत आहे. गेल्या पंधरा वर्षातल्या माझ्या बऱ्या-वाईट कार्याचा परिणाम कोणतेही प्रांतिक काम, मग ते प्रांतिक काँग्रेस कमिटीचे असो, चरखा संघाचे असो, गांधी सेवा संघाचे असो, अथवा वृत्तपत्राचे असो, ते प्रत्यक्ष माझ्यावर येऊन पडते व ही जबाबदारी योग्य रीतीने पार पाडण्याची साधने व त्यांचा खर्च चालविण्यासाठी लागणारे द्रव्यबळ यांचा माझ्याजवळ मात्र पूर्ण अभाव असतो. पुष्कळसा पत्रव्यवहार करावा लागतो. घरकामासाठी काही माणसांची मदत घ्यावी लागते व आवश्यकताही भासते. ज्या परिस्थितीत मी आहे त्या परिस्थितीचा स्वाभाविक परिणाम असा आहे की, पुष्कळ मंडळींच्या मनात माझ्याबद्दल पुष्कळ अपेक्षा उत्पन्न होतात व त्या मी पूर्ण करू शकत नाही. म्हणून त्यांच्यामध्ये असमाधान होते व त्यामुळे प्रेमसंबंध वाढण्यात विघ्न उत्पन्न होते व उलट एक प्रकारची अढी उत्पन्न होते.

पण त्याचे उत्तरही माझ्यापाशी आहे. आणि ते मी आपल्याला सांगतो. 'मोह' हेच त्याचे उत्तर आहे. सकामता नाही असे वाटते. परंतु "माझ्याशिवाय होणार नाही" ही ती भावना आहे. खरोखरी ती चुकीची आहे. महाराष्ट्रात जे काम मी करीत आहे ते खरोखर व्हावे अशी परमेश्वराची इच्छा असेल तर तो वाटेल ते बाहुले निर्माण करू शकेल. एखादे वेळी असे वाटते की, सर्वसंन्यास करावा. तसे होण्याच्या पाठीमागे जी वृत्ती आहे तिचे पृथक्करण करणे महान कठीण काम आहे. मी आपणास अधिक लिहिण्याची आवश्यकता नाही.

गांधी सेवा संघाची घटना तयार झाल्यावर तावडतोब पाठवून द्यावी. महाराष्ट्रात गांधी सेवा संघाचे कामसुद्धा मी केले नाही तर ते जसे व्हायला पाहिजे तसे होणार नाही असे वाटते. वरचे सर्व पत्र वाचल्यानंतरही मला असे वाटावे हे खरोखरीच आश्चर्य आहे. परंतु कारण एकच. सर्वांच्याकडे पाहिले म्हणजे वाटते की, लोकांना कामाची कल्पनाच नाही. मला वाटते मला कल्पना आहे पण साधने नाहीत.

मला वाटते की, माझ्या आयुष्याबद्दल शेवटी एकच वाक्य लिहिले जावे – "कल्पनेचा अहंकार वाळगणारा म्हणून साधनांच्या दुष्काळात मेलेला".

कळावे.

आपला
(संकलित) **शंकरराव देव**

– २ –

(४ दिवसांच्या उपवासातील अनुभव. उपवासात मन विषयातून काढून आत्मचिंतनी लीन होण्यास पूर्वाभ्यास हवा.)

३ इलेक्ट्रिक लेन, नवी दिल्ली
दि. ९-७-१९४६

श्री. प्रेमाबाई कंटक,
सप्रेम न.वि.वि.

माझी उपवासाची कल्पना अशी आहे की, उपवासाच्या काळात मन बाह्य जगातून काढून घेऊन आत्मचिंतनाने त्याला आत्म्यात लीन करणे. विषयाचे विस्मरण हाच चित्तशुद्धीचा मार्ग आहे. मन आत्मचिंतनी लागले म्हणजे कदाचित आत्म्याच्या

अनुक्रमणिका

दर्शनाने विषयांचा दोष प्रतीत होत असावा. मी चार दिवस उपवास केला तेव्हा मला तसे करता यावे अशी माझी मनापासून इच्छा होती. पण पूर्व अभ्यासाशिवाय मन विषयातून काढून आत्म्याच्या ठिकाणी स्थिर करणे कठीण आहे असा अनुभव येतो. शिवाय मनाला विषयाचे विस्मरण होईल अशी त्या वेळी आसपासची परिस्थिती असली पाहिजे. या दृष्टीने माझा चार दिवसांचा उपवास निरुपयोगी झाला असे जरी मी म्हटले नाही तरी त्याचा व्हावा तसा उपयोग झाला असेही म्हणता येत नाही. खरा प्रश्न मन सदा ज्या अवस्थेत राहते त्यातून त्याला एकाएकी बाहेर काढणे कठीण जाते. त्याला नेहमीच विषयाचा उपवास असेल तर मधूनमधून अन्न-त्याग हा त्याला मदत करील. "विषया विनिवर्तते निराहारस्य देहिनः। रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते।।" यात विषयाचा उपवास अभिप्रेत आहे हे स्पष्टच आहे. निराहार हा उपवासाला सहायक होऊ शकेल, आणि झाला पाहिजे.

आपला

**शंकरराव**

– ३ –

[पावस (रत्नागिरी) येथील स्वामी स्वरूपानंद (पूर्वाश्रमीचे गोडबोले) यांच्या भेटीचा प्रसंग. सध्याच्या त्यांच्या जीवनाबाबतची शंकररावांनी प्रकट केलेली भूमिका. उपोषणात आलेल्या अनुभवावरून स्वतःबाबत केलेले आत्मपरीक्षण.]

कोल्हापूर

दि. २०-५-१९६१

श्री. प्रेमाबाई,

सप्रेम आशीर्वाद

सध्याच्या माझ्या जीवनाच्याबाबत जिज्ञासापूर्वक तुम्ही जे प्रश्न विचारले आहेत त्यांचे थोडक्यात उत्तर देतो.

अशा प्रसंगी –

"अर्जुना समत्व चित्ताचे। तेचि सार जाण योगाचे।

जेथ मना आणि बुद्धीचे। ऐक्य आथी।।"

या ज्ञानेश्वरांच्या उक्तीचे मला स्मरण होते आणि मी त्याचे स्मरण करतो. उपोषणानंतर एका निवेदनात प्रकट केलेले संकल्प व सध्याचे माझे जीवन यांच्यामधील दिसणारे महदंतर, वा पाहिजे तर विसंगती म्हणा, यासंबंधीचे सत्यकथन व सत्यदर्शन व ग्रहण जवळून केलेल्या संवादातूनच होणे शक्य आहे.

उपोषणानंतरच्या काळात मला माझ्याविषयी या बाबतीत जो अनुभव आला तो असा आहे की, त्या निवेदनात म्हटलेल्या पद्धतीने साधना करण्याला माझी प्रकृती अनुकूल नाही. शिवाय साधनेचे माझे जे लक्ष्य आहे ती मुख्यतः सत्त्वशुद्धी व त्याचा परिणाम म्हणून वृत्ति-पालट, ते प्राप्त करण्याला माझ्या प्रकृतीप्रमाणे जी साधनापद्धती अनुकूल आहे असे मी मानतो त्या प्रकारची साधना यथाशक्ती करण्याचा माझा प्रयत्न आहे. साधनेचे 'साक्षात्कार' हे माझे लक्ष्य आज नाही. निवेदनात रमणमहर्षींच्या बाबतीत मी जे लिहिले आहे, ती श्रद्धा आज माझी राहिलेली नाही. दृष्टान्तातून साक्षात्काराकडे ही साधना आज माझ्या बुद्धि-वृत्तीला वांछनीय राहिलेली नाही. रमण महर्षींचे एकमेव चित्र आजही माझ्या काशीच्या राहण्याच्या खोलीत आहे. आत्मज्ञान व सहजावस्था हेच मी आजही त्यांनी उपदेशिलेले परमसाध्य आपले लक्ष्य मानतो. या दृष्टीने रमण महर्षींच्या ग्रंथांचे व इतरही स्वाध्याय करतो. ब्रह्मसूत्र हा माझ्या आवडीचा व निवडीचा ग्रंथ झाला आहे. श्री. कृष्णमूर्तींच्या ग्रंथांचे वाचन, त्यांच्या भेटी, त्यांच्या प्रवचनांचे श्रवण व त्यांच्याशी सुखसंवाद याचाही लाभ मला मिळत असतो व मी घेत असतो. कृष्णमूर्तींच्या शिकवणुकीचा माझ्या मनावर मोठा प्रभाव पडला आहे. ब्रह्मसूत्र, उपनिषदे व इतर आध्यात्मिक साहित्य यांच्यामध्ये जे सर्व श्रेष्ठ तत्त्व सांगितले आहे तेच कृष्णमूर्ती आपल्यापरीने व पद्धतीने सांगत आहेत असे माझे ग्रहण आहे. साधनेच्या बाबतीत मात्र फरक आहे असे माझे मत आहे. गांधीजींची जीवनसाधना करण्याला कृष्णमूर्तींची शिकवणूक फार उपयुक्त आहे असाही माझा अनुभव आहे.

उपोषणानंतर त्या निवेदनात म्हटल्याप्रमाणे आज जे मी करीत आहे, ते –

"म्हणोनि जे जे उचित। आणि अवसरेकरुनि प्राप्त।।"

अशा प्रकारचे आहे. आणि ईश्वराची इच्छा अशी की, ते भव्य आणि व्यापक स्वरुपात प्राप्त होत आहे. सध्या "ते कर्म हेतु-रहित। आचरे तू।" हीच माझी साधना आहे. या बाबतीतला अनुभवही 'क्षुरस्य धारा' असाच आहे आणि त्यात यशापेक्षा अपयशाचे प्रमाण अधिक आहे याची जाणीव ठेवून अखंड जागरूकतेने ही साधना करण्याचा मी माझ्या परीने प्रयत्न करीत आहे.

पाँडिचेरीच्या आश्रमाचा माझा अनुभव काय असे तुम्ही विचारले आहे. भौतिकाला आध्यात्मिक करण्याचा पाश्चात्य मनाचा तो एक महान प्रयत्न आहे, अशी माझ्या मनावर छाप पडली आहे. जेव्हा जेव्हा याविषयी बोलण्याचा प्रसंग येतो त्या वेळी मी त्याविषयी आदराने बोलतो, व मी स्वतः काशीला साधना केंद्रात, त्यात मला जे ग्रहण झाले ते सामूहिक जीवनात

आणण्याचा प्रयत्न करतो. मदरबद्दल व्यक्तिशः मी माझे काहीही मत बनविलेले नाही.

**शंकरराव**

– ४ –

(मैत्री-यात्रेच्या कल्पनेचा उगम कसा झाला त्याचा वृत्तान्त. पत्र श्री. प्रेमाबाईंना.)

साधना केंद्र,
राजघाट, वाराणसी
२६-१२-६२

सप्रेम आशीर्वाद,

भारतीय शांतिसेना मण्डल व वर्ल्ड पीस ब्रिगेड या दोघांच्या वतीने दिल्ली ते पीकिंग एक मैत्री-यात्रा करण्याचे ठरले आहे. हे तुम्ही कदाचित वर्तमानपत्रात वाचले असेल. मी वेडछीला गेलो नव्हतो. पण वेडछीचे निवेदन ज्या प्रबंध समितीच्या बैठकीत तयार झाले त्या प्रबंध समितीच्या बैठकीला मी गेलो होतो. ही बैठक बंगालमध्ये श्री. विनोबांच्या मुक्कामावर झाली होती. बंगालमधूनच सरळ सासवडला मी १७ तारखेला येऊन पोचलो होतो. १५ व १६ डिसेंबरला सेवाग्रामला भारतीय शांतिवादी विधायक कार्यकर्त्यांची बैठक झाली त्यात मी गेलो होतो. निवेदन तयार झाले त्यात व सेवाग्रामच्या बैठकीत जे कामकाज झाले त्यात मी जो भाग घेतला त्यातून ही मैत्री-यात्रेची मूळ कल्पना निघाली नसली तरी (ही सूचना अमेरिकेतील शांततावाद्यांकडून आली) तिचा स्वीकार व ती काढण्याचा निर्णय जो घेण्यात आला त्याला मी पुष्कळसा निमित्त झालो आहे. ही मूळ कल्पना शांतियात्रेची होती. ('पीस मार्च'). शांतीच्या ऐवजी "मैत्री" शब्द योजिण्यात आला आहे ते माझ्या विचारामुळे, व सहज झालेल्या प्रयत्नामुळे. अशी यात्रा निघाली तर त्यात सामिल होणाऱ्यांमध्ये माझे पहिले नाव घालावे असे सेवाग्रामच्या बैठकीतच मी माझ्या भाषणात सांगितले होते. जे काही झाले त्याचे क्रियात्मक स्वरूप हे की, या यात्रेबद्दलची माझी जबाबदारी एका प्रकारे मध्यस्थपणाची न राहता मैत्रीची झाली आहे.

ही यात्रा फेब्रुवारी १२ ला दिल्लीहून निघेल. या यात्रेचे स्वरूप आंतरराष्ट्रीय यात्रेचे राहील. अधिकात अधिक २०-२५ मंडळी त्यात राहतील. १०-१२ मंडळी बाहेरची व १०-१२ मंडळी भारतातील. दिल्ली ते पीकिंग जो रस्ता सामान्यपणे घेण्याचे ठरले आहे त्या रस्त्यावर दिल्ली ते पीकिंग ३५०० मैलांचे अंतर आहे याचा अर्थ यात्रा पूर्ण झाली तर वर्ष, दीड-सव्वा वर्ष लागेल. ३० जानेवारीला मला ६८ वे वर्ष लागेल. या वयात ही यात्रा म्हणजे एक 'महान प्रयाण' अशी माझी भावना आहे.

**शंकरराव**

– ५ –

(मैत्री-यात्रेचा उद्देश, तिचा प्रारंभ, यात्रेत येणारे अनुभव, महाराष्ट्रीय जनतेला या मैत्री-यात्रेची विस्तृत माहिती देत राहणारे लेखन मित्रांनी करण्याची आवश्यकता, याबावत आचार्य भागवतांना लिहिलेले विस्तृत पत्र.)

मुक्काम खदौली (आग्रा)
१५-३-६३

सप्रेम नमस्कार,

१५ डिसेंबरला सेवाग्रामला मैत्री-यात्रेची योजना माझ्या अंतःप्रेरणेतून प्रगट झाली. स्वकीय आणि परकीय, स्वदेशी व परदेशी यांच्याकडून स्नेहाशिवाय मला दुसरे काही आज मिळत नाही. मनुष्य आपल्या दोन हातांनी देतो तेच त्याला अनंत हस्तांनी परत मिळते याचा अनुभव त्या क्षणापासून मी अखंड घेतो आहे. यामुळे माझ्या हृदयात एक विलक्षण परिवर्तन झाले आहे. दिव्य संकल्प आणि श्रद्धा हा माझ्या प्रकृतीचा गुण तुम्हांला माहीत आहे. पण ही श्रद्धा संकल्पाची असे. आज या श्रद्धेचे रूपांतर या विश्व-व्यवहाराच्या पाठीमागे एक अज्ञात व अनंत ज्ञानमय शक्ती काम करते आहे या जाणिवेत झाले आहे. हीच जाणीव घेऊन मी काशीला पोहोचलो.

शनि आणि मंगळ यांचा विलक्षण विरोध माझ्या आयुष्यात नेहमी माझ्या संकल्पाच्या सिद्धीच्या ऐन वेळी आड येत गेला आहे. त्याचे मला स्मरण झाले. प्रेमाबाईंचे बंधू व त्यांचे एक सहकारी चांगले ज्योतिष जाणतात असे प्रेमाबाई मानतात. काही महिन्यांपूर्वी, कदाचित एखादे वर्ष झाले असेल, त्यांचे बंधू व ते गृहस्थ सासवडला आले असता प्रेमाबाईंनी माझी पत्रिका त्यांना दाखविली होती. यापुढे शंकररावांच्या हातून झाले तर एक मोठे काम होण्याचा संभव आहे; पण ते यदाकदाचित् झाले नाही तर यापुढे काही वर्षे ते जगतील, पण त्यांच्या हातून काही मोठी कामे होणार नाहीत, असे त्यांनी भाकित केले होते. प्रेमाबाईंनी ते मला कित्येक महिन्यांपूर्वी कळविले होते. या वेळेला मला त्याचे स्मरण झाले. ३० जानेवारीला मला ६८ वर्षे पुरी होऊन ६९ वे वर्ष लागले. ७३-७४ वर्षांपर्यंत माझे आयुष्य आहे असे त्या पत्रिकेवरून त्या मंडळींनी भाकित केले आहे. किती वर्षे यापुढे आयुष्य आहे, याची मला चिंता नाही. कृष्णमूर्तींच्या सहवासाने आणि शिकवणुकीने मृत्यूबद्दल माझ्या विचारात एक






विलक्षण क्रांती केलेली आहे. आपण स्थितप्रज्ञ व्हावे हा माझा संकल्प आणि त्याची साधना ही जशी कृष्णमूर्तींनी माझ्या मनातून काढून टाकलेली आहे, त्याचप्रमाणे भयग्रस्त मृत्यूचा विचारही त्यांनी माझ्या मनातून काढून टाकलेला आहे. जीवनात स्मृतीचा मृत्यू नित्य क्षणाला होत नाही म्हणून माणसाला पुढे येणाऱ्या शारीरिक मृत्यूचे भय वाटते, ह्या त्यांच्या विचाराने माझ्या मनाची पकड घेतली आहे आणि त्याची सत्यता माझे मन अनुभवते आहे. "टु डाय एवरी मिनिट टु दि मेमरी ऑफ दि प्रेझेन्ट लाईफ इज टु बी फियरलेस अबाउट डेथ" हे पूर्ण सत्य आहे हा अनुभव मी अंतःकरणाला साक्षी ठेवून म्हणू शकेन इतका आजचा माझा अनुभव आहे. म्हणून मला आज काय किंवा आणखी कित्येक वर्षांनी येणाऱ्या मृत्यूचे भय वाटत नाही. एक प्रकारे मी त्यातून मुक्त झालो आहे हे नम्रपणे म्हणू शकेन. पण हे सर्व असूनही जे एक महान कार्य माझ्या आयुष्यात होण्याचा प्रसंग आला आहे, आणि ज्याची प्रेरणा मला त्या शक्तीने दिली आहे, ते कार्य ऐन क्षणाला मला करता येऊ नये आणि माझे पुढील सर्व-आयुष्य कार्यहीन व्हावे हा विचार माझ्या चित्ताला भयभीत करू लागला. "टु लिव्ह इज टु बी टू टु लाइफ" हा कृष्णमूर्तींचा आणि माझ्या समजुतीप्रमाणे भारतीय आत्मज्ञानाचा सिद्धान्त बुद्धीने पटला असला तरी त्या वेळेला त्याची अनुभूती करण्याला हृदय समर्थ होईना आणि म्हणून माझ्या आजारपणामुळे, संकल्प व श्रद्धा असूनसुद्धा माझे हृदय अश्रू गाळू लागले. तसे मी निराळ्या शब्दांत डॉक्टरांना सांगितले. डॉक्टरांनी मला असे आश्वासनही दिले की, तुमची जी व्याधी आहे आणि त्याला मी जी औषधे देतो आहे त्यामुळे तुम्ही यात्रा पार करु शकाल असे आश्वासन मी तुम्हांला देतो. त्या आश्वासनाचा आधार भयापासून माझे हृदय मुक्त करण्याला मदत करीत होता. पण शरीर त्याला साथ देत नव्हते. तशा स्थितीत मी २४ तारखेला काशी सोडली. काशीच्या साधना-केंद्रातील सर्व आबाल-वृद्ध स्त्री-पुरुष-मुले काशी स्टेशनावर स्नेहमय व श्रद्धामय अंतःकरणाने निरोप देण्यासाठी त्या दिवशी सायंकाळी जमा झाली होती. प्रकृतीसाठी काशी सोडण्यापूर्वी मी ३-४ दिवस मौन घेतले होते. साधना-केंद्रात २३ तारखेला मला निरोप देण्याचा जो समारंभ झाला त्यात मी मौन घेतले असल्यामुळे बोललो नाही. पण ओरिसाचे नवबाबू त्या समारंभाला हजर होते, त्यांनी माझ्या मौनाचा विलक्षण चांगला अर्थ करून सांगितला, व स्नेहाने भरलेल्या अंतःकरणाने मला निरोप दिला.

दिल्लीला ४ दिवस मुक्काम होता. त्या मुक्कामात चर्चा, बैठका, जाहीर सभा यांमुळे माझ्या प्रकृतीवर फारच ताण पडत होता. १ तारखेला यात्रा सुरू होण्याची सर्व तयारी होत होती. पण ह्या यात्रेत मी कसा येणार याबद्दल सर्वांना शंका वाटू लागली होती. आणि परिस्थिती अशी होती की मी यात्रेत नाही म्हणजे ही यात्रा काय होणार आणि कशी होणार, असा प्रश्न ह्या मंडळींच्या मनात येत होता. आम्हाला निरोप देण्यासाठी म्हणून ढेबरभाई, देवकीनंदन, दासप्पा, काका कालेलकर वगैरे पार्लमेन्टच्या पाच सभासदांच्या सहीने पार्लमेन्टच्या सभासदांची एक बैठक घेण्यात आली होती. त्या सभेत काही उपमंत्री व मंत्रीही हजर होते. स्वतः गृहमंत्री शास्त्रीजी यांनी त्या सभेला येण्याची इच्छा व्यक्त केली होती व ते येणारही होते. पण ऐनवेळी दुसऱ्या एका कार्यक्रमामुळे येऊ शकले नाहीत. त्या सभेला १०० एक सभासद हजर होते. मायकेल स्कॉट व मी असे दोघे त्या सभेत बोललो. सभेच्या अंती पार्लमेन्टचे जुने परिचित व अपरिचित अशा सर्व मंडळींच्याकडून माझ्याबद्दल जी स्नेहाची अभिव्यक्ती झाली व सर्वांच्या मुखातून या यात्रेला ज्या शुभकामना प्रगट झाल्या त्यामुळे परदेशांतून आलेल्या लोकांनाही विलक्षण आश्चर्य वाटले. सप्रू हाउसमध्ये इंडियन कौन्सिल ऑफ वर्ल्ड अफेअर्समार्फत एक जाहीर सभा झाली. त्या सभेचे अध्यक्षस्थान दिवाकरांनी सुशोभित केले होते. प्रथम मी बोललो. मी माझे भाषण लिहून काढलेले होते. नंतर मायकेल स्कॉट बोलले, नंतर जे.पी. बोलले. माझे ते भाषण ज्यांनी ऐकले त्यात जैनेंद्रकुमारांसारख्या प्रथितयश साहित्यकार मंडळींना असे वाटले की, हा एक विलक्षण प्रसंग आहे आणि त्याला आपण एक साक्षी आहोत. १२०० वर्षांपूर्वी भारतात आलेल्या ह्यूएनत्संग यात्रिकाची आठवण काही लोकांना झाली व त्याचे ऋण परत फेडण्यासाठी या कार्याची प्रेरणा मिळाली आहे असा अनुभव त्यांना आला. काकांनी मंडळींना निरोप दिला. मी प्रकृतीमुळे गेलो नव्हतो. तेथे काकांनी त्या महान यात्रिकाची तसबीर ज्या दिवाणखान्यात बैठक झाली तेथे आणून ठेवली होती व त्यांचे स्मरण करून व साक्ष ठेवून काका अर्धा तास बोलले. गांधीजींच्या समाधीपाशी यात्रेकरूंना निरोप देण्याचा सोहळा झाला. तो एक अनुपम सोहळा झाला. शेकडो लोक त्या दिवशी तेथे जमले होते. १ मार्च तारीख ठरविताना त्या दिवशी शुक्रवार आहे याचे आम्हा कोणाला स्मरण नव्हते. पण शुक्रवार निघाला. शुक्रवार नेहमी राजघाटावर प्रार्थना होत असते. त्या दिवशी त्याप्रमाणे तेथे प्रार्थना झाली. काका अध्यक्ष होते. कॅप्टन बिगेलो, मी, जी. रामचंद्रन् व काका बोलले. असा संयोग होता की त्याच दिवशी राजेंद्रबाबूंच्या मृत्यूची बातमी सर्वांनी वाचली होती. आम्ही सर्वांनी त्यांचे स्मरण करून त्यांना श्रद्धांजली दिली.

दुसरा संयोग असा होता की, शांतिनिकेतनचे चिनी भवनाचे प्राध्यापक तान युन शान हे त्या दिवशी मुद्दाम दिल्लीला आले होते. जेव्हापासून त्यांनी मैत्री-यात्रेची कल्पना ऐकली तेव्हापासून त्यांना ती अतिशय आवडली. या यात्रेत आपण सामील व्हावे अशी त्यांची इच्छाही आहे. यात्रेचे लक्ष्य पुरे व्हावे म्हणून ते मदत करण्याला तयार आहेत आणि करीत आहेत. निदान १ मार्चला तरी त्यांनी दिल्लीला यावे म्हणून मी लिहिले होते त्याप्रमाणे ता. २० ला ते दिल्लीला येऊन पोहचले. १ मार्चला जेव्हा यात्रा गांधीजींच्या समाधीपासून निघाली तेव्हा ते व मी हातात हात घालून यात्रा सुरू केली. यात्रेचा पहिला मुक्काम शहादऱ्याला होता. कारण यात्रा सायंकाळी ६ वाजता निघाली होती. शहादऱ्यापर्यंत ते यात्रेत चालत गेले. यात्रा निघाली तेव्हा शेकडो लोकांची हृदये भावनेने भरून आली व चांगल्या शिक्षित दिल्लीच्या नागरिकांच्या डोळ्यांतून भावनांचे अश्रू बाहेर पडत होते. शेकडो लोकांच्या शुभ-कामना व शुभेच्छा यांनी राजघाटाचे वातावरण पवित्र होऊन गेले होते. अनेकांच्या मनांत असा विचार आला की जणू गांधीजींचा आत्माच या यात्रेच्या रूपाने महानिर्वाणासाठी यात्रा करू लागला आहे. यमुनेच्या काठापर्यंत दोन-तीनशे स्त्री-पुरुष यात्रेच्या बरोबर होते. गाणी गायली जात होती व लोक मोठमोठ्याने घोषणा देत होते. त्या दिवशी राजेंद्रप्रसादांचा अंत्यविधी पाटण्याला असल्यामुळे जयप्रकाशबाबू व त्यांच्या पत्नी राष्ट्रपतींच्या बरोबर विमानाने पाटण्याला गेले होते. तथापि ते कार्य उरकून यात्रा जेव्हा सायंकाळी निघणार होती त्या वेळी परत येण्याचा त्यांचा संकल्प होता. पण विमानाच्या काही अडचणीमुळे ते वेळेवर राजघाटावर पोहचू शकले नाहीत. तथापि यात्रा एक मैल दीड मैल गेली नसेल तेव्हा ते सपत्निक यात्रिकांना भेटले. विमानतळावरून सरळ राजघाटला आले होते. पण जेव्हा ते समाधीपाशी आले तेव्हा यात्रा पुढे गेली होती. तान युन शानचा हात धरुन व दुसऱ्या बाजूला कोणाचा तरी आधार धरून मी यमुनेच्या तीरापर्यंत चालत गेलो. पण पुढे इतका थकलो की यात्रा पुढे गेली व मी वाटेत बसलो. चि. सुनंदाचे एक दीर शाम मोहनी शेतीमंत्रालयात अण्डर सेक्रेटरी आहेत. ते आपल्या स्वतःच्या मोटारीत नाना मोहनी, यमुताई वगैरे मंडळींना घेऊन यात्रेत आले होते. मी थकून मागे बसलो आहे असे जेव्हा काही वेळाने त्यांना कळले तेव्हा माझा शोध करीत मी जेथे थकून बसलो होतो तेथे ते येऊन पोहोचले आणि त्यांनी त्यांच्या मोटारीत बसवून शहादऱ्याच्या मुक्कामापर्यंत मला पोहोचविले. ती सर्व मंडळी २ तास माझ्या जवळ राहिली. जेवढी काही माझी सेवा करणे अवश्य होते तेवढी त्यांनी मोठ्या प्रेमाने केली. अखेर ९-१० वाजता मला झोपवून ती मंडळी दिल्लीला परतली.

१५ दिवस झाले, मी यात्रा करतो आहे. काही चालतो, काही वाहनाचा उपयोग करतो. मध्ये ५-६ दिवस मायकेल स्कॉटही माझ्यावरोवर यात्रेत होते. त्यांच्यासकट सर्व परदेशी मंडळी अतिशय सहानुभूतीने माझ्याशी वागताहेत. ही मैत्री-यात्रेची प्रेरणा माझी आहे हे सर्वांना माहीत झालेले आहे. यात्रा सुरू होण्यास किती अडचणी आल्या होत्या हे सर्व ह्या मंडळींना समजलेले आहे. माझ्या प्रेरणेमुळेच या सर्व अडचणी दूर होऊन ही यात्रा सुरू झाली आहे हेही त्यांच्या लक्षात आले आहे. ही मैत्री-यात्रा अहिंसेच्या विकासाच्या इतिहासात एक महान घटना आहे व तिची जगाच्या प्रश्नाचा शांतिमय निकाल शोधण्याला फार मोठी मदत होईल असे मायकेल स्कॉटसारख्या माणसालाही पटलेले आहे. यात्रेत प्रारंभी ३-४ दिवस अमेरिकेचे कॅप्टन विगेलो, मायकेल स्कॉट यांच्यावरोवर मनमोकळेपणाने या मैत्री-यात्रेची प्रेरणा, त्याची कारणे, तिची उद्दिष्टे यावर माझी चर्चा झाली. मायकेल स्कॉट यांचा असा आग्रह पडला की, ही सर्व चर्चा मी माझ्या शब्दांत लिहून काढावी, म्हणजे ते लंडनला घेऊन जाऊ शकतील व तिच्या आधारे युरोप व अमेरिकेतील लोकांशी ते चर्चा करू शकतील. माझी प्रकृती तितकीशी वरी नसल्यामुळे यदाकदाचित हे करण्याला मला १-२ दिवस उशीर झाला तर आपण आपले इंग्लंडचे जाणे लांबणीवर टाकू असे त्यांनी सांगितले. ग्रुपमधल्या दोन मंडळींच्या साह्याने व दादा धर्माधिकारी यांच्या मदतीने मी माझे म्हणणे लिहून काढले. त्यावर ग्रुपमध्ये खूप चर्चाही झाली. अखेरची जी नोट तयार झाली तिची एक प्रत घेऊन मायकेल काल लंडनला परत गेले आहेत.

दादा धर्माधिकारी दिल्लीपासून या यात्रेत केवळ माझ्याबद्दलच्या मैत्रीमुळे बरोबर आहेत. या मैत्री-यात्रेबद्दलची त्यांची मते जरा निराळी आहेत. पण मित्र म्हणून मला जी जी मदत करता येईल ती करता यावी म्हणून ते माझ्यावरोवर यात्रेत आहेत आणि लागेल तितके दिवस ते माझ्यावरोवर राहायलाही तयार आहेत. जाहीर रीतीने ते कोठेही भाषण करीत नाहीत. फक्त खाजगी चर्चेमध्ये जरूर तेव्हा भाग घेतात. उद्देश मला मदत व्हावी एवढाच. शंकरराव जावडेकर आणि तुम्ही, तसे दादा गेली ८-१० वर्षे आपल्या मैत्रीचा प्रसाद मला देताहेत. ही त्यांची मैत्री निरुपचारिक आहे. माझ्या आयुष्यात ही एक विलक्षण घटना घडली आहे.










यात्रेचे लक्ष्य महान आहे व जगाच्या भावी इतिहासावर याचा सत्परिणाम होईल असे जे प्राज्ञ आहेत त्यांची प्रज्ञा सांगते आहे. पण मी असे ऐकले आहे की या यात्रेशी संबंध आहे एवढेच नव्हे तर तिची कल्पना माझी आहे व आज मी तिचा प्रवक्ता आहे यामुळे महाराष्ट्रातल्या वर्तमानपत्रांतून तिचे वाभाडे काढले जात आहेत. महाराष्ट्रातील वर्तमानपत्रकार व महाराष्ट्रातील बुद्धिवादी यांचा दृष्टिकोन, या यात्रेशी माझा संबंध आहे त्यामुळे, किती कलुषित झालेला असेल याची कल्पना मी करू शकतो. यात्रेचे वाभाडे काढीत असताना ते माझ्यासंबंधी मनात काय म्हणत असतील व उघडपणे काय बोलत असतील व लिहीत असतील याचीही मला कल्पना आहे. ती माझ्या जीवनातील करुणांतिका आहे व ती अखेरपर्यंत राहणार आहे हेही मला माहीत आहे. याचे मला दु:ख असले तरी माझ्या अंतःकरणाची ती व्यथा नाही. माझ्या अंत:करणाची व्यथा ही आहे की, यामुळे महाराष्ट्रातील माझे लाखो बंधु-भगिनी या यात्रेच्या महान लक्ष्यापासून अस्पृष्ट राहतील, आणि अंतःकरण पवित्र व उदात्त करण्याच्या एका संधीपासून ते वंचित राहतील. संयुक्त महाराष्ट्राचे आंदोलन जेव्हा सुरू होते तेव्हा मुंबई हायकोर्टचे त्या वेळेचे एक न्यायाधीश श्री. गजेंद्रगडकर व मुंबई सरकारचे चीफ सेक्रेटरी श्री. भट हे मुद्दाम मला खाजगी रीतीने एका डॉक्टराच्या घरी भेटीसाठी आले होते. त्या वेळी गजेंद्रगडकरांच्या मुखांतून असे उदगार निघाले होते की, मी महाराष्ट्राचा कायापालट करून राहिलेलो आहे. त्यांचे इंग्रजी शब्द मला वाटते 'रीजुवेनेट महाराष्ट्र' असे होते. आपण स्वतः ह्या प्रक्रियेतून जात आहोत असेही ते मला म्हणाले होते. आजही, ज्या नैतिक पातळीवरून मी संयुक्त महाराष्ट्राचे आंदोलन चालवीत होतो त्यामुळे ते एक फार मोठे काम होते असे मला वाटते. मी सुचविल्याप्रमाणे पंडितजींनी व इतर राष्ट्रीय पुढाऱ्यांनी द्विभाषिक मान्य केले असते तर तो एक महान प्रयत्न ठरला असता व त्याचा हिंदुस्थानच्या पुढील घडणीवर फार मोठा परिणाम झाला असता. पण हे माझे मत असूनही मला असे वाटते की, मैत्री-यात्रेपुढे ते कार्य एक सामान्यच कार्य होते. आणि मैत्री-यात्रेबद्दलचे हे मत मी वर म्हटल्याप्रमाणे माझे नाही. 'जगाच्या इतिहासातील एक महान घटना' असे अनेकांनी ह्याचे वर्णन केले आहे.

ही मैत्री-यात्रा म्हणजे अहिंसेचे एक संपूर्ण स्वरूप व आंतरराष्ट्रीय संबंधातील संघर्षावरील एक अमोघ उपाय इतकी त्याची नैतिकता व आध्यात्मिकता काही थोर मनांना वाटते आहे. अशा या घटनेपासून महाराष्ट्रातील जनता अस्पृष्ट राहावी याची व्यथा मी वर म्हटल्याप्रमाणे माझ्या मनाला एक प्रकारे दु:खी करते आहे. महाराष्ट्रातील सामान्य जनतेला या संकटातून काहीही करून वाचवावे असे मला वाटते. पण काय करावे हे मला समजत नाही. एक गोष्ट सुचली ती ही की, महाराष्ट्रातील ज्या थोर मनांना ह्या मैत्री-यात्रेचा गुण पटलेला आहे त्यांनी मराठी जनतेला तो आपल्या वाणीने व लेखणीने पोहचवावा. दादा धर्माधिकारी यांनाही तसे वाटते. पण मी वर म्हटल्याप्रमाणे या मैत्री-यात्रेबद्दल, तिच्या गुणांचे मूल्य त्यांना मान्य असूनही, त्यांची काही निराळी मते आहेत; म्हणून इच्छा असूनही आज त्यांना लिहिण्याची प्रेरणा होत नाही. महाराष्ट्रात हे कोण कोण करू शकेल याबद्दल माझी चर्चा झाली. तुम्ही स्वतः लिहू शकला तर फार चांगली गोष्ट होईल असे त्यांचे व माझे मत पडले. परंतु तुमची आजची प्रकृती लक्षात घेता तुम्ही हे करू शकाल किंवा कसे याची खात्री वाटत नाही. इतर काही नावे सुचली पण पक्का निर्णय होऊ शकला नाही. मला वाटते, तुम्हीच या बाबतीत अधिक विचार करू शकाल व या कामासाठी कोण उपयोगी पडेल हे तुम्हीच अधिक ठरवू शकाल. श्री. शंकरराव किर्लोस्कर यांना या मैत्री-यात्रेची कल्पना मान्य आहे असे मी समजलो आहे. महाराष्ट्रातील सत्प्रवृत्त व सद्भावनांवर विश्वास ठेवणाऱ्या नैतिक प्रज्ञावानांची नैतिक विवेकबुद्धी कशी संघटित करावी हे ठरविण्याला कदाचित तुम्हाला त्यांची मदत होईल. या बाबतीत तुम्हांला अधिक काय लिहू?

हे पत्र खूप मोठे झाले आहे. यात्रेत मी वाहनाचा उपयोग करतो हे वर लिहिलेच आहे. आज सकाळी रस्त्यात बाकीच्या यात्रेकरूंची प्रतीक्षा करीत एका झाडाखाली बसलो असताना या पत्रातील बराचसा भाग मी लिहिला आहे. सूर्योदयाच्या वेळी सर्व यात्रिक ५ मिनिटे एका ठिकाणी बसून सायलेन्ट कम्यूनियन करतात. मुक्कामावर पोचण्यापूर्वी मी यात्रिकांच्या बरोबर १-२ मैल चालतो. मध्यंतरी ३ दिवस वाहनाचा उपयोग न करता ७-८ मैल असलेल्या मुक्कामावर चालत गेलो. त्यामुळे पुनः थकून गेलो. यापुढे चालणे कमी केले आहे. काळजी करण्याचे कारण नाही. जितकी विश्रांती घेता येईल तितकी घेतो आहे. सर्व ठीक होईल अशी श्रद्धा आहे.

**शंकरराव**

– ६ –

(मैत्री-यात्रेत असताना पू. केदारनाथजींनी शंकररावांना त्यांच्या यात्रेत सुयश चिंतणारे हृदयस्पर्शी पत्र लिहिले होते.



अनुक्रमणिका

त्याच्या उत्तरी प्रकट झालेल्या भावना या पत्रात उमटल्या आहेत.)

मुक्काम राधिकापूर (बंगाल)
भारत पाकिस्तानच्या सीमेवर,
३-७-६३

श्री. केदारनाथजी,
सप्रेम नमस्कार वि.वि.

आज सकाळी येथे पोहोचलो, तो बरेच दिवसांनी मिळालेल्या डाकेत तुमचे सहृदयतेने व श्रद्धेने लिहिलेले आशीर्वादस्वरूप पत्र मिळाले. तुमचे पत्र वाचून मला काय वाटले ते, नाथजी, मी कसे व किती लिहू? तुमचे पत्र वाचत असताना व वाचल्यानंतर माझे हृदय भरून येत होते व डोळ्यांवाटे अश्रू वाहात होते. नाथजी, मी काही वेळ लहान मुलासारखा रडलो. स्नानगृहात पाण्याने नाहात होतो, त्याच बरोबर डोळ्यांतील अश्रू माझे शरीर व मन स्वच्छ करीत होते. तुमची सहृदयता, श्रद्धा, शुभाशीर्वाद पवित्र जलाचे रूप धारण करून जणू माझे शरीर व मन निर्मल करीत होते असा अनुभव मी घेत होतो.

तुमचे पत्र वाचून मला काय वाटते ते मी येथे शब्दांत लिहू शकत नाही. या व इतर असलेल्या कोणत्याही कामासाठी माझी शक्ती अपुरी, नव्हे अगदी अल्प आहे, याची जाणीव मला आहे. या जाणिवेचा जळजळीतपणाही कदाचित माझे हृदय भाजून काढीत असावा व त्याचे असह्य दुःख माझ्या नेत्रांतून अश्रूंच्या रूपाने बाहेर पडत असावे.

मी व माझे सहयात्रिक एका महान संकल्पाच्या सिद्धीसाठी यात्रा करीत आहोत, ही जाणीव माझ्या मनाला व बुद्धीला आहे. बलिदान करणे हे माझे उद्दिष्ट नाही. या व यासारख्या उद्दिष्टाच्या वैय्यर्थ्यतेतून माझे मन व बुद्धी आता मुक्त झाली आहे, असे मला वाटते. पण या महान संकल्पाच्या सिद्धीच्या कार्यात माझे बलिदान झाले तर माझे जीवन कृतार्थ झाले या आनंदाने माझ्या जीवनाच्या नाटकाच्या शेवटच्या अंकातील शेवटच्या प्रवेशाची समाप्ती मी पाहीन. निदान तो आनंद मला अंतकाली मिळावा अशी आज प्रार्थना आहे. महान संकल्प व अल्पशक्ती ही, नाथजी, माझ्या जीवनाची शोकांतिका आहे. याची जाणीव जितकी मला आहे तितकी अन्य कोणालाही नाही, व ती असणे शक्यही नाही. या यात्रेत प्रयागच्या मुक्कामावर मी जाहीर सभेत म्हणालो होतो की, 'माझा सूळ मला स्वतःच्या खांद्यावर न्यावयाचा आहे' (टु कॅरी माय ओन क्रॉस) हे मी जाणतो. त्या सभेत काळ्या निशाणांचे निदर्शन, अगदी छोटे, पण सुरू होते. ही महान संकल्पाची पदयात्रा माझ्या जीवनाच्या शोकांतिकेतील शेवटचा अंक ठरावी आणि त्यातील शेवटच्या प्रवेशाची समाप्ती माझ्या बलिदानाने होवो असे माझे मन इच्छित नाही. पण जर ती समाप्ती माझ्या बलिदानाने झाली तर मला आनंद होईल व माझा अंतकाल त्या आनंदाच्या अश्रूंनी सौम्य व सह्य होईल. जी अनंत व अज्ञात शक्ती हे सर्व करीत आहे व करवीत आहे तिच्या मनात व योजनेत माझ्या जीवनाच्या शोकांतिकेच्या या शेवटच्या अंकाची समाप्ती आजपर्यंतच्या या पूर्वीच्या अंकांच्या समाप्तीपेक्षा काही निराळ्या रीतीने करावयाची असेल तर मला आनंदच होईल. ते काहीही असो, या शोकांतिकेचा अंत कसाही होवो, माझा अंत आनंदातच होवो व होईल अशी श्रद्धा-आशा मी बाळगून आहे.

आजच्या मैत्री-यात्रेचा महान संकल्प आणि भगवान बुद्ध व जगातील निरनिराळ्या भागांत व निरनिराळ्या कालांत जन्माला आलेल्या अनेक महात्म्यांनी केलेला संकल्प एकच आहे असे, नाथजी, तुम्ही म्हटले आहे. खरे आहे. भगवान बुद्धाचा महान संकल्पच या मैत्री-यात्रेचा संकल्प आहे हे अगदी सत्य आहे. पण कोणीकडे भगवान बुद्ध व ते महात्मे आणि कोणीकडे मी व माझे साथी यात्रिक! श्री. विनोबाजींनी या मैत्री-यात्रेला पाठविलेल्या संदेशात मला व माझ्या साथी यात्रिकांना स्मरण करून दिले होते की, आम्ही ज्यांच्या शांतीसाठी व सुखासाठी ही यात्रा करीत आहोत त्या मानवांच्या पायाच्या धुळीच्या कणाहूनही आम्ही कण आहोत व हे अगदी सत्य आहे. भगवान बुद्धाच्या पदकमलाच्या रजःकणाचीही सर मला नाही. पण ज्या रस्त्यावरून ते गेले किंवा त्यांनी जो रस्ता बांधला त्या रस्त्यावरूनच, मी काल येथील कार्यकर्त्यांच्या सभेत म्हटल्याप्रमाणे, आम्ही जात आहोत असा मला विश्वास आहे. भगवान बुद्धाने व त्याच्यासारखे ज्यांचे विचार व कार्य होते अशा जगातील दुसऱ्या महात्म्यांनी जो रस्ता दाखवला त्या रस्त्यावरून मानव आजपर्यंत चालत आला असता तर आजचे स्वरूप दुनियेला कधीच प्राप्त झाले नसते असे तुम्ही तुमच्या पत्रात म्हटले आहे. याच्या पूर्वीच्या मुक्कामावरील (कालियागंज) व्याख्यानात, नाथजी, मी अशाच प्रकारचे विचार बोललो होतो. परंतु आजपर्यंत मानव या रस्त्यावरून चालला नसला तरी यापुढे या रस्त्यावरून चालल्याशिवाय त्याला अन्य गती नाही असे मला वाटते. तो आपला सर्वनाश करून घेणार नाही, अशी माझी श्रद्धा आहे, व माझ्या भाषणांतून मी ती व्यक्तही करतो. आज जगात अनेक ठिकाणी अनेक आत्मे मानवाने भगवान बुद्धाचा हा रस्ता स्वीकारावा म्हणून प्रयत्न करीत आहेत. अशा या प्रयत्नांपैकी ही मैत्री-यात्रा एक अल्प प्रयत्न आहे. माझे भाग्य आहे की, मी त्याचे निमित्त झालो





आहे. पण, नाथजी, या बाबतीत माझे एक मनाचे दु:ख आहे की, तुम्ही, श्री. विनोबाजी व अनेक इतर मंडळी या देशात आहेत की जी या कार्याला माझ्यापेक्षा अनंतपटीने अधिक अधिकारी आहेत. त्यांपैकी कोणी ही यात्रा सुरू केली नाही. केली असती तर या यात्रेच्या उद्दिष्टाची सिद्धी किती तरी पटीने अधिक आश्वासित झाली असती. अर्थात तुम्ही, श्री. विनोबाजी व या देशात असे अनेक लोक आहेत की ज्यांनी या यात्रेच्या उद्दिष्टाच्या सिद्धीसाठी आपले जीवन समर्पण केले आहे व त्यासाठी महान तप केलेले आहे, व आजही करीत आहेत. मला एवढेच वाटते की, ही यात्रा तुमच्यापैकी कोणी केली असती तर तिचे पुण्य अनेक पटीने अधिक संचित झाले असते व मानवाचे जीवन सुखी होण्याचा रस्ता अधिक शीघ्र बनला असता. पण कदाचित जे होणार ते टळत नाही.

भविष्य अज्ञात असते असे तुम्ही लिहिले आहे. तुमच्यासारख्या सज्जन पुरुषाच्या शुभाशीर्वादांनी माझी लायकी व शक्ती वाढो एवढीच माझी प्रार्थना आहे. या कार्याला तुमचा प्रारंभापासून शुभाशीर्वाद व शुभकामना मिळाल्या आहेत, त्यामुळे हे कार्य अंगीकारण्याला मला फार मोठे प्रोत्साहन व आश्वासन मिळाले आहे. हे तुमचे माझ्यावर अनंत उपकार आहेत व त्याचे मला अखेरपर्यंत स्मरण राहील.

बाकी जे तुम्ही यात्रेबद्दल लिहिले आहे ते सर्व समजले. आम्ही पाकिस्तानच्या सीमेवर आहोत. प्रवेशाला परवानगी मिळाली नाही. ती अखेरपर्यंत मिळाली नाही तर आम्ही येथे एक आठवडा मुक्काम करणार आहोत. या मुक्कामात प्रार्थना, काही रचनात्मक काम व काही यात्रेच्या पुढील कार्यक्रमाचा विचार असा कार्यक्रम आहे. पावसाळा थोडा थोडा सुरू झाला आहे. तरी पावसाळ्यातील इकडील उकाडा माझे शरीर उकडून काढतो. पण महान संकल्पाच्या सिद्धीसाठी जे आजपर्यंत लोकांनी केले आहे, त्यापेक्षा हे काही निराळे नाही – नव्हे फारच अल्प आहे. बाकी सर्व उत्तम चालले आहे. नवीन नवीन अनुभव येत आहेत; त्यांतून बोध मिळत आहे. व मी या कामाला किती अनधिकारी आहे याची जाणीवही नित्य वाढत आहे.

तुमचे पत्र वाचल्याबरोबर बाकी सर्व कामे बाजूला ठेवून तुम्हाला हे पत्र लिहिणे सुरू केले. तुमचे पत्र वाचून मनावरील भार हलका झाला आहे, व तो अधिक हलका व्हावा म्हणून हे पत्र लिहिण्याला ताबडतोब सुरुवात केली. पाकिस्तानच्या सीमेवरील हा मुक्काम प्रार्थनेचा मुक्काम आहे, असे माझ्या मनाने मानले आहे. पण या प्रार्थनेला उपोषणाची जोड द्यावी असा मनात संकल्प उठला नव्हता. अलीकडे माझ्या मनाची श्रद्धा जरा निराळ्या वळणाने वाहत आहे. पण तुमचे पत्र वाचले आणि मनात संकल्प उद्‌भवला की, आज मुक्कामाचा पहिला दिवस, म्हणजे प्रार्थनेचा पहिला दिवस, त्याचा प्रारंभ उपोषणाने करावा आणि २४ तास उपोषण करावे असे मी ठरविले. नाथजी, तुम्हाला धन्यवाद.

तुम्ही पत्राच्या प्रारंभी लिहिले आहे की, यापूर्वीच पत्र लिहिण्याची इच्छा असूनही प्रकृतीच्या अस्वस्थपणामुळे तुम्ही पत्र लिहू शकला नाही. तसेच पत्राच्या शेवटी तुम्ही लिहिले आहे की 'नीट दिसत नसल्यामुळे अक्षर बरोबर आले नाही.' चिंता वाटते. परमेश्वर तुम्हाला दीर्घ आयुष्य व उत्तम स्वास्थ्य देवो. तुमच्या जीवनाचा जगाला केवढा लाभ आहे हे तो जाणतो.

तुम्हाला सहस्त्र प्रणाम करणारा,

**शंकरराव**

– ७ –

(श्री. भाऊ धर्माधिकारी यांना त्यांच्या पत्राच्या उत्तरी मैत्री-यात्रेतून लिहिलेले पत्र.)

मुक्काम मैत्री-आश्रम
४-११-६३

सप्रेम आशीर्वाद,

माझे कार्ड तुला मिळाले आहे व 'उपनिषदांतील दहा गोष्टी'चे तुझ्या मनाप्रमाणे संस्करण करण्याचा तुझा मार्ग त्या पत्राने मोकळा केल्याने तू त्या मार्गाला लागला आहेस अशी आशा आहे.

हे पत्र मी मैत्री-आश्रममध्ये बसून लिहीत आहे व चि. कुसुम लेखिकेचे काम करीत आहे. येथे आल्यापासून सासवडचा आश्रम व प्रेमाबाईचे स्मरण होते. अंदाजे ३० वर्षांपूर्वी सासवडचा आश्रम जन्माला आला. गेल्या ३० वर्षांत माझ्या जीवनगंगेने सासवड आश्रमापासून मैत्री-आश्रमापर्यंत प्रवास केला. नदी उगमापासून निघते तेव्हा सागराला मिळण्याचा तिचा संकल्प असतो. पण या मीलनासाठी तिला कुठल्या प्रदेशातून वाहायचे आहे हे तिला माहीत नसते. अज्ञातातून ती लक्ष्याच्या ओढीमुळे निडरतेने प्रवास करते. माझ्या जीवन-गंगेबद्दल असेच म्हणता येईल. सध्या माझा (मैत्री-यात्रेचा) काही दिवस येथे मैत्री-आश्रमामध्ये मुक्काम आहे. लक्ष्याच्या प्राप्तीसाठी पुढचा प्रवास कोणत्या प्रदेशातून करावयाचा याचा निर्णय अद्याप झालेला नाही. चेतन मानव अचेतनाचे अनुकरण करील तर तो जड होईल अशी भीती वाटते. पण व्यापकतेच्या जाणिवेने जर तो अचेतनाच्या गुण-धर्माचे अनुकरण करील तर तो चैतन्याला प्राप्त होईल.






"तैसे चित्त लया जाये।। आणि चैतन्यचि आघवे होये। ऐसी प्राप्ती सुखापाये। आहे येणे।।"

यात्रेतील माझ्या मनाचा ठाव घेण्याची तुझी इच्छा आहे, ती स्वाभाविकच आहे. सागराचा ठाव घेता येईल, पण माणसाच्या व त्यातूनही माझ्यासारख्याच्या मनाचा ठाव घेणे कठीणच. जीवनात मी अशा परस्पर-विरोधी अनुभवांतून गेलो आहे की, त्या परस्परविरोधी अनुभवांच्या मध्य-बिंदूवर माझे मन स्थिर करण्याला मी अद्याप समर्थ झालेलो नाही. मला दृष्टी आहे पण सृष्टी नाही. माझे जीवन म्हणजे दृष्टि-सृष्टीमधला संघर्ष आहे. दृष्टीप्रमाणे सृष्टी करण्याचा आग्रह 'बिकमिंग' मध्ये जातो आणि 'बिकमिंग' भव्यासाठी असले तरीसुद्धा ते कष्टमय होते. या कष्टात सुखदुःखाचे मिश्रण आहे. याचे चित्रण करण्याची शक्ती माझ्यामध्ये असती व हे चित्रण मी केले असते तर जगाला या चित्राच्या कुरूपतेतूनही सौंदर्याचे दर्शन झाले असते. संवादात कधी कधी ते करण्याची माझी शक्ती आहे. पण आपण एकमेकांपासून सध्या पार्थिव सृष्टीत इतके दूर आहोत की, मानस-संवादही सध्या संभवत नाही. म्हणून तुझी जिज्ञासा मी पुरी करू शकत नाही. म्हणून मला खेद आहे.

गेल्या आठ महिन्यांत तू मला पत्र लिहिले नाहीस याचे कारण तू मोकळ्या मनाने लिहिलेस ते मला बरे वाटले. माझ्याजवळ तू हट्ट केलास तो तुझा माझ्यावरील स्नेह आहे. पण मी तुला जे पत्र लिहिले नाही त्याचे कारण 'जशास तसे'-प्रमाणे माझाही हट्ट असे मात्र नाही. या यात्रेत गेले आठ महिने माझे ज्या प्रकारे जीवन चालले त्यात तुला पत्र लिहावे अशी इच्छा असुनसुद्धा ते लिहिणे मला शक्य झाले नाही. त्याच्या कारणात मी जात नाही. आता तुला मी पत्र लिहू शकतो याचा मला आनंद आहे.

तुझे काम कसे काय चालले आहे? परवा देवकी भेटला होता. म्हणत होता गांधी-साहित्य मराठीत आणण्याचे काम चालू आहे व ते तुलाही मिळाले आहे किंवा मिळणार आहे. 'अर्था'च्या बाबतीत तुझी कधी अडचण होऊ नये अशी माझी सदा इच्छा आहे. मी कधी अर्थप्राप्ती केली नाही. त्यासाठी मी अडचणीही सोसल्या आहेत. पण अर्थापासून मिळणारे वैभव माझ्यापासून कधी फार दूर राहिलेले नाही. त्यामुळे मला अर्थाच्या दोन्ही बाजू माहीत आहेत.

माझी प्रकृती चांगली आहे.

**शंकरराव**

— ८ —

(मैत्री-यात्रेच्या अंतिम टप्प्याच्या समाप्तीच्या प्रसंगी केलेले आत्मपरीक्षणपर पत्र – श्री. प्रेमाबाईंना)

मैत्री-आश्रम, पो. लिलाबारी
उत्तर-लखीमपूर (असम)
५-११-६३

सप्रेम आशीर्वाद,

पुष्कळ माणसे बरोबर आहेत, प्रेमळ आहेत; आणि या यात्रेत माझ्यावर प्रेमाचा वर्षाव होतो आहे. विनोबांनी या यात्रेचा गुण म्हणून सांगितले होते की, 'ही यात्रा ज्या ज्या प्रदेशांतून जाईल तेथे-तेथे त्या वेळचा ऋतू तीव्रतम असेल". जेथे उन्हाळा असेल तेथे कडक उन्हाळा, पावसाळा असेल तेथे मुसळधार पाऊस, व थंडी असेल तेथे कडाक्याची थंडी. असममध्ये तर मुसळधार पावसात गळ्याइतक्या पाण्यातून यात्रा करावी लागेल अशी सर्वांची कल्पना. नेहमीप्रमाणे यंदाही असममध्ये पूर आलाच होता. काही ठिकाणच्या लोकांना गळ्याइतक्या पाण्यात जावेही लागले होते. पण संयोग असा की, जेथे-जेथे गेलो तेथे अवर्षणच होते. त्यामुळे क्वचितच वरून खाली धाव घेणाऱ्या जलधारांनी आम्हाला झोडपले. पण त्याची पूर्ती असमने प्रेमाने केली. असममध्ये प्रवेश केला तो प्रथम बाइदेवच्या प्रेमाच्या स्नेहाच्या स्वागताने. अमलप्रभा बाइदेवला तसा मी ओळखत होतो व अल्प परिचयही होता. पण तो कामानिमित्त. ज्याला आपण स्नेह म्हणतो तो स्नेहसंबंध यापूर्वी तिच्याशी आला नव्हता. असमची प्रकृती सौम्य आहे. बाइदेव तिची सजीव मूर्ती आहे. पौर्णिमेच्या चंद्रासारखीच ती शीतल आहे, व आपल्या शीतल प्रभेने आबालवृद्धांना प्रभावित करीत असममध्ये ती सर्वोदयाच्या ब्रह्मपुत्रेला पूर आणीत आहे. असमच्या यात्रेत खास माझ्या सेवेसाठी म्हणून निर्मलाने दोन सेविका दिल्या. मंडीची विमल व बेंगलोरची सरोजा. दोघींनीही आपल्या वाणीने व प्रेमळ सेवेने मला अल्प काळातच असमचे पिताजी केले; इतके की, एकदा खेड्यातल्या वृद्धेने विचारले "हे कोण?" तेव्हा बाइदेव (अमलप्रभा दास) ने उत्तर दिले "आमचे पिताजी". असमचे हे सर्व प्रेम साठविण्यास माझे हृदयाचे भांडे फार लहान पडते आहे, याची जाणीव मला आहे.

हे पत्र मी मैत्री-आश्रममध्ये बसून लिहीत आहे. "मी विनोबांच्या पादुका घेऊन हा आश्रम चालवत आहे". – असे म्हणणारी कुसुमच हे पत्र लिहीत आहे. मैत्री-आश्रमने व कुसुमने सासवडच्या आश्रमचे व तुमचे स्मरण करून दिले. फरक इतकाच की, तुमच्या हृदयात गांधीजींची भक्ती होती व येथे कुसुमच्या हृदयात विनोबांची.

मी काल भाऊला लिहिल्याप्रमाणे सासवड-आश्रमापासून निघालेली माझी जीवनगंगा मैत्री-आश्रमापर्यंत पोहोचली आहे.

अनुक्रमणिका

अल्पकाळासाठी का होईना, ती विराम घेत आहे. या विरामाच्या काळात स्नेह व शांतीचा लाभ मी घेत आहे. या सर्वांची जाणीव माझ्या जीवनात तुम्ही ज्याची अपेक्षा करता आहात तो अध्यात्मरस शुद्ध स्वरूपात अद्याप निर्माण करू शकली नाही. तथापि बुद्धी शुद्ध होते आहे. अन शुद्ध बुद्धी हृदय निर्मळ करील व करीत आहे, अशी माझी श्रद्धा व अनुभवही आहे. जुन्या खोडी तशा सहज नाहीशा होत नाहीत. अन् मी याला अपवाद नाही. तथापि माझ्या जीवनगंगेची धारा वाळवंटातून, खडकातून, आदळत आपटत वाहात जात असली तरी तिचे एक लक्ष्य किंवा एक दिशा आहे हे आत्तापर्यंतच्या अनुभवाने मान्य करावे लागते. आणि म्हणून माझ्या जीवनाचा अंत तुम्ही अपेक्षा करता तसाच तो होईल असा आशावाद या यात्रेने माझ्या मनामध्ये निर्माण झालेला आहे.

तुम्ही लिहिता माझी मूल्ये स्थिर राहात नाहीत – वारंवार बदलतात. अर्थात दुसऱ्याच्या दृष्टीने आपले जीवन पाहण्यात माणसाचा मोठा लाभ असतो हे मलाही मान्य आहे. आणि म्हणून तुम्ही जे लिहिता तेही कदाचित माझ्या जीवनाचे सत्य असेल. पण मी नम्रपणे असे म्हणू इच्छितो की, अध्यात्माच्या ओढीमुळे नैतिक जीवनाचा प्रयत्न, हे माझ्या जीवनाचे स्थायी मूल्य आहे, असे मला वाटते. माझ्या अध्यात्माच्या ओढीला बालपणी माझ्या मनावर जे भारतीय अध्यात्माचे व संस्कृतीचे संस्कार झाले ते कारण आहेत. आणि नैतिक जीवनाची प्रेरणाही ह्याचेच फळ आहे. गांधीजींनी त्या दोन्हीला साकार रूप दिले. काँग्रेसची सेवा, संयुक्त महाराष्ट्र, सर्वोदय आणि मैत्री-यात्रा हे माझ्या सार्वजनिक जीवनाचे स्थूल मानाने चार खंड आहेत. या चारी खंडांत एक अखंड अनुभव मला आलेला आहे, अन् तो म्हणजे भौतिक फलनिरपेक्षता. एकामागून एक या खंडांतील कार्याच्या नैतिकतेने माझे अध्यात्म विकसित होत गेले असे मी म्हणण्याचे धारिष्ट्य केले नाही तरी, नैतिकतेची व्यापकता व खोली वाढत गेली, आणि तितके हृदयाने अनुभवले नसले तरी बुद्धीने अध्यात्माचे दर्शन अधिक केले आहे व झाले आहे. हे मी अहंकाराने लिहीत नाही. जे व्हायला पाहिजे होते व जे झाले आहे त्याच्यातील अंतर अनंत आहे, ह्याची जाणीव मला आहे. माझ्यात अनेक महान दोष असूनही हे जे घडले आणि घडत आहे त्यावरून माझे स्वतःच्या जीवनाचे दर्शन बरोबर आहे, अचूक आहे, इतके आश्वासन मला मिळालेले आहे. पूर्वीप्रमाणे माझा पूर्वजन्म व पुनर्जन्म यांच्यावर विश्वास असता तर मी "अनेकजन्मसंसिद्धः" या वचनाने काळ आणि साधन यांची जोड बसवली असती, व पुढील जन्मातील सिद्धि-प्राप्तीचे आश्वासन मनाला देऊन शांत झालो असतो. पण कृष्णमूर्तींना याचे श्रेय दिले पाहिजे की, मला आता "अनेकजन्मसंसिद्धः" हे वचन आश्वासन देत नाही, आणि आवश्यकही वाटत नाही. पण कृष्णमूर्तींना याचे श्रेय देणे उचित असले तरी मला वाटते याचे खरे श्रेय ब्रह्मसूत्रालाच आहे. ब्रह्मसूत्राशी माझा जो अल्प परिचय झाला (बाळकोबांना श्रेय) तो झाला नसता तर माझी बुद्धी, माझे मन, या संस्कारजन्य श्रद्धेतून मुक्त झाले नसते. अर्थात माझ्या जीवनात बुद्धी व मन यांचे ऐक्य हा कालाचा प्रश्न आहे. याचा तुम्हाला पुष्कळच अनुभव आहे. आज सिद्धीचीही आकांक्षा पूर्वीप्रमाणे माझ्या मनात राहिलेली नाही. क्षणोक्षणी नवीन जीवन जगणे हीच म्हणायची असली तर सिद्धी आहे. यातच सर्व अध्यात्म भरलेले आहे. यावर माझी मती अधिकाधिक स्थिर होते आहे.

युधिष्ठिराचे विस्मरण मला झालेले नाही. त्याच्या त्या शेवटच्या आचरणातील भावनेची उंची व भव्यता आजही मला मान्य आहे. पण मी आज मात्र त्या भावनेशी सहमत नाही. अशा माझ्या जुन्या किती तरी भावनांचा भंग कृष्णमूर्तींच्या सहवासामुळे झालेला आहे. तुम्हांला हे वाचून काय वाटेल हे मी जाणतो. परंतु याही बाबतीत अधिक पत्र-प्रपंच करीत नाही. यात्रेच्या गुणाबद्दल विनोबांचे वाक्य व त्या बाबतीतील माझा अधिकार याबद्दलचे तुमचे लिहिणे मला मंजूर आहे. मात्र मनुष्य प्रेमामध्येच आपल्याला विसरू शकतो हे तुमचे विधान बरोबर नाही असे मला वाटते. माणसामध्ये स्वतःला विसरवणारी शक्ती अनेक दुसऱ्या गोष्टींतही आहे. पण प्रेमात विसरणे हे सर्वश्रेष्ठ आहे हे मला आता मान्य आहे. याचे श्रेय मैत्री-यात्रेला आहे.

मैत्री-यात्रेसंबंधी तुम्ही जे काही ऐकले व वाचले ते समजले. हाँगकाँगच्या गव्हर्नरने चीनने परवानगी दिल्याशिवाय हाँगकाँगमधील प्रवेश नाकारला आहे. ब्रह्मदेशाने ओवरलँड रूट नाकारला. तथापि बंद झालेले दरवाजे ठोठावण्याचे काम बंद झाले नाही. "नॉक अँड इट विल बी ओपन्ड" हा मैत्री-यात्रेचा मंत्र आहे.

मैत्री-आश्रमात बसून नेफामधून भारत-चीन सीमेवर पोहचण्यासाठी काय करावे लागेल याचा विचार सुरू आहे. त्यासाठी मी उद्या विमानाने दिल्लीला जात आहे. तिकडून पट्टीकल्याणाला. तिथे स.से. संघाच्या प्रबंध समितीची बैठक आहे. १२, १३ ला परत येईन. परत येताना जवाहरलालजींना भेटण्याचा विचार आहे. सध्या पुढे जाण्याचा निर्धार आहे, पण मार्ग अनिश्चित आहे.

**शंकरराव**

अनुक्रमणिका






# उपनिषदे व मी

मला जीवनाची जाणीव झाली त्या वेळीं मी मातृहीन झालेलों होतों. जीवनाला जिव्हाळ्यानें मार्गदर्शन करील असें कोणी नव्हतें. म्हणून या विषयाची गोडी मला कशी लागली हें सांगतां येत नाहीं. कोणीं ती लावण्याचा खास प्रयत्न केला असेंहि नाहीं. मला जें स्मरतें तें असें कीं, लहानपणीं इंग्रजीं शाळेंत विद्यार्थिदशेंत असतांनाच महाभारत, भागवत यांसारखे धार्मिक ग्रंथ वाचण्याची आवड मला लागली. त्या वेळी डॉ. ॲनी बेझंट यांच्या प्रेरणेनें भारतीय तत्त्वज्ञान आणि संस्कृति यांच्या पुनरुज्जीवनाचे प्रयत्नहि या देशांत सुरू होते. या विषयाचें वाचन आम्हीं विद्यार्थ्यांनीं करावें व त्यांत आम्हांला गोडी लागावी म्हणून या विषयावरचीं सुबोध पुस्तकें लावून त्या बाबतींत परीक्षा घेतल्या जात असत. या परीक्षांना बसण्याची आवड मला लागली होती. मी थोडा मोठा झालों तेव्हां त्याच सुमारास श्रीरामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद आणि स्वामी रामतीर्थ यांचीं चरित्रें व व्याख्यानें मराठींत प्रसिद्ध होऊं लागलीं होतीं. तीं वाचण्याचा मला छंद लागलेला होता.

माझ्या वावधन गांवीं श्री. वामनतात्या करंदीकर या नांवाचे शेतकरी-जीवन घालविणारे एक शुचिर्भूत ब्राह्मण गृहस्थ होते. सकाळीं कृष्णास्नान, दुपारीं देवपूजा व सायंकाळी पुराण-प्रवचन अशी त्यांची सात्त्विक दिनचर्या असे. या गृहस्थांपाशीं मीं प्रथम गीतेची संथा घेतली. अर्थात्, त्यांत केवळ पाठांतर होतें, अर्थबोध नव्हता.

या सर्व गोष्टींनीं असा एक परिणाम झाला कीं, वेदान्त-तत्त्वज्ञानानें व त्यांतील आदर्श जीवनानें माझ्या मनाची पकड घेतली. त्यांमध्यें जीवनाचा जो आदर्श दाखविला आहे, तो आपण आपल्या जीवनांत उतरवावा, असें माझ्या मनानें त्या वेळेपासून घेतलें होतें. अर्थात्, त्या बालवयांत या गोष्टींचा मीं खोल विचार केला होता असें नाहीं. तीं एक कल्पनागत अद्‌भुतरम्यता होती हें कबूल केले पाहिजे. ऋषी, त्यांचें ते आश्रम, ते आश्रमवासी, त्या आश्रमांत बागडणारीं हरिणें, गायी आणि तेथें वाढविलेले लतावृक्ष, तेथील उदात्त जीवनांत नांदणारें प्रेमाचें व शांतीचें वातावरण हें माझ्या कल्पनेपुढें सारखें नाचत असे. आपणहि असा एक आश्रम काढावा आणि आश्रमीय आदर्श आपल्या जीवनांत आणावा, आपल्या आसमंतात तें वातावरण पसरावें, असें त्या वयापासूनच मला वाटे.

जेव्हां मी कॉलेजांत गेलों तेव्हां लोकमान्यांचा 'गीतारहस्य', अरविंदांचा 'Essays on the Gita' यांसारखे ग्रंथ माझ्या वाचनांत आले. लोकमान्यांचा 'गीतारहस्य' ग्रंथ प्रथम प्रसिद्ध झाला तेव्हां त्याची किंमत तीन रुपये होती. मी एक गरीब विद्यार्था होतों. त्यामुळें तेवढे पैसे देऊन तो ग्रंथ खरेदी करण्याचीहि माझी ऐपत नव्हती. ज्यांच्या आश्रयाला मी राहिलों होतों त्यांच्याकडून तीन रुपये घेऊन तो ग्रंथ मीं ज्या आतुरतेनें बुधवार चौकांतील एका दुकानांतून विकत घेतला, त्या आतुरतेचा आणि तो हातीं घेतांच माझ्या मनाला जो पराकाष्ठेचा आनंद झाला त्या आनंदाचा ठसा आजहि माझ्या अंतःकरणावर तितकाच ताजा आहे.

योगायोग असा कीं, कॉलेज-शिक्षण घेऊन मी बाहेर पडलों त्या वेळीं गांधीजींनीं भारताच्या जीवनांत नुकतेंच पदार्पण केलें होतें. देशसेवेसाठी जीवन अर्पण करावयाचें अशी शपथ शाळेंत असतांनाच मीं देवाला साक्षी ठेवून घेतली होती. त्या वेळीं माझ्यासोबत आणखी असे दोन मित्र होते. १९१९ सालीं श्री. गंगाधरराव देशपांडे यांच्यामुळें माझा गांधीजींशीं संबंध आला. त्या वेळीं गांधीजींचा अहमदाबादेस आश्रम होता, असें मला समजलें. त्यावरून ऋषींच्या आश्रमाचें तें कल्पनेत अनुभवलेलें आणि वागविलेलें चित्र आजहि प्रत्यक्षांत येऊं शकतें, असें आश्वासन माझ्या मनाला मिळालें.

तथापि, मी गांधीजींच्या आश्रमांत दाखल झालों नाहीं, किंवा स्वतंत्र रीतीनें आश्रमीय जीवनाचा प्रारंभहि केला नाहीं. याचा अर्थ असाच घेतला पाहिजे की, आश्रमजीवनाविषयीं माझ्या मनाला वाटणारें आकर्षण केवळ कल्पनागत किंवा बुद्धिगतच होतें; ती माझी स्वभावप्रवृत्ति नव्हती. माझी स्वभावप्रवृत्ति ही अद्यापि राजकारणीच होती असें दिसतें. आणि देशांतील, विशेषतः महाराष्ट्रांतील, त्या वेळच्या परिस्थितीनें राजकारण हीच माझी

* *उपनिषत्सार* (सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणे) या पुस्तकास लिहिलेली प्रस्तावना. *नवभारत* (वर्ष ६, अंक ४, जानेवारी १९५३) वरून किंचित संक्षेप करून पुनर्मुद्रित.

अनुक्रमणिका

प्रवृत्ति व प्रधान कार्य बनविलें. भाग्य आमचें किंवा माझें कीं, स्वराज्याकडे नेणारा गांधीजींचा रस्ता जेलमधून जात होता. जेल म्हणजे नरक, समाजद्रोहाबद्दल शासन भोगण्याचें यातनाघर, अशी सर्वसामान्य समजूत. पण गांधीजींनीं जेलचें 'मंदिर' बनविलें. मला तेथें आश्रमीय जीवन मिळालें. नियमितपणा, साधी राहणी व संयमी जीवन यांचें शिक्षण मिळण्याची ती जणूं शाळाच होती. जेव्हां जेव्हां मला जेलमध्यें जाण्याचा प्रसंग आला, तेव्हां तेव्हां धर्मग्रंथवाचन, तत्त्वचिंतन आणि तत्त्वाभ्यास हें माझें सहजकर्म बनलें आहे. 'मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः' असें म्हटलें आहे तें खरें आहे.

असें असल्यामुळें मधून मधून मला जेलमधल्या या आश्रमीय जीवनाची एक प्रकारें भूक लागे. हें योग्य कीं अयोग्य, याचा माझ्या मनाला अजून निर्णय करतां आलेला नाहीं. जेलमध्यें जाण्यापूर्वी उपनिषदें माझ्या वाचण्यांत आलीं होतीं कीं नाहीं, याचें मला आज स्मरण नाहीं. पण मला स्मरतें तें हें कीं, जेव्हां मीं प्रथम उपनिषदें वाचलीं आणि त्यांतील 'नायमात्मा प्रवचनेन लभ्यः' किंवा 'सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम्। अन्तः शरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो यं पश्यन्ति यतयः क्षीणदोषाः।' या प्रकारचीं मंत्रवाक्यें उच्चारलीं, तेव्हां माझ्या आध्यात्मिक जीवनाचा आदर्शच जणूं माझ्यापुढें साक्षात् होत आहे असा मला भास झाला आणि त्या मंत्रवाक्यांच्या नुसत्या घोषांतूनहि माझा आनंद आणि माझी चित्तवृत्ति उत्तरोत्तर उन्नत होत जात आहे, असें मीं अनुभविलें.

आजहि ज्या ज्या वेळीं मी उपनिषदांतील मंत्र माझ्या ओबड-धोबड कंठांतून गातों, त्या त्या वेळीं अत्यंत सुरेल अशा संगीताहूनहि ते मला अधिक श्रुतिमनोहर प्रतीत होतात. आणि त्या नादब्रह्मांतून मला जो आनंद मिळतो तो शब्दांनीं वर्णन करणें शक्य नाहीं. आजहि मला दुसरें कांहीं वाचावयास मिळालें नाहीं आणि केवळ उपनिषदेंच माझ्यापाशीं राहिलीं, तरीसुद्धां जीवनांतील उच्च आनंद आणि रस मला अखंड मिळत राहतील, असें मला वाटतें. हें असें कसें होतें याचा खुलासा माझ्या मतें 'पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः' या गीतावचनांत सांगितला एवढाच आहे.

मुळशी सत्याग्रहांत मला दोन वेळां कारागृहवास घडला. पण तो अल्प मुदतीचा होता. एकदां एक महिना साधी कैद व दुसऱ्यांदा तीन महिने सक्तमजुरी. याच सुमारास गांधीजींचे असहकारितेचें आंदोलन देशांत झंझावाताप्रमाणें सुरू होतें. त्याचा परिणाम म्हणून देशांतील अनेक लोकांना दीर्घ मुदतीच्या शिक्षा दिल्या गेल्या होत्या. आपल्याला हें भाग्य लाभलें नाहीं याबद्दल महाराष्ट्रांतील माझ्यासारख्या अनेक तरुण कार्यकर्त्यांना मनांतून एक प्रकारचें वैषम्य वाटत होतें. महाराष्ट्र या असहकारितेच्या यशापासून वंचित राहण्याचें कारण त्या वेळची महाराष्ट्रांतील विशिष्ट परिस्थिति होती. मुळशी-सत्याग्रहामुळें महाराष्ट्राचा आत्मगौरव थोडा-फार राखला गेला.

१९२७ सालीं 'स्वराज्य' पत्रांत लिहिलेल्या एका संपादकीय लेखाबद्दल मला व माझे सहकारी श्री. व्यंकटेश हरोलीकर यांना दोन वर्षांची शिक्षा झाली. हीच माझी पहिली दीर्घ मुदतीची शिक्षा होती. त्या वेळीं माझे सहकारी श्री. हरोलीकर यांच्या मदतीनें मीं संस्कृतांत थोडा प्रवेश करून घेतला. माझ्याबरोबर मीं गीता, उपनिषदें हे ग्रंथ जसे घेतले होते, तसा कांहीं मित्रांच्या सांगण्यावरून ज्ञानेश्वरी हाहि ग्रंथ घेतला होता. या ग्रंथाचा माझ्या जीवनावर विलक्षण परिणाम झाला. आणि ज्ञानेश्वरीमध्यें विषयविस्मृति, विकारशांति, स्थिरवृत्ति यांची गुरुकिल्ली आहे असें मला आढळून आलें. ज्ञानेश्वर हे या ग्रंथाच्या रूपानें माझे गुरु झाले आणि पंढरीचा पांडुरंग माझें आराध्यदैवत बनला. ज्ञानेश्वरींतील कांहीं निवडक भाग मीं मुखोद्गत केला. या ग्रंथाच्या वाचनानें व अभ्यासानें एका नवीन जीवनाची दीक्षा घेण्याची स्फूर्ति मला मिळाली. जेलमधून सुटल्यानंतर कोरड्या भिक्षेवर उदरनिर्वाह करून सेवाकार्य करावयाचें असा त्याच वेळीं मीं संकल्प केला.

जेलच्या या मुदतींत गीता आणि तत्त्वज्ञान विषयांवरील ग्रंथ वाचणें हा माझा स्वाध्याय होता. श्री. जे. कृष्णमूर्ति यांचें 'At the Feet of the Master' हें पुस्तक मीं वाचलें. त्या वेळच्या माझ्या अल्पबुद्धीप्रमाणें मीं गीतेवर एक ग्रंथ लिहिण्याचें धाडसहि केलें होतें. परंतु अनिकेत असा मी, त्या हस्तलिखिताला सांभाळूं शकलों नाहीं. बरें झालें, तें हरवलें!

पावणेदोन वर्षांच्या कालावधीनंतर जेव्हां आम्हीं दोघे जेलच्या बाहेर आलों, तेव्हां माझा सारा परिग्रह श्री. हरोलीकर यांच्याकडे देऊन मी तशीच तडक पायीं आळंदी गाठली आणि प्रथम ज्ञानेश्वरांच्या समाधीचें दर्शन घेतलें. जेलमध्यें संकल्प केलेल्या विशिष्ट सांप्रदायिक जीवनाची प्रत्यक्ष दीक्षा मीं श्री. नारायणशास्त्री मराठे (वाई) यांच्या आशिर्वादानें घेतली व कोरडी भिक्षा मागावयाला आरंभहि केला. परंतु अध्यात्मांतून निर्माण होणारी निःसंकोच व निरहंकार वृत्ति माझ्यामध्यें नाहीं, असा मला अनुभव आला व माझे पाय मागें ओढले. या स्खलनाचें प्रायश्चित्त म्हणून दोन-अडीच वर्षें मीं अन्न वर्ज्य केलें होतें व फलाहारावर राहिलों होतों. कांहीं काळ जेव्हां जेव्हां माझें पंढरपुरास जाणें होई तेव्हां तेव्हां पांडुरंगाचें दर्शन, मंदिराच्या मंडपांत अल्पकाळ बैठक व

त्या दिवशीं उपवास, हा ज्ञानेश्वरांकडून मिळालेल्या दीक्षेचा अवशेष थोडे दिवस राहिला होता. स्वीकारलेलें सांप्रदायिक जीवन जरी मी पुढें चालवूं शकलों नाहीं, तरी ज्ञानेश्वरांनीं दिलेल्या दीक्षेचा माझ्या वृत्तीवर जो परिणाण झाला त्यानें वैषयिक जीवनापासून माझा बचाव केला आणि तो कायमचा. तेलाचा बिंदु जसा पाण्यावर पसरावा, तसा तो परिणाम माझ्या जीवनावर पसरण्याची क्रिया जी एकदां सुरू झाली ती आजहि तशीच सुरू आहे.

१९३० सालीं गांधीजींनीं स्वातंत्र्याचा लढा पुन्हां सुरू केला. या लढ्यांत प्रथम ठाणें व नंतर येरवडा आणि नाशिक या तुरुंगांत मला पुन्हां स्वाध्याय करण्याला सवड मिळाली. येथें श्री. राधाकृष्णन् यांचा 'The Philosophy of the Upanishads' हा ग्रंथ माझ्या वाचण्यांत आला. त्याच्या प्रस्तावनेंतील पुढील वाक्यानें तो ग्रंथ मराठींत यावा असें मला वाटलें : "It was the gospel of spiritual evolution which Buddha, true to the spirit of the Upanishadas, preached 2500 years ago, and it is for a representation of the same gospel, in the spirit of the same philosophy, that the world is waiting now". ("पंचवीसशें वर्षांपूर्वी भगवान् बुद्धानें उपनिषदांच्या अंतरंगाचें यथार्थत्वानें दर्शन घडविणारा जो संदेश दिला, तो अध्यात्म-विकासाचा होता; आणि आजहि जग जशाच्या तशा त्या संदेशाच्या अनुशासनाची मार्गप्रतीक्षा करीत आहे.")

'उपनिषदांतील दहा गोष्टी' मीं येथें असतांनाच लिहिल्या. ज्यांना संस्कृत व इंग्रजी अवगत नाहीं त्यांच्यासाठीं सुलभ मराठींत उपनिषदांचें सार, श्री. राधाकृष्णन् यांनीं आपल्या ग्रंथांत अवलंबिलेली पद्धति स्वीकारून, आणलें पाहिजे, असें मला वाटलें. परंतु तो काळ असा होता कीं, जेलमध्यें केलेले संकल्प माझ्यासारख्याला जेलमध्येंच पुरें करणें शक्य होतें. १९४० च्या वैयक्तिक सत्याग्रहांत मला दीड वर्षाची सजा मिळाली व येरवडा जेलमध्यें मला ठेवण्यांत आलें. १९३२-३४ सालीं नाशिकच्या जेलमध्यें केलेला संकल्प येथें पुरा करण्याचें मीं ठरविलें. शिवाय दुसरी अशीहि पुष्कळ दिवसांपासून इच्छा होती कीं, श्रीशंकराचार्यांच्या उपनिषद्भाष्यावरून उपनिषदांचें वाचन करावें. तीहि इच्छा या वेळीं पुरी होण्याचा सुंदर सुयोग आला. या वेळीं टिळक विद्यापीठाचे आचार्य लिमये हे मला येथें सहनिवासी मिळाले. मला संस्कृत भाषेचें ज्ञान मुळींच नव्हतें. कारण बी.ए. पर्यंत फ्रेंच ही माझी दुसरी भाषा होती. आचार्य लिमये यांना मी शांकरभाष्यावरून उपनिषदें समजावून देण्याची विनंति केली आणि त्यांनीं ती मोठ्या उत्साहानें व आनंदानें मान्य केली. तावडतोब माझ्या कोठडींत एक अभ्यासमंडळ सुरू झालें. श्री. लिमये हे आचार्य आणि आम्ही पांच-दहा मंडळी त्यांचे छात्र, असा आनंद आम्ही रोज लुटूं लागलों. या विषयावरील आचार्यांच्या गाढ व्यासंगाची साक्ष मला पटून त्यांच्याविषयींचा माझा आदर दुणावला.

या अभ्यासानें उपनिषदांतील गूढार्थ समजण्याला मला मदत झाली. उपनिषदांत प्रतिपादिलेले अध्यात्माचे सिद्धान्त व्यवहारांत अनुभवण्यास मनाची अवस्था आणि इंद्रियांचे व्यापार हे कसे असावेत यांसंबधीं फोड करतांना बुद्धीचीं कवाडें खुलीं करणारीं अनेक वचनें श्रीशंकराचार्यांच्या भाष्यांत मधून मधून विखुरलेलीं आढळतात. त्या वचनांची उपनिषदांचें सार समजण्याला तर मला मदत झालींच, पण शंकराचार्यांच्या साक्षात्कारित्वाचीहि साक्ष माझ्या मनाला पटली.

'उपनिषत्सार' लिहिण्याला मीं येथें सुरुवात केली. श्री. राधाकृष्णन् यांचा 'The Philosophy of the Upanishads' हा ग्रंथ मीं त्यासाठीं आधाराला घेतला होता. त्यांची मांडणी मीं संपूर्णपणें स्वीकारली आहे. त्याचप्रमाणें त्यांचे विचारहि बहुतांशीं घेऊन अनेक उतारे जसेच्या तसेच अनुवादिले आहेत. त्याचबरोबर प्रा. रानडे यांच्या 'A Constructive Survey of Upanishadic Philosophy' या ग्रंथाचाहि मी उदारहस्तें उपयोग केला आहे.

येरवड्यांत हें लिखाण मी पुरें करूं शकलों नाहीं. १९४२ च्या 'क्विट इंडिया' – ('भारत सोडा') च्या लढ्यांत अहमदनगरच्या किल्ल्यांतील २।।। वर्षांच्या वास्तव्यांत तें शेवटीं पुरें झालें.

'उपनिषत्सारा'सारखा प्रबंध लिहिण्याचा माझा अधिकार नाहीं याची मला पूर्ण जाणीव आहे... म्हणून मी असे ठरविलें होतें कीं, ह्याला कोणा अधिकारी व्यक्तीची मान्यता मिळाल्यावांचून तें पुस्तक-रूपानें प्रसिद्ध करावयाचे नाही. माझे सहकारी व स्नेही आचार्य भागवत यांना या कामासाठीं मीं योजून ठेवलें होतें. त्यांनीं मान्यता दिली तरच हा ग्रंथ प्रसिद्ध करावयाचा, नाहीं तर नाहीं, असे मीं निश्चित ठरविलें होतें. त्यांनीं पुस्तकपरीक्षणाचें व शुद्धीचें काम पूर्ण केलें. ही त्यांची माझ्यावर खरोखर कृपा होय. त्यांच्यामुळें या ग्रंथाचें स्वरूप नवीनच बनलें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

श्री. राधाकृष्णन् यांच्या ज्या वाक्याने मला हें पुस्तक मराठींत आणण्याचीं स्फूर्ति दिली, त्या वाक्यामागील हेतु सिद्ध होण्यास माझा प्रयत्न जरी अल्पांशानें निमित्तमात्र झाला, तरी त्याचें सार्थक झालें असें मी मानीन.

❋ ❋ ❋

अनुक्रमणिका

# विभाग तिसरा

शंकररावांनी *नवभारत* मधून केलेल्या लेखनातून काही निवडक लेखन येथे वानगीदाखल पुनर्प्रकाशित केले आहे. त्याचे पुढीलप्रमाणे चार उपविभाग पाडले आहेत : १. महात्मा गांधींसंबंधीचे चार लेख; २. लोकशाही, सर्वोदय, भूदान-यज्ञ आंदोलन यांच्यासंबंधीचे चार लेख; ३. भूदान-यज्ञ आंदोलनाचे अधिष्ठान असलेल्या जीवनदर्शनावरील काही आक्षेपांचा समाचार घेण्याच्या ओघात लिहिलेली, विज्ञान-तंत्रविज्ञानाधिष्ठित इहलोकवादी जीवनदर्शनाची चिकित्सा करणारी लेखमाला; आणि ४. भगवद्‌गीतेवरील लोकमान्य टिळक, श्रीअरविंद व महात्मा गांधी यांच्या भाष्यांचा तौलनिक विचार करणारी लेखमाला.

शंकररावांचा विचारव्यूह व त्यांचे विचारधन यांची साकल्याने समज येण्याच्या दृष्टीने, त्यांच्या मृत्यूनंतर सासवड आश्रम विश्वस्त मंडळाने प्रसिद्ध केलेल्या पुढील तीन पुस्तकांचेही वाचन करणे आवश्यक आहे : १. गांधीजी आणि लोकस्वराज्य; २. साध्य आणि साधने व ३. भारताची स्वराज्य-साधना.

अनुक्रमणिका

# उपविभाग १ : महात्मा गांधी

## १. गांधीजींची जीवन साधना*

महात्मा गांधींनीं हिंदी जनमनावर जेवढें अधिराज्य मिळविलें, तेवढे अर्वाचीन काळांत अन्य हिंदी लोकनायकानें क्वचितच मिळविलें असेल. म. गांधींना ही जी असामान्य लोकप्रियता लाभली, त्याचें कारण हिंदी स्वातंत्र्य संपादनकार्यात त्यांनीं बजावलेली अभूतपूर्व कामगिरी, कीं त्यांची अढळ सत्यनिष्ठा व अहिंसेची प्रखर उपासना, यांबद्दल मतभेद होऊं शकेल. पण त्यांना जें 'महात्मा' पद प्राप्त झालें, ते सत्य-अहिंसेच्या उपासनेमुळेंच, याबद्दल दुमत होणे शक्य नाही

### गांधीजींचे आंतरराष्ट्रीय नेतृत्व

महात्मा गांधींचें नेतृत्व केवळ राष्ट्रीय नसून तें आंतरराष्ट्रीय आहे. याचें मुख्य कारण सुद्धां ते आधुनिक भारताचे जनक व हिंदी स्वातंत्र्य संग्रामाचे सेनापति, हेंच केवळ नसून ते सत्याचे शोधक व अहिंसेचे उपासक आहेत, हेंहि आहे. या देशांतल्याप्रमाणें अन्य अनेक देशांतहि शेंकडोंहजारों स्त्री-पुरुथ आज असे आहेत कीं, ज्यांना आपला जीवनपथ उजळविण्यासाठीं म. गांधींच्या जीवनज्योतीचा उपयोग होतो. 'मला पुढे प्रकाश दिसत नाहीं, मी अंधारांत चांचपडत आहे' असे गांधीजी म्हणूं लागले कीं, जगातील हजारों, लाखों जीव ज्ञान-प्रकाशाच्या अभावीं जीवन-मार्गावर ठेंचा खाऊं लागतात. याचें कारण, हे जीव म. गांधींना वाट पुसत किंवा त्यांच्या पावलांवर पावलें टाकीत आपली जीवनयात्रा सफल वा कृतार्थ करूं इच्छितात; एवढेंच नव्हें तर ज्यांत संपूर्ण समता व शाश्वत शांति नांदेल असा एक नवीन अहिंसात्मक समाज निर्माण करण्यासाठीं ते आपलें जीवन समर्पण करूं इच्छितात. म. गांधींच्या जीवनांत अशी कोणती विलक्षण वस्तु आहे कीं, जिच्यापुढें त्यांना हे गुरुपद प्राप्त व्हावे?

### साधनेंत सामान्य लोकही सहभागी

गांधीजींनीं आपल्या आत्मकथेला 'सत्याचे प्रयोग' असें नांव दिलें आहे. कारण सत्याचा शोध हा आपल्या जीवनाचा एकमेव हेतु ते मानतात. ते सत्यालाच ईश्वर समजतात. म्हणून त्यांच्या दृष्टीनें ईश्वरप्राप्ति व सत्याचा शोध या दोन वेगवेगळ्या वस्तु नसून ती एकच आहे. पण ईश्वरप्राप्ति हें जीवनाचें साध्य मानणारे व त्यासाठीं अवश्य ती साधना करणारे म. गांधी हे जगांतील पहिलेच पुरुष नाहींत. सर्वकाळीं, सर्वदेशीं असे असंख्य स्त्री-पुरुष आजपर्यंत झाले आहेत. पण म. गांधींचा विशेष हा कीं, आपल्या या साधनेंत त्यांनीं ज्या प्रमाणांत व ज्या पद्धतीनें सर्वसामान्य लोकांना सहभागी करून घेतले आहे, तें प्रमाण व ती पद्धति अलौकिक असून तसे करणारे ते जगांतील पहिलेच पुरुष आहेत, असे म्हणावयास हरकत नाहीं. सत्याच्या शोधासाठी अगर ईश्वराच्या प्राप्तीसाठीं सामान्य जीवनव्यवहारातून निवृत्त होऊन एखादी विशिष्ट साधना करीत बसण्याची जरूर नाहीं. जीवनाचा नित्यक्रमच सत्यानें शुद्ध व प्रेमभावनेनें पवित्र केला म्हणजे तो सत्याची अथवा ईश्वरप्राप्तीची साधना बनतो, असें त्यांनीं स्वतःच्या उदाहरणानें जगाला शिकविलें आहें. जगाच्या नित्यव्यवहारांतून, जो असत्य व द्वेष यांशिवाय चालूच शकत नाहीं असा सर्वसामान्य समज आहे तो राजकीय व्यवहारहि गांधीजींनीं वगळलेला नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. असें असल्यामुळें त्यांनीं हिंदी स्वातंत्र्यसंग्रामाला आपल्या चित्तशुद्धीची व तद्द्वारा सत्याच्या म्हणजेच ईश्वराच्या प्राप्तीची एक प्रभावी साधना बनविली व त्यामुळें हजारों हिंदी स्त्री-पुरुषांनाहि आपले जीवन शुद्ध व उन्नत करण्याला मदत केली.

### हिंदु जीवनदर्शनाचा मुख्य सिद्धांत

आपल्या नित्याच्या व्यवहारांत प्रत्येक स्त्री-पुरुषाला सत्याचें व अहिंसेचें पालन करण्यांत ज्या मानानें यश येईल, त्या मानानें त्यांच्या अंतःकरणांतून भय व क्रोध नष्ट होतील व तो 'वीतराग' बनत जाईल. कारण भय आणि क्रोध यांचें मूळ राग अथवा आसक्ति यांतच असतें. आणि जो मनुष्य 'वीतराग भयक्रोध' झाला त्याला ईश्वरप्राप्ति होते, नव्हे तो ईश्वरस्वरूप होतो, असा

---

* पूर्वप्रकाशन : *नवभारत*, वर्ष १, अंक ४, जानेवारी, १९४८.

हिंदु जीवनदर्शनाचा मुख्य सिद्धांत आहे.

"वीतरागभयक्रोधः मन्मया मामुपाश्रिताः ।
वहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ।।"

असें गीतेचें वचन आहे. 'नराचा नारायण होतो' या हिंदु धर्माच्या आद्य सिद्धांताचा साक्षात्कार करून घेण्याची शक्यता वर्तमानकालांत म. गांधींनी आपल्या जीवनाने सामान्य माणसाला सुद्धां पटवून देऊन मानवजातीची विनमोल सेवा केली आहे, व या सद्धर्माच्या द्वारां साऱ्या जगाचा गुरु होण्याची हिंदुस्थानची पात्रता हिंदवासियांना व परकीयांना पुनः एकदां पटवून दिली आहे.

**समाजरूप बनणें हें व्यक्तीचे साध्य**

नित्यव्यवहारांत मनुष्य दोन भूमिकांनीं वावरत असतो; एक, त्याची स्वतःची वैयक्तिक आणि दुसरी सामाजिक. या दोन भूमिका वास्तविक एकमेकांपासून अलग अशा कधींच नादूं शकत नाहींत. कारण मनुष्यप्राणी, नव्हे सर्व सृष्टिजातच, मुळांत एकमेकाला सोडून नाहीं. त्यामुळें विचार, भावना यांसकट माणसाच्या होणाऱ्या सर्व हालचाली सामाजिक स्वरूपाच्या असतात. यामुळें अंतरांत स्वतःचें व्यक्तित्व माणसाला भासत असून सुद्धां तो सर्वांशीं – समाजाशीं – एकरूप झालेला आहे. मानवी जीवनातील हे महान सत्य आहे. आणि त्या सत्याचा साक्षात्कार 'आत्मवत् सर्व भूतानि' पहाण्यानेच होत असतो. प्राणीमात्रांशी 'मद् भावा' नें वागण्यालाच प्रेम अथवा अहिंसा हें नांव देतां येईल. कोणत्याहि घटनेनें अथवा क्रियेनें ज्या सुखदुःख संवेदना माझ्या अनुभवाला येतात, त्यांचा इतरांनाही तसाच अनुभव येत असला पाहिजे, ही जाणीव उत्पन्न झाली आणि इतरांविषयीं समभाव वाटला म्हणजे माणसाच्या नित्यव्यवहारांत विषम आचार, पिळवणूक, द्वेष, स्पर्धा इत्यादींना स्थान राहात नाहीं. स्वतःविषयींची आसक्ति यांत सुटते आणि त्याचा परिणाम म्हणूनच भय आणि क्रोध आपोआप नष्ट होतात. सामाजिक व्यवहार या 'आत्मवत् सर्व भूतानि' दृष्टीने चालते, तर आज मानवाच्या हातून स्वार्थमूलक पायावर उभारल्या गेलेल्या सर्व आर्थिक, राजकीय आणि सामाजिक संस्था कोलमडून पडतील आणि केवळ मानवाच्या समानतेवर आणि म्हणून अहिंसेवर उभारलेल्या तेवढ्याच संस्था टिकून राहतील. ही दृष्टि ठेवूनच नवीन समाजरचना करण्याचा संदेश म. गांधींनीं नवभारताच्या द्वारां जगाला दिला आहे. एकमेकाला धरूनच मानवजीवन चालूं शकतें, हें सत्य; या सत्याची अखंड जागृति ठेवून आपले व्यक्तित्व स्वेच्छेनें समाजस्वरूपांत विलीन करणें, हा त्या सत्याचा साक्षात्कार; ही विलीनीकरणाची क्रिया म्हणजेच अहिंसा, आणि या अहिंसेच्या पायावर करावयाची समाजरचना म्हणजेच गांधींजींनी पुरस्कारलेला रचनात्मक कार्यक्रम होय. रचनात्मक कार्याचें सूत्र अशा रीतीनें नराचें साध्य जें नारायणरूप होणें, अथवा दुसऱ्या भाषेंत व्यक्तीचें साध्य जें समाजरूप बनणें, तेथपर्यंत जाऊन पोहोंचतें आणि त्या साध्याचे हा कार्यक्रम साधनरूप बनतो. मानवाच्या सामान्य व्यवहारांतूनच या प्रकारें त्याची साधनापूर्ति होऊन त्याला सत्याचा साक्षात्कार अथवा ईश्वरप्राप्ति होते. त्यासाठीं नित्याच्या व्यवहारांतून निवृत्त होऊन विशिष्ट साधना करण्याची त्याला आवश्यकता राहात नाहीं. यांतच गांधीजींच्या जीवनदर्शनाचे वैशिष्ट्य आहे. अर्थात् या प्रकारें उपासना करणारा साधक विषमता व अन्याय यांवर आधारलेल्या संस्थांपासून मिळणारा सर्व लाभ आपण होऊन सोडून देतो. या स्वेच्छतापूर्वक केलेल्या त्यागानें त्याची चित्तशुद्धि होत जाते आणि चित्त पूर्णपणें शुद्ध – लोभ, मोह, स्पर्धा, द्वेष यांपासून मुक्त – झालें म्हणजेच त्यांत ईश्वर प्रकट होत असतो. रचनात्मक कार्य हें चित्तशुद्धीचें कार्य आहे; मानव आणि मानवसमाज यांच्या शुद्धीचें कार्य आहे, असें गांधीजी म्हणतात त्याचा हा अर्थ आहे.

**साध्यसाधनांची सुंदर सांगड**

गांधीजी साध्य व साधन यांमध्यें फरक कां करीत नाहींत, हें आतां सहज समजण्यासारखे आहे. जेथें व्यवहार हा आसक्तिपूर्वक स्वार्थासाठीं होतो, तेथेंच इष्ट फळाच्या मोहानें मनुष्य बऱ्यावाईट साधनांचा विचार करीत नाहीं. जरूर तर तो वाईट साधनांचाहि उपयोग करतो. पण जेथें व्यवहार हा अनासक्तीने केवळ सत्यप्राप्तीसाठीं होतो, तेथें विशिष्ट फलाची आकांक्षा नसल्यामुळें अशा व्यवहारांत अशुद्ध साधनांचा उपयोग करण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. असत्यानें सत्यप्राप्ति होत नाहीं. अध्रुवाने ध्रुव साध्य होत नाहीं. विवेकानंदांच्या शब्दांत सांगावयाचें तर, "With the means all right, the end must come." (साधन पूर्णपणें बरोबर योजलें, तर साध्य ठेवलेलेंच आहे.).

साध्य-साधनाची इतकी सुंदर सांगड घालणाऱ्या या नेत्याच्या नेतृत्वाखालीं हिंदुस्थाननें स्वातंत्र्य संपादन केलें. पण त्या स्वातंत्र्याचीं आज त्याला विपरित फळें कां चाखावीं लागावींत, हा एक विचारणीय प्रश्न नाही काय?

ӝ ӝ ӝ

अनुक्रमणिका

## २. गांधीजी*

'गांधी वारले!' ही बातमी कानांवर पडली तेव्हां मनाला धक्काच बसला! 'गांधीजी' आणि 'वारले' हें कसें शक्य आहे? परंतु शेजारीं उभ्या असलेल्या सहकाऱ्यानें ते भयंकर शब्द पुनः उच्चारले तेव्हां हृदयाची कालवाकालव झाली. काय असेल तें असो, या खेपेस उपवासानंतर महात्माजींची प्रकृति झपाट्यानें सुधारली होती व अल्पावधींतच त्यांचे सर्व व्यवहार जवळजवळ पूर्ववत् सुरू झाले होते. उपोषण समाप्त झाल्यानंतर विर्ला हाऊसमध्यें जाऊन मी स्वतः इतर मंडळींबरोबर 'निर्वासितांना साहाय्य', 'काँग्रेसची घटना', 'वर्ध्याचें गांधीसेवा-संघाचे संमेलन' वगैरे विषयांसंबंधीं त्यांच्याशीं दीर्घ चर्चा केल्या होत्या. या सर्व प्रसंगीं गांधीजी उपवासाच्या दिव्यांतून नुकतेच पार पडले होते असें त्यांच्या शारीरिक, मानसिक व वौद्धिक चेष्टांवरून कोणालाहि वाटणें शक्य नव्हतें. जेव्हां त्यांच्या मृत्यूची बातमी समजली, तत्पूर्वी अर्धा तासच त्यांनीं तयार केलेल्या काँग्रेसघटनेच्या खर्ड्याबाबत त्यांचेकडे जाऊन विचारविनिमय करण्यावद्दल सहकाऱ्यांशीं बोलणें झालें होतें. आपण जाऊं तोंपर्यंत प्रार्थनेची वेळ होईल, तेव्हां उद्यां अगोदर वेळ ठरवून मगच त्यांचेकडे जाऊं, असें ठरलें होतें. त्यांच्याकडे जाण्याचें दुसऱ्या दिवसावर न टाकता मनांत विचार आल्याप्रमाणें त्याच वेळीं आपण जर विर्लाहाउसमध्यें गेलों असतों, तर प्रार्थनेच्या जागीं जातांना आपण त्यांच्याबरोबर बहुतेक असतों आणि तसें असतों तर कदाचित् ईश्वरानें त्या प्रसंगी आपणास महात्माजींचे प्राण वांचविण्यासाठीं निमित्तहि केलें असते हा विचार मनाला पुनः पुनः चटका देतो. पण –!

हृदयक्रिया वंद पडल्यामुळें महात्माजींना असा एकाएकीं व अनपेक्षित मृत्यु आला असला पाहिजे असें मीं जवळच्या माणसांना म्हटले. इतक्यांत कोणीतरी घावऱ्या घावऱ्या धांवत येऊन म्हणाला, "प्रार्थनेच्या ठिकाणी कोणीं मारेकऱ्यानें त्यांना गोळ्या घालून ठार मारलें." हे शब्द कानीं पडले तेव्हां प्रकृति तर हादरलीच, पण "न हन्यते हन्यमाने शरीरे" या गीतावचनाचा नादहि अंतःकरणांत उमटला. शरीर मारलें तरी आत्मा मरत नाहीं. महात्माजींच्या श्मशानयात्रेंत मी जवळजवळ पांच तास मागें चालत होतों, तेव्हां भगवंताचें हें वचन मनांत सारखें घोळत होतें.

### सर्व जगाचा अन्तर्नाद (Inner Voice)

त्या रात्रीं लॉर्ड माउन्टवॅटनना कोणी तरी म्हटलें, "उद्यांचा दिवस सर्व हिंदुस्थान शोकदिन म्हणून मानील." तेव्हां ते म्हणाले, "उद्यां सर्व संसारच शोकदिन मानील." गांधीजींमध्ये असें काय होतें, कीं त्यामुळें सर्व विश्वानें त्यांच्यावद्दल शोक करावा? ज्या वस्तूवद्दल ममत्व वाटतें, आणि 'आपली' या भावनेमुळें जिच्यावर आपलें प्रेम जडतें, त्या वस्तूचा नाश, आपण तिला कायमचें मुकलों ही जाणीव, माणसाला शोकसागरांत वुडविते. गांधीजी गेले तेव्हां आपला प्रियजन गेला असें केवळ हिंदुस्थानच्या लोकांना वाटलें असें नव्हे, तर सर्व जगाला तसें वाटलें यांत मुळींच संशय नाहीं. गांधीजी हिंदु अथवा हिंदी पुरुष होते असें मानणें ही कोती अगर कृपण भावना आहे. ते विश्वपुरुष होते; विश्व आपलें आहे व आपण विश्वाचे आहों या जाणिवेनें त्यांचा सर्व व्यवहार चाले.

ते धर्मानें हिंदु, राष्ट्रीयत्वानें हिंदी व हिंदुस्थान त्यांची कर्मभूमि असली तरी त्यांना सर्व धर्म सारखे असल्यामुळें ते सर्व-राष्ट्रीय होते व स्वधर्मानुसार भारत ही त्यांची कर्मभूमि असली तरी त्यांचें कर्म विश्वासाठीं होते.

गांधीजींना 'राष्ट्र-पिता' असें सार्थ संवोधलें जातें. कारण आजचा हिंदुस्थान त्यांनींच निर्माण केला आहे. आम्ही आज जे व जसे आहों, तें सर्व त्यांचें देणे आहे. गांधीजींची दृष्टि सर्वोदयी व सर्वव्यापी होती. जीवनाच्या प्रत्येक अंगाबाबत त्यांचे विचार व आचार क्रांतिकारक होते. त्यांनीं भारताला एक नवीन व संपूर्ण जीवन दिलें. आमचें शरीर त्यांनीं आम्हांला दिलें नसलें तरी जीवन, जीवनधर्म तरी त्यांनीं आम्हांला दिला व आत्म्याशिवाय शरीर तसें धर्माशिवाय जीवन ही श्रद्धा त्यांनी आमच्यांत निर्माण केली. म्हणूनच प्रत्यक्ष जन्म देणाऱ्या पित्याशीं पुत्र ज्या प्रेमानें व भक्तीनें वागतो, त्याच्यापेक्षांहि किती तरी पटींनीं अधिक भक्तीनें व प्रेमानें आम्ही तसेच व जगांतील आणखी असंख्य लोक त्यांच्याशीं प्रेमानें वागत. देह देणाऱ्या पित्यापेक्षां धर्म देणारा पिता श्रेष्ठ होय. धर्मानें देहाचें सार्थक होतें. लोक त्यांच्याकडे धर्मपिता (Spiritual Father) म्हणून पाहत व जेव्हां धर्माधर्माचें कोडें त्यांना पडे तेव्हां ते उकलण्यासाठीं ते नेहमीं त्यांच्याकडे जात.

"जयातें नीतिपंथें चालिजे। सत्यधूत बोलिजे।
देखावें ते देखिजे। शास्त्रदृष्टि।।"

* पूर्वप्रकाशनः *नवभारत*, वर्ष १, अंक ६, मार्च, १९४८.

अनुक्रमणिका






या स्थितीला गांधीजी पोहोंचले आहेत, असें आम्ही प्रत्यक्षानुभवानें सांगूं शकतों. आपण जें कांहीं करीत आहों तें धर्म्य आहे, असा निर्णय किंवा कौल गांधीजींनीं दिला आहे हा विश्वास, लोकांना जगांतील कोणत्याहि शक्तीशीं सामना करण्यास समर्थ करीत असे. मी मी म्हणणारे बुद्धिवादीसुद्धां या नीतिदेवतेच्या गाभाऱ्यांत तिला कौल लावण्यांत स्वतःला धन्य मानीत आहेत हें पाहून आम्हां भक्तांचे मस्तक त्या देवतेपुढें भक्तीनें व प्रेमानें अधिकच नमत असें, हें कबूल करण्यास शरम वाटत नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें तर गांधीजी म्हणजे सत्यासत्य, धर्म्याधर्म्य, शिवाशिव ठरविण्याची अंतिम कसोटी होती. गांधीजी हिंदुस्थानचा अंतर्नाद (Innder Voice) होते. पण गांधीजींना हिंदुस्थानचा अंतर्नाद म्हणणें म्हणजे पुनः आमचें लघुत्व त्यांच्यावर लादण्याचा दोष पदरीं घ्यावा लागेल. गांधीजी हिंदुस्थानचाच काय पण सर्व जगाचा अन्तर्नाद होते, असें म्हणणेंच रास्त होईल. त्यांच्या जीवनज्योतीच्या प्रकाशांत आजचें जग नीतिपथावर पाऊल टाकीत होतें. ही ज्योत मावळल्यामुळें जग पुनः अंधःकारांत पडलें आहे आणि म्हणूनच "सर्व जग उद्यां शोक करील" असें लॉर्ड माउंटबॅटन उद्गारले, तें सत्य होतें.

**लोकसेवाद्वारा जीवनसाधना**

पण सर्व विश्वाची नीतिदेवता गांधीजी कां व कसे बनले? महात्माजी एक महान् साधक होते व ईश्वरप्राप्ति हें त्यांच्या जीवनाचें एकमेव ध्येय होतें. ईश्वराच्या अस्तित्वावरील श्रद्धा हा त्यांच्या जीवनाचा प्राणवायु होता. मानव म्हणजे सर्वव्यापी अमर आत्मा, या ज्ञानाच्या साक्षात्कारासाठीं त्यांची अखंड साधना सुरू होतीं, आणि त्यांच्या साधनेचा विलक्षण विशेष हा कीं, सामान्य जीवनव्यवहारांतून कसलीहि निवृत्ति त्यांत नव्हती. जीवनाचे सर्व व्यवहार 'आत्मवत् सर्व भूतानि' या भावनेनें झाले म्हणजे ते चित्तशुद्धिद्वारा ईश्वरप्राप्तीला कारण होतात, या सिद्धान्तावर गांधीजींचा संपूर्ण विश्वास होता. असा व्यवहार होण्याच्या मार्गातील मुख्य प्रत्यवाय म्हणजे 'मी म्हणजे शरीर' ही माणसाची दृढ भावना व तज्जन्यशरीरावरील आसक्ति हा होय. या आसक्तीच्या पोटींच भय, क्रोध हीं करंटीं कारटीं निर्माण होतात व तींच माणसांकडून असत्य व हिंसा करवितात. 'आत्मवत् सर्व भूतानि' असा व्यवहार हातून व्हावयाचा तर 'आपण हें शरीर नसून आत्मा आहों आणि आपण तसे सर्व' हें ज्ञान दृढ होत जाऊन शरीरावरील आसक्ति सुटली पाहिजे. अनासक्त पुरुषाला 'आत्मौपम्येन सर्वत्र' या भावनेनें पाहणें व वागणें शक्य आहें. राग, द्वेष हें शरीराचे धर्म आहेत व शरीरसुखासाठींच मनुष्य हिंसा करतो व असत्य बोलतों. 'मी शरीर नाहीं, आत्मा आहें,' ही भावना दृढ झाली व त्यामुळें शरीरावरची आसक्ति सुटली, कीं मनुष्य राग द्वेषरहित होतो व सर्व विश्वावर प्रेम करूं शकतो. ही स्थिती प्राप्त झाली कीं, 'आत्मवत् सर्व भूतानि' असा त्याचा व्यवहार सुरू होतो. अशा व्यवहारांत द्वेष, हिंसा, असत्य यांना स्थान नसतें. म्हणून अनासक्ति ही नैतिक व आध्यात्मिक जीवनाचीं गुरुकिल्ली आहे. गांधीजींनी आपल्या गीतार्थाला 'अनासक्तियोग' असें नांव दिलें होतें, तें सहेतुक होतें. अनासक्त माणसालाच 'अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व असंग्रह' या पांच व्रतांची साधना करणें शक्य आहे. आपल्या जीवनांत हीं पांच व्रतें उत्तरोत्तर अधिकाधिक पाळण्याचा गांधीजींचा अहर्निश प्रयत्न होता हें सर्वश्रुतच आहे. त्याचप्रमाणें अनासक्त पुरुषालाच सेवाधर्माचें उत्कृष्ट पालन शक्य आहे. दक्षिण आफ्रिकेंत बोअर युद्धांत काम करीत असतांना, आपल्या हातून खरी सेवा व्हावयाची तर ब्रह्मचर्याचे पालन केलें पाहिजे असा विचार गांधीजींना प्रथम सुचला, ही गोष्ट त्यांच्या आत्मचरित्राशीं परिचित असलेल्यांना माहीतच आहे.

गांधीजींचें जीवन सेवामय होतें हें सांगणें नकोच. सेवेच्या द्वारा सर्वांशीं समरस होऊन सर्वत्र समवस्तूचें दर्शन घेणें, ही त्यांची जीवनसाधना होती. या सेवेंतून कोणीही व्यक्ति वा कोणताहि व्यवहार त्यांनीं वगळलेला नव्हता. सर्वांचीच सेवा खरी; परंतु अद्याप या जगांत दीनदुबळे व दरिद्री यांचीच संख्या फार मोठी आहे म्हणून ते आपल्या सेवेला 'दरिद्रीनारायणाची सेवा' असे यथायोग्यरीत्या म्हणत. मातेची माया सर्वच मुलांवर असते हें खरें, पण त्यांतल्या त्यांत जें सर्वात लहान व अपंग, त्याच्यावर विशेष असते; ज्या मुलाची सर्वात चाल कमी, त्याचाच चालीनें आई चालते. जनसेवेच्या बाबतींत महात्माजींची नेमकी अशीच स्थिति होती. सामान्य लोकांची सेवा हाच त्यांनीं आपला मुख्य धर्म केला होता. समाजांतील बुद्धिमान, कर्तृत्ववान् व धनवान् लोकांचीहि ते सेवा करीत; पण ती अशा रीतीनें व रूपानें कीं, त्यामुळें त्या लोकांची बुद्धि, कर्तृत्व व धन हीं समाजांतील दीन, दुबळ्या व दरिद्री लोकांच्या सेवेला, त्यांची स्थिति सुधारण्याकडे लागावी. आपल्याबरोबर ते या लोकांनाहि समाजांतील सामान्य लोकांची सेवा करण्याला लावीत. पण ते स्वतः दरिद्री नारायणाचे उपासक होते. त्यांचा सर्व रचनात्मक कार्यक्रम या दृष्टीनें आंखलेला होता. ज्यांत सामान्य लोकांवरील अन्याय व त्यांची पिळवणूक थांबेल व समाजांतील सर्व लोकांना खरें स्वातंत्र्य व सुख मिळतील, असा समाज निर्माण करणें हा या कार्यक्रमाचा हेतु होता. पीडितांना तात्कालिक साह्य व्हावें, किंवा स्वातंत्र्यसंग्रामाची शक्ति निर्माण

करावी, हा या कार्यक्रमामागील त्यांचा मुख्य हेतु नव्हता. त्यांचा रचनात्मक कार्यक्रम ही एक विशिष्ट 'जीवनपद्धति' होती व जो असें जीवन जगेल, तोच सर्वांशीं समरस होऊं शकेल व सर्वांवर प्रेम करून सत्याची प्राप्ति करून घेऊं शकेल, असें त्यांचें मत होतें.

**प्रेमाचे प्रेषित**

समग्र लोकसेवेच्या द्वारा ईश्वरप्राप्ति हा जसा गांधींच्या जीवनांतील अलौकिक गुण होता, त्याचप्रमाणें सत्याचा आग्रह हा एक दुसरा असामान्य गुण त्यांच्यांत होता. जगांत सर्वच सज्जन असते तर जग स्वर्गच बनलें असतें. कोणीं कोणाची सेवा करण्याचा प्रश्नच उत्पन्न झाला नसता. पण या अपूर्ण जगांत सज्जनांप्रमाणे दुर्जनहि आहेत, व त्यांची संख्याच अधिक आहे. व असे आहे म्हणूनच जगांत सेवाधर्माला स्थान वा अवकाश आहे. जगाची अशी स्थिति आहे तोंपर्यंत समग्र सेवकाला 'रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग' या तुकारामाच्या उक्तीप्रमाणें स्वतःशीं व इतरांशीं युद्ध करणें भाग आहे. आणि गांधीजींच्या सेवाक्षेत्रांतून तर ज्यांत अनृत व हिंसा ओतप्रोत भरलीं आहेत व जेथें सत्तेसाठी सतत संग्राम सुरू आहे ते राजकारणहि सुटलेले नव्हतें. गांधीजींचा सर्व जन्म जगांत जें जें म्हणून अशुभ वा दुष्कृत (Evil) आहे त्याच्याशीं लढण्यांत गेला. गांधीजी संत होते, मुत्सद्दी होते व वीरहि होते. जगांत या तीनहि वृत्ती एका पुरुषाच्या ठायीं क्वचितच आढळतात. पण मौज अशी कीं या योद्ध्यानें तलवार कधींहि हातांत घेतलीं नाहीं. 'जो तलवार हातांत घेतो तो त्या तलवारीनेंच नाश पावतो', या तत्त्वावर त्यांचा विश्वास होता व तशी त्यांची वागणूकहि होती. हिंसेनें हिंसा वाढते म्हणून हिंसेचा मुकाबला अहिंसेनें केला पाहिजे अशी त्यांची जगाला शिकवणूक होती व स्वतः त्यांनींहि जन्मभर अहिंसेचीच आराधना केली. गांधीजी बलाचे उपासक होते, पण आत्मबलाचे. आत्मबल अजिंक्य आहे अशीं त्यांची श्रद्धा होती. जो आत्मबलानें लढतो तो 'दुर्जन व त्याची दुर्जनता' यांच्यामध्यें भेद करतो. तो दुर्जनावर प्रेम करतो; परंतु त्याच्या दुर्जनतेला विरोध करून तिचा नाश करतो. दुष्टाच्या शरीराचा नाश म्हणजे त्याच्या दुर्जनतेचा नाश नव्हे, असें तो मानतो. कारण दुर्जनता शरीरांत नसते तर खरोखर हृदयवृत्तींत असते. आत्मक्लेशानें व जरूर तर स्वतःच्या शरीराची आहुति देऊनहि ही दुर्जनांची हृदयवृत्ति पालटण्याचा तो प्रयत्न करतो. हृदय पालटण्याच्या प्रक्रियेंत दुर्जनांवरील प्रेम ही एक मोठी शक्ति आहे. त्यांच्यावर बॉंब टाकणाऱ्या श्री. मदनलालांचें मतपरिवर्तन करण्याचा प्रयत्न मॅजिस्ट्रेटनीं करावा असे गांधीजी सांगतांना मीं स्वतः ऐकिलें आहे. त्यांना संधि मिळाली असती तर श्री. गोडसे यांच्या बाबतींतहि त्यांनीं अशा प्रकारच्या प्रयत्नांचा पुरस्कार केला असता, यांत तिळमात्र संशय नाहीं. आपल्या मारेकऱ्याच्या मनांतहि सत्प्रवृत्ति आहे व आत्मबलिदानानें ती जागृत होणें शक्य आहे असें मानण्याइतकी विशाल सद्भावना त्यांच्यामध्यें होती. मारेकऱ्याची गोळी हृदयांत घुसल्यानंतर ज्ञानसंवेदनाचे जेवढे क्षण त्यांना लाभलें असतील, त्या क्षणांत "परमेश्वरा, आपण काय करीत आहों हें त्याला समजत नाहीं; तेव्हां त्याला क्षमा कर व त्याला सद्भावना दे", अशीच प्रार्थना गांधीजींनीं श्री. गोडसे यांच्याकरितां केली असली पाहिजे, यांत मला मुळीच संशय वाटत नाहीं. कारण ते प्रेमाचे प्रेषित होते व प्रेमानें जग जिंकण्याची त्यांची प्रतिज्ञा होती. जगांत शांति व सद्भाव स्थापन करणें हें त्यांचें जीवितकार्य होतें. प्रेम व सेवा ही त्यांचीं साधनें होतीं. परमेश्वराच्या प्रार्थनेच्या वाटेवर त्यांना मृत्यु आला, तो मंगलच मानला पाहिजे. जेव्हां त्यांचे शरीर पडलें तेव्हां त्यांच्या मुखांतून 'हे राम!' असे शब्द बाहेर पडले. "अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम्। यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः।।"

**पुरुषाचा पुरुषोत्तम**

गांधीजी विसाव्या शतकांतील एक चमत्कार होते. अर्वाचीन शास्त्रीय मन चमत्कार मानीत नाही; पण मानवी मनाला आज जें ज्ञात आहे तें, जें अज्ञात आहे त्याच्या मानानें, कोणीं सांगावें, कदाचित् रतिभरहि नसेल! गांधीजींचे सामान्य बालपण व पहिलें तारुण्य हीं पाहिलीं तर एका रात्रींत वेलीवरचीं कळी पूर्ण उमलून तिचें फूल बनावें त्याप्रमाणें एका जन्मांत केवळ पन्नाससाठ वर्षांच्या अवधींत त्यांनीं येवढ्या उच्च कोटीची साधकावस्था स्वयंप्रेरणेनें व प्रयत्नानें प्राप्त करून घेतलीसें दिसतें. गांधीजींचा पूर्वजन्मावर व पुनर्जन्मावर विश्वास होता. या जन्मांतीलहि दुर्लभ साधकावस्था त्यांनीं अनेक पूर्वजन्मांत केलेल्या तपांचा सुंदर परिपाक असली पाहिजे. "तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम्।।" अभ्यासानें व वैराग्यानें पुरुषाचा पुरुषोत्तम होऊं शकतो, याचें गांधीजींचें चरित्र एक उत्तम उदाहरण आहे. त्यांनीं आपल्या उदाहरणानें आमच्यासारख्या हजारों, लाखों सामान्य जीवांच्या मनांत श्रेष्ठ, नैतिक व आध्यात्मिक जीवन जगण्याची आशा निर्माण करून आम्हांला प्रयत्नवादी बनविले आहे. सामान्य माणसालाहि आपल्यांतील पशुत्वाचा बलि देऊन देवत्व प्राप्त करून घेणें शक्य आहे, हें त्यांनीं सोदाहरण सिद्ध केलें आहे.






असा देवमाणूस या पृथ्वीतलावर अवतरला होता व त्याचा पार्थिव देह माणसांत वावरत होता, या गोष्टीवर पुढच्या पिढ्या कदाचित् विश्वासहि ठेवणार नाहींत.

रामाचे सहकारी वानर व श्रीकृष्णाचे सवंगडी गोपाल यांच्या भाग्यावद्दल आम्हांला केवढी असूया वाटते! अवताराशीं 'सखेति मत्वा प्रसमं यदुक्तं, हे कृष्ण हे यादव हे सखेति।।' इतक्या सलगीनें ते वागले म्हणून आम्हीं त्यांना धन्य मानतों; पण भारतांतील गेल्या दोन पिढ्यांचे केवढें महद्‌भाग्य कीं या पुण्यभूमध्यें एका अवतारी पुरुषाच्या जन्माबरोबर त्यांचाहि जन्म झाला होता! धन्य आम्ही कीं अवतारीं पुरुषाचे शिष्य व सहकारी होऊन आमचे जीवन सार्थ करण्याची संधि आम्हाला मिळाली! आमच्या पूर्वपुण्याईचेंच हें फळ असलें पाहिजे. ही पुण्याई पुढें वाढविणें म्हणजे महात्माजींचें कार्य यथाशक्ति, यथामति पुढें चालविणें होय. परमेश्वर ती शक्ति व ती बुद्धि आम्हांला प्रदान करो येवढीच प्रार्थना.

※ ※ ※

## ३. संताच्या जीवनांतील प्रेरणा*

'सर्वां भूतीं पाहे तोचि वासुदेव' या चरणांतील उदात्त तत्त्व आचरणांत उतरलें, तर सर्व जग सुखी होईल व आपलीहि व्यक्तिदृष्ट्या नैतिक व आध्यात्मिक उन्नति होईल, हें आपणांस समजत नाहीं असें नाहीं. पण भगवान् श्रीकृष्णांनीं गीतेंत म्हटल्याप्रमाणें, 'वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः।' असें आहे. म्हणून तर 'तोच वासुदेव सर्वां भूतीं पाहाण्यास शिका', हें वारंवार सांगावें लागतें.

### समदर्शित्व आणि समवर्तित्व

आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी व ज्ञानी असे चार प्रकारचे सदाचरणी लोक 'सर्वां भूतीं पाहे तोचि वासुदेव' या चरणांतील मंगलमय तत्त्वाकडे आकर्षिले जातात. अशांपैकीं जे आपल्या तपानें व सदाचारानें 'समदर्शिनः' होतात, त्यांत फारच थोडे 'समवर्तिनः' म्हणजे सर्व भूतांमध्यें एकच परमेश्वर आहे, या जाणिवेनें सर्व जीवनव्यवहार करणारे असतात. समर्थांनीं म्हटलें आहेः 'देवावेगळें कोणी नाहीं। ऐसें बोलती सर्वही। परंतु त्यांची निष्ठा काहीं तैसीच नसे।।'

अद्वैत ज्ञानाचें हें सुंदर कमल भारतीय मानससरोवरांत फार प्राचीन काळापासून उमललें आहे. मुंडकोपनिषदाचा ऋषि म्हणतो : 'हें मरणरहित ब्रह्मच पुढें, मागें, उजवीकडे, डावीकडे, खालीं, वर, सर्वत्र पसरलें आहे. हें ब्रह्मच सर्व विश्व होय. हें सर्वांमध्यें अत्यंत श्रेष्ठ आहे'. (ब्रह्मैवेदममृतं पुरस्ताद् ब्रह्म पश्चाद् ब्रह्म दक्षिणतश्चोत्तरेण। अधश्चोर्ध्व च प्रसूतं ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठम्।।) या लोकीं जें ब्रह्म आहे तेंच परलोकीं आहे. जें परलोकीं आहे तेंच या लोकीं आहे. विश्वांत निराळें असें कांहीं नाहींः 'नेह नानास्ति किंचन'. 'तत्त्वमसि', 'एकं सत्', 'अहं ब्रह्मास्मि' हे महान् सिद्धान्त या देशांत पंडितांपासून शेतकऱ्यांपर्यंत सर्वतोमुखीं झालेले आहेत. सर्व भूतांमध्यें एकच आत्मतत्त्व भरून राहिलें आहे, या सिद्धान्ताची मनास प्रचीति होणें, या तत्त्वाचा बुद्धीस साक्षात्कार होणें, यांतच मानवी उन्नतीची पराकाष्ठा आहे आणि त्यामुळें मानवास मुक्ति व खरा आनंद मिळतो अशी आजपर्यंत आमची अखंड श्रद्धा आहे. 'जें जें भेटे भूत, तें तें वाटे भगवंत' अशी ज्यांच्या मनाची सतत स्थिति झालेली आहे, ते ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम यांच्यासारखे संतशिरोमणि आपसांतील सर्व लौकिक भेद विसरून, उच्चनीचतेचे भाव टाकून, धन-विद्या-बल अगर धर्मजातिविषयक क्षुद्र अहंकार, त्याचप्रमाणें मानप्रतिष्ठा वगैरेंचा मोह टाकून, सर्वांनीं परस्परांशीं प्रेमानें व समतेनें वागावें, असा उपदेश करतात व स्वतः तसें आचरण करतात.

### वर्णाश्रमसंस्थेची अवनति

द्वैतबुद्धि टाकून समता साधणें हीच मानवजीवनाची शेवटची सिद्धि असली तरी ती साधण्याकरितां देशकालपरिस्थित्यनुसार आचार, व्यवहार व परस्पर वागण्याचे नियम हे ठरवून घ्यावे लागतात. समाजाची सतत धारणा होत राहून व्यक्तिलाहि समता

नागपूरच्या नभोवाणीवर 'सर्वां भूतीं पाहे तोचि वासुदेव' या विषयावर केलेलें भाषण (नागपूर नभोवाणीच्या कृपेनें).

* पूर्वप्रकाशन : *नवभारत*, वर्ष ६, अंक १, ऑक्टोबर, १९५२.

अनुक्रमणिका

शनैः शनैः प्राप्त करून घेतां यावी हाच हिंदु समाजांतील वर्णाश्रमसंस्थेचा मूळ हेतू होता, असें मानण्यास हरकत नाहीं. ("अर्जुना, जो यापरी। तें विहित कर्म स्वयें करी। तो मोक्षाच्या ऐल द्वारीं। वैठा होय।। अगा ज्याचें विहित। तें ईश्वराचें मनोगत। म्हणोनि केलिया निभ्रान्त। सांपडेचि तो।।"). पण मानवाच्या इतर सर्व संस्थांच्या बाबतींत जें घडलें, तेंच या संस्थेच्या बाबतींतहि घडलें असलें तर त्यांत अस्वाभाविक अथवा आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. समाजाची सुस्थिति राहावी व व्यक्तीचा विकास व्हावा म्हणून जी संस्था स्थापन झाली तिच्यांत पुढें दीर्घ कालानें कायमचे वर्ण वा जाति निर्माण होऊन ज्ञान व संपत्ति ही विशिष्ट वर्गांची मक्तेदारी बनली. वर्णाश्रमधर्माधिष्ठित समाज अखंड गतिमान् वा विचारशील राहिला नाहीं, तर तो हळूहळू स्थितिशील बनत गेला व त्याच्यातील चैतन्य लुप्तप्राय झालें. मानव हा ईश्वराचीच एक प्रतिकृति असून, मानवसमाज हा त्याचाच आविष्कार असल्यामुळें तो आनंदी वा सुखी करणें शक्य आहे, ही श्रद्धाज्योत मालवली गेली व संसार दुःखमय व अशाश्वत आहे म्हणून त्यापासून मुक्ति मिळविण्यांतच मानवी जीवनाची सार्थकता आहे ('मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम्। नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः।।') ही समजूत वळावत गेली. मोक्ष किंवा मुक्ति हिनें आमच्या मनाला इतकें मुग्ध केलें कीं, आम्ही मोक्षाला चौथा पण सर्वश्रेष्ठ पुरुषार्थ मानूं लागलों. ह्याचा परिणाम असा झाला कीं, आमचें संसाराकडे व समाजाकडे दुर्लक्ष झालें. शरीर समाजांत पण मन हिमालयांत अशी आमची स्थिति झाल्यामुळें समाजांत राहूनहि आम्ही प्रत्यक्षांत एकटेंच राहिलों व एकट्यापुरताच विचार करण्याची खोड आम्हांला लागली. सामुदायिक लाभ व कल्याण यांकरितां जो सामुदायिक विचार, वृत्ति व सद्‌गुण यांची आवश्यकता असते त्यांची आमच्यांत वाढ झाली नाहीं. दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, कर्माच्या कायद्याच्या अनर्थकारी अर्थानें आम्हांला अधिकच व्यक्तिनिष्ठ व स्वार्थपरायण बनविलें. 'प्रत्येक जण आपापल्या कर्मानुसार सुखदुःख भोगीत असतो. आपण कोणाला सुखी किंवा दुःखी करूं शकत नाहीं, तसें मानणें केवळ एक भ्रांति आहे' ही शिकवणूक रात्रंदिवस आमच्या कानींकपाळीं मारण्यांत येऊं लागली! इहलोकीं धन, विद्वत्ता, वैभव अगर अन्य कोणतीहि संपदा कमावून जो सुखी होईल व परलोकीं मोक्ष साधून स्वतःचें कल्याण साधून घेईल तोच खरा शहाणा ठरूं लागला. या शहाण्यांनीं आमच्या संसाराचीं आज शेंकडों-हजारों वर्षांपासून नासाडी करून टाकली आहे! वैयक्तिक स्वार्थ व सुखलालसा बोकाळल्यामुळें समाजांतील निरनिराळ्या वर्गांत जो जिव्हाळा व जें प्रेम सहज निर्माण व्हावयास पाहिजे त्यांस आम्ही अजीबात आंचवलों आहोंत. परस्परांच्या सुखदुःखांबद्दल सहसंवेदना व सहानुभूति यांचा आमच्यांत अजीबात अभाव आहे. 'निर्विण्णचेतसा' व 'निश्चयेन' अभ्यास करून आपलें आत्मतत्त्व विकसित करावयाचें हीच मनुष्यजन्माची परम सिद्धि, हा सिद्धान्त मागें पडल्यामुळें, सामाजिक आत्मीयतेच्या प्रचीतीला आपण पारखे झालों आहोंत व 'सर्वां भूतीं पाहे तोचि वासुदेव' ही केवळ अध्यात्मसृष्टींतीलच कल्पना अथवा अनुभव राहिला आहे!

**'जल मरता संसार!'**

अशा वेळीं लोकमानसांतील विवेकदीप उजळून लोकांची प्रगतिशील नीतिमत्ता जागृत करण्याचें कार्य मधूनमधून नीतिमान् विभूतींकडून झालेलें आहे. आणि ह्या नीतिमान् विभूती संतांच्या किंवा साधुपुरुषांच्या रूपानें या भूतलावर सदां अवतीर्ण झाल्या आहेत. अशा संतांचें जीवन हें एक दिव्य प्रेरणेनें भरलेलें सदाचारसंपन्न असें जीवन असतें. उच्च नीतिमत्तेचे आदर्श असे हे संत अवनत समाजाच्या रूढ नीतिविरूद्ध वंड उभारून एका उन्नत प्रगतिशील नीतीचें ध्येयदर्शन समाजाला घडवून आणतात. म्हणूनच संतांचा त्यांच्या वेळच्या समाजाकडून सदा छळच होतो. समाजाकडून होणारा हा छळ हे संत श्रद्धेनें व शांतपणें सहन करतात. त्यांत त्यांचा उद्देश हाच असतो कीं, मानवजातींतील क्षुद्रता व हीनता नाहींशी होऊन तिनें आपली शेवटची सिद्धि साधावी. नीति, सदाचार, शील, चारित्र्य हीच जीवनाला शोभा देणारी खरी संपत्ति आहे, ही गोष्ट प्रत्येक माणसाच्या हृदयावर ठसविण्याची संतांनीं पराकाष्ठा केली आहे. स्वतःमधील शांतीनें व सौजन्यानें त्यांनीं जगांतील त्रिविध ताप सौम्य केले आहेत. भोगवश व भोगलुब्ध जगाला त्यांनीं संयमाचे धडे दिले आहेत. त्याला विलासांतून काढून त्यांनीं वैराग्याकडे वळविलें आहे, मोहांतून कर्तव्याकडे आणलें आहे. पाप्यांना त्यांनीं पुण्यवान् बनविलें आहे; पतितांना त्यांनीं पावन केलें आहे. स्वतः मानव बनून जगाला त्यानीं मानवता शिकविली आहे. आज जगांत जी थोडी फार मानवता दिसत आहे, जे सद्‌गुण दिसून येत आहेत, ते सर्व त्यांच्याच कर्तृत्वाचें फळ आहे. एका सज्जनतेशिवाय धन, बल, विद्या, सत्ता, ऐश्वर्य यांत किंवा इतर कोणत्याहि सिद्धींत मनुष्यांतील पशुता, अज्ञान, मोह, जडता वगैरे दुर्गुण नाहींसे करण्याचें सामर्थ्य नाहीं. असे संतसज्जन जन्मास आले नसते तर अजूनहि जगांतील जन जंगलीच राहिले असते कीं काय अशी शंका मनास येते. संत कबीर यांनीं यावरूनच म्हटलें असावें कीं, असे हरिभक्त संतसज्जन निर्माण झाले नसते, तर

'जल मरता संसार'! संतशिरोमणि तुकाराममहाराज म्हणतात : 'पुण्य पर-उपकार पाप तें परपीडा। आणिक नाहीं जोडा दूजा यासी।।'.

पण सर्वसामान्य माणसाला सज्जनता व समता सहजसुलभ नाहींत, ही गोष्ट आपण सर्व स्वानुभवावरून मान्यच करूं. माणसाच्या जीवनाची सिद्धि स्वतः, सृष्टि व समाज या त्रिपुटीवर अवलंबून आहे. विषयांच्या सेवनानें सुख व समाधान होणें हा माणसाचा म्हणजे त्याच्या इंद्रियांचा स्वभावधर्म आहे. मनानें या इंद्रियग्रामाचें नियमन करणें भल्याभल्यांना कठिण जातें! ('जें मनातें सदा मुठी। धरूनी आहाती। तेही किजती कासाविसी। या इंद्रियांची प्रौढी ऐसी।।'). तेव्हां या इंद्रियाश्वांना आवरून सज्जनता व समता प्राप्त करावयाची म्हणजे बुद्धिरूपी सारथ्याला मनाचा लगाम फार जोरानें खेंचावा लागतो व त्यासाठीं आंतरिक किंवा आत्मिक शक्तीची जरूरी लागते. म्हणूनच माणसाच्या जीवनसिद्धीसाठीं त्याच्यांतील या आत्मशक्तीला आवाहन करून ती जागृत करण्यासाठीं संत आपली पराकाष्ठा करतात.

**नवी जाणीव**

पण ज्या सृष्टीच्या व समाजाच्या संसर्गात व सहवासांत माणसाला ही सज्जनता व समता प्राप्त करून घ्यावयाची असते, त्या सृष्टीचा व समाजाचा व्यापार माणसाच्या या प्रयत्नांना अनुकूल व पोषक होईल असा त्यांत बदल घडवून आणण्याची आवश्यकता पूर्वीच्या संतांना कधीं पटली नाहीं व म्हणून त्यांनीं तसा प्रयत्नहि केला नाहीं. सृष्टीचा व्यापार व समाजाचा व्यवहार या गोष्टी ईश्वराधीन आहेत, अशी पूर्वीच्या संतांची श्रद्धा होती. सृष्टि व समाज यांचें ज्ञान करून घेऊन स्वतःच्या उन्नतीला अनुकूल असे बदल त्यांच्यांत घडवून आणणें माणसाला शक्य आहे व म्हणून तसें करणें ही त्याची जबाबदारी आहे, ही त्यांना जाणीव नव्हती. मोठमोठ्या सामाजिक संस्थांच्या परंपरेंत माणसाला सज्जन किंवा दुर्जन बनविण्याची मोठी शक्ति आहे; ज्या संस्था एका काळीं माणसाला उपकारक असतात त्याच संस्था दुसऱ्या काळीं अपकारक ठरतात, हें संतांच्या ध्यानीं स्पष्ट आलें नव्हतें. "सामाजिक विश्वाची सर्व जबाबदारी माणसावरच आहे. विश्व आहे तसेंच चालूं ठेवणें किंवा तें बदलणें हें माणसाच्या हातीं आहे, इतकेंच नव्हे, तर 'या जगांत कोणी कोणाचा नाहीं, प्रत्येक कर्म ज्याचें त्यालाच भोगावें लागतें' अशा विचारसरणीच्या कर्मसिद्धान्तावर विश्वास ठेवून परदुःखाविषयीं उदासीन राहणें हा समाजद्रोह आहे" ही शिकवणूक संतांच्या जीवनांत आपल्याला आढळत नाहीं. पण आतां माणसाची जाणीव जुनी राहिली नाहीं. आज सर्व जग एक असून त्याच्या सुखदुःखाची जबाबदारी सर्वांची आहे असें आपण मानूं लागलों आहोंत. मात्र या जाणिवेनें आज माणसाचा व्यवहार होत नाहीं. याचें कारण असें आहे कीं, विज्ञानानें माणसा-माणसामधील बाह्य अंतर तोडलें असलें तरी माणसांचीं मनें जवळ आणून त्यांच्यांत मैत्रीभाव उत्पन्न केला नाहीं. वैज्ञानिकाला तें शक्य नाहीं; नव्हे, त्याचें तें कामच नाही असें म्हटलें पाहिजे. तें कार्य फक्त संतच करूं शकतील. त्या कार्याला आवश्यक त्या विश्वप्रेमाची प्रेरणा आपल्याला संतांच्य जीवनांतच आढळते. त्यांना स्वदेश आणि परदेश माहीत नसतो. 'हें विश्वचि माझें घर' या भावनेनें त्यांचा जीवनक्रम भरलेला असतो व त्यांची चळवळ मानवी ऐक्याच्या स्फुरणानें व्यापलेली असते.

**म. गांधी यांच्या जीवनांतील स्फूर्ति**

महात्मा गांधी हे मुत्सद्दी होते किंवा नाहीं हा विवाद्य प्रश्न होऊं शकेल; पण त्यांची चळवळ मानव्याची असून त्यांच्या जीवनाची स्फूर्ति मानवी ऐक्य ही होती, याबद्दल सर्वांचें एकमत होईल, गांधी लोकोत्तर महात्मे म्हणून त्यांची दिगंत कीर्ति झाली व जनमनांत त्यांनीं पूर्वीच्या धर्मसंस्थापकांइतकेंच खोल स्थान मिळविलें याचें कारण तरी हेंच होय. कोट्यावधि स्त्री-पुरुषांच्या जीवनांतील विवेकदीप अधिक प्रज्वलित करावा, म्हणजेच त्यांना सज्जन व शीलवान् करून सोडावें व त्यांच्यांत समता प्रस्थापित करावी, हें त्यांच्या जीवनाचें लक्ष्य होतें. परम-सत्याची जिज्ञासा आणि विश्वव्यापी प्रेम हीं जीं संतांचीं दोन मुख्य लक्षणें तीं त्यांच्या ठिकाणीं अशा रीतीनें प्रकट झालीं होतीं.

आत्मोद्धाराशिवाय दुसऱ्यांचा उद्धार करतां येत नाहीं, हें संतांच्या क्रियापंथाचें सूत्र असतें. जो आत्मबंधु होतो तोच विश्वबंधु होऊं शकतो; म्हणून आत्मशुद्धि हा गांधीजींच्या सत्याग्रह-चळवळीचा प्राण होता. पण गांधीजी व पूर्वी होऊन गेलेले संत यांच्यामध्यें हा मोठा फरक होता कीं, सामाजिक सुखदुःखांची जबाबदारी समाजांतील सर्व माणसांची मिळून आहे व माणसाला सज्जन किंवा साधू बनवावयाचें असेल तर सामाजिक संस्थांत तसा अनुकूल बदल घडवून आणणें जरूर आहे व मानवी प्रयत्नांनीं तो तसा होतो असें गांधीजी मानीत. अशी त्यांची श्रद्धा होती म्हणूनच समाजकारण, राजकारण, अर्थकारण वगैरे जीवनाच्या सर्व क्षेत्रांत धर्माची व नीतीची स्थापना झाली पाहिजे असा आग्रह त्यांनीं सदा धरला.

अनुक्रमणिका

लोकशाही समाज व राज्यपद्धति यांचा मुख्य आधार प्रत्येक व्यक्तीबदल आदर व श्रद्धा आणि जीवनांतील सर्व क्षेत्रांत समता हा आहे. सज्जनतेशिवाय लोकशाही सुस्थिर होणें शक्य नाहीं. 'सर्वां भूतीं पाहे तोचि वासुदेव' या तत्त्वाचा साक्षात्कार झाल्याशिवाय व या मंगलमय तत्त्वाची आराधना केल्याशिवाय आजच्या जगांत सज्जनतेची व समतेची स्थापना कशी होणार?

※ ※ ※

## ४. मानवाच्या सज्जनतेवरील निष्ठा*

आज महात्मा गांधींची पुण्यतिथि आहे. जीवनाच्या अंतकालपर्यंत आपल्या निष्ठेवर स्थिर राहाणाऱ्या पुरुषाचें जीवन सफल होतें, असें म्हणतात. गांधीजींच्या जीवनांत केवळ मरणापर्यंतच नव्हें तर प्रत्यक्ष मरणांतदेखील त्यांनीं आपली जीवननिष्ठा स्थिर ठेविली, हें त्यांच्या जीवनसाफल्याचें विशेष कौतुक होय. म्हणून गांधीजींची पुण्यतिथि ही त्यांच्या जीवननिष्ठेची जयंतीच समजली पाहिजे. गांधीजी आपणाला सत्याचे उपासक समजत. अहिंसेच्याच द्वारें जीवनांतील सत्याची प्राप्ति होऊं शकते असा त्यांचा जीवनसिद्धान्त होता. म्हणून ते आपणांला अहिंसेचे पुजारी असेंहि समजत. अहिंसेच्या द्वारा जीवनसत्याचा शोध या मार्गाला त्यांनीं सत्याग्रहमार्ग असेंहि संबोधलेलें आढळतें. गांधीजींच्या या सत्याग्रहमार्गाचें स्वरूप थोडक्यांत सांगण्याचा मी आज अल्पसा प्रयत्न करणार आहे.

### मनुष्य मुळांत सज्जन

माझ्या दृष्टीनें गांधीजींची सत्याग्रहनिष्ठा म्हणजे मनुष्यमात्राच्या मूलभूत सज्जनतेवरील श्रद्धा होय. माणूस मूलतः सत्प्रवृत्त असतो; त्याचा मूळ स्वभाव सज्जनपणांत आनंद मानणारा असतो; असा विश्वास हा गांधीजींच्या सत्याग्रह-दर्शनाचा गाभा आहे. अज्ञानानें, लोभानें आणि मोहानें माणसाच्या या मूलभूत सज्जनतेवर आवरणें येतात आणि त्याच्या स्वाभाविक सत्प्रवृत्ती प्रगट होण्याला अडथळा निर्माण होतो. इतकेंच नव्हे तर नाना प्रकारच्या विकृतीहि त्याच्या चित्तांत निर्माण होतात आणि तो अत्यंत दुष्टपणाच्या प्रवृत्तींत कित्येकदा गढलेला आढळतो. स्वच्छ जलाशयावर जसें शेवाळ माजावें तशीच माणसाच्या चित्ताची स्थिति झालेली असते. शेवाळ काढून टाकलें, कचरा दूर केला म्हणजे पाण्याचें शुद्ध रूप दिसूं लागतें त्याप्रमाणें माणसाच्या मनांतील अज्ञान आणि विकृत भावना दूर करतां आल्या तर माणसाच्या अंगची स्वाभाविक सज्जनता प्रभावीपणानें प्रगट झाल्याशिवाय राहणार नाहीं, अशी गांधीजींची दृढ श्रद्धा होती. तसें पाहिलें तर माणसाच्या सुधारणेचा मार्ग उपदेशिणारे सर्व विचारवंत अशी श्रद्धा बाळगतातच. कारण माणूस मुळांतच दुष्ट असेल तर त्याला सुधारण्याची आशा नाहीं. सारें शिक्षणशास्त्र या श्रद्धेवरच काम करीत असतें. जगांतील सर्व धर्म हाच सिद्धान्त मानून आपल्या कार्याला प्रवृत्त झालेले आढळतात. आणि म्हणूनच आपण कांहीं नवेंच सांगत आहोंत असा गांधीजींचा दावा नसे. जीवनाचें सनातन सत्यच मी आचरण्याचा प्रयत्न करीत आहे असें ते नेहमीं म्हणत.

गांधीजींच्या प्रयत्नाचें वैशिष्ट्य म्हणून असें सांगतां येईल कीं, त्यांनीं जीवनाच्या सामाजिक क्षेत्रांत या सनातन सत्यांचा वापर करण्याचें आग्रहानें ठरविलें. अलीकडच्या काळांत मानवसमाजांत जे राजकीय व आर्थिक अन्याय विशाल प्रमाणांत वाढले आहेत त्यांच्याविरुद्ध अन्यायपीडितांना लढण्याची शिकवण देतांना गांधीजींनीं मानवाच्या मूलभूत सज्जनतेवर सर्वांत अधिक भर देण्याचें काम केलें. आधुनिक जगाला गांधीजींची ही फार मोठी देणगी समजली पाहिजे.

माणूस हा कांहीं एकटा जन्माला येत नाहीं, एकटाच आपलें जीवन जगूं शकत नाहीं. त्याला इतर माणसांशीं संबंध ठेवावेच लागतात. हे संबंध ठेवण्याच्या निमित्तानें नाना प्रकारच्या सामाजिक संस्था माणूस निर्माण करतो. या संस्था नेहमींच माणसाच्या स्वाभाविक सज्जनतेच्या आविष्काराला पोषक ठरतातच असें नाहीं. कित्येक वेळां त्या माणसाच्या सज्जनतेला प्रतिबंध करतात. इतकेंच नव्हें तर त्यांना दुष्टतेच्या मार्गावर नेण्यालाहि कारणीभूत

---

३० जानेवारी, १९५६ ला गांधीजींच्या सातव्या निर्याणदिनीं पुणें नभोवाणीवर श्री. शंकरराव देव यांचें जें भाषण झालें तें पुणें नभोवाणी-अधिकाऱ्यांच्या अनुज्ञेनें येथें दिलें आहे – का.सं.

* पूर्वप्रकाशन : *नवभारत*, वर्ष ९, अंक ६, मार्च, १९५६.








होतात. अशा वेळीं माणसाच्या सज्जनतेच्या रक्षणासाठीं बाह्य संस्थांशीं झगडून त्यांत क्रांतिकारक बदल घडवून आणावे लागतात. मानवसमाजाच्या इतिहासांत अशा प्रकारच्या अनेक क्रांत्या झालेल्या दिसून येतील. पण या क्रांतीच्या साधनांत कित्येक वेळां अज्ञानानें अथवा नाइलाजानें सज्जनतेचा विनाश होईल अशा प्रवृत्तींचा स्वीकार केला जातो. त्यामुळें बाह्य क्रांति होऊनहि सज्जनतेचा व्हावा तितका जय होत नाहीं. कित्येक वेळां तिचा पराभवहि झालेला दिसून येतो. सामाजिक क्रान्त्यांचें हें वैफल्य दूर करावयाचें असेल तर क्रांतीच्या साधनांत सज्जनताविरोधी प्रवृत्तींचा समावेश करण्याचा मोह क्रांतिकारकांनीं कटाक्षानें टाळला पाहिजे. तरच क्रांति मानवतेच्या दृष्टीनें यशस्वी होईल व मानव-जीवन सज्जनतेच्या विकासाला अनुकूल होईल. गांधीजींच्या सत्याग्रह-मार्गाचें हें वैशिष्ट्य सर्व सामाजिक सुधारकांनीं आणि क्रांतिकारकांनीं समजून घेतलें पाहिजे.

### द्वैताचा सहिष्णुतेनें स्वीकार

हिंदुस्थानसारख्या संमिश्र समाजांत निरनिराळे मतभेदांचे प्रश्न सोडविण्यासाठीं सत्याग्रहाचाच मार्ग स्वीकारला पाहिजे. आधींच येथें नानाप्रकारचे भेद आहेत. धर्मभेद आहेत, भाषाभेद आहेत, जातिभेद आहेत. कोणताहि मतभेदात्मक प्रश्न सोडवितांना येथील लोकांच्या मनांत जर प्रक्षोभ उत्पन्न झाला तर मतभेद दूर होण्याऐवजीं त्यांत मनाची कटुता आणि द्वेष या विकृती शिरण्याचा धोका आहे. द्वैतांत अद्वैत पाहण्याचा तत्त्वज्ञानाचा मार्ग सामाजिक व्यवहारांत आणावयाचा म्हणजें द्वैताचा प्रेमानें व सहिष्णुतेनें स्वीकार करावयाचा असा अर्थ होतो. द्वैत म्हणजे विविधता. अशा अर्थानें भारतीय समाज नेहमींच द्वैतमय राहील. आपण अभिनिवेशाच्या आहारीं जाऊन भारतीय समाजाला एकरूप बनविण्याचा अट्टहास करतां कामा नये. विविधतेमध्यें स्वभावतःच विरोध येतो असें मानण्याचें कारण नाहीं. विविधता स्वीकारूनहि परस्परांशीं समंजसपणानें, न्यायानें आणि सहिष्णुतेनें वागणें शक्य आहे. जेथें अन्याय होईल तेथें विचारविनिमयाच्या मार्गानें, हृदयपरिवर्तनाच्या प्रक्रियेने तो दूर करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. सज्जनतेचा परिपोष करूनच आमचे सामाजिक प्रश्न लौकर सोडवितां येतील.

गांधीजींचा सत्याग्रहाचा प्रयोग प्रामुख्यानें राजकीय क्षेत्रांत झाला. पारतंत्र्याच्या विरुद्ध करावयाच्या झगड्यासाठीं सत्याग्रहाचें कार्यक्रम म्हणून ज्या गोष्टी पुढें आल्या त्यांत सामुदायिक प्रक्षोभ वेळोवेळीं प्रगट होत गेला. त्यामुळें सत्याग्रह म्हणजे प्रक्षोभात्मक आंदोलनें अशी आपल्यांतील पुष्कळ लोकांची समजूत झाली आहे. पण सत्याग्रहाचें खरें मर्म प्रक्षोभ हें नाहीं. उलट, होत असलेला प्रक्षोभ शमविण्याचा प्रयत्न करणें हेंच सत्याग्रहाचें मुख्य कार्य आहे. सत्याग्रहांत कोणताच शत्रु मानतां येणार नाहीं. म्हणून शत्रूचा निःपात करणें, त्याची कायमची खोडकी जिरविणें इत्यादि भावनांना सत्याग्रहांत स्थान नाहीं. जशास तसें हा सत्याग्रहाचा मार्ग नव्हे. आपल्या सौजन्याची अभिवृद्धि करून जेथें दुर्जनता आहे असें वाटतें तेथेंहि सुप्त असलेलीं सज्जनता जागृत करणें हेंच सत्याग्रहाचें तंत्र आहे. अन्याय करणारा माणूस अन्याय करीत राहातो याचें कारण त्याला आपण अन्याय करीत आहोत याची बहुधा जाणीव नसते. अन्याय दूर करण्यासाठीं प्रयत्न करणाऱ्या सत्याग्रही पुरुषाला अन्यायी माणसांतहि जाणीव निर्माण करावयाची असते. असें करतांना स्वतः कोणताहि अन्याय करतां कामा नये. असत्याशीं असत्य, कपटाशीं कपट आचरिल्यानें क्वचित् प्रसंगीं व्यावहारिक जय झालेला दिसला, तरी अन्यायाचें मूळ दूर होण्यास त्यामुळें कसलीच मदत होत नाहीं. असत्याचा सत्यानें, द्वेषाचा प्रेमानें आणि अन्यायाचा न्यायानें विरोध केल्यानेंच असत्य व अन्याय यांचें निर्मूलन होतें. विरोधी व्यक्तीच्या व गटाच्या हृदयांतील सद्भावना जागृत होईपर्यंत सत्याग्रही माणसाला आपला विरोध चालू ठेवावा लागतो. यासाठीं सत्याग्रहाच्या मार्गात सबूरीची विशेष महती मानली जाते. उतावीळपणा हें सज्जनतेला मारणारें विष आहे. मतभेदाच्या प्रसंगीं आपल्या चित्तवृत्तींत उतावीळपणाचा विचार शिरणार नाहीं याची दक्षता घ्यावी लागतें.

### आत्मौपम्याचा सिद्धान्त

सत्याग्रहाचा मार्ग हा मनुष्यांतील मूलभूत सज्जनतेच्या विकासाचा मार्ग असल्यामुळें तो संपूर्ण नैतिक मार्ग आहे. दुसऱ्यानें जसे आपणाशीं वागावें अशी आपली अपेक्षा असते तसें आपण स्वतः त्यांच्याशीं वागणें हा नीतिमार्ग होय. 'जसें आपणांला तसेंच इतरांना' हा आत्मौपम्याचा सिद्धान्तहि हाच मार्ग सुचवितो. म्हणून नीतिमार्गांत आपलें वर्तन सापेक्ष असूं शकत नाहीं. दुसरा चांगला वागत नाहीं म्हणून मी त्याच्याशीं चांगला वागणार नाहीं, हा नीतिमार्ग नव्हे. ती व्यावहारिक अडवणूक म्हणतां येईल. पण अशी अडवणूक करण्यासाठीं आपण सतत वांकड्या मार्गानें जाण्याचें ठरविलें तर शेवटीं आपलाहि व्यावहारिक नाश झाल्याशिवाय राहात नाहीं. कारण जीवनाचा सर्व व्यवहार शेवटीं प्रामाणिकपणावरच आधारलेला आहे. सत्य हें सर्व व्यवहाराचें आधारभूत तत्त्व आहे. त्या सत्याचा लोप झाला म्हणजे व्यवहारहि बिघडतो. म्हणून नीतिमार्गांत नीतीचें आचरण निरपेक्षपणेंच

अनुक्रमणिका

करावयाचें असतें. आपली सज्जनता कधीहि न सोडतां विरोधकाला आपलें म्हणणें न्यायाचें आहे हें पटवून देणें हाच खरा व्यवहार-मार्ग ठरतो. तात्पुरत्या व्यावहारिक लाभासाठी सज्जनतेचा त्याग केला असतां आधीं सज्जनता जाते आणि मग व्यवहारहि विघडतो. म्हणून सज्जनतेची सदैव जपणूक करणें हाच यशाचा राजमार्ग ठरतो.

सत्याग्रहाचें स्वरूप समजून घेतांना या तात्त्विक विचारावरोबरच गांधीजींचें सारें जीवन तपासून पाहिलें तर आपणांला आणखी कित्येक गोष्टी स्पष्ट दिसूं लागतात. एखादा लढा उत्पन्न झाला म्हणजे सत्याग्रहपद्धतीनें कसें वागावें या प्रश्नाचें उत्तर केवळ तार्किक बुद्धीनें मिळण्यासारखें नाहीं. सत्याग्रह ही एक जीवनपद्धति आहे. ज्यानें आपल्या जीवनांत सत्याची व सौजन्याची सदैव जोपासना चालविली असेल त्यालाच एखाद्या विवक्षित प्रसंगीं सत्याग्रहानें कसें तोंड द्यावें हें सुचूं शकतें. गांधीजींच्या जीवनविकासावरोबर त्यांच्या सत्याग्रह-मार्गाचाहि विकास होत गेला असें आपणांला आढळून येतें. सत्याग्रह हा एक जीवन-विचार आहे. आणि जीवनाच्या विकासाबरोबरच त्या विचाराचाहि विकास होणें हा त्याचा स्वभावच आहे. गांधीजी तरुण वयांत दक्षिण आफ्रिकेंत गेले. तेव्हां त्यांच्या पुढें कोणताहि सामाजिक प्रश्न नव्हता. केवळ चरितार्थाच्या साधनासाठींच तें गेले होते. पण तेथे गेल्यावर हळूहळू त्यांना तेथील सामाजिक जीवनाच्या प्रश्नांनीं घेरून टाकलें. व्यक्तिगत अपमान गिळून टाकून केवळ सुखाचा संसार चालविण्याचीच त्यांनीं इच्छा धरली असती तर त्यांचें जीवन अगदींच वेगळें झाले असतें. पण गांधीजींनीं आपल्या जीवनांत सुखापेक्षां कर्तव्याला श्रेष्ठ स्थान दिलें आणि त्यामुळेंच त्यांना सत्याग्रह-मार्गाचा शोध लागला. सामाजिक जीवनाशीं एकरूप होण्याची त्यांची वृत्ति त्यांच्या कर्तव्यभावनेंतूनच जन्म पावलेली दिसते. जर ते व्यक्तिगत जीवनांत गुरफटून राहिले असते तर त्यांना सत्याग्रह-मार्गाची साधना सुचली नसती. व्यक्तिगत सुखाच्या प्रेरणेंतून नैतिक प्रश्नाची निर्मिति होत नाहीं. व्यक्ति जेव्हां कर्तव्याच्या जाणिवेनें स्वतःच्या बाहेर पडूं लागते तेव्हांच नैतिक जीवनाची निर्मिति होते. आपलें जीवन कर्तव्यभावनेवर उभारलें गेलें पाहिजे ही गांधीजींची स्वाभाविक प्रेरणा होती. त्यांच्या बालपणीं त्यांच्यावर झालेले संस्कार या कर्तव्यभावनेला पोषकच होते. मात्र, गांधीजींच्या जीवनांत कर्तव्यभावनेनें फार मोठें सामाजिक स्वरूप धारण केलें आणि म्हणूनच त्यांचें जीवन ही एक सामाजिक जीवनाचे प्रश्न सोडविणारी प्रयोगशाळा बनली.

**नैतिक जीवनाचा मूलमंत्र**

गांधीजींचा बहुतेक जीवनकाल राजकीय क्षेत्रांतील अन्याय निवारण्याच्या कामीं खर्ची पडला असला तरी त्यांची जीवनाकडे पाहण्याची दृष्टि केवळ राजकीय नव्हती. जीवनाच्या सर्व क्षेत्रांत सत्य प्रस्थापित व्हावें अशी त्यांची तळमळ असे. सामाजिक जीवनांतील सर्व अन्याय दूर व्हावे, आर्थिक क्षेत्रांतील सर्व पिळवणूक दूर व्हावी आणि माणसा-माणसांचे परस्पर व्यवहार सज्जनतेच्या आधारावर चालू व्हावेत असें त्यांचें जीवनाचें भव्य स्वप्न होतें. मानवांतील सर्व कृत्रिम भेदांच्या भिंती फोडून त्यांची दृष्टि विश्वांतील महामानवावर स्थिर झाली होती. धर्म, राष्ट्र इत्यादि भेदांनीं त्यांच्या बुद्धीला संकुचित केलें नव्हतें. कसल्याहि प्रकारचा आपपर भाव त्यांच्या मनांत उरला नव्हता. म्हणून त्यांना जगांतील सर्व राष्ट्रांनीं आपलें मानलें आणि त्यांच्या प्रयोगांत लक्ष घातलें. आजपर्यंत चालत आलेल्या विश्वकुटुंबवादी विभूतिपरंपरेंत गांधीजींचें स्थान मान्य करण्यांत आलें आहे. आज सारें जग आधुनिक शोधांनीं जवळ आलें आहे. विज्ञानाच्या साधनांनीं माणसाचें दारिद्र्य दूर होण्याची शक्यताहि निर्माण झाली आहे. पण भौतिक विपुलतेच्या या काळांत जगभर मानवांत नैतिक जीवनाचें दारिद्र्य दूर करण्यासाठीं नैतिक जीवनाचाच आधार घ्यावा लागेल. धर्म, ईश्वर, अध्यात्म इत्यादि अनेक विचार मानवाला नैतिक जीवनाची दीक्षा देण्याचे प्रयत्न करीत असतात. परंतु कोणाहि साध्याभोळ्या माणसाला कसल्याहि गूढ अथवा जटिल समस्येंत न जातां नैतिक जीवनाचा अर्थ समजून घ्यावयाचा असेल तर त्यानें आपल्या हृदयांतील सज्जनतेचा विकास करावा म्हणजे झालें. सज्जनतेवरील श्रद्धा हाच नैतिक जीवनाचा मूलमंत्र आहे. प्रत्येक मनुष्यमात्रांत सज्जनता भरून राहिलेली आहे आणि आपण दुसऱ्याशीं सज्जनतेनें वागलें असतां त्याची प्रतिक्रिया सज्जनतेचीच झाली पाहिजे एवढी श्रद्धा पुरेशी आहे. बौद्धिकदृष्ट्या तत्त्वज्ञानाचा कीस काढण्याची नैतिक जीवनाला गरज नाहीं. चांगल्याचें फल चांगलेंच आणि वाईटाचें फल वाईट असाच सृष्टीचा व्यवहार आहे. म्हणून जें चांगलें वाटेल त्याला घट्ट धरून राहणें एवढाच धर्ममार्ग आहे.

पण या चांगल्याचा अथवा सज्जनतेचा प्रत्यक्ष अनुभव पाहिजे. ज्या माणसाला आपल्या हृदयांत सज्जनतेचा अनुभव येतो तो 'अंतरीं निर्मळ आणि वाचेचा रसाळ' सहजच बनतो. आज भारतांत आणि विशेषतः महाराष्ट्रांत आपणाला या साधनेची तीव्र गरज आहे. आपल्या सामाजिक जीवनांत अनेक प्रकारचे अभाव आणि अनेक प्रकारचे दोष दिसत आहेत. हे अभाव आणि हे दोष घालविण्यासाठीं आपण जाणीवपूर्वक प्रयत्न केले








पाहिजेत. व्यक्ति-जीवनांतच गुरफटल्यामुळें आपल्यांतील सामुदायिक विकासाचे प्रयत्न खुरटत आहेत. महाराष्ट्रांत बुद्धि आहे, त्याग आहे, चिवटपणा आहे; पण हे सारे सद्‌गुण सामाजिक विकासासाठीं निरपेक्षपणें अर्पिण्याची निष्ठा वाढविली पाहिजे. गांधीजींच्या चरित्राच्या अवलोकनानें आपणाला अशी निष्ठा संपादितां येईल. गांधीजींचा मार्ग नवा नाहीं. साधुसंतांच्या परंपरेला तो विरुद्ध नाहीं. फक्त आजच्या काळाच्या गरजेसाठीं तो व्यापक झालेला आहे. व्यक्तीप्रमाणेंच समाजाला व राष्ट्रालाहि चारित्र्याची गरज असते. आणि चारित्र्याचा आधार सज्जनता हाच असतो. ही सज्जनता प्रत्येक व्यक्तीच्या अंगीं बाणल्यानेंच आपल्या समाजाचा व राष्ट्राचाहि सर्व बाजूंनीं उद्धार होणार आहे.

गांधीजींच्या पुण्यतिथीच्या दिवशीं आपण सर्वांनीं आपलें जीवन सज्जनतेनें परिपूर्ण व्हावें अशी इच्छा धरावी व त्यासाठीं प्रयत्नपूर्वक झटावें. थोर पुरूषांच्या जीवनाचें स्मरण यासाठींच करावयाचें असतें.

※ ※ ※

*नवभारत* आगामी विशेषांक

# तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

**व्यक्ती आणि विचार**

तर्कतीर्थांचे व्यक्तित्व व जीवन बहुपरिमाणसंपन्न होते. पारंपरिक पद्धतीने शास्त्राध्ययन केलेल्या शास्त्रीजींची दृष्टी परंपरा नवतेच्या अंगाने जाणून घेणारी होती. समकालीन सामाजिक-राजकीय जीवनात ते सक्रिय राहावेत हे ओघानेच आले. अनेक विषयांवर त्यांनी विपुल लेखन केले. ग्रंथरचना केली. धर्मकोशाचे संपादक, मराठी विश्वकोशाचे प्रमुख संपादक, महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळाचे आद्य अध्यक्ष म्हणून त्यांनी महत्त्वपूर्ण व मौलिक कामगिरी पार पाडली. प्राज्ञपाठशाळा मंडळाचे ते अध्यक्ष होते.

शास्त्रीजींच्या वयाला ऐंशी वर्षे पूर्ण झाली त्यावेळी *नवभारत*ने विशेषांक प्रसिद्ध केला होता (फेब्रुवारी-मार्च १९८१). शंभरी गाठल्यावर विशेषांक काढण्याचा बेत आम्ही आखला होता. पण गतवर्षी २७ मे रोजी शास्त्रीजींचे अकस्मित निधन झाले.

शास्त्रीजींची वैचारिक जडणघडण व वाटचाल, त्यांचे व्यक्तित्व, त्यांचे जीवन, त्यांचे लेखन यांचा परामर्श घेणारा *नवभारत*चा विशेषांक (डिसेंबर १९९५-जानेवारी १९९६) २७ जानेवारी १९९६ रोजी प्रसिद्ध करीत आहोत.

# उपविभाग २ : सर्वोदय विचार

## १. लोकशाही आणि पक्षपद्धति*

*नवभारता*च्या गेल्या फेब्रुवारीच्या व एप्रिलच्या अंकांत श्री. वा.रं. सुंठणकर व आचार्य शं.द. जावडेकर यांचे अनुक्रमें 'राजकारण आणि पक्षपद्धति' व 'हिंदी राजकारण आणि राजकीय पक्ष' हे लेख प्रसिद्ध झाले आहेत. या देशांतील लोकशाहीच्या प्रयोगाच्या यशापयशावर भारताचेंच काय, पण खुद्द लोकशाहीचेंहि भवितव्य अवलंबून असल्यामुळें, लोकशिक्षणाच्या व लोकमत बनविण्याच्या दृष्टीनें या विषयाची सांगोपांग व सखोल चर्चा होणें अत्यंत अवश्य आहे.

'सुशिक्षित मध्यमवर्गाची राज्यनिष्ठा : (३) लोकशाही राज्य?' या *नवभारत*च्या जुलै १९५० अंकांतील लेखाच्या शेवटच्या परिच्छेदाच्या शेवटीं मीं म्हटलें होतें : "धर्म, जात, वंश यांच्या बंधनांमुळें व्यक्तित्व विलयाला गेलेल्या या देशांत एक लोकशाही हीं बंधनें नष्ट तरी करील किंवा हीं बंधनें लोकशाहीला तरी पराभूत करतील. अखेर लोकशाहीचाच जय व्हावयाचा तर वैयक्तिक, सामाजिक, आर्थिक, राजकीय, धार्मिक, सांस्कृतिक, राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय अशा जीवनाच्या सर्व अंगांत सर्वांचे हक्क व स्वातंत्र्य यांच्याकडे समानतेच्या भावनेनें लक्ष दिलें पाहिजे. 'मानव तितुका सारखा' या निष्ठेनें प्रत्येकाच्या सुख-दुःखांशीं समरस होऊन मानवधर्माची पताका उंच उभारली पाहिजे".

स्वतंत्र भारताच्या राज्यघटनेंत भारतीयांनीं अशी प्रतिज्ञा केली आहे कीं, 'आम्ही, भारताची जनता, भारताचें एक सार्वभौम लोकशाही प्रजासत्ताक (गण) राज्य निर्माण करण्याचें ठरवून, आणि भारतीय नागरिकांना सामाजिक, आर्थिक व राजकीय न्याय, विचार, उच्चार, समजुती, श्रद्धा आणि उपासना यांचें स्वातंत्र्य, व दर्जा आणि संधि यांची समानता, हीं प्राप्त व्हावी म्हणून, आणि राष्ट्राचें ऐक्य आणि व्यक्तीची प्रतिष्ठा यांसंबंधीं भरंवसा देऊन त्यांच्यामध्यें भ्रातृभाव वाढावा या करितां, आमच्या या घटना-परिषदेंमध्यें सन १९४९च्या नोव्हेंबर महिन्याच्या २६ तारखेस ही घटना मान्य करीत आहोंत व त्यासंबंधीं कायदा करून आपली म्हणून तिचा स्वीकार करीत आहोंत.'

आमचें समग्र जीवन कोणत्या दर्शनाच्या मुशींत ओतलें जावें याचें ही प्रतिज्ञा स्पष्ट दिग्दर्शन करते. लोकशाही ही केवळ एक विशिष्ट राज्यपद्धति किंवा व्यवस्था नसून ती एक जीवनवृत्ति किंवा पद्धति आहे असें जें म्हटलें जातें त्याचें इंगित आतां सहज लक्षांत येईल. जें कागदावर लिहिलें आहे तें जीवनांत उतरून व भिनून जाण्यापूर्वी जीवनांत अनेक आमूलाग्र बदल करावें लागतील. प्रत्येक व्यक्तीत अंतिम मूल्य आहे म्हणजे ती 'साध्य' आहे ही श्रद्धा व तिच्याबद्दल मनांत नितान्त आदर हा लोकशाहीचा पहिला मूलभूत सिद्धान्त आहे. मनुष्य हा नैतिक प्राणी असून सदसत्, चांगलें-वाईट यांमध्यें निवड करण्याचें इच्छास्वातंत्र्य त्याला असून, तसे करण्याची त्याच्यांत शक्ति आहे व म्हणून स्वतःच्या विवेकदीपाच्या प्रकाशांत आत्मविकासाचा मार्ग चालून जाण्याचें स्वातंत्र्य व संधि हीं माणसाला असलीं पाहिजेत, हा लोकशाहीचा दुसरा मूलभूत सिद्धान्त आहे. हें नैतिक स्वातंत्र्य लोकशाहीचा प्राण असून, जेथें तें नाहीं तेथें लोकशाही नांदणें शक्य नाहीं. समूहांत अगर समाजांत प्रत्येक व्यक्तीस या स्वातंत्र्याचा अबाधित लाभ होत राहून तिचें तें स्वातंत्र्य इतरांच्या स्वातंत्र्यास मारक न होतां तारक करावयाचें, तर त्यांचा परस्परांवर विश्वास असला पाहिजे, हें अगदीं उघड आहे. तसेंच आपल्या प्रमाणें इतरांनाहि स्वतःचा विकास करून घेण्याची संधि मिळाली पाहिजे या गोष्टीला मान्यता व तसा प्रयत्न करण्याची तत्परता ही गोष्टहि लोकशाहींत क्रमप्राप्तच असते. सामाजिक जीवनाच्या निरनिराळ्या क्षेत्रांत ज्या वाईट गोष्टी (Evils) व्यक्तीच्या स्वतःचा विकास करून घेण्याच्या मार्गात प्रत्यवाय असतील किंवा बनतील त्या सर्व नष्ट करणें, हें या प्रयत्नांचें स्वरूप राहील. 'स्वतः जगावयाचें व दुसऱ्याला जगूं द्यावयाचें' या तत्त्वाचा अंमल करण्यासाठीं लागणारी सहिष्णुता, दुसऱ्याशीं शक्य तों जुळवून घेण्याकडे सदा कल व स्वतःचे विचार व आचार दुसऱ्यावर

* पूर्वप्रकाशन : *नवभारत*, वर्ष ४, अंक १०, जुलै, १९५१.

अनुक्रमणिका

लादण्याविषयीं 'अरति', हा लोकशाही संस्कृतींत वाढलेल्या माणसाचा स्वभावधर्म असतो.

या लेखाच्या आरंभीं पूर्वीच्या लेखाचा जो शेवटचा भाग उद्धृत केला आहे त्याचें महत्त्व आतां वाचकांच्या सहज लक्षांत येईल. वर्ण, धर्म, जात वगैरे भेदांमुळें आपल्या समाजांत व्यक्तीबद्दल आदर बाळगणें व तिला स्वातंत्र्य व संधीची समानता मिळेल अशी दक्षता घेणें या गुणांचा जवळ जवळ अभावच आहे. अशा स्थितींत सामाजिक जीवनात आमूलाग्र क्रान्ति करण्याचा कळकळीचा प्रयत्न न करता केवळ एक लोकशाही राज्यपद्धतीचा अथवा व्यवस्थेचा सांगाडा देशांत उभा केल्यानें या देशांत खरी लोकशाही नांदू लागेल, ही आशा मृगजळाप्रमाणें भ्रम उत्पन्न करणारी व फसविणारी आहे.

भारताचें एकराष्ट्रीय राज्य बनवावयाचें व त्यांत लोकशाही राज्यपद्धति व संस्कृति यांची वाढ करावयाची असा आम्ही जो प्रतिज्ञापूर्वक निश्चय केला आहे, त्याला आमचा इंग्लंडसारख्या लोकशाही राष्ट्राशी जडलेला दीडदोन शतकांचा संबंध व त्याच्या तत्त्वज्ञानाचा व जीवनदृष्टीचा आमच्यावर परिणाम होऊन गेलें एक शतक आम्ही जीं धार्मिक, सामाजिक व विशेषतः अनत्याचारी अथवा सत्याग्रही राजकीय आंदोलनें केलीं तीं कारणीभूत आहेत. या आंदोलनांत भारतांतील मोठमोठ्या पुरुषांनीं व स्त्रियांनीं भाग घेतला होता व त्यांनीं भारतीयांच्या विचारांत व आचारांत फार मोठी क्रांति घडवून आणलीं हें खरें; पण भारत हें एक खंडतुल्य राष्ट्र आहे एवढेंच नव्हे, तर आमच्या धार्मिक, सामाजिक, सांस्कृतिक, भाषिक व राजकीय विचारांची व आचारांची परंपरा अनेक शतकांची असून तिचे आमच्या स्वभावावर व चारित्र्यावर अति दृढ व दूरपरिणामी संस्कार झालेले आहेत. लोकशाहीचा संसार सुखाचा व शांतीचा होण्यासाठीं धर्म, वंश, संस्कृति, भाषा वगैरे बाबतींत आमच्यांत जो एक किमान एकजिनसीपणा असणें आवश्यक आहे त्याचा विचार केला, तर या दिशेनें आजपर्यंत झालेल्या प्रयत्नांनीं हा प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीनें अद्याप 'श्रीगणेशा' सुद्धां केलेला नाहीं, असें म्हटलें तर तें वस्तुस्थितीला अगदीं सोडून होईल असें मला वाटत नाहीं. इंग्लंडसारख्या देशांत लोकशाही समाज व राज्यपद्धति शतकानुशतकाच्या जीवनांतून उत्क्रान्त झालेली असून इंग्रजांचा जीवनपट तिच्या निरनिराळ्या सूत्रांच्या ताण्याबाण्यांतून विणून तयार झालेला आहे. या स्थितीला पोंचण्याला भारताला लांबचा प्रवास करावा लागेल.

युरोपांत अर्वाचीन लोकशाहीचा जो जन्म व विकास झाला त्याला एक इतिहास आहे. आपल्याप्रमाणें तिकडेहि, म्हणजे ग्रीसमध्यें, प्राचीनकाळीं गणराज्यें अथवा नगरराज्यें (City States) होतीं; पण आपल्याप्रमाणेंच पुढें तीं कालाच्या उदरांत गडप झालीं. तिकडेहि धर्मगुरु (पोप) व राजेमहाराजे आणि सामंत यांची सत्ता स्थापन झाली. युरोपांत मध्ययुगाचा अंत होऊन अर्वाचीन युगाचा उदय झाला तो धार्मिक, बौद्धिक, भौतिक वगैरे जीवनाच्या सर्व क्षेत्रांत व्यक्तीला विचारांचें व आचाराचें संपूर्ण स्वातंत्र्य असलें पाहिजे या क्रांतिकारक वादानेंच झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. युरोपियन लोकांनीं प्रथम आध्यात्मिक व नंतर ऐहिक जीवनांतील धर्मगुरूंची सत्ता झुगारून दिली. पारलौकिक व आध्यात्मिक क्षेत्रांतील आपलें साध्य प्राप्त करून घेण्याचें व्यक्तीचें स्वातंत्र्य व सामर्थ्य एकदां मान्य झाल्यावर ऐहिक व भौतिक जीवनांत तें प्रस्थापित होणें हा केवळ कालाचा प्रश्न होता. ईश्वराचा व आत्म्याचा विचार करण्याचें स्वातंत्र्य व सामर्थ्य ज्या व्यक्तींत आहे त्या व्यक्तीला भूराजे व शरीर यांचा विचार करण्याचें स्वातंत्र्य व सामर्थ्य नाहीं, असें प्रतिपादणें हास्यास्पदच ठरलें असतें. अशा रीतीनें आपला ऐहिक व पारलौकिक उद्धार करून घेण्याला व्यक्ति स्वतंत्र व समर्थ आहे हें तत्त्व युरोपमध्यें सतराव्या शतकांत सर्वसाधारणपणें मान्य होऊन जीवनाच्या सर्व क्षेत्रांत धर्माचें स्वातंत्र्य व समता या तत्त्वांचा अंमल कमीअधिक प्रमाणांत सुरू झाला.

राजकीय अथवा राज्यकारभाराच्या क्षेत्रांतील या तत्त्वाच्या आविष्कारानें तिकडे स्वाभाविकच लोकसत्ताक राज्यपद्धतीचें रूप धारण केलें. लोकसत्ताक राज्यपद्धति म्हणजे लोकमतानुसार चालणारा राज्यकारभार असा आहे. प्राचीन गणराज्यांत किंवा नगरराज्यांत सर्व नागरिकांना एकत्र जमून कोणत्याहि गोष्टीचा निर्णय घेणें सहजसाध्य होतें. अर्थात्, सर्व प्रश्नांवर सर्वांचें एकमत होणें अस्वाभाविक अतएव असंभवनीय असलें, तरी आपल्या मनोदेवतेला कौल लावून कोणत्याहि प्रश्नाचा विचार करण्याला व आपलें मत देण्याला प्रत्येक नागरिक स्वतंत्र होता. त्याच्यावर कोणाचें व कसलेंहि बाह्य बंधन वा दडपण नव्हतें. ती खरी लोकशाही, म्हणजे सर्व लोकांच्या मतानुसार चालणारी राज्यपद्धति होती.

पण अर्वाचीन राष्ट्रें विस्तारानें आणि लोकसंख्येनें प्रचंड असल्यामुळे हल्लींची लोकशाही पूर्वीच्या नगरराज्यांतील लोकशाहीप्रमाणे कशी चालवितां येईल? भारताएवढें महान् लोकशाही राज्य यापूर्वी जगांत कधींच झालें नाहीं. करोडों लोकांनीं एका ठिकाणीं जमून सल्लामसलत करणें अगर दैनंदिन राज्यकारभारांत प्रत्यक्ष भाग घेणें शक्यच नाहीं. तेव्हां लोकमतानुसार राज्यकारभार चालणें हा जो लोकशाहीचा मूलाधार तो कायम

ठेवून रोजच्या कारभारांत हजारों-लाखों लोकांनीं प्रत्यक्ष भाग घेण्याची अडचण दूर करण्यासाठीं प्रतिनिधींच्या द्वारा राज्यकारभार चालविण्याचें तत्त्व (Delegation of Power) अस्तित्वांत आलें. मात्र याचा परिणाम असा झाला कीं, सर्वसाधारण लोक सत्तेचे उगमस्थान राहिलें, पण त्यांचे प्रतिनिधी खरे सत्ताधारी बनले! पुढें या प्रतिनिधींत पक्ष पडले व विशिष्ट तत्त्वाप्रमाणें आणि कार्यक्रमावर पक्षांची संघटना करणें हें लोकशाही राजकीय जीवनाचें मुख्य व महत्त्वाचें अंग बनलें. स्वाभाविकच ज्या पक्षाचें बहुमत त्याच्या हातांत राज्यसूत्रें ही प्रथा रूढ झाली. या सर्वांचा परिणाम असा झाला कीं, लोकांच्या हातांतून प्रतिनिधींच्या हातांत व प्रतिनिधींच्या हातांतून पक्षाच्या हातांत अशा रीतीनें कमी कमी लोकांच्या हातांत सत्तासंक्रमण होत गेलें; पण ही अनर्थपरंपरा येथेंच थांबलेली नाहीं. राज्यकारभाराचें काम जसजसें वाढत व संकीर्ण होत गेलें तसतसें, ज्यांतील सभासदांची संख्या कांहीं दशकांनीं अगर शेंकड्यांनी मोजतां येईल अशा पक्षालाहि लोकशाहीचा रोजचा कारभार चालविणें अव्यवहार्य झालें व तें काम पक्षाच्या कार्यकारी प्रधानमंडळाच्या म्हणजे जनसंख्येच्या प्रमाणांत अगण्य अशा मूठभर लोकांच्या हातांत गेलें!

तथापि, सत्ता काबीज करून राज्यकारभार चालविण्याचें साधन म्हणून आज पक्ष हीच प्रभावी संघटना आहे व सध्यांच्या लोकशाही राज्यपद्धतींत कांहीं क्रांतिकारक बदल होईपर्यंत ती तशीच राहणार, असें धरून चालण्यास हरकत नाहीं. पूर्वी समाजांत धर्मपीठें व धर्मगुरु अथवा राजवंश व राजेमहाराज यांना जें सर्वश्रेष्ठ स्थान होतें (राजा कालस्य कारणम्) तें आज राजकीय पक्ष व त्यांचे नेते यांना प्राप्त झालें आहे. शिवाय जें सरकार कमींत कमी राज्य करतें तें सरकार उत्तम, हें तत्त्व आज मागें पडलें आहे. हुकुमशाही राष्ट्रांतच नव्हे, तर तथाकथित लोकशाही राष्ट्रांतहि आज जवळ जवळ हीच स्थिति पाहावयास मिळते. हुकुमशाही राष्ट्रांत एकच पक्ष सदा सत्ताधारी असतो, तर उलट लोकशाही राष्ट्रांत एकाहून अधिक पक्ष अस्तित्वांत असतात व लोकाराधना करून सत्ता काबीज करण्याचें स्वातंत्र्य त्यांना असतें हें मान्य केलें पाहिजे. एकाहून अधिक पक्ष असणें हें लोकशाहीचें आधारभूत तत्त्व (*sine qua non*) समजलें जातें. तथापि, कधीं कधीं तर 'येन केन प्रकारेण' एकदां सत्ता काबीज केली म्हणजे लोकशाही राष्ट्रांतील सत्ताधारी पक्षहि सध्यांच्या स्थितीत 'हुकुमशहा'च असतो. कारण, कोणत्याहि सुधारलेल्या राष्ट्रांतील आजचें सरकार लोकजीवनाच्या सर्वांगावर सर्वंकष अधिकार गाजवूं शकतें, नव्हें तसा तो त्यानें गाजविणें त्याचें कर्तव्य मानलें जातें.

यावर असा प्रतिवाद केला जाण्याचा संभव आहे कीं, लोकशाही देशांतील सत्ताधारी पक्षाला ठराविक कालानंतर पुनः प्राणदानाची याचना करण्यासाठीं लोकांकडे जावें लागतें व मध्यंतरींच्या कालांत विरोधी पक्षाच्या निर्भीड व कठोर टीकेच्या माऱ्यांत त्याला आपला राज्यशकट हाकावा लागल्यामुळें तो सरळ मार्गावरून चालेल याची दक्षता त्याला घ्यावी लागते. या म्हणण्यांत मुळींच सत्य नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. पण त्याबरोबर हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, एकदां लोकमताच्या जोरावर ठसठशीत बहुमत मिळविलें, तर (सत्ताधारी पक्षाला) घटनेप्रमाणे पुनः मतदारांपुढें जावें लागण्यापूर्वी सत्तात्याग करण्याचा क्वचितच प्रसंग येतो व तो निरंकुशपणें कारभार हांकू शकतो. मनाची लाज व आगामी निवडणुकीच्या वेळीं पराभवाची भीति या दोन गोष्टींचा जो कांहीं लगाम लागेल तेवढाच खरा.

अर्थात् या कालांत स्वतःचें बहुमत कायम टिकविण्याची कुशल करामत सत्ताधारी पक्षाला करावी लागते. अर्वाचीन लोकशाहीचा ज्या पद्धतीनें विकास झाला आहे तिच्यामुळें पक्षनेत्याला हें काम यशस्वी रीतीनें करणें सुलभ झालें आहे. सध्यांच्या पद्धतीत या कामीं पक्षनेत्याला सभासदांची ध्येयनिष्ठा व सार्वजनिकहितबुद्धि जितकी उपयोगी पडते, तितकीच, किंबहुना कांकणभर अधिकच, राज्यांतील अधिकारपदें, मानाचीं स्थानें आणि त्यांपासून मिळणारी संपत्ति व सवलती यांची खैरात करण्याची त्याच्या हातांतील अखेरची सत्ता उपयोगी पडते. या सत्तेच्या जोरावर तो स्वपक्षाच्या सभासदांना शिस्तीच्या गवसणींत चांगलाच बांधून ठेवूं शकतो व आपलें बहुमत टिकवूं शकतो. हल्लींच्या लोकशाहीला पक्षपद्धतीनें इतकें करकचून बांधलेलें आहे कीं, तिच्याबाहेर राहून सत्तेमार्फत लोकसेवा अथवा आत्मसेवा करण्याची सभासदाची शक्ति शून्याइतकीच मोठी आहे! पार्लमेन्टमध्यें प्रवेश मिळवावयाचा तरी सुद्धां कोणत्या ना कोणत्या पक्षाची कांस धरावीच लागते. या सर्व गोष्टींमुळे 'पक्षशिस्त' हा एक सध्यां असा मंत्र बनलेला आहे कीं, त्यामुळें सभासद मुग्ध होऊन जातो! शिस्तभंग करण्याचें धाडस क्वचितच कोणी सभासद करतो. शिस्तपालनाचें पावित्र्य इतकें मानलें जाऊं लागलें आहे कीं, त्याचा भंग करणें हें लोकशाहीच्या दृष्टीनें मोठें पाप समजलें जातें.

लोकहि आज व्यक्तीला मत देत नाहींत, तर पक्षाला देतात. तसेंच सांप्रत मताची मागणी व्यक्ति करीत नाहीं तर पक्ष करतो. तत्त्वतः लोकशाहींत व्यक्तीच्या मूलभूत हक्काला स्थान आहे, गटाच्या अगर जातीच्या हक्काला नाहीं. त्याचप्रमाणें कोणतीहि लोकशाही राज्यघटना व्यक्तीला ओळखते व मान्यता देते, पक्षाला

नाहीं. असें असूनहि सध्यां व्यवहारांत पक्षच वावरतात, व्यक्तीचा जवळजवळ लोपच झाला आहे. लोकशाही व राजकीय पक्ष हे शब्द आज इतके समानार्थी झाले आहेत कीं, लोकशाहीद्वारा लोकांची सेवा करावयाची म्हणजे एक पक्ष काढून सत्ता काबीज करावयाची, अशी लोकांची व लोकनेत्यांची प्रामाणिक व दृढ समजूत झालेली दिसते. या सत्तास्पर्धेच्या झटापटींत व लटपटींत पक्ष व त्याची शिस्त यांनीं व्यक्ति व तिचें स्वातंत्र्य वा सदसद्विवेकबुद्धि यांना ग्रासून टाकलें आहे.

समाजांतील सर्व माणसांची मतें सारखींच असणें अनैसर्गिक म्हणून असंभवनीय आहे; त्याचप्रमाणें ज्यांचीं मतें सारखी त्यांनीं एकत्र येणें हेंहि तितकेंच स्वाभाविक आहे. यामुळेंच सामाजिक, आर्थिक अगर राजकीय मतांच्या एकतेवर अथवा भिन्नतेवर निरनिराळे पक्ष पडतात. आपल्यासारखींच ज्यांचीं मतें आहेत अशा लोकांना पक्षाचें आवाहन असतें व आपलीं मतें ज्या पक्षांत प्रतिबिंबित झालीं आहेत अशा पक्षाचें आकर्षण लोकांना असतें. 'परस्परं भावयन्तः' असा हा व्यवहार आहे. तेव्हां कोणत्याहि राजकीय पक्षाचें आवाहन समाजांतील सर्व लोकांना असत नाहीं व असूंहि शकत नाहीं. याचा स्वाभाविक परिणाम असा झाला आहे कीं, सर्व समाजाचें कल्याण डोळ्यांपुढें ठेवून मतें मागणारा व राज्यकारभार करणारा पक्ष ही गोष्ट लोकशाहींत अशक्य झाली आहे. एवढेंच नव्हे, तर एकाच वधूचें पाणिग्रहण करूं इच्छिणाऱ्या अनेक वरांप्रमाणें या निरनिराळ्या पक्षांत मैत्रीभावाच्या ऐवजीं वैरभाव नांदत असतो. ज्या पक्षाचें आवाहन समाजांतील बहुसंख्यांक मतदारांना आकर्षित करतें तो सत्ताधारक बनतो. प्रत्यक्ष व्यवहारांत ही संख्या शंभरांत ५१ हि असूं शकेल. म्हणजे शेंकडा ४९ लोक सत्ताधाऱ्यांच्या मताचे नाहींत, अशी परिस्थिति संभवनीय आहे. अशा सत्ताधारी पक्षाचे लोक निःस्वार्थी व निरपेक्ष वृत्तीनें काम करीत आहेत असें मानलें, तरीहि ते समाजांतील ज्या बहुसंख्यांक लोकांचे प्रतिनिधी आहेत त्यांच्याच मताप्रमाणें व त्यांच्याच हितासाठीं राबतील, हें अगदीं उघड आहे. याचा सरळ अर्थ असा आहे कीं, सध्यांच्या लोकशाही राज्यपद्धतींत सर्व लोकांच्या हिताच्या दृष्टीनें राज्यकारभार चालण्याचीं शक्यता उरली नाहीं. शिवाय, स्वहित व सर्वहित म्हणजे काय व त्यांच्यातील समन्वय कसा साधावयाचा या गोष्टी समजण्याची सामान्य माणसाची आजची शक्ति लक्षांत घेतली तर, समाजांतील बहुसंख्यांक लोकांची मान्यता मिळालेला कार्यक्रम खरोखर त्यांच्या हिताचा असेलच, असेहि म्हणतां येणार नाहीं.

या सर्व गोष्टींचा परिणाम असा झाला आहे कीं, कुंपणानेंच शेत खावें त्याप्रमाणे लोकशाही चालविण्यासाठीं व वाढविण्यासाठीं ज्या पक्षपद्धतीचा जन्म झाला, तिनेंच 'लोकांनीं स्वतः आपला कारभार चालविणें', 'कारभाराचा हेतु सर्वांचें कल्याण साधणें' व 'प्रत्येकाला स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीप्रमाणें वागण्याचें स्वातंत्र्य व संधि असणें आणि त्याचा त्यानें उपयोग करून घेणें' ही जीं लोकशाहीचीं तीन आधारभूत तत्त्वें त्यांना जवळजवळ हरताळ फासला आहे. जेथें जीवनाच्या सर्व क्षेत्रांत वैयक्तिक स्वातंत्र्य व समता यांचें अनिरुद्ध साम्राज्य चालण्याचीं अनेक शतकांची परंपरा आहे व या परंपरेवरच जेथील राजकीय लोकशाही पोसलेली आहे, अशा पाश्चात्य देशांतच आज ही परिस्थिति निर्माण झालेली आहे, हें लक्षांत ठेवले पाहिजे. भांडवलशाही, पक्षपद्धति वगैरे संस्थांतील दोषांमुळे लोकशाहीला धोका उत्पन्न झाला आहे. ही गोष्ट आतां पाश्चात्त्य विचारवंतांनाहि मान्य झाली असून, त्यावर काय उपाययोजना केली पाहिजे याविषयीं ते गंभीरपणे विचार करूं लागले आहेत. पण या विचारमंथनांतून अद्याप कांहीं खास अमृतौषधी निघालेली दिसत नाही. भांडवलशाही व बहुपक्षपद्धति या संस्था व्यक्तिस्वातंत्र्य व समता यांच्या नांवावर सामान्य माणसाला गुलाम करणाऱ्या आहेत, म्हणून त्या नष्ट करून त्यांच्या जागीं कम्यूनिझम् वा फॅसिझम् आणि एकपक्षपद्धति यांची प्राणप्रतिष्ठा केली पाहिजे, हें राजकीय तत्त्वज्ञान पहिल्या जागतिक युद्धाच्या शेवटी फार झपाट्यानें पुढें आलें. त्यांपैकीं फॅसिझमचा दुसऱ्या जागतिक युद्धांत पुरा बींमोड होऊन आज जगांत कम्यूनिझमचा सर्वत्र बोलबाला सुरू आहे. मात्र प्रत्यक्ष व्यवहारांत व्यक्तीची प्रतिष्ठा व स्वातंत्र्य या दृष्टीनें काय फरक आहे, हें समजणें व सांगणें जरा कठिणच आहे. आमच्या अंतिम समाजरचनेंत सर्व माणसें स्वतंत्र व सारखीं राहतील असा कम्यूनिझमचा दावा आहे हें येथें मान्य केलें पाहिजे. त्याचें म्हणणें एवढेंच कीं, आजपर्यंतच्या अनुभवानें सध्यांची पाश्चात्त्य भांडवलशाहीप्रधान लोकशाही व तिची पक्षपद्धति यांनीं हें कधींच प्राप्त होणें शक्य नाहीं असें सिद्ध झालें असल्यामुळेंच प्रथम त्यांचा नाश करणें अवश्य झालें आहे.

भांडवलशाही व पक्षपद्धति यांनीं लोकशाहीला असे अनेक प्रामाणिक धोके निर्माण केले असले, तरी भारतीयांनीं आपल्या व जगाच्या वर्तमान व भूतकालीन परिस्थितीचा सांगोपांग व दूरवर विचार करून भारतांत लोकशाही राज्यपद्धति व संस्कृति यांची स्थापना करावयाची असा पवित्र निर्णय घेतला आहे व त्याप्रमाणें त्यांनीं कामाला प्रारंभहि केला आहे. मागें म्हटलेंच आहे कीं, मुख्यतः पाश्चात्त्य व विशेषतः आंग्ल राजकीय विचारांनीं व आचारांनीं प्रेरित व प्रभावित होऊनच आम्हीं हा निर्णय घेतला आहे. अर्थात् पाश्चात्त्य लोकशाहीचें अविभाज्य अंग

बनलेल्या पक्षपद्धतीचाहि आम्ही त्याचबरोबर स्वीकार केला असला तर त्यांत कांहींच नवल नाहीं.

येथे हेंहि मान्य करणें जरूर आहे कीं, कोणत्याहि प्रकारची पक्षसंघटना न करतां लोकशाहीचें राज्य चालविणें निदान आजच्या परिस्थितींत तरी कोणत्याहि देशांत व विशेषतः भारतासारख्या प्रचंड खंडतुल्य देशांत अशक्य आहे, असें जर कोणीं प्रतिपादिलें, तर त्याला खोडून काढणें सुलभ नाहीं. कारण या प्रश्नाचा केवळ आदर्शनिष्ठ परंतु अव्यवहार्य तात्त्विक दृष्टीनें विचार करून निर्णय न देतां व्यवहार आणि तात्त्विक दृष्टि या दोघांचाहि समन्वय साधून हा निर्णय आपण दिला पाहिजे असें जे आ. जावडेकर यांनीं आपल्या लेखांत म्हटलें, तें कोणालाहि मान्य होण्यासारखेंच आहे. पण त्याचबरोबर भारतांतील लोकशाही टिकावयाची व वाढावयाची तर या देशांत एकापेक्षां अधिक पक्ष असणें जरूर आहे व म्हणून काँग्रेसला विरोध करणारा तितकाच तुल्यबल व अखिल भारतीय महत्त्वाचा पक्ष निर्माण करणें, हे भारतांतील लोकशाहीनिष्ठ पुढाऱ्यांचें व लोकांचें आज पहिलें कर्तव्य आहे असें मानलें, तरी तेवढ्यानें या देशांतील लोकशाही सुरक्षित व संघटित होईल असें मानणें अति धोक्याचें आहे, असें येथे नमूद केल्याशिवाय राहवत नाहीं. लोकशाही राज्यकारभाराचें पक्षपद्धति हें एक अविभाज्य अंग आहे या गोष्टीवर प्रमाणाबाहेर जोर दिला गेल्यामुळें, लोकशाही चालवावयाची व सुस्थिर करावयाची म्हणजे एक पक्ष काढून सत्तास्पर्धेच्या आखाड्यात उतरावयाचे, असा या देशांत एक सवंग समज पसरलेला दिसतो. निवडणुका जसजशा जवळ येत आहेत तसतसे या देशांत नव्या पक्षांचें पीक वाढत आहे याचें, लोकशाही विषयींचा हा समज किंवा गैरसमज म्हणा, एक मुख्य कारण आहे, असें मला वाटतें. लोकशाहीचीं मूलभूत तत्त्वें बरोबर समजून घेऊन त्याचें स्वतःला व इतरांना शिक्षण देणें या कामाकडे फारसें कोणाचे लक्ष दिसत नाहीं. लोकशाहीच्या पुढील विकासात सध्यांच्या पक्षपद्धतीची कदाचित् जरूरी राहणार नाहीं. पण तिच्या बुडाशीं असलेले हे सिद्धान्त मात्र सनातन आहेत. म्हणून लोकशाहीचें संघटन व संरक्षण या सिद्धान्ताच्या शिक्षणानेंच होऊं शकेल. केवळ अनेक पक्ष काढल्यानें तें होणें शक्य नाहीं. कारण, इंग्लंड व इतर पाश्चात्त्य लोकशाही राष्ट्रांत अनेक राजकीय पक्ष दीर्घकालापासून अस्तित्वांत असूनहि तिच्या मूलभूत सिद्धान्तांकडे दुर्लक्ष झाल्यामुळें, त्यांपैकी कांहीं देशांतील लोकशाही पूर्ण अस्त पावलीं असून, लोकशाहीचें माहेरघर जें इंग्लंड तेथेंहि लोकशाही पुढें किती काळ टिकेल याबद्दल जबरदस्त संशय उत्पन्न होण्यासारखी आज परिस्थिति निर्माण होऊं पाहात आहे.

शिवाय, भारतांत लोकशाही स्थापन करण्याचा आपण जो प्रयोग आरंभिला आहे, तो येथील विशिष्ट परिस्थितीमुळें अतिविकट आहे एवढेंच नव्हें, तर आजची जागतिक परिस्थितीहि लोकशाहीच्या वाढीस व सुरक्षिततेस अत्यंत प्रतिकूल अशी आहे. युरोप खंडांतील अर्वाचीन लोकशाहीच्या जन्मस्थानींच भांडवलशाहीचा पापग्रह होता व त्यानें आज तेथें तिचा बहुतेक उच्छेद करून टाकला आहे. इंग्लंडमधील व अमेरिकेंतील लोकशाहीचें हा पापग्रह तितकेसें वांकडें करूं शकला नसेल तर त्याचें कारण या दोन देशांची परिस्थिति भिन्न असली तरी विशिष्ट प्रकारची आहे हें होय. लोकशाहीची वाढ करण्याला इंग्लंडला जितकी अनुकूल परिस्थिति लाभली तितकी कोणत्याहि दुसऱ्या देशाला पूर्वी लाभली नाहीं व पुढें लाभण्याचा संभव नाहीं. या दोन देशांत लोकशाही वाढूं शकली याचें कारण अमेरिकेची अमाप नैसर्गिक संपत्ति व इंग्लंडची साम्राज्यापासून लुटलेली संपत्ति हें होय. हीं राष्ट्रें या संपत्तीचा जगांतील सर्व राष्ट्रांच्याबरोबर समानतेनें उपभोग घेण्यास तयार होतील तरच तीं स्वतःच्या लोकशाहीचें संरक्षण करण्यास व इतरांस ती स्थापण्यास साहाय्य करूं शकतील. म्हणजेच जगांत लोकशाही स्थापावयाची व टिकवावयाची तर त्याचा मुख्य उपाय आर्थिक समता प्रस्थापित करणें व सामाजिक व सांस्कृतिक विकास करणें हा आहे, एकाहून अधिक पक्ष स्थापणें हा गौण प्रश्न आहे.

आर्थिक समता स्थापन करणें हें कम्यूनिझमचेंहि ध्येय आहे. पण हें ध्येय हिंसेनें अथवा अत्याचारानेंच स्थापन होणें शक्य आहे असें तो मानतो, निदान तसें वागतो. यामुळें तो लोकशाहीला पोषक होण्याऐवजी मारक झाला आहे. तेव्हां लोकशाहीला टिकविण्यासाठीं जी आर्थिक समता स्थापावयाची, ती शांततेच्या मार्गानें स्थापली पाहिजे हें उघड आहे. पण शांततेच्या मार्गानें म्हणजे केवळ सनदशीर मार्गानें आर्थिक समता स्थापन करण्यांत यश येणें तितकेंच असंभवनीय दिसतें. मनुष्य हा बुद्धिप्रधान प्राणी आहे व एकादें मत सत्य असेल आणि तें सत्य असल्याचा पुरावा त्याच्या पुढें मांडला, तर त्याची बुद्धि निःपक्षपातीपणें त्याचा विचार करून आज ना उद्यां त्याचा स्वीकार करील, हें तत्त्व लोकशाही राज्यपद्धतीचा आधार आहे. पण आतांपर्यंतचा या बाबतींतील अनुभव या सिद्धान्ताला पुष्टि देणारा नाहीं. सामान्य माणसाचीच काय पण, तथाकथित श्रेष्ठींची बुद्धीसुद्धा स्वार्थपरायण असते व ती स्वार्थालाच परार्थ समजते असें आढळून आलें आहे. याचा परिणाम असा झाला आहे कीं, सुधारणेच्या म्हणजेच समाजांतील सर्व प्रकारची विषमता नष्ट करण्याच्या मार्गावर लोकशाहीचें पाऊल इतकें मंद पडतें कीं, समाजांतील

जे वर्ग या विषमतेचें भाजन बनले आहेत, त्यांना या गतीनें शांति व समाधान मिळणें, केवळ युक्तिवादानें बुद्धीला सत्य पटवून देणे शक्य आहे अशी श्रद्धा त्यांच्यात राहणें, हें अशक्य झालें आहे. हिंसेच्या जोरावर सत्याची प्रस्थापना करतां येईल, तर ती करण्याला ते अधीर झाले आहेत. पण हिंसेनें लोकशाहीचा लोप होतो. तेव्हां हिंसा न करता बुद्धीला सत्य पटवून देण्याचा सनदशीर मार्गाशिवाय दुसरा कांही मार्ग आहे का? गांधीजी लिहितातः "मी या अंतिम निर्णयावर आलों आहें कीं, तुम्हांला माणसाकडून खरोखर काहीं महत्त्वाची गोष्ट करून घ्यावयाची असेल तर, केवळ त्याच्या बुद्धीचें समाधान करून भागणार नाहीं. त्याच्या हृदयांत प्रवेश केला पाहिजे. तर्काचें व युक्तिवादाचें लक्ष्य बुद्धि आहे, हृदय नव्हे. उलट हृदयाचीं कवाडें त्यागानेंच उघडतात. सत्याग्रहानें माणसाचीं सदद्विवेकबुद्धि जागृत होते, आत्मबलिदान हें माणसाचें मुख्य लक्षण किंवा वैशिष्ट्य आहे, तरवार किंवा हिंसा नाहीं". माणसाची सदद्विवेकबुद्धि जागृत झाली म्हणजे समाजांतील अन्याय दूर करण्यास तो स्वतः होऊन पुढें येतो.

तेव्हां आज लोकशाहीचें रक्षण करून तिला टिकवावयाची, तर सत्ताभिलाष व स्पर्धा यांच्यापेक्षा सत्याग्रही निष्ठा व आत्मबलिदानाची वृत्ति यांची देशाला अधिक जरुरी आहे. सत्तेची अखेरची शक्ति भय व दंड आहे, तर सत्याग्रहाची शक्ति प्रेम व सेवा आहे. माणसाचें हृदयपरिवर्तन होऊन त्यानें आपल्या मनोदेवतेच्या सांगण्याप्रमाणें वागून प्रेमामुळें सोसलेले क्लेश व केलेला त्याग हा तरवारीपेक्षां अधिक प्रभावी शस्त्र आहे. असे असल्यामुळें समाजांतील विषमता व अन्याय शांततेच्या व पारंपरिक सहकार्याच्या मार्गानें नष्ट करून समाजांत स्नेह व शांति प्रस्थापित करण्याच्या कार्यात सत्ताभिलाषी पक्षापेक्षां सत्याग्रही निष्ठेचा सेवकवर्ग शीघ्र यशस्वी होईल. गांधीजी कॉंग्रेसचें ज्या लोकसेवकसंघांत रूपांतर करूं इच्छीत होते तो अशाच सत्याग्रही निष्ठेच्या निःस्वार्थी सेवकांचा बनावा, अशी त्यांची कल्पना होती. ज्यांच्या 'सर्वसमारंभांचा' उगम सत्यावरील निष्ठेंतून व मानवावरील प्रेमांतून झाला आहे व जनसेवा ज्यांनीं आपले जीवनकार्य बनविलें आहे असे हे सेवक असतील. हे सेवक आपल्या शुद्ध सेवेच्या द्वारा प्रजेतील सद्भावना जागृत करून तिची सर्जनशील व विधायक शक्ति शांततेच्या व सहकार्याच्या मार्गानें समाजसुधारणेला लावतील. ते सत्तेचें राजकारण खेळणार नाहींत. अशा सेवकांचा वर्गच जनतेला लोकशाहीच्या मूलभूत सिद्धान्ताचें शिक्षण देऊं शकेल व सत्ताधाऱ्यांना सम्यक मार्गावर राहण्याला मदत करूं शकेल.

गांधीजींच्या प्रेरणेनें कॉंग्रेसनें व इतर लोकांनी निरनिराळीं विधायक कामें करण्यासाठीं अखिल भारतीय स्वरूपाचें अनेक संघ काढले होते. या सर्व संघांनीं एकत्र येऊन वर वर्णिल्याप्रमाणें काम करण्यासाठीं आपला एक संघ तयार करावा अशी गांधीजींची इच्छा होती व आपल्या आयुष्याच्या शेवटीं शेवटीं त्यानीं तसा प्रयत्नहि केला. 'सर्वसेवा संघ' (हा निरनिराळ्या अखिल भारतीय विधायक संस्थांचा मिळून बनलेला) व 'सर्वोदय समाज' या दोन संस्था गांधीजींच्या आदेशाप्रमाणें लोकसेवा व संघटना करण्याचा प्रयत्न करीत आहेत. गांधीजींच्या जीवननिष्ठेवर ज्यांची श्रद्धा आहे व जे विधायक कार्याच्याद्वारा लोकसेवा करूं इच्छितात, असे सर्व कार्यकर्ते या दोन संस्थांच्या निशाणाखालीं येतील, तर या संस्था लोकांवर व सरकारवर नैतिक बलानें आपला प्रभाव पाडूं शकतील. असें घडेल तरच या देशाला लोकशाहीची चढण चढून जाण्याचें अवघड काम सफल रीतीनें करतां येईल; इतकेंच नव्हे तर आज लोकशाहीला सर्वत्र जें ग्रहण लागले आहे तें सुटून ती आपल्या प्रकाशांत सर्वसाधारण जनतेला स्वयंस्फूर्तीनें व शक्तीनें स्वोद्धाराचा मार्ग चालून जाण्याला मदत करूं शकेल. कार्यारंभ करण्याची शक्ति हीच व्यक्तिमत्त्वाची गुरूकिल्ली असून, तीच लोकशाहीचा खरा आधार आहे.

इंग्लंड वगैरे पाश्चात्त्य देशांत अर्वाचीन लोकशाहीचा ज्या रीतीनें विकास झाला आहे, त्यांत सत्ताधारी पक्षावर नियंत्रण (check) ठेवणारा दुसरा एक सत्ताभिलाषी पक्ष, हें तिचें एक अविभाज्य अंग बनलें असून 'बादशहाचा विरोधी पक्ष' (His Majesty's Opposition) असें त्याला सन्माननीय नामाभिधान प्राप्त झालें आहे. या पक्षाची तिकडे इतकी आवश्यकता मानली जाते की, त्या पक्षाच्या प्रमुखाला सरकारी तिजोरींतून मानधन दिलें जातें. सत्तेमध्यें माणसाला शीलभ्रष्ट करण्याचा नैसर्गिक गुण असल्यामुळें सत्ताधाऱ्याला सन्मार्गावर ठेवण्यासाठी नियंत्रणाची जरूरी आहे ही गोष्ट सहज समजण्यासारखी आहे. तथापि सत्ताभिलाषी हा सत्ताधाऱ्याचें शीलभ्रष्टतेपासून खरोखर रक्षण करूं शकेल, हें तितकेसें मनाला पटत नाहीं. आपण कुकर्म केलें तर त्यावर टीका करणारा अगर तें उजेडांत आणणारा कोणी तरी दुसरा डोळ्यांत तेल घालून बसलेला आहे या भयानें माणसें कुकर्मापासून परावृत्त होतील व सहकार्य करतील असें क्षणभर मानलें, तरी माणसाच्या मनांत सत्कर्माबद्दल खरी प्रीति उत्पन्न करण्याचा हा सर्वोत्कृष्ट मार्ग नव्हे, हें सर्वांना पटण्यासारखें आहे. सत्कर्मासाठीं सत्कर्म अथवा सत्यासाठीं सत्य पाळणारे लोकच या बाबतींत

म्हणून 'बादशहाच्या विरोधी पक्षा'ची भूमिका सत्तानिरपेक्ष, अनासक्त वृत्तीनें लोकसेवा करणारा सत्याग्रही निष्ठेचा सेवकवर्गच योग्य रीतीनें बजावूं शकेल. या दृष्टीनें विचार केला, तर गांधीजींच्या अशा सेवकवर्गाच्या कल्पनेनें अर्वाचीन लोकशाहीच्या विकासांत नवीन भरच घातली आहे असें म्हटलें पाहिजे.

¤ ¤ ¤

## २. लोकशाही आणि सर्वोदय*

भारताच्या व जगाच्या वर्तमान व भूतकालीन परिस्थितीचा सांगोपांग व दूरवर विचार करून या देशांत लोकशाही राज्यपद्धति व संस्कृति यांची स्थापना करावयाची अशी आम्हीं पवित्र प्रतिज्ञा केली आहे. या पवित्र प्रतिज्ञेची प्रेरणा आम्हांला पाश्चात्य व मुख्यतः आंग्ल सामाजिक व राजकीय विचार-आचारांपासून मिळाली आहे. याबद्दल दुमत होण्याचा संभव नाही.

आमच्या इकडे वज्जी, मल्ल इत्यादिकांची गणसत्ताक राज्यें बुद्धाच्या वेळीं अस्तित्वांत होतीं. (स्वतंत्र भारताच्या राज्यघटनेंत प्रजासत्ताक "गणराज्य" असा शब्द योजिलेला आहे.) हें जरी खरें असलें, तरी ज्या अर्वाचीन लोकशाहीच्या संसाराचा मांड आम्ही मांडीत आहोंत तिचें माहेर पाश्चात्य जग असून तिचें उगमस्थान शोधावयाचेंच म्हटलें तर तें प्राचीन ग्रीक नगरराज्यांतच सांपडेल. हीं प्राचीन ग्रीक राज्यें एक शहर व त्याच्या आजूबाजूचा थोडा प्रदेश यांचीं बनलेलीं असल्यामुळें तीं लहान होतीं व नागरिकांनीं स्वतः आपला कारभार पाहणें ही कल्पना त्यांत अभिप्रेत होती. पण अर्वाचीन लोकशाहीचा जन्म मोठमोठ्या देशांत झालेला असून प्रातिनिधिक पद्धतीला बरोबर घेऊनच ती जवळजवळ जन्माला आली आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. मात्र यामुळें "जनतेचें स्वामित्व पण प्रतिनिधींचें प्रभुत्व" अशी अर्वाचीन लोकशाहीची व्याख्या करणें अपरिहार्य होऊं पाहत आहे.

### लोकशाहीची मूळ प्रेरणा ही नैतिक

आधुनिक युरोपांतील लोकशाहीचा उदय व्यक्तिवादी तत्त्वज्ञानांतूनच झालेला आहे. धार्मिक, सामाजिक वगैरे जीवनाच्या सर्व क्षेत्रांत व्यक्तीला विचारांचें व आचारांचें जसें पूर्ण स्वातंत्र्य असलें पाहिजे, तसेंच प्रत्येक व्यक्तीला आपल्या गुणांचा पूर्ण उत्कर्ष करून घेण्यास समान व योग्य संधि आणि साधनसामग्री मिळाली पाहिजे, हे स्वातंत्र्याचे व समतेचे दोन सिद्धांत या व्यक्तिवादाच्या बुडाशीं आहेत. लोकशाहीचीं हीं दोन फुप्फुसें आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. सर्व माणसें सारखीं आहेत आणि एखादें मत सत्य असेल आणि तें सत्य असल्याचा पुरावा माणसापुढें मांडला, तर त्याची बुद्धि निःपक्षपातीपणें त्या मताचा विचार करून आज ना उद्यां त्याचा स्वीकार करील, – हीं तत्त्वें येथें गृहीत धरलेलीं आहेंत. पण समता आणि विवेकबुद्धि या ज्या दोन गोष्टी येथे गृहीत धरल्या आहेत, त्या जगाच्या व्यवहारांत सिद्ध झालेल्या नाहींत. त्या अजून साध्य करावयाच्या आहेत, हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. एकाच मातापित्यांचीं दोन अपत्यें घेतलीं तरीसुद्धां ती सारखीं नसतात. मग दूरच्या दोन माणसांचा प्रश्न कशाला? माणसांचीं शरीर, मन, बुद्धि वगैरे अंगें व त्यांचे गुण घेतले व त्यांची परीक्षा केली, तर त्यांच्यांत हमखास विषमता आढळून येते. तसेंच माणसांची बुद्धि नेहमीं सत्य चटकन् ग्रहण करतेच असाहि अनुभव नाहीं. जगांत सुवर्णानें सत्याला झांकलेलें आहे ("हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम्"). सामान्य माणसाचीच काय, पण तथाकथित श्रेष्ठींची बुद्धिसुद्धां स्वार्थानें व लोभानें लडबडलेली असते. स्वार्थालाच परार्थ समजणे हा सामान्य बुद्धिचा जणुं स्वभावच दिसतो! म्हणून समता व धर्म-अधर्म, कार्य-अकार्य यांच्यांत विवेक करणारी बुद्धि हीं ज्या लोकशाहीचीं साधनें आहेत व साध्येंहि आहेत त्या लोकशाहीची मूळ प्रेरणा खरी नैतिक आहे हें विसरतां कामा नये. संपूर्ण लोकशाहीच्या प्रस्थापनेसाठीं लोकांमध्यें "सर्वांच्या ठिकाणीं स्वतःला पाहणें" ही वृत्ति व सत्यान्वेषिणी व सत्यनिष्ठ बुद्धि असणें जरूर आहे.

ज्या जीवनामुळें लोकांमध्यें ही समता वृत्ति व विवेकबुद्धि जागृत होऊन पोसली जाईल तें जीवनच खऱ्या अर्थानें लोकशाही जीवन म्हणतां येईल. पण ज्या युरोपीय राज्यनीतिशास्त्रज्ञांनीं व

* पूर्वप्रकाशन : *नवभारत*, वर्ष ५, अंक ११-१२ (लोकशाही विशेषांक), ऑगस्ट-सप्टेंबर, १९५२.

अनुक्रमणिका

कार्यधुरंधर मुत्सद्द्यांनीं अर्वाचीन लोकशाहीचें पालनपोषण केलें त्यांचें लोकशाहीच्या या मूलगामी नैतिक अंगाकडे जावें तसें लक्ष गेलेलें नाहीं, असें खेदानें म्हणावें लागतें.

**"शहाण्या स्वार्था" चें लोकशाहीला ग्रहण**

अर्वाचीन लोकशाहीच्या जन्मस्थानीं जे दोन ग्रह होते, त्यांपैकी धार्मिक व सामाजिक क्षेत्रांतील स्वातंत्र्य व समता यांच्यावर आधारलेला व्यक्तिवाद हा एक पुण्यग्रह होता; तर दुसरा आर्थिक क्षेत्रांतील स्वातंत्र्य व समता यांच्यावर आधारलेला व्यक्तिवाद हा पापग्रह होता! आर्थिक क्षेत्रांतील व्यक्तिवादाचें ध्येय वैयक्तिक सांपत्तिक भरभराट हें बनलें. या व्यक्तिवादांतूनच समाजाच्या आर्थिक व्यवहारावर वित्तरक्षण आणि कराराचें पालन यांखेरीज कोणतीहि राजकीय बंधनें नसावींत हें अनियंत्रणाचें तत्त्व पुढें आलें आणि प्रत्येकानें आपापलें सुख संपादन करण्याचा प्रयत्न करीत राहिलें म्हणजे व्यक्ती-व्यक्तींमधें जी अनिर्बंध स्पर्धा निर्माण होते तीमुळें एकंदर समाजाचें हित किंवा "अधिकांत अधिकांचें अधिकांत अधिक सुख" आपोआप साध्य होतें, हें घातक तत्त्व प्रसार पावूं लागलें. याचा परिणाम असा झाला कीं, या व्यक्तिवादास सुखवादाचें व त्यावर आधारलेल्या लोकशाहीला भांडवलशाहीचें स्वरूप प्राप्त झालें. सुखवादाचा परिणाम लोकशाही राष्ट्रांतील लोक स्वार्थपरायण व सुखलोलुप बनण्यांत झाला आणि भांडवलशाहीचा परिणाम साम्राज्यशाहीची तृष्णा वाढण्यांत झाला. जेथें स्वार्थपरायणतेनें व सुखलोलुपतेनें बाजारपेठा काबीज केल्या तेथें नीतीची देवघेव कोण व कशी करणार? तेथें भरभराट झाली तरी ती "शहाणा स्वार्था"चीच होणार! आज युरोपीय व अमेरिकन लोकशाही राष्ट्रांची नीति अथवा धर्म हा "शहाणा स्वार्थ"च बनला आहे. शहाण्या स्वार्थाच्या नांवाखालीं अधर्मच धर्माच्या बुरख्याखालीं उजळ माथ्यानें वावरूं लागला आहे व त्यामुळें लोकशाहीला ग्लानि आणि क्षीणता आली आहे.

धार्मिक व सामाजिक क्षेत्रांतील बुद्धिप्रधान व्यक्तिवादाचा वैयक्तिक स्वार्थ आणि लोभ यांच्याशी कांहीं संबंध नसून आत्मशुद्धि व सत्यशोधन हें त्याचें साध्य आहे. परंतु राहूनें जसें चंद्राला त्याप्रमाणें या दोन व्यक्तिवादांना आर्थिक क्षेत्रांतील तिसऱ्या व्यक्तिवादानें ग्रासून टाकलें आहे. स्पर्धा व सुख यांवर आधारलेल्या तिसऱ्या प्रकारच्या व्यक्तिवादाच्या विषारी वायूने लोकशाहीचीं स्वतंत्रता व समता हीं जीं दोन फुप्फुसें तीं क्षीण करून टाकलीं आहेत. आज याचा परिणाम असा झाला कीं, लोकशाही मृत्युशय्येवर पडलेली असून तिचा विनाशकाल जवळ येऊं लागला आहे.

**यंत्रप्रधान युगांतील केन्द्रीकरण**

लोकशाहीला आणखीही एक गोष्ट विघातक ठरली आहे, तिचाहि विचार करणें अवश्य आहे. अर्वाचीन लोकशाहीला ज्या भांडवलशाहीचें स्वरूप प्राप्त झालें आहे त्या भांडवलशाहीचें यंत्रप्रधान प्रचंड उद्योगधंदे हें अन्न आहे. या भांडवलशाहीनें आपल्या वाढीबरोबर सत्तेचें अधिकाधिक केंद्रीकरण केलें आहे व पक्षनिष्ठ राजकारणाला जन्म देऊन सत्तादानाच्या वा सत्तासंक्रमणाच्या राजकीय युगाला प्रारंभ केला आहे. पण पक्षनिष्ठ व सत्तासंक्रमणाच्या राजकारणाचा परिणाम आधुनिक लोकशाहीला अभावात्मक बनविण्यांत झाला आहे. भांडवलशाहीप्रधान लोकशाहींत खऱ्या लोकसत्तेचा अभावच दिसून येतो. या लोकशाहींत सामान्य नागरिकांचा आत्मविश्वास व स्वावलंबन वाढण्याऐवजीं त्यांची असहायता व परावलंबनच वाढत आहेत. तसेंच लोकशाही पक्षनिष्ठ बनल्यामुळें सर्वांचें सुख अथवा हित हें तिचें ध्येय न राहतां बहुसंख्यांकांचें किंवा अधिकांत अधिकांचें हित अगर सुख हें तिचें ध्येय बनलें आहे. तसेंच सध्यांच्या पक्षनिष्ठ लोकशाहींत व्यक्तीला स्वतःच्या विवेकबुद्धीप्रमाणें वागण्याला क्वचितच वाव राहिला आहे. पक्षनिष्ठेनें व्यक्ति इतकी भारली गेली आहे कीं, तिच्या जीवनांत विवेकाची जागा पक्षशिस्त व आज्ञापालन यांनीं घेतली आहे. या शिस्तीमुळें व्यक्तीच्या जीवनांत सत्यनिष्ठेचा हळूहळू लोप होत जाऊन व्यक्तीचा विकास हा जो लोकशाहीचा मूळ हेतु, तो विफल होऊं पाहत आहे!

लोकशाहीवरील हीं सर्व अरिष्टें असून व्यक्तिविकास हा जो तिचा मूळ हेतु, तो सफल व्हावयाचा तर लोकशाहीची मूळ प्रेरणा नैतिक आहे या कल्पनेचे पुनरुज्जीवन झालें पाहिजे. आणि व्यक्तीची जीवनगंगा नैतिक मूल्यांच्या पवित्र पात्रांतून वाहूं लागली पाहिजे.

धार्मिक व सामाजिक क्षेत्रांतील व्यक्तिवादाचा मूळ हेतु सत्यसंशोधनानें प्रत्येक माणसाला स्वतःची शुद्धि व उन्नति करून घेण्याला स्वातंत्र्य असावें व या बाबतींत सर्व माणसें सारखीं मानलीं जावीं हा आहे. उन्नति किंवा सुख म्हणजे केवळ शारीरिक किंवा भौतिक सुख, पैशाअडक्याचें सुख असा अर्थ मानण्यांत येऊं लागला. म्हणूनच आर्थिक क्षेत्रांतील व्यक्तिवादाला स्पर्धेचें स्वरूप प्राप्त झालें व स्वतःच्या किंवा पुष्कळांच्या सुखासाठीं अगर उन्नतीसाठीं इतर थोड्यांचें नुकसान करणें वा त्यांना दुःख देणे समर्थनीय ठरलें. असें झाल्यामुळेंच लोकशाही म्हणजे लोकांचें राज्य असें नांव राहिलें, पण प्रत्यक्षांत लोकांपैकीं किंवा समाजापैकीं कांहीं लोकांच्या सुखांसाठीं अगर हितासाठीं लोकशाहीला राबविण्यांत येऊ लागलें. सध्यांची राजकीय पक्षपद्धति लोकशाहीचा सर्वांसाठीं

उपयोग न करतां तिला कांहीं थोड्यांच्यासाठीं राबविण्याचें मुख्य साधन बनलें आहे.

समाजांतील व्यक्ती केवळ स्वसुखपरायणच असतात अथवा असणें शक्य आहे, स्वसुख म्हणजे पैशाच्या मानदंडानें मोजतां येण्यासारखें आर्थिक वा भौतिक सुख आणि तें प्राप्त करून घेणें हीच मनुष्याची नैसर्गिक प्रवृत्ति आहे – या दोन सिद्धान्तांवर आधुनिक लोकशाहीची उभारणी झालेली आहे. पण हे दोन्हीहि सिद्धान्त फक्त काहीं अंशीच खरे आहेत. कारण मनुष्य म्हणजे केवळ शरीर नव्हे. शरीराप्रमाणें माणसाला मन, बुद्धि व आत्मा ही आहेत. म्हणून माणसाचें सुख किंवा उन्नति म्हणजे केवळ शारीरिक सुख किंवा भौतिक संपत्तीची प्राप्ति नव्हे, तर बौद्धिक व आत्मिक सुखाची व उन्नतीची प्राप्ति होय.

### राजकीय पक्ष ही आपत्ति

सद्‌गुणांचें संवर्धन करून व्यक्तीला सत्यसंशोधनानें आत्मोन्नति करून घेतां येईल अशी परिस्थिती निर्माण करणें व त्याला तशी संधि देणे हेंच कोणत्याही राज्यपद्धतीचें मुख्य ध्येय असलें पाहिजे. याच अर्थानें लोकशाही राज्यपद्धति सर्व राज्यपद्धतींत श्रेष्ठ मानली गेली आहे. कारण, या राज्यपद्धतींत स्वतःसाठीं अशी परिस्थिति निर्माण करण्याचें नागरिकांना जितकें स्वातंत्र्य व सत्ता असते तितकी दुसऱ्या कोणत्याहि राज्यपद्धतींत नसते असें गृहीत धरलें आहे व अनुभवानें तें सिद्धहि झालें आहे. असें असल्यामुळें लोकशाहीचा कारभार अशा रीतीनें चालला पाहिजे कीं, त्यांत आत्मक्लेशानें परस्परांची सदसद्विवेकबुद्धि जागृत करून सद्‌भावजन्य व्यवहारानें एकमेकांची आत्मशक्ति जागृत करण्याला नागरिकांना ज्यास्तींत जास्त उत्तेजन व संधि मिळाली पाहिजे. स्पर्धेवर आधारलेलें पक्षनिष्ठ राजकारण या गोष्टींना प्रतिकूल आहे हें सांगावयास नकोच.

सद्यस्थितींत राजकीय पक्ष-पद्धति एक आवश्यक आपत्ति (necessary evil) मानली तरी "सर्व नागरिकांचा स्वातंत्र्य व समतेचा परस्परव्यवहार" हें लोकशाहीचें साध्य शीघ्र सिद्ध व्हावयाचें तर लोकांत सत्यनिष्ठा व प्रेमवृत्ति अधिकाधिक वाणत गेलीं पाहिजेत हें विसरतां कामा नये. हें कार्य राजकीय पक्षांपेक्षां सर्वोदयी जीवनदृष्टीचा व जीवनपद्धतीचा ज्यांनीं स्वीकार केला आहे असे सत्याग्रही निष्ठेचे निःस्वार्थी सेवक सत्तानिरपेक्ष जनसेवेनेंच अधिक करूं शकतील. अशा सेवकांचा वर्ग जसजसा वाढत जाईल त्या मानानें राजकीय पक्षांचें प्रयोजनच (raison d'etre) असमर्थनीय ठरेल व एक काळ असा येईल कीं, त्या वेळीं ते अंतर्धान पावतील.

राजकीय पक्षाच्या लोपाबरोबर बहुसंख्यांकांच्यासाठीं लोकशाहीला राबवून घेण्याची अनिष्ट प्रथाहि नाश पावून खऱ्या लोकशाहीला खरोखर अभिप्रेत अशा "सर्वकल्याणकारी" समाजकारणाच्या व राजकारणाच्या शुभ युगाला प्रारंभ होईल.

⁂ ⁂ ⁂

## ३. भू-दान आणि समाजक्रांतीचें अहिंसक तंत्र*

'नवभारता'च्या फेब्रुवारीच्या 'भूदान-विशेषांका'त प्रा. ना.अ. मावळंकर व प्रा. मा.दि. कानेटकर यांचा 'भूदान-आंदोलन : तत्त्वज्ञान, ध्येय व कार्य-पद्धति' हा लेख, तसेंच त्या लेखावरील चर्चाहि प्रसिद्ध झाली आहे. त्या चर्चेत मूळ लेखातील महत्त्वाच्या मुद्यांविषयीं बरेंच स्पष्टीकरण झालें आहे. प्राध्यापकद्वयांनीं आपल्या लेखांत भूदानाविषयीं ज्या शंका उपस्थित केल्या आहेत व जे आक्षेप घेतले आहेत त्याविषयीं माझे विचार मी येथें थोडक्यांत मांडण्याचा प्रयत्न करीत आहे.

### मार्क्सवाद आणि कर्मस्वातंत्र्य

प्राध्यापकद्वयांच्या लेखनाची तात्त्विक बैठक मार्क्सवादाची आहे असें प्राध्यापक पारीख यांच्याप्रमाणेंच माझेंहि मत झालें आहे. या लेखांत मधूनमधून जी विचारसरणी प्रगट झालेली आहे ती पाहिली आणि विशेषतः लेखाचा शेवटचा परिच्छेद वाचला तर कोणाहि वाचकाचा सर्वसाधारणपणें असाच ग्रह होईल असें मला वाटतें. या लेखाची तात्त्विक बैठक मार्क्सवादी आहे असें आपण कां म्हणतों त्याचें मुख्य कारणहि पारीख यांनीं

* पूर्वप्रकाशन : *नवभारत*, वर्ष ८, अंक ७, एप्रिल १९५५.

लागलीच दिलें आहे. स्वतःमध्यें व समाजामध्यें परिवर्तन घडवून आणण्याचें स्वातंत्र्य व्यक्तीला आहे किंवा नाहीं? – या प्रश्नाला मार्क्सवादाकडून 'होय' असें रोखठोक व ठसठशीत उत्तर मिळत नाहीं. प्रा. पारीख लिहितात : "तात्पर्य, सामाजिक परिस्थितीमुळें समाजरचना बदलत नाहीं; ती बदलण्यासाठीं 'भोंवतालच्या समाजव्यवस्थेंतून निर्माण होणाऱ्या मूल्यांचा' त्याग करावयास सिद्ध झालेलीं माणसें निर्माण व्हावीं लागतात, तीच समाजव्यवस्थेंत बदल घडवून आणण्याचे प्रयत्न हातीं घेतात आणि उरलेल्या माणसांनाहि अधिकाधिक संख्येनें बदलूं शकतात, असाच निष्कर्ष वरील विवेचनावरून निघतो. क्रांति माणसेंच घडवून आणतात. त्यांच्या इच्छाशक्तीचाच तो परिपाक असल्यामुळें ती एक आत्मनिष्ठ (subjective) घटना आहे असेंहि म्हणतां येतें. त्यासाठीं भोंवतालच्या परिस्थितींतून प्राप्त होणाऱ्या मूल्यांपासून मुक्त झालेलीं किंवा त्या मूल्यांचा त्याग केलेलीं माणसें निर्माण होणें शक्य आहे हें मार्क्सवादाला देखील मान्य करावे लागतें. भूदानआंदोलन देखील याच विचारावर आधारलेलें आहे असें म्हणावें लागेल. किंबहुना सगळींच सामाजिक परिवर्तन घडवून आणूं पाहणारी आंदोलनें याच विचाराच्या आधारावर उभीं राहूं शकतात. खरा प्रश्न याच्यापुढें आहे आणि त्यांत मार्क्सवादाचा एकांगीपणा प्रगट होतो. समाजरचना बदलावयास उद्युक्त झालेल्या माणसांनीं एका विशिष्ट प्रकारेंच प्रयत्न केले पाहिजेत असा त्यांत आग्रह आहे. हा प्रकार सर्वांच्या आतां परिचयाचा असल्यामुळें त्याविषयीं अधिक स्पष्टीकरणाची जरूरी नाहीं. या आग्रहामुळें मानवी इच्छाशक्तीचें सर्जनाचें कर्तृत्व मान्य करीत असतांनाच तिला पुनः बंधनांत टाकण्याचें कार्य मार्क्सवादानें केले आहे". पारीख यांच्या या मुद्याला प्राध्यापकद्वयांनीं चर्चेतील आपल्या लेखांत उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. समाजांत जें कांहीं घडतें तें सर्व माणसेंच करतात ही गोष्ट इतकी उघड आहे कीं, तिचा विशेषत्वानें उल्लेख करण्याची आवश्यकता आम्हांला वाटली नाहीं असें म्हणून जणूं व्यक्तीचें कर्मस्वातंत्र्य आम्हाला मान्यच आहे असा भास प्राध्यापकद्वयांनीं उत्पन्न केला आहे. पण तेथील सर्व विवेचन सूक्ष्म रीतीनें वाचलें म्हणजे सर्वोदयवाद्यांना ज्या अर्थानें व्यक्तीचें 'कर्मस्वातंत्र्य' मान्य आहे त्या अर्थानें प्राध्यापकद्वयांना ते मान्य नाहीं हें सहज लक्षांत येतें "मार्क्सवाद म्हणजे दुसरेंतिसरें कांहीं नसून सामाजिक बदलांचा अभ्यास करून त्यांच्या साहाय्यानेंच सामाजिक परिवर्तनाचे नियम शोधून काढण्याचें शास्त्र आहे" असें प्राध्यापकद्वय म्हणतात. पण खरा प्रश्न असा आहे कीं, मार्क्सच्या या शास्त्रांत माणसामध्यें वा समाजामध्यें जें परिवर्तन होतें त्याचें कर्तृत्व मुख्यतः बाह्य परिस्थितीला आहे की व्यक्तीला आहे? – कारण ते म्हणतात : "मनुष्य व परिस्थिति ह्या अलग नसून एकमेकांशीं संलग्न आहेत. व्यक्तीव्यक्तींमधील व व्यक्ति-समूहामधील जीवनाच्या निरनिराळ्या क्षेत्रांमधील रूढ संबंधांचें जाळें म्हणजे समाज. तसेंच समाज हा कांहीं माझ्या खाजगी इच्छेचा व जाणीवेचा प्रश्न नाहीं. (Society is not a mere expression of private will and consciousness.) त्याचप्रमाणें सामाजिक क्रान्ति व्यक्तींच्या नुसत्या इच्छेवर अवलंबून नाहीं. व्यक्तीच्या मनामध्यें उत्पन्न होणारे सर्वच विचार तिच्या सामाजिक आचरणावर परिणाम करूं शकत नाहींत. जे विचार प्रचलित समाजरचनेनें निर्माण केलेले प्रश्न सोडविण्यास समर्थ असतात तेच प्रभावी लोकमत बनवितात व लोकांच्या आचरणांत उतरतात". पण हें सर्व मान्य केलें तरी एक महत्त्वाचा प्रश्न शिल्लक रहातोच. व्यक्तीच्या मनांमध्यें उत्पन्न होणाऱ्या सर्व विचारांचा उगम बाह्य परिस्थितींतच असतो कीं त्यांपैकीं कांहींचा उगम त्याच्या अन्तःकरणकुहरांत वास करणाऱ्या चित्शक्तींत – ज्याला प्राध्यापकद्वय 'आंतला आवाज', 'साक्षात्कार' असें म्हणतात – त्यांत असतो? आणि अज्ञात शास्त्रापलीकडील हीं सत्येंच परिणामीं सामाजिक व्यवहारांतून निर्माण झालेल्या कूट प्रश्नांचा उकल करण्याला समर्थ ठरतील का? या प्रश्नांना तत्त्वतः 'होय' असें सर्वोदयवादाचें उत्तर आहे, तर मार्क्सवादाचें 'नाहीं' असें आहे हें मला नम्रपणें येथें म्हणावयाचें आहे. प्राध्यापकद्वयांच्या मूळ लेखाच्या अंतिम परिच्छेदांत ही गोष्ट स्पष्ट होते. तो परिच्छेद असा : "लेखांत प्रारंभीच्या भागांत सांगितल्याप्रमाणें सत्याग्रहादि साधनांनीं कोणत्याहि नवसमाजनिर्मितीची शक्यता आम्हांस दूरापास्त वाटते. मानवांत बदल घडविणें याचा अर्थ त्याचीं प्रचलित मूल्यें व निष्ठा नष्ट करून त्या ठिकाणीं नवीन मूल्यांचें अधिष्ठान बसविणें असा आहे. तथापि, सामान्य मनुष्य हा समाजाचा एक घटक असून व असल्यामुळें त्याचीं मूल्ये व निष्ठा भोंवतालच्या समाजव्यवस्थेंतूनच निर्माण झालेल्या असतात. कोणत्याहि समाजव्यवस्थेचें स्वरूप हें परिणामीं त्यांतील अर्थव्यवस्थेवर अवलंबून असल्यामुळें मानवांत बदल घडविणें याचा खरा अर्थ पर्यायानें समाजरचना (social structure) च बदलणें असा आहे. एरवीं सत्याग्रहादि साधनांनीं झालेला बदल हा केवळ तात्कालिक आणि गौण (incidental), वरवरचा ठरेल, मौलिक रचनेमध्यें (structural) नव्हे". समाजाच्या अर्थव्यवस्थेंत होणाऱ्या बदलांवरच त्याच्या बाकीच्या अंगांतील बदल अवलंबून असतात हा सामाजिक परिवर्तनाचा मुख्य नियम होय असें मार्क्सचें मत आहे, अशी सार्वत्रिक समजूत आहे; आणि वरील उताऱ्यावरून प्राध्यापकद्वयांनाहि मार्क्सचें हें

मत मान्य आहे ही गोष्ट उघड आहे. असें असल्यामुळें मार्क्सच्या नांवाचा उल्लेख करून प्रा. पारीख यांनीं आमची परिस्थिति बिकट केली आहे अशी तक्रार प्राध्यापकद्वयांनीं कां करावी तें समजत नाहीं. पण प्राध्यापकद्वयांचा लेख कोणत्याहि तात्त्विक भूमिकेवरून लिहिलेला असला तरी त्यांत जर सत्य असेल तर तें त्यामुळें अग्राह्य होतें असें थोडेंच आहे? म्हणून त्यांनीं भूदानाविषयीं ज्या शंका किंवा आक्षेप घेतले आहेत त्यांत किती सत्यांश आहे हें पहाणेंच उपयुक्त ठरेल.

**विचाराचें आकर्षण व आचाराची धडपड**

भूदान-यज्ञवाले सर्वसाधारण माणसाकडून ज्या कृतीची वा कार्याची अपेक्षा करतात तें त्याच्याकडून होणें दूरापास्त असल्यामुळें भूदानयज्ञाचा हेतु सफल होणें शक्यच नाहीं, व तो तसा झाला नाहीं तर माणसाला तो दांभिक आहे अथवा त्याची निष्ठा बाजारी आहे असें म्हणून नांवें ठेवणें वा दोष लावणें कितपत योग्य होईल असा प्राध्यापकद्वयांचा पहिला सवाल आहे.

माणसाच्या विचारांत व आचारांत महदंतर असणें ही त्याच्या जीवनांतील जशी एक मोठी दुखाःन्तिका आहे तशी ती एक महान् सुखान्तिकाहि पण आहे हें विसरून चालणार नाहीं. विचारानेंच माणसाला पशूहून निराळें केले आहे. इतकेंच नव्हें तर माणसाच्या मनाला नेहमींच महान् विचारांची लोहचुंबकी ओढ वा आकर्षण राहिलेलें आहे आणि तसें आहे म्हणूनच मानवी जीवन आत्मविजयाचें समर, पुरुषार्थाची प्रयोगशाळा अथवा ज्यांतून पुरुषोत्तमाचा जन्म होतो अशी यज्ञवेदी ठरली आहे. सत्य, अहिंसा, न्याय, समता यासारखीं उदात्त नीतितत्त्वें सर्वांना मान्य आहेत व या उच्च नैतिक मूल्यांची पाठपूजा सर्वत्र होत असूनहि व्यवहारांत मात्र खोटेपणा व स्वार्थ, हिंसा व अन्याय यांसारख्या गोष्टीच हरघडी दृष्टीस पडतात हें खरें. परंतु त्याचबरोबर या उच्च मूल्यांची समाजांत प्रस्थापना करण्याची धडपडहि सतत सुरू असून सत्याची व न्यायाची प्रस्थापना करण्यासाठीं आत्मसमर्पण करणाऱ्या महात्म्यांची परंपरा या सृष्टींत अखंड सुरू आहे इकडेहि दुर्लक्ष करतां कामा नये. या जगाची धारणा अशा सज्जन लोकांच्या तपस्वी जीवनानेंच झालेली आहे. 'सन्तो भूमिं तपसा धारयन्ति'.

पण असे सज्जन सोडले व सामान्य माणसांचाच जीवनपट पाहिला तरी या सामान्य माणसांना अशा सज्जनांचीच संगति अधिक आवडते व ते या सज्जनांचेच जीवन श्रेष्ठ व आदर्श जीवन मानतात यांत तिळमात्र संशय नाहीं. असें आहे तर जगांत इतकी दुर्जनता व दुष्टता कां? याचें उत्तर मनुष्य दांभिक आहे हें खास नव्हे व भूदानवाले तसा त्याच्यावर आरोप करतात असें जें प्राध्यापकद्वय म्हणतात त्याला कांहीं आधार आहे असें मला वाटत नाहीं.

'कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।
इंद्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ।।'

असें गीतेंत म्हटलें आहे. पण असा मिथ्याचार अल्प अथवा कांहीं काळ साधकाच्या बाबतींतहि अपरिहार्य असतो हें लक्षांत ठेवलें पहिजे. मात्र स्वार्थानें प्रेरित होऊन बुद्धिपुरस्सर असा मिथ्याचार करीत रहाणें हें दांभिकच होय. सामान्य माणसांच्या विचारांत व आचारांत जो विरोध दिसतो त्याचें कारण त्यांच्यामध्यें हें दांभिकत्व असतें हें नसून माणसाच्या पूर्ववासना व भावना त्याच्या विचाराशीं विसंगत असतात हें होय. या पूर्व-वासनांमुळेंच तो विचाराप्रमाणें आचार करूं शकत नाहीं.

'माझें मज कळो येती अवगुण,
काय करूं मन अनावर ।
वाचा वदे परी करणें कठीण,
इंद्रियाधीन झालों देवा ।।'

हा जो तुकाराममहाराजांचा अनुभव तो आपल्या सर्वांचाच आहे. विचार व आचार यांमधील विसंगति माणसाला अभ्यासानें व वैराग्यानें घालवावी लागते ('अभ्यासे न तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ।') व हा प्रयत्नच माणसाच्या जीवनाला नैतिक बनवितो. उच्चतर हेतूनें प्रेरित होऊन म्हणजेच श्रेयासाठीं केलेलें वैराग्यशील वर्तनच नैतिक वर्तन होय. प्राध्यापकद्वयांच्या कल्पनेंतील जीवनशास्त्रांतहि सर्वसामान्य माणसाच्या दृष्टीनें कर्माकर्मविवेकाची किंवा नैतिक वृत्तीची कसोटी (criterion of action), म्हणजेच त्याग, सहकार यांसारख्या उच्च तत्त्वांचा अंमल म्हणून कांहीं वस्तु आहेच असें मी समजतों. एका विशिष्ट समाजपरिस्थितींत सामान्य माणूसहि भूमिदान, संपत्तिदान, साधनदान करील अथवा त्यानें करावें असें प्राध्यापकद्वयसुद्धां म्हणतात. मात्र ज्या सामाजिक परिस्थितींत सामान्य माणसाला या गोष्टी शक्य आहेत असें प्राध्यापकद्वय म्हणतात, ती समाजपरिस्थिति सामान्य माणसानें आपल्या त्यागानें, दानानें व सहकारानें निर्माण करावी असें सर्वोदयवाद्यांनीं म्हटलें तर मात्र प्राध्यापकद्वय हें त्यांचें म्हणणें ऐकांतिक आहे अशीं नांवें त्यांना ठेवतात. याचें कारण प्राध्यापकद्वयांना साध्यसाधनांतील विवेक अथवा संगती तितकीशी मान्य नसावी. मात्र आपल्या वैचारिक भूमिकेंतील ऐकान्तिकपणाचा दोष भूदानवाले मान्य करीत नसले तरी ते सामान्य माणसाची निष्ठाच दांभिक आहे असें म्हणून त्याची निन्दा करतात हें म्हणणें सत्य नाहीं हें वर एकदां सांगितलेंच आहे. सत्याग्रही हा

दुसऱ्यांतील दोषाचें प्रतिबिम्बच नव्हें तर त्याचें मूळ स्वतःमध्येंच पाहतो हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

"वर्गविहीन समाज व अर्थव्यवस्था, न्याय, समता आणि स्वातंत्र्य यांसारखीं साध्यें व त्याग आणि सहकार यांसारखीं साधनें सर्वमान्य असतांना त्यासंबंधीं आंदोलनाची जरूरी काय? हृदयपालट करण्याची आवश्यकता कोणती?" असा प्रश्न प्राध्यापकद्वय करतात. आंदोलनाची व हृदयपालटाची आवश्यकता यासाठीं कीं माणसाला एखादा विचार पटला कीं, त्याप्रमाणें लागलीच त्याचा आचार होतो अशी माणसाची प्रकृति नाहीं. 'जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः। जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः।' हें वचन प्रसिद्धच आहे. 'भूदान-विशेषांकां'तील 'भूदान-आंदोलन व सत्याग्रहमीमांसा' या आपल्या लेखांत श्री. लक्ष्मणशास्त्री एके ठिकाणीं म्हणतात : "विचारपरिवर्तन व हृदयपरिवर्तन या दोन प्रकारच्या वाक्प्रयोगांत एक महत्त्वाचा भेद दर्शित केलेला आहे. एखाद्या व्यक्तीस अमुक एक विचार मान्य असला तरी त्या व्यक्तीचें वर्तन त्या विचारास धरून घडेलच असें सांगवत नाहीं. त्या व्यक्तीच्या भावनांची व वासनांची बैठक त्या विचाराशीं विसंगत असली तर विचारनुरूप वर्तन घडत नाहीं. हृदयपरिवर्तन या कल्पनेंत भावना व वासना या सर्वांचें परिवर्तन विवक्षित आहे. हृदय-परिवर्तनानें आचरणांत परिवर्तन हमखास होतें. विचारपरिवर्तनापेक्षां हृदयपरिवर्तनास अधिक खोली व व्यापकता आहे. हृदयपरिवर्तन म्हणजे माणसाच्या संपूर्ण अन्तरंगाचें परिवर्तन होय". म्हणून भूमिदान-चळवळींत अभिप्रेत असलेलीं साध्य-साधनें सर्व-संमत आहेत व लोकांकडून त्यांना केव्हांहि विरोध होत नाहीं असें भूदानवाल्यांचें म्हणणें असलें व त्यांचा तसा अनुभवहि असला तरी कोटीच्या मापानें भूमिदान व संपत्तिदान करवून एक नवसमाज निर्माण करणें हें काम सुकर आहे असें भूमिदानवाले केव्हांहि मानीत नाहींत व म्हणूनच त्यांनीं देशव्यापी आंदोलनाचा महान् प्रपंच मांडला आहे.

### कायद्यालाहि हृदयपरिवर्तनाची गरज

खाजगी स्वामित्वापासून होणारे अनर्थ प्राध्यापकद्वयांना मान्य आहेत. पण या अनर्थापासून समाजाचें रक्षण करण्यासाठीं हृदयपालटाची जरूरी काय, असें ते विचारतात. 'लोकशाही पद्धतींत ही गोष्ट कायद्यानें करतां येण्यासारखी असून ती तुम्ही कां करीत नाहीं' हा प्रश्न सर्वत्रच विचारला जातो. बहुसंख्य लोकांना ती पटवून दिली म्हणजे झालें. बुद्धीला पटणें आणि हातून घडणें यांच्यामधील भेद वर सांगितलाच आहे. तो बरोबर असेल तर कायदा घडण्यालाहि एक प्रकारच्या हृदयपरिवर्तनाची जरूरी आहे हें मान्य करावें लागेल. पण बहुसंख्यकांनीं, म्हणजेच परिणामीं दंडशक्तीच्या जोरावर, आपलें मत अल्पसंख्याकांवर लादणें एवढाच लोकशाहीचा अर्थ करणें बरोबर नाहीं. लोकशाहीची मूळ व्याख्या लोकांचें, लोकांसाठीं, लोकांनीं चालवलेलें राज्य अशी आहे. येथें बहुसंख्य व अल्पसंख्य असे लोकांचे दोन वर्ग अथवा तट कल्पिलेले नाहींत. असे वर्ग वा तट कल्पिल्या-मुळेंच हिंसा निर्माण झाली म्हणा किंवा हिंसेमुळें असे दोन तट पडले म्हणा; पण त्याचा परिणाम असा झाला कीं, खरी लोकशाही नाश पावली. खरी लोकशाही अहिंसेनेंच प्रस्थापित होईल. कारण अशा लोकशाहीमध्येंच बहुसंख्य व अल्पसंख्य असे दोन तट उरणार नाहींत. भूदानयज्ञवाले अशी लोकशाही प्रस्थापित करूं इच्छितात. म्हणूनच ते अहिंसेच्या मार्गानें जाऊं इच्छितात.

तसेंच कोणताहि नवीन विचार व्यक्तीला सुचतो तो समूहाला सुचत नाहीं. म्हणून एकानें अनेकांना तो विचार पटवून द्यावयाचा व तो अमलांत आणण्यासाठीं कायदा करण्याला त्यांना तयार करावयाचें म्हटलें तरी एक प्रकारें त्यांचें हृदयपरिवर्तनच करावयाचें. लोकशाहीमध्यें अल्पसंख्याकवर्ग कायद्यानें बहुसंख्यकांना आपल्या मताप्रमाणें वागावयाला भाग पाडूं शकत नाहींत. त्यांना त्यांचें विचारपरिवर्तनच करावें लागतें. व हें विचारपरिवर्तन आचारांत उतरावयाचें तर अहिंसेच्या मार्गानें केलेले हृयपरिवर्तन त्याला फार मदत करतें हा अनुभव आज आपल्याला येत आहे. अर्थात् ज्या व्यक्ती अगर पक्ष अहिंसातत्त्वाला मान्यता देत नाहींत व ज्यांची हृदयपरिवर्तनावर श्रद्धा नाहीं ते अल्पसंख्यकांनीं आपलें मत बहुमतवाल्यांवर हिंसेनें लादावें या मताचा पुरस्कार करतात व तसें ते करतात यांत काहीं नवलहि नाहीं. पण भूदानवाल्यांची हृदयपरिवर्तनावर श्रद्धा आहे म्हणून ते अहिंसेनें काम करूं इच्छितात. मात्र गांधीजींच्या अहिंसेंत असहयोग व सत्याग्रही प्रतिकार यांचा अन्तर्भाव होतो; म्हणूनच त्यांच्या अहिंसेंतून एक सामाजिक क्रांतीचें शास्त्र व तंत्र निर्माण झालें हें लक्षांत ठेवलें पाहिजे. एक बलाढ्य साम्राज्यशाही नष्ट करून भारताला स्वतंत्र करण्याचा यशस्वी प्रयत्न काँग्रेसनें महात्माजींच्या नेतृत्वाखालीं अहिंसात्मक क्रांतीनेंच केला. भारतांत हा जो बदल घडून आला तो केवळ तात्कालिक आणि गौण (incidental) असून त्याला मौलिक बदल (structural) म्हणतां येणार नाहीं असें म्हणणें धाष्ट्यार्चेंच होईल.

महात्मा गांधींनीं भारतामध्यें ज्या संतपरंपरेची गंगा सुरू केली आहे ते संत केवळ 'पहिलें तें हरिकथानिरूपण' एवढेंच कार्य जन्मभर करून त्यांत इति-कर्तव्यता मानणारे नाहींत.








'हरिकथानिरूपणा'वर त्यांची श्रद्धा आहे. पण 'दुसरें तें राजकारण' या बाबतींतहि ते सदा सावध राहतील. मात्र येथें 'दुसरें' या शब्दानें 'हरिकथानिरूपण' व 'राजकारण' हे परस्परांहून भिन्न आहेत वा विरोधी आहेत असें ते समजत नाहींत. इमारतीचा पाया व इमारत अथवा वृक्षाचीं मुळें व वृक्ष यांच्यामध्यें जो संबंध आहे तोच हरिकथानिरूपण व राजकारण यांच्यामध्यें आहे असें ते समजतात. असें असल्यामुळें 'हरिकथानिरूपण' करून फक्त माणसाच्या मनांत कांहीं थोडा बदल घडवून आणणें हें त्यांचें केव्हांहि उद्दिष्ट राहणार नाहीं. हरिकथानिरूपणाच्या पाकांत मुरलेल्या राजकारणानें (spiritualised politics) समाजरचनाच (social sturcture) बदलावी असा त्यांचा मानस आहे. त्याच्या व अहिंसेच्या मार्गानें सामाजिक व आर्थिक क्रांति घडवून आणून समतेच्या पायावर एक सर्वोदय-समाज स्थापन करणें हा भूदानयज्ञाचा हेतु आहे. अर्थात् अहिंसेनें म्हणजेच प्रेमानें व त्यागानें हे कार्य सिद्ध होईल किंवा कसें याबद्दल अद्याप लोकांच्या मनांत शंका आहे. पण ही शंका तसें करून दाखविण्यानेंच दूर होणार आहे. युक्तिवादानें विचारपरिवर्तन घडवून आणण्याला कांहीं मर्यादा आहे. प्रत्यक्ष प्रत्यय हेंच विचारपरिवर्तनाचें अथवा हृदयपरिवर्तनाचें सर्वश्रेष्ठ साधन आहे.

### खाजगी स्वामित्व नष्ट करावयाचें उद्दिष्ट

संपत्ति निर्माण करण्याच्या साधनांवरील खाजगी स्वामित्व भूदानयज्ञ-आंदोलनामुळें नष्ट होण्याऐवजीं तें जास्त दृढमूलच होण्याची भीति आहे असें एक विधान प्राध्यापकद्वयांनी केलें आहे. परंतु 'सबै भूमि गोपालकी' हा भूदानयज्ञाचा मंत्र आहे. जमिनीवरील तसेंच सर्व प्रकारची संपत्ति निर्माण करण्याच्या साधनांवरील खाजगी मालकी नष्ट करावयाची हें भूदानयज्ञाचें लक्ष्य आहे याबद्दल आतां या देशांत कोणाच्या मनांत शंका उरली असेल असें मला वाटत नाहीं. जमीन सर्व देवाची वा समाजाची, व्यवस्था-विश्वस्त गांव, वहिवाट कुटुंबाची व शेती सहकारी असा हा कार्यक्रम आहे. गांवच्या गांव म्हणजे गांवाची सर्व जमीन भूदानयज्ञांत घेतली जात आहे. वैयक्तिक दात्यांकडून जी जमीन दानांत मिळत आहे. त्यावरील त्याचा स्वामित्वाचा हक्क तो स्वखुषीनें सोडीत आहे. प्रा. धनंजयराव गाडगीळांसारख्या विचारवंतांना या आंदोलनामुळें जमिनीच्या मालकी हक्काबद्दल जास्त आसक्ति निर्माण होईल अशी जी भीति वाटत आहे त्याचें कारण सध्या ज्या पद्धतीनें जमिनीचें वांटप होत आहे त्यांत अल्पांशानें आहे. भूदानयज्ञांत जी जमीन मिळेल तिची कसणूक सहकारी पद्धतीनेंच व्हावी असी विनोबाजींची इच्छा होती. पण भारतीय शेतकऱ्याचें सध्यांचें मानस लक्षात घेतां तसें करणें अव्यवहार्य आहे व सहकारी पद्धतीचा आग्रह धरल्यास आंदोलनाचा उद्देशच विफळ होईल अशी खात्री पटल्यामुळेंच मिळालेली जमीन कसण्यासाठीं प्रत्येक कुटुंबाला द्यावी असें ठरविण्यांत आलें. तथापि ही जमीन पुढील शर्तीवरच दिली जाते :

(१) सारी जमीन गांवाची या तत्त्वानुसार भूदानयज्ञांत मिळालेली सर्व जमीन गांवाच्या मालकीची समजली जाते.

(२) जमीन ज्याला दिली त्याला ती विकता येणार नाहीं; पडित किंवा गहाण टाकतां येणार नाहीं; तिच्यावर कर्ज काढतां येणार नाहीं किंवा कसलाहि बोजा करतां येणार नाहीं; किंवा दुसऱ्या कोणाला पोटकूळ म्हणून (sub-lease) भाड्यानें देतां येणार नाहीं.

(३) दिलेली जमीन दोन वर्षेपर्यंत पडित पडलेली आहे किंवा तिचा यथायोग्य वापर केला नाहीं असें म.प्र.भू. समितीच्या मतानें ठरलें तर ती काढून घेण्याचा अधिकार श्री. विनोबा भावे यांच्या तर्फे म.प्र.भू. समितीला राहील. यांपैकीं दुसऱ्या व तिसऱ्या शर्तीचा ज्या राज्य-सरकारांनीं भूमिदानयज्ञ-कायदे केले आहेत त्यांत अन्तर्भाव झाला आहे. पहिल्या शर्तीचे बंधन आज नैतिकच आहे हें कबूल केलें पाहिजे. भूदान-यज्ञमूलक सफल अहिंसक क्रान्तीनें जें लोकमानस बनेल तें जें सरकार निर्माण करील तें सरकारच पहिल्या शर्तीला कायदेशीर स्वरूप देईल हें सुज्ञांना सांगणें न लगे. पण एवढ्यावरून भूदानयज्ञ-आंदोलनानें जमीनदारवर्गाच्या हातामधील अंतिम सत्ता अबाधित राहील, नव्हे जास्तच दृढमूल होईल असें म्हणणें म्हणजे पराचा कावळा करण्यासारखें हास्यास्पदच होय.

कदाचित् प्रा. पारीख म्हणतात त्याप्रमाणें प्राध्यापकद्वयांनीं या प्रश्नाचा ऊहापोह करतांना भांडवलशाही अर्थव्यवस्था व जमीनदारी यांची थोडीशी गल्लत केली आहे असे म्हणणें अधिक उदारपणाचें होईल. जशी 'सबै भूमि गोपालकी' तशीच 'सबं संपत्ति रघुपति कै आही' म्हणजे सर्व संपत्ति समाजाची – अशीच भूदानयज्ञवाल्यांची संपत्तीच्या बाबतींत भूमिका आहे. 'सत्याग्रह करणें' व 'धरणे धरणें' यांमध्यें कोणताहि भेद न करण्याइतकी प्राध्यापकद्वयांची दृष्टि पूर्वग्रहदूषित असावी हें पाहून खेद वाटल्यावांचून राहात नाहीं. भूमिदान म्हणजे ज्या वाम किंवा पापमार्गांनीं जमीन वा संपत्ति मिळविली त्याच मार्गांनीं ती निर्लज्जपणें पुढें मिळविण्याचा मुक्त परवाना होय असें ज्यांना वाटतें त्या प्राध्यापकद्वयांसारख्या मंडळींना भूमिदानाची कार्यपद्धति सदोषच नव्हे तर परिणामीं प्रतिगामी स्वरूपाची वाटली तर त्यांत कांहीं नवल नाहीं. भूमिदान किंवा संपत्तिदान म्हणजे दयेनें

व पारलौकिक धर्मभावनेनें प्रेरित होऊन सदसद्विवेकबुद्धीच्या टोंचणीला बोथट करण्यांचा एक मार्ग म्हणून भूदानवाल्यांनीं त्याचा पुरस्कार केला असता तर प्राध्यापकद्वयांच्या या आरोपाला कांहीं आधार होता. पण जेथें सारी जमीन गांवाची व संपत्ति समाजाची म्हणून ती गांवाला व समाजाला परिणामीं परत केली पाहिजे व हें क्रमानें घडून येईपर्यंत मध्यंतरींच्या काळांत तिचा विश्वस्त म्हणून वापर केला पाहिजे ही भूमिका आहे, तेथें हा आरोप निराधार आहे. गांधीजींच्या 'विश्वस्ता'च्या कल्पनेला व्यावहारिक स्वरूप देण्याचा भूदान-आंदोलनानें प्रयत्न केला जात आहे. जमीनदारांच्या बाबतींत याची प्रक्रिया जितकी स्पष्ट झाली आहे व होत आहे तितकी ती भांडवलदार व कारखानदार यांच्या बाबतींत अद्याप झालेली नाहीं हें प्रांजळपणें कबूल केले पाहिजे. पण 'भूदान विशेषांकां'त श्री. हरिभाऊ मोहनी यांनीं चर्चेतील आपल्या लेखाच्या शेवटीं म्हटल्याप्रमाणें "हें आंदोलन अधिकाधिक कार्यक्षम करणें जनहिताच्यां दृष्टीनें योग्य आहे आणि निःपक्ष भूमिकेवर आर्थिक समानतेच्यां इष्ट हेतूनें हें आंदोलन चालविण्याचें संचालकांच्या मनांत व कृतींत उतरलेलें आहे" असें ज्यांना प्रामाणिकपणें वाटतें त्यांनीं चिकित्सक बुद्धीनेंच पण विधायक वृत्तीनें हें आंदोलन सफळ करण्याला मदत करणेंच अधिक सयुक्तिक व फलदायी होईल.

### चांगल्या उद्दिष्टाचा विपर्यास!

दुसऱ्या अनेक विचारवंतांप्रमाणें प्राध्यापकद्वयांचाहि शेवटचा पण फार महत्त्वाचा आक्षेप भूदानयज्ञाचें उद्दिष्ट व ग्रामोद्योगप्रधान ग्रामराज्याचीं स्थापना, त्यावर आहे आणि तें स्वाभाविकहि आहे. कारण भूदानयज्ञवाले जो नवीन सर्वोदय-समाज स्थापन करूं इच्छितात त्याचा भूदानयज्ञांत मिळालेल्या जमिनीचें वितरण हा पाया आहे, तर ग्रामोद्योगप्रधान ग्रामराज्य ही या पायावरची इमारत आहे. या पायाभरणीबद्दल फारसा कोणाचाच मतभेद नाहीं. समता ही आजच्या युगाचीच मागणी आहे व भूमीचें न्यायोचित समान वांटप हें त्याचेंच एक अंग आहे. भूदानयज्ञ शांततेच्या मार्गानें जमिनीचें वांटप करण्याचा प्रयत्न करीत असल्यामुळें सर्वांकडून त्याचें स्वागत व्हावें व त्याला जनतेचा पाठिंबा मिळावा हें अगदीं स्वाभाविक आहे. भूदानामुळें जमिनीचे फार लहान लहान तुकडे होत आहेत अशी शिकायत कांहीं करीत असले, तरी चीन, जपान यांसारख्या देशांत सामान्यपणें अशीच लहान लहान तुकड्यांची शेती असल्यामुळें या शिकायतींतहि फारसा अर्थ नाहीं असें मानणारे पुष्कळ लोक आहेत. पण पाया ठीक असला तरी वर जी इमारत उठवावयाची त्यासंबंधीं तीव्र मतभेद आहेत. कारण, भूदानयज्ञवाल्यांच्या मताप्रमाणें जर ही इमारत उठली तर यंत्रप्रधान औद्योगिक क्रान्तीमुळें प्राप्त होणाऱ्या समृद्धीला भारत मुकेल व लोकांची रहाणी सुधारण्याऐवजीं ती निकृष्ट होईल व आज लोकांचें दूरवर दळणवळण प्रस्थापित होऊन त्यांच्यांतील अन्योन्यसंबंध जे घनिष्ठ झाले आहेत ते दूरावतील, नव्हें तुटतील; एका वाक्यांत सांगावयाचें म्हणजे भारत मध्ययुगीन तमोमय लोकांत लोटला जाईल अशी या मंडळींना अगदीं मनापासून भीति वाटते. या ग्रामोद्योगप्रधान ग्रामराज्यांत यंत्राचा व शक्तीचा (machine and power) वापर करणें व बाहेरच्या जगाशीं संबंध ठेवणें निषिद्ध समजलें जाईल अशी त्यांची भ्रामक पण प्रामाणिक कल्पना आहे. प्राध्यापकद्वय म्हणतात : "भांडवलशाहीच्या काळांतच औद्योगिक क्रांति फोंफावत जाऊन तिचीं फळें आपण आज चाखीत आहोंत. औद्योगिक क्रांतीमुळेंच देशांतील अर्थव्यवस्थेत एक तऱ्हेचा सुसूत्रीपणा आला, वेगवेगळ्या प्रान्तांचे अन्योन्यसंबंध घनिष्ठ झाले. त्यांमधील दळणवळण वाढलें, आणि यामुळें राष्ट्र समृद्ध झालें, याउलट, ग्रामराज्यांची स्थापना करून त्यांना स्वयंपूर्ण बनविण्याचा प्रयत्न करणें म्हणजे औद्योगिक व एकंदर सर्वच उत्पादनक्षेत्रांत प्रतिक्रांति (counter-revolution) घडवून आणण्यासारखें आहे. ही प्रतिक्रांति यशस्वी करण्यास द्यावी लागणारी सामाजिक किंमत (social cost) केवढी प्रचंड आहे याचा भूमिदान-वाद्यांनीं साकल्यानें विचार केला आहे किंवा नाहीं हें समजत नाहीं. केवळ दळणवळणाचीं साधनेंच घ्या : कॉंक्रीट व मेटलचे रस्ते व सडका, पूल, लोहमार्ग, आगगाड्या, एंजिनें, स्थानकें, गुदामें इत्यादींनीं आज भारतांतील प्रमुख शहरांचें एकमेकांशीं दळणवळण चाललें आहे, व्यापार-उदीम वाढला आहे, बाजारपेठा समृद्ध होण्यास मदत झाली आहे. ग्रामराज्यव्यवस्थेंत हा सर्वच प्रपंच कोसळून पडणार; म्हणजेच यांत आजपर्यंत ओतलेल्या पैशाची किंमत पूज्य होणार! वरील साधनांचा इतरत्र उपयोग होण्याची शक्यताहि कमी आहे. घातलेले लोहमार्ग उखडून काढून त्यांतील लोखंडादि वस्तूंचा इतरत्र उपयोग करण्यासाठीहि केवढी जबर किंमत द्यावी लागेल! रस्ते व सडका यांवरील वहातूक बंद पडली म्हणजे त्यांचा वापर पूज्य होऊन निकामी अडगळीमध्येंच (dead-weight) त्यांची गणना होणार". एखाद्या चांगल्या गोष्टीचाहि कसा विपर्यास केला जाऊं शकतो याचा हा एक उत्तम नमुना आहे.

### वैज्ञानिक यंत्रतंत्रविद्येचा विवेकयुक्त उपयोग

यंत्रप्रधान भांडवलशाही औद्योगिक क्रांतीचीं कांहीं मधुर








फळें आपण चाखीत आहोंत हें नाकबूल करण्यांत जसा अर्थ नाहीं तसेंच आपणाला त्यासाठीं जबर किंमतहि पण द्यावी लागत आहे या गोष्टीकडेहि कानाडोळा करून चालणार नाहीं. माणसानें यंत्र निर्माण केलें खरें; पण भस्मासुराप्रमाणें तें आज माणसाच्या जिवावर उठल्यासारखें झाले आहे. कारण यंत्रविद्येनें जी कल्पनातीत प्रगति केली आहे त्यामुळें आर्थिक व्यवस्थेचें व सत्तेचें कमालीचें केन्द्रीकरण झालें असून आज समाजांत केवळ श्रीमंत व गरीब, शोषक आणि शोषित असे दोन मोठे भेद पडले आहेत. एवढेंच नव्हें तर माणूस आपलें स्वातंत्र्य व व्यक्तित्त्व गमावून बसला आहे. तसेंच मानवी मूल्यांना फार मोठा धोका निर्माण झाला आहे. या केन्द्रीकरणापासून होणाऱ्या अपायांवर इलाज म्हणून साम्यवाद निष्फळ ठरला आहे. रोगापेक्षां औषधच अधिक हानिकारक असा त्याचा अनुभव येत आहे. म्हणून यंत्रविद्येची वाढ म्हणजे मानवाचा विकास असें समीकरण मांडणें चुकीचें असून यंत्रविद्येचा विवेकयुक्त चिकित्सक बुद्धीनेंच उपयोग केला पाहिजे हें मत जोरानें पुढें येत आहे. व्यक्तीचे स्वातंत्र्य व स्वयंकर्तृत्व त्याला लाभावयाचें तर त्यासाठीं 'भूदानयज्ञ-विशेषांकां'तील आपल्या लेखांत श्री. नानासाहेब गोरे म्हणतात त्याप्रमाणें फक्त 'स्वामित्वविषयक संबंध व शासनविषयक कल्पना' वदलून चालणार नाहीं. त्यासाठीं आर्थिक व्यवस्थेचें व सत्तेचें विकेन्द्रीकरण होणें जरूर आहे. यंत्रावर कुणाचें स्वामित्व आहे एवढाच हा प्रश्न नाहीं, यंत्राचें स्वरूप काय आहे हाहि महत्त्वाचा प्रश्न झाला आहे. यंत्र एक माया बनलें आहे. या मायेंतून माणसाची मुक्तता विवेकानें केली पाहिजे. ग्रामोद्योगप्रधान अर्थव्यवस्था म्हणजे विकेंद्रित अर्थव्यवस्था व ग्रामराज्य म्हणजे सत्तेचें विकेन्द्रीकरण होय. या विकेन्द्रित अर्थव्यवस्थेंत यंत्राचा व शक्तीचा (तेल, वाफ, विद्युत् यांचा) विचारपूर्वक उपयोग केला जाईल व या ग्रामराज्यांचा बाहेरच्या जगाशीं अखंड संबंध राहील. कारण, या ग्रामराज्यांचें एक भारतीय संघराज्य बनेल इतकेंच नव्हें तर त्याचा विश्व-समाजाशींहि संबंध असेल. कारण, विज्ञानानें या गोष्टी शक्य कोटींत आणल्या आहेत, नव्हें अपरिहार्यच केल्या आहेत.

ग्रामराज्य म्हटलें कीं, आज भारतांत जी सहा लाख खेडीं आहेत त्यापैकीं प्रत्येक खेडें आहे त्या स्थितींत एक घटक राज्य करणें अव्यवहार्यच होईल. त्यासाठीं ग्राम म्हणजे एक खेडें असें समजण्याऐवजीं ज्यांत फार मोठी वस्ती नाहीं असा ग्रामीण प्रदेश (rural area) एक घटक राज्य समजला पाहिजे. हा प्रदेश कांहीं महत्त्वाच्या बाबतींत स्वयंपूर्ण व स्वयंशासित असावा असें भूदानवाद्यांचें म्हणणें आहे. परावलंबी जीवन व सहकारी जीवन यांमध्यें महत्त्वाचा भेद आहे, हें भूदानवालेहि जाणतात. शारीरिक गरजा भागविण्याच्या बाबतींत मुख्यतः स्वावलंबन आणि मानसिक, बौद्धिक अतएव सांस्कृतिक क्षेत्रांत सहकारी जीवन हें त्यांचें ध्येय आहे.

या विकेंद्रित अर्थव्यवस्थेंत यंत्राचा व शक्तीचा विवेकपूर्ण उपयोग केला जाणार असल्यामुळें या पद्धतींत लोकांची रहाणी गरिबीची वा हलाखीचीच राहिली पाहिजे ही कल्पना कशी चुकीची आहे हें 'विशेषांकां'तील श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांचा 'सर्वोदयाचा आर्थिक कार्यक्रम व भूदान' हा लेख पाहिला म्हणजे सहज लक्षांत येईल. प्रचंड यंत्रांनीं केलेल्या पर्वतप्राय उत्पादनानें सर्वसाधारण लोकांची रहाणी श्रीमंतीची होतेच असा आजपर्यंतचा अनुभव नाहीं. आणि यदाकदाचित् ती तशी झाली तरी माणसाला त्याची जी जबर किंमत द्यावी लागेल ती लक्षांत घेतां,

विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।
परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ।।

असाच या बाबतींत अनुभव येण्याची भीति आहे. त्यापेक्षां गांधीजी म्हणत त्याप्रमाणें असंख्य लोकांनीं विकेंद्रित पद्धतीनें लहान लहान यंत्रांच्या साहाय्यानें केलेलें उत्पादन मानवाच्या सांस्कृतिक मूल्यांचें रक्षण करून त्याची रहाणीहि जरूर तेवढी सुधारूं शकेल असें वाटतें. त्यांत कदाचित् आजची अमेरिकेची रहाणी आम्हाला नेहमींच अप्राप्य राहील. पण ती आदर्श मानावयालाच पाहिजे का? विपन्नावस्थेप्रमाणें विपुलावस्थाहि माणसाचा नैतिक अधःपात करते असा आजपर्यंतच्या सर्व संस्कृतींच्या उत्कर्ष-अपकर्षांचा इतिहास सांगत नाहीं कां? तेव्हां विपन्नावस्थाहि नाहीं व विपुलावस्थाहि नाहीं तर रहाणीच्या बाबतींत सुवर्णमध्यच माणसाला तारील. 'मनुष्य केवळ भाकरीनें जगूं शकत नाहीं' या ख्रिस्ताच्या वाक्यांत माणसाच्या सद्विकासाचें एक मोठें तत्त्व समाविष्ट झालेलें आहे.

विज्ञान व विद्युत् यांच्या साहाय्यानें अशीं यंत्रें व विकेन्द्रीकरण साध्य होण्याची शक्यता आतां निर्माण झाली आहे. माणसाच्या निरनिराळ्या गरजा भागविण्यासाठीं त्याला ज्या वस्तू लागतात त्या सर्व प्रचंड यंत्रावर आधारलेल्या केन्द्रित उद्योगांनींच निर्माण केल्या पाहिजेत असें जो मानतो तोच प्रगमनशील हा विचार भ्रामक आहे हें मान्य करण्याची वेळ आतां आली आहे. केन्द्रित व विकेंद्रित उद्योग, प्रचंड व लहान यंत्रें यांचीं क्षेत्रें निश्चित करावीं लागतील. त्याचबरोबर सत्तेचेंहि विकेंद्रीकरण करावें लागेल. हें सर्व करण्याचा हेतु, माणूस हाच अंतिम मूल्य समजून त्याच्या सर्वांगीण विकासाला पोषक अशी सामाजिक, आर्थिक, राजकीय वगैरे सर्व तऱ्हेची रचना झाली पाहिजे. त्यांत बंधुत्व, समत्व व स्वातंत्र्य या मूल्यांची बाजारपेठ सदा भरलेली राहील असा

अनुक्रमणिका

समाज आम्हाला निर्माण करावयाचा आहे. संध्यांच्या सामाजिक व आर्थिक रचनेच्या बाजारपेठांतून या मूल्यांची जवळजवळ हकालपट्टी झाली आहे. म्हणून भूदानयज्ञ हा नवसमाज-निर्मितीचा एक महान् प्रयोग आहे. या कामीं, आ. जावडेकर चर्चेतील आपल्या लेखांत म्हणतात त्याप्रमाणें, "वैज्ञानिक प्रगति; लोकशाहीचें राजकारण आणि समाजवादी अर्थघटना यांचा नाश न करतां पण त्यांतील दोष नष्ट करून आम्हांस नव्या समाजाची रचना करावयाची आहे. या कामीं वैज्ञानिक संशोधन, नैसर्गिक शक्ति, यंत्रकला आणि सामाजिक, आर्थिक व राजकीय इत्यादि सर्व व्यवहारांत समत्व, बंधुत्व आणि स्वातंत्र्य यांचा अवलंब – या नव्या अधिष्ठानांवरच आमची स्वावलंबी व स्वयंपूर्ण ग्रामराज्यें निर्माण करण्यांत येतील. असें आम्ही करूं तरच आधुनिक भारतांतील जनतेला तीं आकर्षक व स्पृहणीय वाटतील. नाहींतर समाज आमच्या मागून येणारच नाहीं. ग्रामराज्यें आणि ग्रामोद्योग हे शब्द उच्चारल्याबरोबर आम्ही आंधळेपणानें मध्ययुगांत उडी घेणार आहोंत असा आपला गैरसमज करून घेऊं नका".

प्रयोगावस्थेंत यापेक्षां अधिक आश्वासन कोण कोणाला देणार?

※ ※ ※

## ४. सर्वोदयाच्या साधनेची गुप्त सरस्वती*

ऑगस्ट-सप्टेंबर १९५२ च्या 'नवभारता'च्या लोकशाही विशेषांकांत आचार्य शंकरराव जावडेकर यांचा 'आधुनिक भारतीय लोकशाहीचा विकास' हा लेख प्रसिद्ध झाला आहे. श्री. शंकररावांनीं आपल्या लेखाचें प्रयोजन लेखाच्या आरंभींच स्पष्ट केलें आहे. ते लिहितात : "... आधुनिक भारतांत लोकशाहीची स्थापना व्हावी यासंबंधीं आम्ही जे प्रयत्न केले, त्यांचें स्वरूप कोणतें होतें आणि त्या प्रयत्नांतून आज आपल्या राष्ट्रांत जें लोकशाही राज्य निर्माण झालें आहे त्याचें स्वरूप व भवितव्य काय होणार आहे, या दोनच प्रश्नांचा विचार या लेखांत अगदीं थोडक्यांत करावयाचा आहे". यांत पहिला भाग इतिहासकथनाचा म्हणजे भूतकालांत जशा घटना घडल्या तशाच त्या सांगण्याचा आहे, तर दुसरा भाग भविष्यकाळांत कोणत्या घटना घडतील याचा अंदाज करण्याचा आहे. पहिल्या भागांत वस्तुनिष्ठ सत्याची अधिक अपेक्षा असते, तर दुसऱ्यांत आत्मनिष्ठ सत्याला अधिक अवकाश मिळतो. भूतकाळाचा आढावा घेतांना व भविष्यकाळाचा अंदाज करतांना श्री. शंकररावांच्या लेखांत वस्तुनिष्ठ सत्याच्या अपेक्षेचा थोडा भंग झाल्यामुळेंच मी हा लेख लिहिण्यास प्रवृत्त झालों आहे. त्यांत श्री. शंकररावांनीं आपल्या लेखांत जे विचार मांडले आहेत व जीं विधानें केलीं आहेत त्यांना विरोध करावा, ती खोडून काढावींत असा माझा मुळींच हेतु नाहीं हें मी प्रथम स्पष्ट करूं इच्छितों.

**स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वी साध्यसाधनाविषयीं ऐकमत्य**

"आधुनिक भारतांत लोकशाही राजकारणाची मुहूर्तमेढ इ.स. १८८५ सालीं राष्ट्रीय सभेची संस्थापना करून भारतीय नेत्यांनीं मुंबई शहरांत रोविली" असें जे श्री. शंकरराव म्हणतात त्याबद्दल दोन मतें होतील असें वाटत नाहीं. ज्यांनीं काँग्रेसची संस्थापना केली, त्यांनीं आपल्या डोळ्यापुढे ब्रिटिश पार्लमेंटचा आदर्श ठेवला होता आणि ब्रिटिश पार्लमेंट म्हणजे लोकशाहीची जननी. तेव्हां काँग्रेसचें पालनपोषण लोकशाहीच्या अन्नावर झालें असलें तर त्यांत नवल असें कांहींच नाहीं, तसें होणें अगदीं स्वाभाविक होतें. काँग्रेस-संस्थापनेपासून स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंतच्या साठ वर्षांच्या दीर्घ काळांत तीनचार पिढ्यांतील कर्तृत्ववान्, लोकप्रिय अशा काँग्रेसच्या असामान्य नेत्यांनीं आटोकाट प्रयत्न करून तिचें लोकशाही स्वरूप टिकविण्याचा यशस्वी प्रयत्न केला, हें सत्य कोणीहि मान्य करील. ज्या गांधीजींनीं राष्ट्रसभेची वाढ लढाऊ व क्रांतिकारक संस्थेंत केली, त्यांनींसुद्धां तिच्या अन्तर्गत कारभारांत लोकशाही जिवंत ठेविली असें म्हणणें भाग आहे. कारण, परकीय सत्तेशीं लढा देत असतांहि तिच्यांत पोटपक्ष स्थापण्यास अखेरपर्यंत स्वातंत्र्य होतें व काँग्रेसच्या शिस्तीचा आधार केवळ नैतिक शक्ति हाच होता.

पण हे सर्व मान्य करूनहि येथें एक गोष्ट नमूद करणें जरूर आहे. स्वातंत्र्य मिळेपर्यंत राष्ट्रीय सभा परकीय सरकारशीं

---

* पूर्वप्रकाशन : *नवभारत*, वर्ष ६, अंक ३, डिसेंबर, १९५२.

सनदशीर व (अहिंसात्मक) क्रांतिकारक मार्गांनी सत्तेसाठी लढणारी जरी संस्था होती, तरी तिच्यांतील पक्षोपपक्षांत साध्य व साधनांबद्दल जवळजवळ ऐकमत्य असे. जेव्हां काँग्रेसमधील पक्षांत या दोन गोष्टींबद्दल तीव्र मतभेद होत, तेव्हां त्यांतील एक पक्ष काँग्रेसमधून फुटून बाहेर पडे, असें १९०६-७ सालचा बहिष्कारयोगाचा व १९२०-२२ सालचा असहयोगाचा इतिहास दर्शवितो. स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर काँग्रेसमधील निरनिराळ्या पक्षोपपक्षांत साध्य-साधनांमधील, विशेषतः साध्यांमधील एकवाक्यता राहणें असंभवनीय होतें. जेव्हां एखादा पक्ष सत्ताधारी होतो, तेव्हां त्यांत उपपक्ष निर्माण झाले तर तो फार काळ टिकणें शक्य नाहीं, हें लोकशाहीचें अगदीं बाळकडू प्यालेल्या इंग्लंडमधील मजूरपक्षांत आज जें अन्तर्गत वादळ उत्पन्न झालें आहे, त्यावरून सिद्ध होतें.

### समाजवादी पक्षाचा उदय आणि त्याचा काँग्रेसत्याग

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर काँग्रेसनें जर गांधीजींचा सल्ला स्वीकारला असता व स्वातंत्र्यपूर्व काळांतले आपलें जीर्ण शरीर टाकून देऊन नवीन शरीर धारण केले असतें, म्हणजे सत्तेच्या राजकारणाचा त्याग करून केवळ लोकसेवेचें व्रत अंगीकारिलें असतें, तर पंडित नेहरू व जयप्रकाशजी या दोघांनाहि काँग्रेस सोडावी लागली असती. कारण, दोघांनाहि सत्तेचें राजकारण करावयाचें होतें व आहे. म्हणून गांधीजींचा सल्ला व इशारा धुडकावून न लावतां काँग्रेस 'लोकसेवासंघ' बनली असती तर समाजवादी पक्षानें तिचा त्याग केला नसता, असें श्री. शंकररावांना सुचवावयाचें आहे, असा जो वाचकांच्या मनावर परिणाम होतों, तो बरोबर नाहीं. काँग्रेस लोकसेवकसंघ बनल्यावर समाजवादी पक्ष काँग्रेसमधून जर बाहेर पडला नसता, तर सत्तेची इच्छा करणारा दुसरा पक्ष देशांत निर्माण करून भारतांत लोकशाही टिकविण्याचा खरा प्रयत्न श्री. जयप्रकाशजी व समाजवादी पक्ष यांनीं केला आहे असा दावा करण्याला श्री. शंकरराव यांना मुळींच आधार मिळाला नसता. श्री. शंकरराव लिहितात : "या परिस्थितींत राष्ट्रांतील लोकशाही निष्ठा जागृत ठेवून, म. गांधींनीं दाखवून दिलेल्या अनत्याचारी क्रांतितंत्राचा उपयोग करून, आर्थिक लोकशाहीची अथवा समाजवादाची क्रांति करण्याच्या उद्दिष्टानें भारतीय समाजवादाची संस्थापना करणारा पक्ष काँग्रेसचा त्याग करून जनतेच्या पुढें आला", "... भारतीय तरुणांच्या अंतःकरणांतील समाजवादी क्रांतिनिष्ठेला लोकशाहीचें व अनत्याचारी वृत्तीचें वळण लावणारा हा समाजवादी पक्ष भारतांत या वेळीं निर्माण झाला नसता, तर दादाभाई नौरोजी, टिळक, गोखले, गांधी यांनीं निर्माण केलेली लोकशाहीनिष्ठा नष्ट होण्यास फार काळ लागला नसता".

खरा इतिहास असा आहे : १९४२ सालच्या लढ्यांतून बाहेर आल्यानंतर, १९४५ सालीं बदललेली परिस्थिति लक्षांत घेऊन काँग्रेसची नवी घटना बनविण्यासाठी अ.भा.काँ. कमिटीनें पांच सभासदांची एक समिति नेमली, तींत श्री. नरेंद्र देव होते. पण अनेक कारणांमुळें नवीन घटना तयार होऊन ती पास होण्याला जवळजवळ तीन वर्षें लागलीं. अगदीं प्रथम नेमलेली समिति मध्यंतरीं मोठी करण्यांत आली. तींत नरेन्द्र देव होतेच. शिवाय श्री. जयप्रकाशजीहि तींत आले. यानंतर एक दुसरी अगदीं नवीनच समिति नेमण्यांत आली. तींत श्री. नरेन्द्र देव राहिले. या कमिटीनें तयार केलेल्या घटनेवर काँग्रेसनें जयपूरला डिसेंबर १९४८ मध्यें शिक्कामोर्तब केलें. काँग्रेसच्या या नवीन घटनेप्रमाणें तिच्यांत एकापेक्षां अधिक पक्षांना स्थान राहिलें नाहीं. काँग्रेसच्या घटनेंत हा महत्त्वाचा बदल होऊं नये म्हणून समाजवादी पक्षानें शेवटपर्यंत कसून विरोध केला. पण त्यांत यश आलें नाहीं. काँग्रेसमधून समाजवादी पक्ष जो बाहेर पडला, त्याचें त्या वेळीं मुख्य कारण हें असें होतें. श्री. शंकररावांनीं वर म्हटलें आहे, "हा समाजवादी पक्ष भारतांत या वेळीं निर्माण झाला नसता –" 'या वेळीं' म्हणजे केव्हां? १९४८ मध्यें? कारण लेखांतील कालानुक्रमाशीं 'या वेळीं' चा संबंध जोडला, तर समाजवादी पक्ष १९४७-४८ मध्यें निर्माण झाला असें मानावें लागेल; निदान श्री. शंकररावांच्या लिखाणानें वाचकांचा तसा ग्रह होण्याचा फार संभव आहे. पण समाजवादी पक्षाचा जन्म फार अगोदर, काँग्रेसच्या आयुष्यांत हे गुंतागुंतीचे पण महत्त्वाचे प्रश्न उत्पन्न झाले नव्हते किंवा पुढें उत्पन्न होतील असें कोणाच्याहि स्वप्नांत आलें नव्हतें तेव्हां, म्हणजे १९३४ सालीं नाशिकच्या तुरुंगांत झाला.

श्री. शंकररावांच्या मतें समाजवादी पक्षाची स्थापना कोणत्या हेतूंनीं झाली तें वर आलेंच आहे. 'साधने' मधील 'भारतीय समाजवादी तत्त्वज्ञानाचा विकास' या आपल्या लेखांत श्री. एस्.एम्. जोशी लिहितात : "राष्ट्रीय आंदोलनांत भाग घेतलेल्या काहीं तळमळीच्या कार्यकर्त्यांनी नाशिकच्या कारागृहांत फुरसतीच्या आणि शांततेच्या काळांत मार्क्सवादाचा अभ्यास केला. राष्ट्रीय आंदोलनाचें मार्क्सवादी दृष्टिकोनांतून समीक्षण केल्यावर त्यांना असें आढळून आलें की, राष्ट्रीय स्वातंत्र्याचें व सामाजिक परिवर्तनाचें उद्दिष्ट साध्य व्हावयाचें असेल तर आपण मार्क्सवादी दृष्टिकोनाचा अंगीकार केला पाहिजे. या भूमिकेवरूनच १९३४ सालीं काँग्रेस सोशालिस्ट पार्टी स्थापन करण्यांत आली. प्रारंभींच्या काळांत

काँग्रेसच्या व महात्मा गांधींच्या सैद्धान्तिक भूमिकेशीं आपली भूमिका मूलतः विरोधी आहे अशाच समजुतीवर पार्टीचें कार्य चालत असे. म्हणूनच त्या वेळीं महात्माजींच्या रचनात्मक कार्यक्रमाबद्दल पार्टीला आपुलकी वाटली नाहीं; किंबहुना बहुसंख्य सभासदांचा त्याला विरोधच होता. याच्या उलट १९३०-३४ सालीं कम्युनिस्ट पार्टी व सोशालिस्ट पार्टी या दोहोंमध्यें कांहीं प्रश्नांवर मतभेद असला, तरी सामान्यतः दोघांचें उद्दिष्ट आणि कार्यपद्धति एकच आहे अशी सर्वसाधारण भावना होती. परिणामतः सोशालिस्ट पार्टीनें या दोन्ही पक्षांचें एकीकरण घडवून आणण्याचा साहसी प्रयत्न केला".

दांडी-मार्चनें सुरू झालेला स्वातंत्र्याचा लढा थांबवल्यानंतर १९३४ मध्यें मुंबईला काँग्रेसचें अधिवेशन झालें. या अधिवेशनापूर्वी म. गांधींनीं एक महत्त्वाचें निवेदन प्रसिद्ध केलें. "खादी, अहिंसा, अस्पृश्यतानिवारण वगैरेसारख्या अत्यंत मूलभूत प्रश्नांच्या बाबतीत आपण व पुष्कळसे प्रमुख काँग्रेसजन जणूं अगदीं विरुद्ध दिशेनें जाऊं इच्छितों असें मला वाटते" असें या निवेदनांत महात्माजींनीं म्हटलें आहे. याच निवेदनांत समाजवादी पक्षासंबंधीं गांधीजी म्हणतात : "समाजवादी पक्षाच्या स्थापनेचें मी स्वागत केलें आहे. त्यांच्यापैकी पुष्कळसे माझे सन्माननीय सहकारी असून देशासाठी त्यांनीं फार मोठा त्याग केला आहे. हें सर्व मान्य असूनहि हें कबूल केलें पाहिजे कीं, त्यांच्या अधिकृत पुस्तकांतून व पत्रकांतून पक्षाचा म्हणून जो कार्यक्रम प्रसिद्ध झाला आहे, त्याच्याशीं पुष्कळ बाबतींत माझा मूलभूत मतभेद आहे. परंतु त्यांच्यावर नैतिक दडपण आणून त्यांच्या विचारांना दाबून टाकावें अशी माझी इच्छा नाहीं. त्यापैकीं कांहीं विचार मला कितीहि नापसंत असले, तरी त्यांच्या प्रचाराला मीं प्रतिबंध करता कामा नये. त्यांचा काँग्रेसवर प्रभाव पडून काँग्रेसमध्यें जर त्यांचें वर्चस्व झालें – आणि तसें होणें शक्य आहे – तर मला मात्र काँग्रेसमध्ये राहता येणार नाहीं. कारण कोठेंहि सतत नुसता विरोध करणें ही कल्पनाच मी करूं शकत नाहीं. माझ्या दीर्घ सार्वजनिक जीवनांत मी पुष्कळ संस्थांना माझें सर्वस्व अर्पण केलें असलें, तरी ही भूमिका मीं कधीहि घेतली नाहीं".

अर्थात् ही प्रारंभींची अवस्था होती. यांत हळूहळू बदल होत गेला. श्री. एस्.एम्. जोशी आपल्या वरील लेखांत लिहितात : "कम्युनिस्ट सिद्धान्त आणि कार्यपद्धति आपल्यापेक्षां कशी भिन्न आहे याची जाणीव कालांतरानें सोशालिस्ट पार्टीस अनुभवानें होऊं लागली. त्याचप्रमाणें महात्मा गांधींच्या सैद्धांतिक भूमिकेसंबंधीं आणि कार्यपद्धतींबाबत आपला ग्रह कसा चुकीचा आहे हें देखील सोशालिस्टांना कळून आलें. अर्थात्, महात्मा गांधींनीं आपली भूमिका वेळोवेळीं अधिक सुस्पष्ट आणि आपला कार्यक्रम अधिक व्यापक केल्यामुळें ही प्रक्रिया सुलभ होऊं शकली हें खरें". तथापि १९४५ झाली कारागृहवासांतून बाहेर आल्यानंतर स्वातंत्र्याच्या लढ्याचें स्वरूप, घटना-परिषदेशीं सहकार कीं तीव्र बहिष्कार वगैरे महत्त्वाच्या प्रश्नांवर काँग्रेसमधील बहुमतवाल्या पक्षानें गांधीजींच्या नेतृत्वाखालीं जें धोरण स्वीकारलें, त्याच्याशीं समाजवादी पक्षाचा तीव्र मतभेद होता हेंहि लक्षांत ठेवणें जरूर आहे. पाकिस्तानसारख्या अत्यंत जिव्हाळ्याच्या प्रश्नावर तर समाजवादी पक्षानें ऐन वेळीं तटस्थवृत्ति स्वीकारली.

**भारताचे 'भाग्यविधाते'**

आधुनिक भारतांत लोकशाही स्थापण्याचे जे प्रयत्न झाले, त्यांचें स्वरूप व तिचें भवितव्य काय, याचा विचार करतांना श्री. शंकरराव जावडेकर पुढें लिहितात : "आधुनिक भारतांत जें राजकीय स्वातंत्र्य व जी लोकशाही उदय पावलीं आहेत त्यांच्या प्राप्तीचें श्रेय ज्या महान् नेत्यांना देतां येईल अशा आठ विभूती गेल्या साठ-पाउणशें वर्षांत होऊन गेल्या. आधुनिक भारताच्या राजकारणाचे हे आठ भाग्यविधाते आहेत, असेंहि म्हणतां येईल". श्री. दादाभाई नौरोजी, लो. टिळक, ना. गोखले, महात्मा गांधी, पं. नेहरू, साथी जयप्रकाश, योगी अरविंद घोष आणि नेताजी सुभाषचंद्र बोस हे ते आठ अर्वाचीन भारताचे भाग्यविधाते होत. मात्र भारतमातेचे हे आठ कंठमणि असले तरी श्री. शंकररावांच्या मतें त्यांच्यांतहि उजव-डावे, म्हणजे पहिले सहा प्रत्यक्ष व शेवटचे दोन प्रतिकरूप असा थोडा भेद केला पाहिजे. भारताला स्वातंत्र्य मिळवून देण्यांत या आठ विभूतींपैकीं प्रत्येकाच्या कामगिरीचें मूल्यमापन करण्याचें कार्य वाचकांवरच सोंपविणें अधिक इष्ट होईल. भारतीय लोकशाहीचें भवितव्य ठरविण्याच्या बाबतींत पहिल्या सहांच्या पैकीं शेवटच्या दोन कंठमण्यांविषयीं श्री. शंकरराव लिहितात : "दादाभाईच्या पुढील पिढीत जसे टिळक व गोखले असे दोन पक्षांचे नेते निर्माण झाले, तसेंच गांधींच्या पुढील पिढींत पं. नेहरू व साथी जयप्रकाश हे दोन असामान्य राजकीय नेते स्वतंत्र भारताला लाभले आहेत. या दोघांच्या नेतृत्वाखालीं दोन राजकीय पक्ष स्वतंत्र भारतांत संघटित होत असून तेच दोन पक्ष भारतीय लोकशाहीचें भवितव्य ठरवून तिचा भावी आकार घडविणार आहेत. महात्मा गांधींच्या राजकीय वारश्याचे दोघेहि आपापल्यापरी निधिधारक आहेत. त्या दोघांनाहि त्याची जाणीव असून आपआपल्या कार्यास लागणारी गुणसंपत्ति दोघांपाशींहि भरपूर आहे. भारतीय लोकशाही या दोन नेत्यांच्या मार्गदर्शनानें खंबीर बनून दृढमूल व पूर्ण विकसित होऊं शकेल".

"जवाहरलाल आपला राजकीय वारस आहे" असें गांधीजींनीं अनेक प्रसंगीं उद्‌घोषित केले होतें हें सर्वश्रुतच आहे. असें असलें तरी सूर्योदय होऊन त्याच्या तेजस्वी रश्मींनीं पृथ्वी एकदां प्रकाशित झाली म्हणजे कोणताहि पुरुप जाणिवेच्या जबाबदारीनें आपला पुरुपार्थ व पराक्रम प्रकट करूं शकतो. त्यासाठीं त्याला कोणाच्या प्रसादाची वा परवानगीची जरूरी लागतेच असें नाहीं. पण ब्रह्मानें जसें सदा सर्व विश्व व्यापलेलें आहे, तसें सध्यां राजकारणानें नागरिकांचें जीवन ओतप्रोत व्यापलेलें असल्यामुळें, पंडितजींच्या या राजकीय वारशाचा खूप 'बोलबाला' व्हावा हें तर स्वाभाविक आहेच; पण त्याचबरोबर जवाहरलालजींच्यामध्यें असे पुष्कळ असामान्य गुण आहेत कीं त्यांच्यामुळें, जसा सोन्याला सुगंध, त्याप्रमाणें गांधीजींकडून मिळालेल्या वारशाला त्यांनीं अनुपम शोभा आणली आहे.

**गांधींचा सत्याग्रहाचा सर्वश्रेष्ठ वारसा कोणाकडे?**

परंतु गांधीजींचा सर्वश्रेष्ठ वारसा राजकीय नसून व्यापक, अध्यात्म व सत्यधर्म यांच्या निष्ठेंतून जन्मलेला सत्याग्रह आहे ही गोष्ट स्वतः शंकररावच मान्य करतात. ते लिहितात : "लोकशाहीच्या शुद्धीकरणास ज्याप्रमाणें सत्याग्रहनिष्ठेचा उपयोग आहे त्याचप्रमाणें समाजवादाच्या संस्थापनेस व शुद्धीकरणास सत्याग्रहाची आवश्यकता आहे. युरोपांतील लोकशाही संग्रहवादामुळें भ्रष्ट झालेली असून रशियांतील समाजवाद हिंसावादानें विकृत झालेला आहे, असें गांधीजींचे मत होतें. असंग्रह आणि अहिंसा यांच्यावर अधिष्ठित झालेली सत्याग्रहनिष्ठा जागृत करून लोकशाहीचें व समाजवादाचें शुद्ध स्वरूप प्रकट करण्याचें कार्य भारताला करतां येईल व तें त्यानें करावें, हाच गांधीजींचा भारताला संदेश आहे. सत्याग्रहनिष्ठा हा आधुनिक मानवाचा धर्म आहे. त्याच्या आश्रयानें बुद्धिस्वातंत्र्य व व्यक्तिस्वातंत्र्य यांचेंहि शुद्धीकरण होईल; कारण, युरोपांत बुद्धिस्वातंत्र्याचा उपयोग स्वार्थसंपादन व धनसंग्रह यांच्या कामीं होऊं लागल्यामुळें तीं तत्त्वेंहि भ्रष्ट झालेलीं आहेत. स्वार्थ आणि संग्रह यांच्यांतून मुक्त होऊन बुद्धि अव्यभिचारी सत्यनिष्ठेचा आश्रय करील आणि सामाजिक सत्याच्या संस्थापनेसाठीं स्वार्थमूलक व संग्रहप्रधान समाजरचनेविरुद्ध अहिंसक क्रांति करण्यास प्रवृत्त होईल, तेव्हांच बुद्धिस्वातंत्र्याचें व व्यक्तिस्वातंत्र्याचें तत्त्व शुद्ध बनून मानवाच्या सर्वांगीण अभ्युदयास तें प्रेरक बनूं शकेल. अशा रीतीनें विचार केल्यास गांधीजींनीं दिलेल्या सत्याग्रहाच्या संदेशांत बुद्धिस्वातंत्र्य, व्यक्तिस्वातंत्र्य, लोकशाही आणि समाजवाद या आधुनिक युगांत निर्माण झालेल्या तत्त्वांचे शुद्धीकरण करून मानवाला आत्मोद्धाराचा व समाजोद्धाराचा मार्ग दाखवून देण्याचें सामर्थ्य आहे हें दिसून येईल"... "गांधीजींचा सत्याग्रही संदेश त्यांच्या देहावसानानंतर नष्ट न होतां तो राष्ट्रांतील सर्व पक्षांतील लोकांच्या अंतःकरणांत प्रविष्ट होत असल्याचें दृश्य कोणाहि सूक्ष्म निरीक्षकास आज दिसल्यावांचून राहणार नाहीं. जेव्हां हें कार्य मूर्त स्वरूपास येईल तेव्हांच म. गांधींनीं आधुनिक मानवाला दिलेल्या क्रांतिकारक धर्मनिष्ठेचें खरें माहात्म्य लोकांना कळूं लागेल".

गांधीजींचा हा सत्याग्रहाचा वारसा कोणाकडे आला आहे याचें विवेकयुक्त विवेचन प्रस्तुत विपयाच्या दृष्टीनें उद्‌बोधक व उपयुक्त ठरेल. श्री. शंकररावांनीं वर जें म्हटलें आहे कीं, सत्याग्रही संदेश राष्ट्रांतील सर्व पक्षांतील लोकांच्या अन्तःकरणांत प्रविष्ट होत असल्याचें आशाजनक दृश्य भारतांत दिसत आहे, त्याचा कोणाला सानन्द अभिमान वाटणार नाहीं? मात्र सर्वच ईश्वराच्या विभूती असल्या, तरी 'विभूतिमत्त्व' हें एक विशेपच आहे व तें भगवान् श्रीकृष्णांनीं गीतेच्या दहाव्या अध्यायांत कथन केलें आहे. दुसरें जागतिक युद्ध सुरू असतां युद्धविरोधी प्रचार करण्याच्या हक्काचें रक्षण करण्यासाठीं गांधीजींनीं १९४०-४१ मध्यें जो वैयक्तिक सत्याग्रह केला, त्यांत त्यांनीं घातलेल्या अटी पाळून गांधीजींच्या परवानगीनें हजारों सत्याग्रहींनीं कारागृहवास पत्करला. पण पहिला सत्याग्रही म्हणून गांधीजींनीं श्री. विनोबाजींचीच निवड केली. ह्या पहिल्या सत्याग्रहाचा भारतीय जनतेला 'हरिजन' मधून परिचय करून देतांना गांधीजींनीं त्याच्या गुणमण्यांची 'हरिजन'मधील लेखांत जी माला गुंफली, त्यांत 'सर्वच युद्धांना विरोध करणारा' हा अहिंसेचा गुण मध्यमणि होता. अहिंसेशिवाय माणसाला सत्याचें दर्शन शक्य नाहीं, अशी गांधीजींची स्वानुभवानें खात्री झाली होती. म्हणून त्यांच्या मतें अहिंसा हा सत्याग्रहाचा आत्मा होता.

गुजरातनें भूदान-यज्ञाच्या कार्याला जोरानें प्रारंभ केला त्या प्रसंगीं आपल्या गुर्जरभाईंना पाठविलेल्या संदेशांत श्री. विनोबाजी म्हणतात :

"१९४५ मध्यें तुरुंगांतून बाहेर आल्यावर गांधीजींना भेटावयास गेलो, तेव्हां आपल्या देशांत अहिंसेचा फैलाव कसा होईल यासंबंधींच त्यांच्याशीं चर्चा केली होती. तशी चर्चा तर पुष्कळ प्रश्नांवर झाली; पण गांधीजींच्या पुढें मी जी एक मुख्य गोष्ट मांडली, ती ही होती की ज्या संस्थांचें संचालन करण्याची जबाबदारी माझ्यावर आहे व ज्या संस्थांशीं माझा संबंध आहे, अशा सर्व संस्थांच्या व्यापारांतून माझी सुटका होईल तर मी मुक्त चिंतन करूं शकेन. आणि तसें होईल तरच मला अहिंसेचा मार्ग स्पष्ट दिसेल. बापू माझें मन समजूं शकले व त्यांनीं माझी ही








सूचना मान्य केली. तेव्हांपासून मी मुक्त मानव बनलों व माझे पाय जमिनीवर ठेवून मी आकाशांत विहार करूं लागलों".

आत्मोद्धाराच्या मार्गावर प्रवास करीत असतांना मानवाचें एकमेव पाथेय जें सत्याग्रह, अहिंसा व त्याची साधना म्हणजे विधायक कार्यक्रम त्याचें – या गांधीजींकडून मिळालेल्या तेजस्वी वारशाचें – जतन करून तो कसा वाढवावा हा श्री. विनोबाजी, श्री. किशोरलालजी व त्यांचे लहान थोर असंख्य सहकारी यांच्यापुढें मोठा चिंतेचा व चिंतनीय प्रश्न होता. या दैवी निधीचें निधिधारकत्व राष्ट्रीय सभेनें करावें अशी महात्माजींची स्वाभाविकच इच्छा होती. पण ही जबाबदारी पार पाडण्याकरिता काँग्रेसनें जो कायाकल्प करणें जरूर आहे असें गांधीजींना वाटत होतें, तो करण्याची काँग्रेसची तयारी नव्हतीं, हें खरें आहे. स्वतंत्र भारतांत काँग्रेसचें स्वरूप व कार्य काय असावें याविषयीं गांधीजींचीं कांहीं निश्चित मतें होतीं. मरणापूर्वी कांहीं घटकाच गांधीजींनीं स्वतंत्र भारतांत काँग्रेसचें ध्येय व घटना काय असावी यासंबंधींचे आपले विचार एका कागदावर लिहून काँग्रेस मंत्र्यांच्या हवालीं केले.

गांधीजींनीं हा जो काँग्रेसच्या घटनेचा खर्डा तयार केला होता, त्यांत त्यांनीं काँग्रेसचें भावी स्वरूप कसें असावें तें पुढीलप्रमाणें सुचविलें होतें : "फाळणी होऊन का होईना, पण काँग्रेसनें वापरलेल्या साधनानें भारताला स्वातंत्र्य प्राप्त झालें असतां, आतां प्रचाराचें व कायदेमडळांतील कामकाजाचें एक साधन ह्या स्वरूपाच्या काँग्रेसच्या अस्तित्वाचा भारताला उपयोग नाहीं. शहरापासून पूर्णतः भिन्न समजल्या जाणाऱ्या भारतांतील पांच लाख खेड्यांतील लोकांसाठीं सामाजिक, नैतिक व आर्थिक स्वातंत्र्य अद्यापि भारताला संपादन करावयाचें आहे. लोकशाहीच्या ध्येयाकडे वाटचाल करीत असतां, भारतांत मुलकी व लष्करी या दोन शक्तींत वर्चस्व कुणाचें असावें यावद्दल संघर्ष होणें अपरिहार्य आहे. जातीय संस्था व राजकीय पक्ष यांच्यातील अकल्याणकारक चुरशीपासून काँग्रेसला बाजूला ठेवणें आवश्यक आहे. ह्या व अशाच इतर कारणांसाठीं ऑल इंडिया काँग्रेस कमिटी सध्यां अस्तित्वांत असलेली काँग्रेस बरखास्त करून, तिचें 'लोकसेवक-संघां'त रूपान्तर करण्याचा आपला निश्चय जाहीर करीत आहे". – त्याचप्रमाणें या खर्ड्यांत अखिलभारतीय चरखा-संघ, अ.भा. ग्रामोद्योग-संघ, अ.भा. तालिमी-संघ, अ.भा. गो-सेवासंघ वगैरे त्यांनीं निर्माण केलेल्या सर्व रचनात्मक संस्था काँग्रेसला जोडल्या जाव्यात असें एक कलम गांधीजींनीं घातलें होतें. यावरून ही गोष्ट अगदीं स्पष्ट आहे कीं, राजकीयांहून अगदीं भिन्न असा जो आपला सत्याग्रह, अहिंसा व रचनात्मक कार्यक्रम यांचा वारसा, तो काँग्रेसकडे जावा अशी महात्माजींची इच्छा होती. पण श्री. शंकररावांच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे काँग्रेसनें हा गांधीजींचा सल्ला व इशारा धुडकावून लावला व केवळ त्यांचे राजकीय वारस होऊन देशाचा राज्यकारभार चालविण्याची जबाबदारी स्वीकारली. म्हणून विशिष्ट अर्थानें 'म. गांधीजींच्या राजकीय वारश्याचे दोघेहि (जवाहरलालजी व जयप्रकाशजी) आपआपल्या परी निधिधारक आहेत' असें जें श्री. शंकरराव म्हणतात तें बरोबर आहे. कारण श्री. जयप्रकाशजींनीं काँग्रेस सोडली पण समाजवादी पक्ष धरला व त्या पक्षानें कायदेमंडळांतींल काम सोडलेलें नाहीं.

**'सर्वोदय-समाज' व 'सर्वसेवासंघ'**

व्यापकता हें नीतीचें लक्षण किंवा गुणधर्म आहे. म्हणून गांधीजींचा राजकीय क्षेत्रांतील कर्मव्यापार प्रचंड असला तरी ज्यांचा सत्तेशीं किंवा सत्तेच्या राजकारणाशीं कांहींहि संबंध नव्हता अशा या देशांतील व परदेशांतील असंख्य लोकांना त्यांच्यावद्दल जें प्रेम व असामान्य आकर्षण वाटे, त्याचें मुख्य कारण त्यांचें आध्यात्मिक व नैतिक जीवन होय हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. शारीरिक व भौतिक सुखाची गोडी माणसाला जितकी स्वाभाविक आहे, तितकीच, किंबहुना त्याहूनहि अधिक गोडी व भूक नैतिक जीवनाची असते. काँग्रेसमध्यें ह्या जीवनाची भूक असलेली पुष्कळ मंडळी होती. पण अशा लोकांची फार मोठी संख्या गांधीजींच्या विधायक कामांतच रस घेणारी होती. चरखा-संघ, ग्रामोद्योग-संघ, तालिमी-संघ अशांसारख्या विधायक संस्थांच्या कारभाराचें जूं अशांपैकींच कांहीं वेंचक मंडळींच्या मानेवर गांधीजींनीं ठेवलेलें होतें. भारताच्या नैतिक जीवनाची पातळी उंचावून, त्याला सत्याग्रहासाठीं तयार करण्याच्या गांधीजींच्या जीवनसाधनेंत ही मंडळी त्यांची साथी होती.

भारत स्वतंत्र झाल्यावर संपादन केलेली सत्ता स्वतःच्या हातांत न घेतां काँग्रेसनें आपल्या अहिंसेच्या व सत्याग्रहाच्या निधीचें जतन करून तो वाढवावा व त्याच्या उपयोगानें सत्तेवर नियंत्रण ठेवून सत्ताधाऱ्यांचें मार्गदर्शन करावें अशी गांधीजींची इच्छा होती. म्हणून निःस्वार्थ बुद्धीनें जनतेची शुद्ध सेवा करणाऱ्या सेवकांचा, काँग्रेस हा एक लोकसेवासंघ बनावा अशी योजना काँग्रेसच्या कार्यकारिणीपुढें त्यांनीं मांडली होती. पण गांधीजींची ही इच्छा पुरी करण्याची जबाबदारी, ज्यांना गांधीजींच्या नैतिक व सत्याग्रही जीवनाचें अधिक आकर्षण होतें व जे रचनात्मक कार्याच्या द्वारां सत्तानिरपेक्ष जनतेची सेवा करीत होते, अशा काँग्रेसमधील व काँग्रेसबाहेरील कार्यकर्त्यांवर अधिक होती. एवढेंच नव्हे तर ती त्यांच्याकडूनच पार पाडली जाण्याची अधिक शक्यता

होती. आणि या गोष्टीची या मंडळींना जाणीवहि होती. स्वतंत्र भारतांत गांधीजींचें सर्वोदयाचें ध्येय अहिंसेच्या व सत्याग्रहाच्या मार्गानें साध्य करावयाचें तर त्यासाठीं पुढें काय केलें पाहिजे याचा हे कार्यकर्ते विचार करीतहि होते. या कामांत स्वतः गांधीजींचें मार्गदर्शन मिळावें म्हणून यांच्यांतील कांहीं प्रमुख मंडळींनीं गांधीजींच्या सल्ल्यानें फेब्रुवारी १९४८ मध्यें वर्ध्याला रचनात्मक कार्यकर्त्यांची एक छोटी परिषद् भरविण्याचें ठरविलें. पण विधिलिखित निराळेंच होतें! ३० जानेवारीला गांधीजींची प्रार्थनेच्या वेळी हत्या झाली! तथापि, या कार्यकर्त्यांनी अशी परिषद् भरविण्याचा आपला संकल्प पुरा केला व मार्च १९४८ मध्यें सेवाग्रामला गांधीजींच्या सर्व क्षेत्रांतील सहकाऱ्यांची व अनुयायांची एक मोठी परिषद् भरविली. या परिषदेचें अध्यक्षस्थान डॉ. राजेंद्रप्रसाद यांनीं ग्रहण केलें होतें व स्वतः जवाहरलालजी या परिषदेला हजर होते. गांधीजींच्या मृत्यूनंतर त्यांच्या अमोल वारशाचें रक्षण कसें करावयाचें, हा या सम्मेलनापुढें एकमेव प्रश्न होता. तीन-चार दिवसांच्या दीर्घ व गंभीर चर्चेनंतर संमेलनानें ऐकमत्यानें 'सर्वोदय समाज' नांवाचा एक समाज स्थापन केला. सत्य व अहिंसा यांच्या पायावर, ज्यांत समष्टि व व्यक्ति दोघांनाहि सर्वांगीण विकास करण्याची संधि मिळेल असा, जातिविहीन व वर्गविहीन समाज निर्माण करणें हें सर्वोदय समाजसंस्थेचें ध्येय राहील व गांधीजींचा रचनात्मक कार्यक्रम हें त्याचें साधन असेल; हें साध्य सिद्ध करीत असतां साधनशुद्धीवर सेवकांचा कटाक्ष राहील; सर्वोदय-समाज गांधीजींच्या सिद्धान्तावर श्रद्धा ठेवणाऱ्या लोकांचें एक भ्रातृमंडळ असल्यामुळें राजकीयपक्षनिरपेक्ष कोणालाहि त्याचे सेवक होण्याचा अधिकार राहील – इतक्या मुख्य गोष्टी संमेलनांत ठरविण्यांत आल्या.

अहिंसात्मक समाज निर्माण करावयाचा तर आपण स्थापन केलेल्या रचनात्मक संस्थांचें कार्य आदर्श स्वरूपांत चाललें पाहिजे व या मार्गावरील पहिलें पाऊल म्हणून या सर्व संस्थांनीं एका संस्थेंत विलीन झालें पाहिजे असें गांधीजींचें मत होतें व तें त्यांनीं आगाखान पॅलेसच्या तुरुंगांतून बाहेर येतांच सेवाग्रामला भरलेल्या विधायक कार्यकर्त्यांच्या बैठकींत सर्वांपुढें मांडलें होतें. त्यानंतर सेवाग्रामच्या संमेलनापर्यंत गांधीजींच्या या सूचनेवर निरनिराळ्या रचनात्मक संस्थांतून कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांची गांधीजींशीं व आपापसांत चर्चा सुरू होती. सेवाग्रामच्या संमेलनांत एका ठरावानें ही कामगिरी श्री. कुमारप्पांच्यावर सोंपविली. यामुळें या प्रश्नाला जोराची चालना मिळाली व या सर्वांचा परिणाम म्हणून इन्दूरहून ६ मैलांवर असलेल्या राऊ या गांवीं सर्वोदय समाजाचें जें पहिलें संमेलन झालें त्या प्रसंगीं गांधीजींच्या इच्छेनुसार त्यांनीं स्थापन केलेल्या सर्व संस्थांचा मिळून एक 'सर्व-सेवा-संघ' अस्तित्वांत आला. गांधीजींच्या विचारांचा आत्मा जर 'सर्वोदय-समाज' म्हटला, तर 'सर्व-सेवा-संघ'ला त्यांचे शरीर म्हणावें लागेल. अशा रीतीने काँग्रेसचें 'लोकसेवासंघ' बनून आपलें कार्य पुढे चालवावें अशी जी गांधीजींची इच्छा ती 'सर्वोदय-समाज' व 'सर्वसेवासंघ' या दोन संस्थांच्या संस्थापनेच्या रूपानें मूर्त स्वरूप पावली.

श्री. विनोबाजी व समाजाचे अन्य सेवक यांनीं भारतांत भ्रमण करून सर्वोदयाची कल्पना व ती अंमलांत आणण्याचा कार्यक्रम यांचा लोकांत प्रचार केला. समाजाचे सेवक करण्यासाठीं खास प्रयत्न करणें ही समाजाची नीति नसूनहि तिचें पांच ते सहा हजार सेवक झाले असून, त्यांत भारताच्या बाहेरच्या अनेक देशांतील दोनशें-अडीचशें लोकसेवक आहेत.

**सत्ताग्रहण न करतां, सत्ताधाऱ्यांना मार्गदर्शन**

राजकीय सत्तेची अभिलाषा धरणारा व सत्ताधारी पक्षांशीं सत्तेसाठीं स्पर्धा करणारा एखादा राजकीय पक्ष स्थापन करणें 'सर्वोदय-समाजा'चें लक्ष्यच होऊं शकत नाहीं. पाश्चात्त्य अर्वाचीन लोकशाहीचें, निदान दोन पक्ष हें अनिवार्य अंग असून, या अंगाला पुष्ट करूनच ती वाढली आहे हे खरें. परंतु गांधीजी लिहितात : "युरोपीय लोकशाहीचें उघडेंनागडें स्वरूप वर्णन करावयाचें झालें तर युरोपीय जनता दंडुकेशाहीच्या, हिंसेच्या जोरावर पिळली जात आहे. लोकशाही आणि हिंसक साधनें यांचें सहकार्य अशक्य आहे. आजचीं तथाकथित लोकशाही राष्ट्रें, आडपडदा न ठेवतां बोलावयाचें झालें तर, हुकुमशाही राष्ट्रेंच होत. त्यांना जर खरी लोकशाही प्रस्थापित करावयाची असेल, तर त्यांनीं धैर्यानें अहिंसेचा अवलंब केला पाहिजे".

युरोपांतील लोकशाही, श्री. शंकरराव म्हणतात त्याप्रमाणें, संग्रहवादामुळें व गांधीजी लिहितात त्याप्रमाणें हिंसावादानें भ्रष्ट झालेली आहे. "असंग्रह आणि अहिंसा यांच्यावर अधिष्ठित झालेली सत्याग्रहनिष्ठा जागृत करून लोकशाहीचें व समाजवादाचें शुद्ध स्वरूप प्रकट करण्याचें कार्य भारताला करतां येईल व तें त्यानें करावें, हाच गांधीजींचा भारताला संदेश आहे" असें श्री. शंकरराव समजतात तें अगदीं बरोबर आहे. पण हें लोकशाहीचें व समाजवादाचें शुद्धीकरण ज्यांनीं असंग्रहाचें व अहिंसेचें व्रत घेतलें आहे, त्यांच्याशिवाय अधिक चांगलें कोण करूं शकेल?

सत्तेसाठीं स्पर्धा करणारे दोन राजकीय पक्ष हें जें पाश्चात्त्य लोकशाहीचें अनिवार्य अंग, त्याचेंच हुबेहूब अनुकरण भारतानें केलें व तेवढ्यावरच समाधान मानलें, तर भारताला आपल्या








पित्याच्या – गांधीजींच्या – उपदेशाचें पालन कसें करतां येईल? सत्ता कावीज करणें हें अहिंसेला म्हणजेच अहिंसावाद्यांना शक्य आहे असें तत्त्वतः मानलें, तरी त्यांचें तें लक्ष्य असतां कामा नये असें गांधीजींचें आग्रहपूर्वक सांगणें होतें. राज्यकारभाराचें यंत्र कावीज न करतां सत्तेचें मार्गदर्शन त्यांनीं करावें असें त्यांचें मत असून, हीच अहिंसेची खुवी होय असें त्यांचें म्हणणें होतें. मृत्यु येण्यापूर्वी महिना-सव्वा महिना दिल्ली येथें गांधीजींनीं देशांतील मुख्य मुख्य रचनात्मक कार्यकर्त्यांशी अनेक दिवस चर्चा केल्यानंतर त्यांनीं त्या कार्यकर्त्यांना शेवटचा असा सल्ला दिला कीं, "स्वतःची पूर्ण शुद्धि करा. सत्ता कावीज करण्याची कल्पना डोक्यांतून अजिवात फेंकून द्या. म्हणजे तुम्ही सत्तेचें मार्गदर्शन करूं शकाल व तिला योग्य मार्गावर पाऊल टाकण्यास मदत कराल. यांतच कल्याण (सर्वोदय) आहे. दुसरा मार्ग नाहीं". 'एष वः पंथाः। नान्यः पंथाः विद्यते अयनाय।' म्हणून लोकशाहीचें सत्याग्रहानें शुद्धीकरण करून समाजवादाचा सर्वोदयांत विकास करावयाचा तर, भारतांत सत्तास्पर्धी दोन राजकीय पक्ष स्थापन करणें हा उपाय सर्वोत्कृट नाही किंवा अंतिमहि नाही. हें, मला वाटतें, श्री. शंकररावहि मान्य करतील. यासाठीं असंग्रहाचें व अहिंसेचें व्रत घेतलेला व निःस्वार्थबुद्धीनें व निःपक्ष वृत्तीनें समाजाची सेवा करणारा एक तिसरा पक्ष भारतांत निर्माण झाला पाहिजे. आज 'सर्वोदय समाजा'चें नेमकें हेंच स्थान व कार्य आहे. सत्तेचें राजकारण करावयाचें नाहीं, पण समाजाच्या राजकीय जीवनाला वळण देऊन सत्ताधाऱ्यांचें मार्गदर्शन[1] करावयाचें हें व्रत 'क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया दुर्गं पथस्तत् कवयो वदन्ति' असें आहे.

### प्रजासूययज्ञाचा पुरोहित

एका अर्थानें असें म्हणता येईल कीं, जगांत आजपर्यंत या मार्गावरून कोणी चाललें नसल्यामुळें वाट पुसायलाहि कोणी नाहीं. गांधीजींनीं म्हटल्याप्रमाणें राजकीय स्वातंत्र्य मिळाल्यानंतर पांच लाख खेड्यांच्या सामाजिक, नैतिक व आर्थिक स्वातंत्र्याचा प्रश्न राष्ट्रापुढें उभा होता. देशाची आर्थिक स्थिती सुधारण्याऐवजीं ती दिवसानुदिवस खालावत जात होती. काँग्रेस व देशांतील इतर राजकीय पक्ष स्वतंत्र भारताची सामाजिक, विशेषतः आर्थिक रचना काय असावी याच्या योजना तयार करून, त्या देशापुढें मांडीत होते. सर्वोदयाच्या दृष्टीनें भारतांत कोणती आर्थिक रचना असावी यावद्दलचे स्वतः गांधीजींचे खास विचार होते व त्यांच्या आधारें एक योजना तयार केली जावी अशी त्यांची इच्छा होती. पण इतर अनेक इच्छांप्रमाणें त्यांची हीहि इच्छा अतृप्त राहिली. 'सर्वोदय समाज' व 'सर्वसेवासंघ' यांची ज्यांनीं स्थापना केली होती व ज्यांना सर्वोदयाची प्रेरणा गांधीजींकडून मिळाली होती, त्या रचनात्मक कार्यकर्त्यांना गांधीजींची ही इच्छा अतृप्त राहिली आहे, याची जाणीव होती व शिवाय देशांत घडणाऱ्या राजकीय व आर्थिक घटनांकडे त्यांचें वारीक लक्ष होतें. देशांत नैराश्य व वैफल्यवाद पसरत असून त्याची शक्ति कुजत आहे याची त्यांना कल्पना होती. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर देशांत उत्पन्न झालेल्या स्थितीला तोंड कसें देतां येईल व भारताची कायमची सामाजिक, आर्थिक रचना काय असावी, यासंवंधींची आपली योजना तयार करण्याचें त्यांनीं ठरविलें व महात्माजींच्या दुसऱ्या पुण्यतिथीच्या दिवशीं, म्हणजे ३० जानेवारी १९५० ला त्यांनीं आपली सर्वप्रसिद्ध अशी 'सर्वोदय योजना' देशापुढें मांडली. ही सर्वोदय योजना इतकी लोकमान्य झाली कीं, गेल्या सार्वत्रिक निवडणुकीच्या वेळीं देशांतील वहुतेक सर्व राजकीय पक्षांनीं तिला जाहीर रीतीनें आपला पाठिंवा दिला. समाजवादी पक्षाचे नेते श्री. जयप्रकाशजी यांनीं असें जाहीर केलें कीं, जर ही सर्वोदय-योजना काँग्रेस मान्य करील, तर आपण समाजवादी पक्षाचें विसर्जन करूं!

तथापि, इतकें करूनहि विधायक कार्यकर्त्यांना खरें समाधान नव्हतें. कारण जनतेची आर्थिक दुःखें दूर करण्याचा व आर्थिक समता स्थापण्याचा अहिंसात्मक मार्ग शोधून काढण्याची तळमळ त्यांना लागली होती व ते वेचैन होते. जनतेच्या जिव्हाळ्याचे जे आर्थिक प्रश्न ते जर आपण अहिंसेच्या मार्गानें सोडवूं शकलों नाहीं, तर आपल्या विधायक कार्याची 'आत्म्यावांचून कुडी' अशी स्थिति होईल हें ते पक्के समजून होते. म्हणून ते काम करीत होते. पण त्यांत त्यांना खरी निष्ठा नव्हती. श्री. विनोबाजी म्हणतात : "गांधीजींच्या पश्चात् मी भारतांत थोडा फिरलों. पण माझ्या मनांत प्रतिदिन जो एक विचार घोळत होता तो हा कीं, वापूंनीं आम्हांला जीं सांचेबंद विधायक कामें सांगितलीं आहेत, तीं म्हणजेच एकाच मूर्तीचे सर्व अवयव होत. त्यांचा आत्मा सत्य व अहिंसा आहे. हा आत्मा कसा प्रकट होईल, त्याच्या शोधार्थ मी कांहीं दिवस निर्वासितांमध्यें राहिलों. थोडें-फार मुसलमान वंधूंचें म्हणजे मेओंचें काम केलें. शेवटीं साम्यवाद्यांचें

१. श्री. विनोवाजी व श्री. दादा धर्माधिकारी यांच्या संपादकत्वाखालीं चालणारें 'सर्वोदय' मासिक, आणि विशेषतः 'हरिजन' यांनीं गांधीजींच्या मृत्यूनंतर त्यांच्या जीवनदृष्टीवर व पद्धतीवर प्रकाश पाडणारा आपल्या लिखाणाचा प्रदीप सारखा प्रज्वलित ठेविला आहे. 'हरिजन'चा हा दीप विझणार असें जाहीर होतांच अनेक लोकांना असें वाटलें कीं आपला जीवनपथ अंधःकारमय होईल. म्हणून लोकांनीं स्वयंस्फूर्तीनें पुढें येऊन त्याला तेलवात पुरविली व तो जळत राहील अशी व्यवस्था केली.

अनुक्रमणिका

जें खास क्षेत्र तेलंगण तेथें पोहोंचलो.[२] तेथें ज्याला अहिंसेचा साक्षात्कार म्हणता येईल तो मला झाला. आणि हाच ईश्वरी संकेत मानून अखिल भारतांत मी प्रजासूययज्ञाचा पुरोहित होऊन सतत यात्रा करीत आहे".

### भूदानयज्ञांतील क्रांतिकारक सामर्थ्य

ज्याला विनोबाजींनीं आपल्याला अहिंसेचा साक्षात्कार झाला असें वर म्हटलें आहे, त्याची कथा अशी आहे : आपल्या पदयात्रेमध्यें श्री. विनोबाजी ता. १८ एप्रिल १९५१ रोजीं हैदराबादहून ३४ मैलांवर असलेल्या नलगुंडा जिल्ह्यांतील पोचमपल्ली या गांवीं पोहोंचले. त्या गांवचे हरिजनवंधू श्री. विनोबाजींच्याकडे आले व त्यांना आपल्या दुःखाची कहाणी त्यांनीं सांगितली. अखेर ते हरिजन म्हणाले, "धड ना पुरें काम, ना धड जमीन! आम्हीं पोट तरी कसें भरावें?" विनोबाजींनी विचारलें, "किती जमीन पाहिजे?" "८० एकर" त्यांनीं उत्तर दिलें. गांवांतील सवर्ण लोकहि तेथें पुष्कळ जमले होते. त्यांच्याकडे वळून विनोबाजी म्हणाले, "सरकारकडून जमीन मिळाली नाहीं किंवा मिळावयाला विलंब लागला तर गांववाले कांहीं देतील?" उपस्थितांपैकीं एक रामचंद्र रेड्डी नांवाचे गृहस्थ उठले व म्हणाले, "आमच्या वडिलार्जित जमिनीपैकीं, मी व माझे पांच भाऊ मिळून, आपल्याला या हरिजन वंधूंना देण्यासाठीं पन्नास एकर वागाईत व पन्नास एकर जिराईत जमीन भेट म्हणून देतों". दुसऱ्या दिवसापासून श्री. विनोबाजींनीं अत्यंत विनयपूर्वक व प्रेमपूर्वक जमिनींचें दान मागण्याला सुरुवात केली. अशा रीतीनें अनेक लोकांचा सत्यसंकल्प व त्यासाठीं केलेली यथाशक्ति साधना फळाला आली.[३]

गेल्या १९५२ च्या एप्रिलमध्यें बनारसच्या जवळ सेवापुरीला समाजाचें चौथें संमेलन झालें, तेव्हां श्री. विनोबाजींनीं तेलंगण, मध्यप्रदेश, मध्यभारत, विंध्याचल, राजस्थान व उत्तर प्रदेश इतक्या राज्यांतून पदयात्रा केली होती, व त्यांना जवळजवळ एक लाख एकर जमीन या भूदानयज्ञांत लोकांनीं दान दिली होती. या संमेलनांत, पुढील दोन वर्षांत लोकांच्या सदसद्विवेकबुद्धीला आवाहन करून, किमान २५ लाख एकर जमीन भूमिहीनांसाठीं मिळविण्याचा संकल्प सोडण्यांत आला. तेव्हांपासून भूदानयज्ञ-कल्पनेचा प्रचार सर्वत्र सुरू झाला असून, भारताच्या बहुतेक प्रदेशांत या कामासाठीं भूदान-यज्ञ-समित्या स्थापन झाल्या आहेत व अनेक कार्यकर्ते सर्वोदयाचा व भूदानयज्ञाचा संदेश खेडोंपाडीं नेऊन पोंचविण्यासाठीं प्रचार व यात्रा करीत आहेत. सर्वोदयाचा सिद्धान्त व भूदान- यज्ञाची कल्पना यांनीं भारतीय मनांत कायमचें मूळ धरलें आहे ही गोष्ट आज सर्वमान्य झाली आहे. या भूदान-यज्ञासंबंधीं 'भूदान-यज्ञ आणि भूमिविषयक समस्या' ('नवभारत' लोकशाही-विशेषांक, ऑगस्ट-सप्टेंबर १९५२) या आपल्या लेखांत, मुंबई विद्यापीठाचे प्राध्यापक श्री. दांतवाला लिहितात : "आचार्य विनोबाजींनीं आरंभिलेला हा सत्याचा किंवा न्यायप्रस्थापनेचा प्रयोग जमीनसुधारणेच्या इतिहासांतच केवळ अद्वितीय नव्हे, तर राजकीयापासून भिन्न असें जें सामाजिक परिवर्तन, तें घडवून आणण्याचें एक तंत्र म्हणूनहि हा प्रयोग अपूर्व व अद्वितीय आहे असें त्याचें कमींत कमी वर्णन करतां येईल. हा प्रयोग जसा अद्वितीय तसा नैतिकदृष्ट्याहि अत्यंत भव्य आहे. हें अत्यंत निकडीचें सामाजिक परिवर्तन जें विनोबाजी घडवून आणीत आहेत तें आणतांना त्यांत दडपणाचा लवलेशहि नाहीं. ह्या गोष्टींतच, माझ्या मतें, या प्रयोगाची नैतिक भव्यता आहे".

श्री. जयप्रकाश नारायण म्हणतात :

"तीस सालच्या दांडी-यात्रेंत व मीठ पिकविण्याच्या क्रियेंत जें सामर्थ्य व जी जादू होतीं, तशीच या भूदानयज्ञांतहि आहे याचा कार्यकर्त्यांना प्रत्यय येऊं लागला आहे. गांधीजींनीं नमक-सत्याग्रह सुरू केला तेव्हां स्वतःला क्रांन्तिकारक म्हणविणारे, या कार्यक्रमाची चेष्टा करीत दूर उभे होते. सैद्धान्तिक तर्कशास्त्राचा आधार घेऊन गांधीजींची चळवळ भांडवलदारांच्या संरक्षणासाठीं आहे, असेंहि ते सांगत फिरत होते. पण गांधीजींनीं त्या चळवळीनें

२. एप्रिल १९५१ मध्यें हैदरावादशेजारीं शिवरामपल्लीला सर्वोदय समाजाचें तिसरें सम्मेलन झालें. या संमेलनाला श्री. विनोबाजी वर्ध्यापासून ३०० मैलांचा प्रवास करून पोहोंचले. सम्मेलनानंतर त्यांनीं तेलंगणाची पायी यात्रा सुरू केली.

३. १९४८ च्या एप्रिल २७-२८ ला ठाणें जिल्ह्यांतील अंवरनाथ येथें विधायक कार्यकर्त्यांचें संमेलन भरलें होतें. त्या संमेलनांत जो ठराव पास झाला तो पुढें दिला आहे. त्यावरून विधायक कार्यकर्त्यांचे विचार कोणत्या दिशेनें चालत होते, हें प्रत्ययास येईल. तो ठराव असा :

"सुखी व समृद्ध समाज आर्थिक समतेच्या पायावरच उभारणें शक्य आहे. आर्थिक विषमता असेपर्यंत वर्गकलह व त्यापासून उद्‌भवणारे अनेक अनर्थ टाळणें अशक्य आहे. आर्थिक विषमता नष्ट करून समता स्थापन करण्याचा मार्ग, जमीनदार-कारखानदार इत्यादि उत्पादनसाधनांचे मालक व धनिक यांनीं आपापल्या जवळ स्वतःच्या चालू गरजेपेक्षां अधिक असलेलीं साधनें व संपत्ति राष्ट्राला स्वखुपीनें अर्पण करणें, हा होय. म्हणून महाराष्ट्रांतील समजूतदार व समंजस धनिकांना व जमीनदारांना या संमेलनाची नम्र परंतु आग्रहाची विनंति आहे कीं, त्यांनीं आर्थिक समता स्थापन करण्याच्या या मार्गाचें अनुसरण करण्यास आपण होऊन पुढें यावें. सरकारनें अशा सर्व जमिनी खऱ्याखुऱ्या किसानांना केवळ शेतसारा घेऊन, अधिकांत अधिक उत्पादन व्हावें ही तजवीज करून कसण्यास द्यावी".










भारतांत नवचैतन्य निर्माण केलें हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे व विनोबाजींच्या भूदान-यज्ञ-आन्दोलनांतील आशय नम्रतेनें समजून घेऊन या आन्दोलनास सर्वतोपरीं साहाय्य केलें पाहिजे".

**सर्वोदयसाधनेची गुप्त सरस्वती**

अहिंसेनें लोकांचें मतपरिवर्तन करून सामाजिक व आर्थिक समता स्थापन करण्याचें भूदानयज्ञ हें एक सर्वोत्तम साधन आहे व तो सफल झाला तर मानवाला आपल्या विकासाचा एक नवीन मार्ग सांपडला असें होईल, यावद्दल आतां या देशांतच नव्हें तर परदेशांतहि ऐकमत्य आहे. अर्थात् विधायक कार्याच्या द्वारें गेलीं तीस-पस्तीस वर्षे केलेल्या प्रदीर्घ अहिंसेच्या व सत्याग्रहाच्या साधनेला हें 'रसाळ गोमटें' फळ आलें आहे, हें अनेकांच्या लक्षांत आलें नाहीं तर आश्चर्य नाहीं. प्रयागच्या त्रिवेणीसंगमावर अखेर एकदां आपल्याला स्नान करावयाला मिळालें म्हणून स्वतःला धन्य मानणाऱ्या असंख्य यात्रेकरूंपैकीं, किती यात्रेकरूंना त्या संगमाला पावनत्व देणाऱ्या गुप्त सरस्वतीचें दर्शन तर दूरच पण स्मरण तरी होतें? मानवाच्या इतिहासांत अशी एक गुप्त सरस्वती सदाच वाहत असते. खरोखर तिच्यांतच मानवी जीवन पावन करण्याची शक्ति असते. पण सामान्य माणसाच्या चर्मचक्षूंना तिचें दर्शन होत नाही, म्हणूनच इतिहासाची पुनरावृत्ति होत असते; व मनुष्य वर्तुलाकार दुष्टचक्रांतच भ्रमण करीत राहतो. तिच्या दर्शनासाठीं दिव्य चक्षू लागतात. मला खेद याचाच वाटतो कीं, श्री. शंकररावांसारखे प्रज्ञावानहि या गुप्त सरस्वतीचें दर्शन सामान्य जनतेला करून देण्याला समर्थ होत नाहींत. श्री. शंकरराव लिहितात : "दादाभाईंच्या पुढील पिढींत जसे टिळक, गोखले असे दोन पक्षांचे दोन नेते निर्माण झाले, तसेच गांधींच्या पुढील पिढींत पं. नेहरू व साथी जयप्रकाश हे दोन असामान्य राजकीय नेते स्वतंत्र भारताला लाभलेले आहेत. या दोघांच्या नेतृत्वाखालीं दोन राजकीय पक्ष स्वतंत्र भारतात संघटित होत असून, तेच दोन पक्ष भारतीय लोकशाहीचें भवितव्य ठरवून तिचा भावी आकार घडविणार आहेत. म. गांधींच्या राजकीय वारशाचे दोघेहि आपापल्यापरीं निधिधारक आहेत. त्या दोघांनाहि त्याची जाणीव असून आपापल्या कार्यास लागणारी गुणसंपत्ति दोघांपाशींहि भरपूर आहे. भारतीय लोकशाही या दोन नेत्यांच्या मार्गदर्शनानें खंबीर बनून दृढमूल व पूर्ण विकसित होऊं शकेल".

ही आपली सर्वांची इच्छा सफल व्हावयाची तर, श्री. शंकरराव म्हणतात त्याप्रमाणें, "युरोपीय संस्कृतींतील लोकशाही व समाजवाद यांचें शुद्धीकरण करून आपण त्यांचा स्वीकार केला पाहिजे". हें शुद्धीकरण, अहिंसा व सत्याग्रह यांची अखण्ड साधना करणाऱ्या साधकांची गुप्त सरस्वती भारतांत सतत वाहत राहिली, तरच होऊं शकेल.

❋ ❋ ❋

---



---

अनुक्रमणिका

# उपविभाग ३ : विज्ञान, तंत्रज्ञान आणि इहलोकवादी जीवनदर्शन

येथे एकत्रित केलेले चार लेख शंकरराव देवांनीं *नवभारत*च्या मे, जून, जुलै आणि ऑगस्ट १९५८ च्या अंकांत लिहिले. त्यांचे निकट-निमित्त प्रा. अ.भि. शहांचे भूदान चळवळीचे मूल्यमापन करणारे लेख असले तरी, दुसऱ्या महायुद्धानंतर विज्ञानाच्या स्वरुपाची आणि त्याच्या समाजधारणवरील आघाताची जी शोधक चिकित्सा सुरू झाली तीच या लेखांची खरी प्रेरणा आहे हे उघड आहे. विज्ञानस्वरुपचिकित्सेबरोबरच दुसऱ्या एका आधुनिक पाश्चात्य जीवनमूल्याचा, दृष्टिकोनाचाही शंकरराव देवांनी मूलगामी शोध घेतला आहे. आजही आपल्यापुढे 'विज्ञान-तंत्रज्ञान-विकास' आणि 'इहलोकवादी दृष्टी' यांनी काही महत्त्वाचे प्रश्न नव्याने उपस्थित केले आहेत. या संदर्भात प्रस्तुतचे लेख उद्‌बोधक ठरतील असे वाटते.

## १. इहलोकपर जीवनदर्शनाला आलेलीं अनपेक्षित कटु फळें*

'नवभारता'च्या फेब्रुवारी व मार्च १९५८ च्या अंकांत प्रा. शहा यांनीं "ग्रामदान – एक मूल्यमापन" हे दोन लेख लिहिले आहेत. भूदान-यज्ञ आंदोलनाचा वा आरोहणाचा प्रारंभ, प्रचार व पहिला परिणाम असा झाला कीं, भारताची भूमि-समस्या सोडविणें हाच त्याचा प्रधान हेतु आहे असा सार्वत्रिक समज झाला व तें अगदीं स्वाभाविक होतें. परंतु गेल्या ६/७ वर्षांत या आंदोलनाचा जो विकास वा प्रगति झाली त्यावरून हें आंदोलन भारतांतील शेतीचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सोडवूं शकेल असें आपल्याला वाटत नाहीं असा प्रा. शहांनीं या लेखांतून आपला अभिप्राय प्रकट केला. प्रा. शहांनीं या आंदोलनाचा विचारपूर्वक जो हा निष्कर्ष काढला आहे तो किती वास्तववादी आहे याचा विचार होणें महत्त्वाचें असलें तरी तसें करणें या लेखाचें प्रयोजन नाहीं.

### जुन्या अध्यात्मवादाचें अधिष्ठान

"... परंतु ही चळवळ केवळ जमिनीचा प्रश्न सोडविणें एवढ्या मर्यादित हेतूनें चालविलेली नाहीं, तर तिच्या मागें एक समग्र जीवनदर्शनाची प्रेरणा आहे असें विनोबांनीं अनेकदां निक्षून सांगितलेले आहे". "... या जीवनदर्शनांत मनुष्यजीवनाच्या प्रत्येक महत्त्वाच्या प्रश्नावर स्पष्ट विचार आहेत. राज्यसंस्था, शिक्षण, कौटुंबिक संबंध, प्रजासंख्या, इत्यादि जटिल समया सर्वोदयी तत्त्वज्ञानांत एका विशिष्ट परंतु सुसंगत रीतीनें सोडविल्या आहेत...." (फेब्रु. पृष्ठ ५५ व ५६) असे प्रा. शहा यांनीं आपल्या लेखांत जें म्हटलें आहे तें बरोबर आहे. भूदानाचा व ग्रामदानाचा विचार व स्वागत करतांना हें आंदोलन जीवनदर्शनाचा आविष्कार आहे, त्याचा सखोल अभ्यास करूनच त्या विषयींची आपली विचाराची व कृतीची भूमिका ठरविणें न्यायाचें होईल एवढेंच नव्हे तर त्यांत सत्याचीं अधिक पूजा होईल, या प्रा. शहांच्या मताशीं मी स्वतः सहमत आहे. तसेंच "... योग्य भाषासंज्ञा व कणखर ध्येयवाद असला तर कोणत्याहि सामाजिक चळवळीचा तात्कालिक प्रभाव फार मोठा पडूं शकतो. परंतु दूरगामी परिणाम होण्याकरितां तिचा वैचारिक आशय काय आहे व समाजजीवनांत वेळोवेळीं निर्माण होणारे प्रश्न हाताळण्याकरितां ती कोठला मार्ग दाखविते या गोष्टींना अधिक महत्त्व आहे. या सत्याचा विसर पडल्यामुळें राजकारणांत अनेकदां वैफल्याचे प्रसंग येतात" (मार्च, पृ. ४९) हें प्रा. शहांचें विधानहि सर्वसाधारणपणें सर्वांना मान्य होण्यासारखेंच आहे. केवळ भावनेनें भारलें जाऊन विचाराला कमी महत्त्व देणाऱ्यावर अगर त्यांच्याकडें दुर्लक्ष करणाऱ्यावर वैफल्याचे प्रसंग येतात हा नियम सर्वच जीवनदर्शनांना लागूं आहे. प्रा. शहा यांनीं 'स्वतःचें' म्हणून जें जीवनदर्शन म्हटलें आहे तें दर्शनहि या नियमाला अपवाद कसें असेल? आज हें दर्शन वैफल्याच्या गर्तेत कसें रुतून बसलें आहे या गोष्टीकडे 'नवभारता'च्या विचारी वाचकांचें लक्ष वेधावें म्हणून सर्वोदय जीवनदर्शनावर प्रा. शहा यांनीं आपल्या या लेखांत जीं मतें मांडलीं आहेत त्यांपैकीं विशेषतः एकाच मतासंबंधींची एक दुसरी बाजू

* पूर्वप्रकाशन : *नवभारत*, वर्ष ११, अंक ८, मे, १९५८.

'नवभारता'च्या वाचकांच्या विचारार्थ या लेखांत मांडावी असें मी योजिलें आहे.

सर्वोदयवाद्याचेंच काय पण सर्वसाधारण भारतीयाचें जीवनदर्शन अजूनहि औपनिषदीय विश्वदर्शनावर आधारलेलें व रूढ अर्थानें आध्यात्मिक असें आहे अशी प्रा. शहा यांची तक्रार असून या परिस्थितीचें त्यांच्या मनाला मोठें दुःख आहे. याहून भिन्न असें म्हणजे "विज्ञानानें उपलब्ध करून दिलेल्या ज्ञानावर उभारलेलें, विज्ञानाची कार्यपद्धति हाच नवीन ज्ञान मिळविण्याचा एकमेव विश्वासार्ह मार्ग आहे असें समजणारें ऐहिक, भौतिकवादी व व्यक्तिस्वातंत्र्यवादी" (secular) जीवनदर्शन आपलें आहे असें प्रा. शहांनीं या लेखांत सांगितलें आहे. पाश्चात्यांचें म्हणजे आधुनिकांचें हेंच जीवनदर्शन असून सर्व भारतीयांनीं याच जीवनदर्शनाचा, त्याच्यांतील गुणदोषांची खंत न बाळगतां (ungrudgingly) स्वीकार करावा म्हणजे ते इतर जगाबरोबर विशेषतः सुधारलेल्या पाश्चात्य देशांबरोबर सुखाच्या व शांतीच्या मार्गावर सहयात्रिक होतील असें प्रा. शहा यांना खरोखर मनापासून वाटत असून आपल्या देशबांधवांना तसें आर्जवानें सुचवावें हाच हे दोन लेख लिहिण्याचा त्यांचा मुख्य हेतु आहे हें प्रा. शहा मान्य करतील असें मला वाटतें.

**पाश्चात्यांचा घटोत्कची बाजार**

विज्ञान आणि तंत्रविद्या (Science and Technology) हीं दोन जुळीं भावंडें आहेत व त्यांचा जन्म पश्चिम युरोपमध्यें तीनशें-साडेतीनशें वर्षांपूर्वी झाला. जुळ्या भावंडांत वडील कोणाला समजावयाचें यावद्दल सर्व ज्योतिषशास्त्रज्ञांत अद्याप एकवाक्यता झाली आहे असें वाटत नाहीं. कारण एक धारणेनें वडिल तर दुसरें जन्मानें वडिल अशी ही विलक्षण परिस्थिति असते. ते कांहींहि असो, विज्ञान व तंत्रविद्या आणि इहलोकपर जीवनदर्शन हीं जुळीं भावंडें आहेत याबद्दल सर्वांचें एकमत आहे. "लढाऊ राष्ट्रवादाच्या राजकीय गरजांमुळें पश्चिम युरोपांत कांहीं शतकांत उदयास आलेलें, विज्ञानाबरोबर विकास पावलेलें व व्यक्ति हीच अंतिम मूल्य असें समजणारें इहलोकपर (secular) जीवनदर्शन" असें प्रा. शहा यांनींहि म्हटलें आहे. विज्ञान व तंत्रविद्येबरोबर इहलोकपर जीवनदर्शनाचा स्वीकार न केल्यामुळें भारतीयांच्या जीवनांत एक विसंगति उत्पन्न झाली आहे असें प्रा. शहांनी जें म्हटलें आहे तें अगदीं बरोबर आहे. मात्र हा विसंगतीचा दोष फक्त आज भारतीय जीवनांतच निर्माण झाला आहे असें नसून ज्या ज्या पाश्चात्येतर देशांनीं या विज्ञान व तंत्रविद्येवर आरूढ होऊन वाढलेल्या पाश्चात्य संस्कृतीचा अथवा सभ्यतेचा (civilization) स्वीकार केला आहे त्या सर्वांच्याच जीवनांत ही विसंगति उत्पन्न झाली आहे व तिच्या अनंत यातना हे सर्व देश आज भोगीत आहेत हें प्रा. शहांनाहि माहीत असलें पाहिजे. पाश्चात्य तंत्रविद्या व त्यांतून निर्माण झालेली संस्कृति अंतिम सुखाचा व शांतीचा मार्ग आहे असा भ्रमात्मक विश्वास कांहीं वर्षांपूर्वी सर्वांनाच वाटत असल्यामुळें तिचा स्वीकार करणे कांहींना सुलभच काय पण लोभनीय वाटलें असले तर त्यांत अस्वाभाविक असें कांही नाहीं. परंतु विज्ञान व तंत्रविद्येबरोबर इहलोकपर जीवनदर्शनाचा स्वीकार करणें लोकांना तितकेसें सुलभ जात नाहीं याचें कारण त्यांचें स्वतःचें असें शेंकडो, हजारों वर्षांचें एक जीवनदर्शन, संस्कृति व जीवन पद्धति असते. स्वतःचें सर्व टाकून त्याच्याऐवजी परक्याचें घ्यावयाचें ही गोष्ट माणसाच्या मनाला तितकीशी अनुकूल असत नाहीं (disagreeable). विज्ञान व तंत्रविद्येवर आधारलेल्या आधुनिक पाश्चात्य संस्कृतीसाठीं पाश्चात्येतर लोकांनीं फार मोठी किंमत दिली असून ती आपल्याला अति महाग पडली आहे असा त्यांना हळूहळू अनुभव येत आहे. या संस्कृतीबद्दल एक प्रकारची घृणा (repellent) वाटत असूनहि त्यांच्यापैकीं बहुतेकांनीं तिचा नाइलाजानें स्वीकार केला असला तर त्याचें कारण असें कीं, ही पाश्चात्य संस्कृति अक्षर व अखेरची (definitive) असून ती परिपूर्ण व शाश्वत आहे अशी त्यांची प्रामाणिक समजूत होती. असें म्हणण्याचें कारण आज त्यांना प्रत्यक्ष अनुभव यांच्या विपरीत येऊं लागला आहे. हा सौदा 'जुनें देऊन नवें घ्यावयाचें' या घटोत्कची सौद्यासारखा मायावी महागडा ठरणार असें त्यांना आतां वाटूं लागलें आहे. या व्यापारांत पाश्चात्यांनीं पाश्चात्येतरांना जाणूनबुजून ठकविलें असें म्हणतां येणार नाहीं. कारण जगाच्या पेठेंत विक्रीसाठीं आपण जी ही संस्कृति ठेवली आहे ती आजपर्यंत कालाच्या उदरांत लुप्त झालेल्या व इतिहासांतून पुसल्या गेलेल्या पूर्वीच्या सर्व संस्कृतींहून अगदीं भिन्न आहे, ही संस्कृति परिपूर्ण व शाश्वत (perfect and permanent) असून ती अक्षर आहे – 'सा काष्ठा सा परा गतिः' – असा त्यांना संपूर्ण विश्वास वाटत होता. इतका कीं आपण निर्माण केलेली ही इहलोकपर विज्ञान व तंत्रविद्याप्रधान संस्कृति अखंड प्रगतीच्या मार्गावरील आपलें व आपल्याबरोबर सर्व जगाचें पाथेय ठरेल आणि मानवी जीवनांतून दुःखाची खातेवही आपण फाडूं व त्याच्या सुखाची गुढी आपण उभारूं असा तिचा 'डिंडिमा' ते पिटूं लागले होते.

**पाश्चात्य संस्कृति महासंकटांत**

पण १९१४ नंतर म्हणजे पहिलें महायुद्ध सुरू झाल्यापासून








पाश्चात्यांचा हा आत्मविश्वास डळमळला आहे. इहलोकपर जीवनदर्शन आणि विज्ञान व तंत्रविद्येवर आधारलेली आपली ही संस्कृति पूर्वीच्या संस्कृतींहून भिन्न नाहीं व तिच्या कपाळींहि विनाश लिहिलेला दिसतो या भीतीनें त्यांचा तिच्याबद्दलचा आत्मविश्वास पोखरला गेला आहे. इहलोकपर जीवनदर्शन आणि तंत्रविद्येचा स्वीकार केल्यापासून गेल्या २५०-३०० वर्षांत पाश्चात्य मनाची सुष्टतेची अथवा दुष्टतेची मात्रा फारशी कमी जास्त झाली नाहीं हें खरें; पण चांगलें अथवा वाईट करण्याची त्याची शक्ति अणुशक्तीमुळें पूर्वीपेक्षां अनंत पटीनें वाढली आहे. माणसानें निर्माण केलेली शक्ति त्याला शाश्वत शांति व सुखाकडे घेऊन जाईल किंवा सर्वनाशाकडेहि घेऊन जाईल. 'पापाचें मोल मृत्यू आहे' हें शाश्वत सत्य आहे, व आज जगांत ज्या घटना घडत आहेत त्यामुळें आजमितीला माणसाला या सत्याची तीव्रतेनें जाणीव झाली असली तरी माणसाचा अहंकार इहलोकपर जीवनदर्शनानें कमी केलेला नाहीं. विज्ञान व तंत्रविद्या यांच्या साहाय्यानें बाह्य निसर्गावर त्यानें आपलें जें अधिराज्य स्थापन केलें आहे त्यामुळें तो वाढलाच आहे. त्यामुळें प्राप्त शक्तीचा माणूस आत्मनाशासाठीं उपयोग करणारच नाहीं असें सांगतां येत नाहीं. या भीतीची तरवार त्याच्या मानेवर आज सतत टांगलेली असल्यामुळें पाश्चात्य जग व संस्कृति एका महान् आध्यात्मिक संकटांत (Spiritual Crisis) सांपडली आहे. आणि दैवदुर्विलास असा आहे कीं, गेल्या दोन अडीचशें वर्षांत बहुतेक साऱ्या जगानें या इहलोकपर जीवनदर्शनाचा आणि विज्ञान व तंत्रविद्याप्रधान संस्कृतीचा स्वीकार केला असल्यामुळे या संकटाला एका महान् प्रलयाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. अहेतुकपणें पण पश्चिमेनें सर्व जगाला खोड्यांत टाकलें आहे. तिनें सर्व जगाला अशी एक संस्कृति दिली आहे कीं, ती देण्याघेण्याच्या वेळीं तिच्या उदरांत दबा धरून बसलेल्या मृत्यूची कोणालाच कल्पना नव्हती. सतराव्या शतकांत पाश्चात्य संस्कृतीनें आपला नवा कायापालट केला. पूर्वापार चालत आलेल्या ख्रिश्चन धर्माचा त्याग करून तिनें इहलोकपरवादाचा (secularism) स्वीकार केला. या कायापालटामुळें पाश्चात्य माणसाच्या जीवनांत क्रांतीकारक बदल झाला. त्याच्या जीवनांत धर्माची जागा तंत्रविद्येनें व श्रद्धेची जागा बुद्धीनें घेतली. विद्यादेवीच्या हातांत सुखाची गुरुकिल्ली आहे, या एक प्रकारच्या श्रद्धेनें तिची बौद्धिक उपासना हें त्यानें आपल्या जीवनाचें मुख्य लक्ष्य बनविलें. या त्याच्या उपासनेला अगदीं अनपेक्षित असें फळ आलें असून तो व त्याच्याबरोबर सारेंच जग महान् संकटांत सांपडलें आहे. कारण पाश्चात्यांच्या गेल्या तीनशें-साडेतीनशें वर्षांच्या तंत्रविद्येच्या उपासनेचा एक परिणाम सारें जग एक होण्यांत झाला आहे. ज्या विज्ञान व तंत्रविद्येनें आणि इहलोकपर जीवनदर्शनानें मानवावर हें महान् संकट आणलें आहे त्यांच्यात मानवाला या संकटांतून मुक्त करण्याची शक्ति असेल असें म्हणणें म्हणजे स्वतःला स्वतःच्या खांद्यावर बसतां येईल असें म्हणण्यासारखें आहे. म्हणून तें बुद्धीला पटण्यासारखें नाहीं. ती शक्ति त्यांच्या बाहेर व भिन्न आणि श्रेष्ठ असली पाहिजे असेंच बुद्धि सांगते. ती शक्ति कोणती याचें अचूक ज्ञान व्हावयाला मानवावरचें सध्यांचे संकट कां व कसें आलें याची मीमांसा करणें उपकारक ठरेल.

सतराव्या शतकाच्या प्रारंभाला युरोपमध्यें ख्रिश्चन धर्मयुद्धाची धुमाळी माजली होती व धर्मवेड व धर्मछळानें कहर केला होता. धर्मकलहानें युरोपच्या सामाजिक जीवनाच्या चिरफाळ्या उडून गेल्या होत्या व युरोपीय मन अगदीं संत्रस्त होऊन गेले होतें. परलोकाप्रमाणें इहलोकावरहि ईश्वराचें राज्य स्थापन करण्याचे ख्रिश्चन धर्माचें अनेक शतकांचे सर्व प्रयत्न विफल झाले होते. माथेफिरूपणा व धर्मांधतेचा दुष्टपणा व दुष्कृत्यें पाहून विचारवंतांच्या मनाला किळस वाटूं लागली होती. तें विटून गेले, आणि माणसाला अशी आसुरी प्रेरणा देणारा ईश्वर राक्षस असला पाहिजे असें त्याला वाटूं लागलें असलें तर त्यांत नवल नाहीं. शांति व सुख ही माणसाची सदाची भूक आहे. आपली ही भूक मिटविण्याला धर्म असमर्थ ठरला आहे अशी युरोपांतील विचारवंताची वालंबाल खात्री झाल्यामुळें शांतीचा व सुखाचा एखादा नवीन मार्ग शोधण्याचा वाटेला तो लागला. त्यानें त्यासाठीं धर्माची आशा कायमची सोडली व परलोकावरून आपली नजर फिरवून त्यानें ती बाहेरच्या निसर्गाकडे वळविली. निसर्गाचें निरीक्षण व प्रयोगात्मक संशोधन (experimental method and scientific research) करणारे परस्परांमध्यें शांति, सहिष्णुता व स्नेह यांचा अनुभव करूं लागले. शनैः शनैः बाह्य सृष्टीवर मानवाचें साम्राज्य स्थापन करणे हा त्यांचा सर्वश्रेष्ठ जीवन पुरुषार्थ बनला. सृष्टीचे नियम सांभाळूनच सृष्टीवर साम्राज्य स्थापन करतां येतें हें सत्य माणसानें ओळखलें. या सत्याची कांस भौतिक सुखाच्या लाभार्थ त्याला कामधेनूची कांस ठरली. (पावा उत्कर्ष यज्ञानें। हा तुम्हां कामधेनुचि।).

### रिकामें हृदयसिंहासन

या सत्यसंशोधनांत त्याची बुद्धि हिलाच माणसानें आपलें एकमेव वाटाड्या बनविलें. सतराव्या शतकाच्या प्रारंभीं व मध्याला युरोपीय माणसाच्या हृयसिंहासनावरून ईश्वर व धर्म पदच्युत झाले तेव्हां त्या तख्तावर पुनः कोण आरूढ होणार हा महत्त्वाचा

अनुक्रमणिका






प्रश्न होता. कारण मनुष्य असा घडला आहे कीं, त्याचें जीवन व सर्व जीवनव्यापार यांना प्रेरणा देणारें व त्यांच्यावर सत्ता चालविणारें तत्त्व वा वस्तू ही त्याच्या हृदयसिंहासनावर आरूढ होऊनच हें महान् कार्य करते. म्हणून माणसाचें हें हृदयसिंहासन फार वेळ रिकामे राहूं शकत नाहीं. ज्याप्रमाणें शास्त्याशिवाय राज्यांत अराजक माजते त्याचप्रमाणें माणसाचें हृदयसिंहासन रिकामें राहिले तर त्याच्या जीवनांत अराजक माजतें व त्याचा शीघ्र विनाश होतो. माणसाची ईश्वरावरची श्रद्धा उडाली होती व धर्माच्या किंवा चर्चच्या सत्तेची (authority) एकप्रकारें चीड व वीट येऊन त्याचें मन तिच्या विरुद्ध एकप्रकारें बंड करून उठलें होतें. त्याच्या राजकीय क्षेत्रांत रोमच्या प्रेपिताच्या (Apostle) दैवी हक्कावरील (Divine right) अंधश्रद्धेची जागा लघु राज्याच्या (Parochial state) दैवी हक्कावरील अंधश्रद्धेनें (Uncritical faith) घेण्यापलीकडे कांहीं फरक झाल नाहीं. पण याच्या उलट अर्थ, तंत्रविद्या व बुद्धि या क्षेत्रांत त्यानें एक प्रस्थापित सत्ताच (प्रामाण्य) नव्हे तर सत्तेचें तत्त्वच झुगारून दिलें. सतराव्या शतकांत पश्चिमेकडील प्राचीन व अर्वाचीन यांमधील लढाईचा हा विषय अगर मुद्दाच बनला व याच्याच बरोबर पश्चिमेनें ख्रिश्चन धर्माचा व संस्कृतीचा वारसा फेकून दिला. या लढाईत 'जुन्या वा नव्या' सर्वच सत्ता-तत्त्वांचा विमोड होऊन बुद्धि, विज्ञान व तंत्रविद्या यांचा पूर्ण विजय झाला. बुद्धीच्या व प्रयोगाच्या निकपावर जें सत्य ठरेल तेंच सत्य हें पश्चिमेचें जीवनसूत्र बनलें. बुद्धि व प्रयोग (experiment) या शिवाय बाकी सर्व 'अप्रमाण' ठरलें व पाश्चात्य माणसाच्या जीवनांत धर्माची जागा तंत्रविद्येनें घेतली. बुद्धीच्या प्रकाशांत प्रयोगाच्या मार्गानें सृष्टीचें ज्ञान करून घेत गेलों म्हणजे सत्याची प्राप्ति हा फक्त कालाचा प्रश्न आहे अशी त्याला खात्री वाटूं लागली. या क्रांतिकारक बदलाचें सर्व श्रेय धर्मान्धतेकडे व धर्मवेडेपणाकडे जातें. ही क्रांति सुरू झाल्यापासून ती पूर्ण होण्याला दोनशें-अडीचशें वर्षे लागलीं. हें क्रांतिचक्र जेव्हां आपल्या संपूर्ण वेगानें फिरूं लागलें तेव्हां ईश्वराचें राज्य पृथ्वीवर आणण्यापेक्षां पृथ्वीवर स्वर्ग निर्माण करणें अधिक सुलभ आहे असा विश्वास पाश्चात्य मनांत निर्माण झाला.

पश्चिमेकडे धर्मोपासनेच्या जागीं तंत्रविद्येची उपासना सुरू झाली. त्याचे मुख्य दोन परिणाम झाले. पश्चिमेच्या संपत्तींत (wealth) व शक्तींत (power) पूर्वी कधीहि झाली नव्हती इतकी बेसुमार वाढ झाली व धर्माबद्दलची तिची असहिष्णु वृत्ति कमी झाली. याचा परिणाम असा झाला कीं, पश्चिमेतर जगाचा पश्चिमेकडे बघण्याचा दृष्टिकोन बदलला. पश्चिमेच्या पायाशीं बसून तिच्या या नव्या संस्कृतीचें पाठ घेणें त्याला सुलभ झालें. प्रारंभीं प्रारंभीं त्याला असें वाटलें कीं, या संस्कृतीपैकीं जेवढें आपल्याला आवश्यक तेवढेंच आपण घेऊं व बाकीचें आपण आपल्या पूर्वापार चालत आलेल्या संस्कृति अवशेषांचें जतन करूं; पण संस्कृतीच्या बाबतींत असें जुन्या नव्याचें कलम करणें शक्य नसतें हें लवकरच त्याच्या लक्षांत आलें. कारण प्रत्येक संस्कृतीचे अथवा जीवन पद्धतीचे जे निरनिराळे भाग असतात ते परस्परावलंबी असतात. त्यामुळें त्यांतला एक भाग घेतला कीं दुसरा, तिसरा असे सर्व भाग घेणें अनिवार्यच असतें. त्यामुळें पश्चिमेतर जगाची पश्चिमेची ही नवीन संस्कृति घेण्याची जी प्रक्रिया सुरू झाली तिचा अंत ज्या पश्चिमेतर जगानें यापूर्वी पश्चिमेची परलोकपर धार्मिक संस्कृति झिडकारली होती त्यानें पश्चिमेची ही इहलोकपर तंत्रविद्यामूलक संस्कृति सर्वस्वी स्वीकारण्यांत झाला.

### अपघातांत सांपडलेलें आधुनिक जग

पण याचा एक अटळ परिणाम असा झाला कीं, पाश्चात्य जगानें तयार केलेल्या गाडींत त्याच्या बरोबर पश्चिमेतर जग बसल्यापासून एकंदर २५०-३०० वर्षे या गाडीनें प्रवास केल्यानंतर तिला जो भयंकर अपघात झाला त्यांत पश्चिमेच्या लोकांबरोबर सर्व जगांतले लोक सांपडले!

इहलोकपर जीवनदर्शन व तंत्रविद्या या दोन रुळांवरून चाललेली, अटळ विश्वास हा ड्रायव्हर व बुद्धि हा गार्ड असलेली अर्वाचीन पाश्चात्य संस्कृतीची ही गाडी पृथ्वीतलावरील स्वर्गाचें राज्य या टर्मिनसला पोहचण्यासाठीं गेलीं शें-दोनशें वर्षे वाढत्या तुफान वेगान प्रवास करीत असतां ती एकाएकीं रुळावरून एकदम घसरली व तिला – प्राणघातकी ठरेल असा – एक मोठा अपघात झाला व जवळ जवळ गेलें अर्धे शतक या गाडींतले सर्व जगांतले प्रवासी – एंजिन व गाडीचे अनेक डबे यांचा चुराडा होऊन त्यांच्या ढिगांत – गुदमरून गेलेले असून त्यांतून ते सहीसलामत बाहेर पडतात कीं, त्यांतच त्यांची इहलोकीची यात्रा संपते या भीतीने जगांत आकांत माजला आहे याची जाणीव व माहिती प्रा. शहांना नाहीं असें कसें म्हणतां येईल? पण त्यांचे दोन लेख वाचले तर असा कांहीं भयंकर अपघात झाला आहे व मानवावर युगान्त ओढवला आहे असें कांहीं त्यांना वाटत आहे असें मुळींच दिसत नाहीं. डेन्मार्कच्या राज्यांत सर्व कांहीं ठीक चाललें असें प्रा. शहांना सुचवावयाचें आहे असें मी म्हणणार नाहीं; पण जें चाललें आहे त्या किरकोळ कटकटी आहेत, त्यांना फारसें भिण्याचें कारण नाहीं व त्यासाठीं माणसानें दुसरा

जीवनमार्ग शोधण्याची गरज नाहीं असें सांगण्याचा किंवा भासवण्याचा त्यांच्या या दोन लेखांचा 'डौल' आहे! प्रा. शहा लिहितात : "आजच्या युगाचीं कांहीं व्यवच्छेदक लक्षणें – यंत्रविद्येला आलेलें स्थायी महत्त्व, मोठमोठ्या जनसमूहांचे परस्पर गुंतले गेलेले हितसंबंध व त्यामुळें शासनसंस्थेला आलेलें सर्वव्यापी अभूतपूर्ण महत्त्व, सर्वसामान्य मनुष्याला समतेची व आर्थिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या समृद्ध जीवन जगण्याची उत्पन्न झालेली दुर्दम्य आकांक्षा, व ही आकांक्षा वाढत्या प्रजासंख्येच्या संदर्भात पूर्ण करण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या नियोजनामुळें व्यक्तिस्वातंत्र्याला उत्पन्न झालेला धोका – अशीं दाखवितां येतील, व या समस्या सोडवावयाच्या असतील तर अगोदर त्यांचें अस्तित्व मान्य केलें पाहिजे" (मार्च, पृ. ५१) त्याचप्रमाणें, "आपल्याकडे आधुनिकतेला होणारा विरोध जुन्या संस्कृतीचा मृत्युविलाप आहे, असें वाटतें. हा फरक पाश्चात्य व पौर्वात्य देशांत होणाऱ्या आधुनिक संस्कृतीवर होणाऱ्या टीकेंत सुद्धां दिसून येतो. समाजवाद, मार्क्सवाद, पक्षीय राजकारण, यंत्रविद्या इत्यादींवर टीका करतांना तिकडील विचारवंत आधुनिक अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, मानसशास्त्र, विज्ञान, इत्यादि शास्त्रांनीं उपलब्ध करून दिलेले ज्ञान गृहीत धरून बोलतात. या उलट आपल्याकडे सर्वसाधारण समज असा दिसतो कीं, कांहीं नीतिमूल्यें मान्य केली व तीं कृतींत उतरावयाचा मनापासून प्रयत्न केला कीं, ज्ञानाची – आणि तीं 'पुस्तकीं' ज्ञानाची – गरज नाहीं. ही गोष्ट केवळ सर्वोदयवाद्यांची आहे, असें नाहीं. हा आपल्या सामाजिक जीवनाचा मोठा दोष आहे". (मार्च, पृ. ५५-५६) प्रा. शहांचें हे विचार वाचले म्हणजे पाश्चात्य संस्कृतीवर व तिच्या बरोबर सर्व जगावर आज जें संकट आलें आहे त्याची 'रौद्रता' ते फार कमी मानीत आहेत व त्यांचें मूल्यमापन सखोल व वास्तववादी नाहीं असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. इहलोकपर तंत्रविद्याप्रधान पाश्चात्य संस्कृतीचा स्वीकार केल्यामुळें आज सारें जग ज्या संकटांत सांपडलें आहे त्यामुळें मानवाचें जीवन 'अशाश्वत' झालें आहे व त्याच्या जीवनवृक्षाचीं मुळेंच मुळीं इतकी हादरून गेली आहेत कीं, तो उन्मळून पडतो की काय असा संभ्रम निर्माण झाला आहे. मानवी जीवनांत आज एक मोठी पोकळी निर्माण झाली आहे व ती भरून कशी काढावयाची हा आजच्या माणसापुढें जीवनमरणाइतकाच महत्त्वाचा प्रश्न आहे. भिंतीला लहान लहान भोकें पडलेलीं नाहींत की तीं चुन्यामातीच्या गिलाव्यानें भरून काढतां येतील. भिंतीला एक मोठें भगदाड पडलें आहे. इतकें मोठें की दुसरी नवी भिंत बांधणेंच आवश्यक झाल्यासारखें वाटतें.

बुद्धि व प्रयोगात्मक संशोधन यांच्या साहाय्यानें माणसानें बाह्यसृष्टीवर आपलें अबाधित व अजिंक्य अधिसाम्राज्य स्थापन केल्यामुळें –

इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम्।
इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम्।।
असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि।
ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोहं बलवान् सुखी।।
आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया।
यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः।।

(गीता – १६, १३-१४-१५)

– असें माणसाला वाटूं लागलें नसलें तरच आश्चर्य म्हटलें असतें. हा मानवी अहंकार ईश्वरी साक्षात्कारच ठरला असता. 'जैसे पितळेचि काळिमा उडवितां। मग ते पितळचि पावे सुवर्णता'। पण हा काळिमा मुळीं पितळ याचा स्वभावगुण आहे. माणसाच्या अखंड प्रगतीच्या मार्गांत आतां कसलाहि अडथळा येणार नाहीं व शाश्वत सुखाच्या आणि शांतीच्या निधानाचा तो स्वामी निःसंशय होणार हें मानवाचें स्वप्न आतां भंग पावलें आहे. कारण बाहेरचें जग जिंकल्यावर किंवा जिंकत असतांनाच माणसाची दृष्टि त्याच्या स्वतःच्या अंतःसृष्टीकडे वळली. परिणामतः ज्या विज्ञानानें बाह्य सृष्टीच्या संशोधनांत तिच्याबद्दलचा गूढपणा माणसाच्या मनांतून काढून टाकला होता त्याच विज्ञानानें माणसाच्या अंतःसृष्टीच्या संशोधनांत तोच गूढपणा त्याच्या मनांत पुनः निर्माण केला! अणुशक्तीचा शोध व उपयोग करण्याची तंत्रविद्येची ही पार्श्वभूमि आहे.

जो तंत्रविद्याविशारद एक वेळ पश्चिमचें दैवत बनला होता त्याचेंच आतां माणसानें आपल्या हृदयाच्या भयसरोवरांत विसर्जन केलें आहे. तोच तंत्रविद्याविशारद आज अणुशक्तीच्या शोधामुळें खलपुरुष बनला आहे. तो स्वतःचें स्वातंत्र्य गमावून बसला आहे व मानवाचें स्वातंत्र्यच काय पण जीवनच त्यानें धोक्यांत आणलें आहे. शाश्वति, सामाजिक न्याय व श्रेष्ठ भौतिक राहणी अशा आज माणसाच्या तीन मुख्य मागण्या आहेत, आणि मूल्य दिल्याशिवाय कोणतीहि वस्तू मिळत नाहीं असा निसर्गाचा नियम आहे. या तीन वस्तू स्वातंत्र्याचें मूल्य दिल्याशिवाय माणसाला मिळूं शकतील कां? संभव कमी दिसतो. स्वातंत्र्याचें मोल देऊन माणसानें या तीन वस्तू मिळविल्या तर त्याला सुख व शांति स्थिरकाल लाभेल कां? आजपर्यंतच्या माणसाच्या स्वभावाचा अनुभव तसें खात्रीनें सांगत नाहीं. मग या मागण्या व त्यांचें मोल यांच्यामध्यें संगति वा सामंजस्य उत्पन्न होऊन तीं एकत्र नांदतील अशी परिस्थिति येईल कां? सध्यांची इहलोकपर,

तंत्रविद्यामूलक पाश्चात्य संस्कृति हा महान् यक्षप्रश्न सोडविण्याला समर्थ आहे कां? त्यासाठीं तिच्यांत कांहीं क्रांतिकारक बदल करावे लागतील कीं त्यासाठीं एका नवीन संस्कृतीलाच जन्म द्यावा लागेल? या यक्षप्रश्नाचें धर्माकडून उत्तर मिळेल तरच माणूस आपल्या मानस सरोवरांतील शांतीच्या व सुखाच्या चैतन्यदायी जलाचें प्राशन करूं शकेल.

॥ ॥ ॥

## २. विज्ञानाचें विश्वरूपदर्शन*

ज्यानें विज्ञानाच्या भव्य मंडपाची आंखणी केली व मुहूर्तमेढ रोंवली त्या गॅलिलिओनें संशोधनाच्या सोयीसाठीं सर्व विषयाचे (data) मुख्य व दुय्यम गुण (Primary and Secondary characteristics) असे दोन विभाग केले. रूप, गति, शब्द व भरीवपणा यांपैकीं रूप व शब्द हे सृष्टीचे गुण त्याने बाजूला ठेवले आणि भरीव व गतिमान् सृष्टीचा (solid and moving world) अभ्यास व संशोधन त्यानें सुरू केलें. या 'बहुरत्ना', संपन्न व सुंदर वसुंधरेचा एकसमयावच्छेदेंकरून अभ्यास करणें त्याच्या बुद्धीला सोयीचें नव्हतें. संशोधनविषय जितका साधा व मर्यादित तितकें चांगलें! ख्रिश्चन चर्च या संशोधनाच्या विरुद्ध होतें. तें या कार्याच्या आडवें आलें. त्या वेळची परिस्थितीच अशी होती कीं, विज्ञानाला चर्चशीं समझोता करावा लागला. दोघांनीं विश्वाची वांटणी केली व आपल्या सरहद्दी ठरविल्या. संशोधनाच्या व प्रयोगाच्या सोयींसाठीं मुख्य व दुय्यम गुण असा जो केवळ तात्पुरता व आत्मनिष्ठ (subjective) विभाग कल्पिण्यांत आला होता तोच वस्तुनिष्ठ (objective) व कायमचा ठरवला गेला. "धर्म व नीति यांच्या प्रभावामुळें मुळांत आत्मनिष्ठ मानलें गेलेलें हें वर्गीकरण वस्तुनिष्ठ व अनिर्बंध (absolute) स्वरूपांत स्वीकारणें विज्ञानाला भाग पडलें." आणि अशा रीतीनें सृष्टींतून सचेतनाची-मनाची (mind) हकालपट्टी झाली. विज्ञानाचा पाया घालणाऱ्या पुरुषाची तशी इच्छा नव्हती, हें येथें लक्षांत ठेवलें पाहिजे; पण या समझोत्याचा परिणाम आत्मा व शरीर वेगळें होण्यांत झाला. आत्मा अभ्यासाचा व संशोधनाचा कधींहि विषय होऊं शकत नाहीं, या वैज्ञानिकांच्या वचनावर चर्चेने सर्व सचेतन व मानवेतर प्राणिसृष्टी व मनुष्याचें शरीर येवढें त्यांना संशोधन व प्रयोग यासाठीं मोकळें मैदान सोडलें व प्राण्यांच्या व मानवी शरीराची चिरफाड करण्याला त्यांना इजाजत दिली. न्यूटननें आपल्या गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धांताने बाह्य सृष्टींतून सचेतनाला व ईश्वराला झालेल्या हद्दपारीच्या शिक्षेवर अखेरचें शिक्कामोर्तब केलें. जे काम न्यूटननें अचेतन व जडसृष्टीत केलें तें काम अगदी बेमालुमपणें डार्विननें विकासवादांतील आपल्या "नैसर्गिक निवड" (Natural Selection) आणि "क्षमतमांची अक्षोणता" (Survival of the fittest) या सिद्धान्तांच्या योगानें प्राणिसृष्टीत (biology) केलें. निसर्ग व मनुष्य यांच्यामध्यें विज्ञानानें निर्माण केलेलें अंतर व भेद फार काळ टिकणें शक्य नव्हते. बाह्यसृष्टि संपूर्णतया जड असून तिचा व्यापार यांत्रिक नियमांप्रमाणे चालतो हें पदार्थविज्ञानानें निर्विवाद सिद्ध केलें होतें. एवढें प्रचंड विश्व जर एक यंत्र असेल तर त्यांतील लहान लहान पशुपक्षी व मनुष्य याला अपवाद कसे असूं शकतील? जे जड नियम विश्वाला लागूं असले पाहिजेत तेच नियम प्राण्याला व मानवाला लागू असले पाहिजेत, असें त्यांनीं मानले असलें तर त्यांत त्यांना कसा दोष देतां येईल? मनुष्य व निसर्ग अभिन्न आहेत म्हणून विश्वाचे नियम माणसालाहि लागूं आहेत ही विचारसरणी तर्कशुद्ध वाटते! "शेष विश्व त्यांत अंतर्भूत असलेल्या नियमानुसार चालते, त्याचा कोणी कर्ता किंवा नियंता नाहीं", या आपल्या श्रद्धेंत प्रा. शहांनीं ज्या विश्वनियमांचा नामनिर्देश केला आहे ते नियम बहुधा हेच असावेत असें मी समजतों. डार्विनच्या नैसर्गिक निवडीच्या तत्त्वानें विश्व व मानव यांच्यामधील पूर्वीचा सांधा पुनः जोडला. मनुष्य हा इतर प्राण्यांप्रमाणेंच एक प्राणी आहे; विश्वाचा सर्व व्यापार आंधळा आहे तसाच तो सर्व जीवांचा असला पाहिजे. कारण, अचेतनांतून सचेतन निर्माण झाले होते. अशा रीतीनें प्रथम जड सृष्टि, मग जीवसृष्टि आणि अखेर माणसाचें मन अशा एकामागून एका क्षेत्रांतून धर्माची पिछेहाट झाली. फ्रॉइडनें माणसाच्या हृदयांतील सद्धर्माची व सत्कर्माची प्रेरणा माणसाच्या अंतर्मनांत दडून राहिलेल्या त्याच्या अतृप्त कामवासनेचें उदात्तीकरण आहे या मनोविश्लेषण शास्त्रांतील आपल्या शोधानें धर्माच्या शेवटच्या बालेकिल्ल्यास सुरुंग लावला.

* पूर्वप्रकाशन : *नवभारत*, वर्ष ११, अंक ९, जून, १९५८.

सर्व सृष्टि जड व अचेतन असली व तिच्या व्यापाराचे सर्व नियम आंधळेपणानें काम करीत असले तरी माणसाच्या हृदयांत परमेश्वर वसतो व मनुष्य निसर्गतः चांगला आहे या सिद्धान्तावर पाश्चात्य उदारमतवाद वा मानवतावाद खरोखर उभा होता. परंतु न्यूटन, डार्विन व फ्रॉइड यांच्या पदार्थविज्ञान, जीवशास्त्र व मनोविश्लेषणशास्त्र यांतील शोधांनीं उदारमतवादाच्या पायाखालची भूमि हळूहळूं घसरत होती. जीवनाला कांहीं उदात्त हेतु राहिला नाहीं. "वळी तो कान पिळी" हा जीवनाचा धर्म बनला. सुखाचा, आणि तोहि केवळ भौतिक सुखाचा, शोध व त्यासाठीं उपकरणीं व साधनें वाढविणें व प्राप्त करणें एवढी एकच गोष्ट उदारमतवादांत शिल्लक राहिली. आज याचा परिणाम असा झाला आहे कीं, मानवाच्या प्रगतीच्या मार्गावर अनुल्लंघनीय असा पहाड आडवा आला आहे. आंतरराष्ट्रीय जगांत अराजक माजलें आहे. आंतरराष्ट्रीय जग एकाप्रकारें राष्ट्रीय जीवनाचाच प्रक्षेप (projection) होय. या सर्वांच्या बुडाशीं विज्ञानाच्या दृष्टिकोनावद्दलचें आजच्या माणसाचें गाढ अज्ञान हें आहे. मनुष्यासह सर्व विश्व जड आहे असें विज्ञान सांगतें, अशी माणसाची अजूनहि भ्रामक समजूत आहे. विज्ञानांत विलक्षण प्रगति झाली असून विश्वावद्दलच्या वैज्ञानिकाच्या दृष्टिकोनांत क्रांतिकारक फरक झाला आहे. हें ज्ञान त्याच्या गांवापर्यंतहि अद्याप पोंचलेलें नाहीं. सत्यज्ञानाची लब्धि झाली तरी त्याचीं किरणें माणसाच्या बुद्धींत प्रविष्ट होऊन तीं ढवळून निघणें व माणसाच्या विचारांत परिवर्तन होऊन त्याच्या दृष्टिकोनांत वदल होणें व तो त्याच्या आचारांत प्रतिबिंबित होणें या प्रक्रियेला दीर्घ काल लागतो. माणसाच्या शरीराची लांबी फक्त साडेतीन हात असली व शरीरांतच त्याच्या बुद्धीची व मनाचीं स्थानें असलीं तरी बुद्धीचा व मनाचा योग होण्याला कधीं कधीं शतकेंहि लागतात. दोन डोळे इतके जवळ असूनहि त्यांची कधीं भेट नाहीं. बुद्धि व हृदय यांची स्थिति अशी जरी नसली तरी त्यांची भेट तितकी सहजसुलभहि पण नाहीं.

प्रकृति जड व आंधळी आहे हा विचार विज्ञानाच्या क्षेत्रांत फार जुना झाला आहे. अचेतन सृष्टि व तिचे सर्व नियम यांचा उलगडा करून तिचें सम्यक् दर्शन घडवून आणण्याला न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणाचा सिद्धान्त अपुरा पडत आहे ही गोष्ट अनेक वर्षांपासून वैज्ञानिकांच्या लक्षांत येऊं लागली होती. प्रकाशावर केलेल्या प्रयोगांवरून असें आढळून आलें कीं, "न्यूटनप्रणीत नियम हे सर्व घटनांचा उलगडा करण्याच्या दृष्टीनें असमर्थ होत". त्याचा परिणाम असा झाला कीं, "... वैज्ञानिकांचें सर्व लक्ष प्रकाश, विद्युत् व लोहचुंवकत्व या क्षेत्रांवर केंद्रित झालें; आणि अन्य भौतिक गतींचा गुरुत्वाकर्षणाच्या नियमानें लावलेला अर्थ व या क्षेत्रांतील घटना या सर्व एखाद्या सामान्य नियमाच्या कक्षेंत आणतां येतील कीं काय याचा विचार होऊं लागला. प्रकाश हा कण वा लहरी अशा द्विविध स्वरूपांत वावरतांना दिसून आला... शिवाय त्याचें स्वरूप प्रवाही नसून तो विंदु किंवा शक्तिपुंजांच्या – फोटॉन्सच्या – रूपानें जातो असेंहि आढळून आलें."

मध्यंतरीं "जडाला पूर्णपणें कावूत आणलें, जिंकलें असल्याची जी समजूत होती तिलाहि धक्का बसला; व तें वंडखोर वनून मर्यादा उल्लंघूं लागलें. अणूंच्या विश्लेषणांतून विद्युदणु (Electron) व प्राणू (Proton) यांचा शोध लागला. आणि त्यांच्या विश्लेषणांतून ते जड नसून विद्युत्भार (Charges of electricity) आहेत असें दिसून आलें. जडवाद येथेंच संपुष्टांत आला". "१९२७ सालीं हैसेन्वर्गचा 'अनिश्चितता सिद्धान्त' पुढें आला. आणि त्याच्या योगानें विद्युदणूची गती व परिमाण हे जरी अत्यावश्यक गुण असले तरी ते दोन्ही एकाच वेळीं कळूंच शकत नाहींत असें सिद्ध झालें. आणि हे दोन्ही गुण कळले नाहींत तर विद्युदणूचें स्वरूप अनिर्वचनीयच राहतें; स्थितिशील विद्युदणु म्हणजे काय हें कोणीहि सांगूं शकणार नाहीं. तो जेव्हां गतिमान होऊन त्यापासून तेजोद्गिरण सुरू होतें तेव्हांच त्याचें आकलन होऊं शकतें. यामुळें परिमाणाप्रमाणेंच गति हाहि त्याच्या स्वरूपाचा आवश्यक भाग होय. तथापि यांतील एकाचें आकलन होत असतांना दुसरा भाग आपल्या आकलनांतून निश्चितपणें सुटतोच असें हैसेन्वर्गनें दाखवलें आहे. जडाचें स्वरूप यंत्राकार (mechanomorphic) आहे असें निश्चितपणें म्हणायचें झाल्यास वा भौतिक विश्वाचें यथार्थ चित्रीकरण किंवा वर्णन करावयाचें झाल्यास हे दोन्ही भाग समजणें अत्यंत आवश्यक आहे. त्यावांचून तसा प्रयत्न केल्यास तोंडांतील हाडाचा तुकडा टाकल्यावांचून पाण्यांतील प्रतिबिंबित तुकडा घेऊं पहाणाऱ्या इसापच्या कुत्र्यासारखी अवस्था होणें अपरिहार्य आहे."

"आधुनिक युगांतील पदार्थविज्ञानाचा प्रयत्न जडाचें मूळ स्वरूप व वर्तनक्रम यांचा शोध करणे हा आहे. हें संशोधन या पिढींत पूर्ण झाले आहे. जडाची विभागणी करतां करतां तें मुळांतच नाहीं झालें असें त्याच्या अंतिम स्वरूपावद्दल म्हणता येईल. त्याचें अंतिम स्वरूप म्हणजे ज्याला शक्ति असें म्हणता येईल असें अभौतिक तत्त्व होय; पण त्याच्या मूळ वर्तनाचें काय? कार्यकारणभावानें, त्यांतील अपरिहार्य आवश्यकतेनें जसें जडाचें वर्तन नियंत्रित होतें तसेंच या शक्तिवद्दलहि म्हणता येईल काय? तसें दिसत नाहीं असेंच आपणास प्रामाणिकपणे कबूल केलें पाहिजे. खरोखर हैसेन्वर्गनें तर असें सिद्ध केलें आहे कीं,

हा कार्यकारणभाव यापुढे केव्हांहि प्रस्थापित करणें अशक्यच होईल." "न्यूटनप्रणीत जुनें गतिशास्त्र पदार्थविज्ञानानें नाहीसेंच केलें आहे. सृष्टीच्या अंतिम स्वरुपाचें यांत्रिकतेच्या आधारें वर्णन करणें यापुढें अशक्य आहे. रसायन, शारीरशास्त्र व मानसशास्त्र ही सर्व शास्त्रे पदार्थविज्ञानावर उभीं आहेत. खालचा आधारच निसटला तर वरची इमारत कशी व किती वेळ उभी रहाणार?"

जीवरसायनविद्ये (Biochemistry) ने कांहीं काळ या शास्त्रांना पुनः थोडा आधार दिला. हें नांवच मुळीं सचेतन सृष्टीच्या क्षेत्रांतच यांत्रिक दृष्टिकोणाचा विजय सूचित करणारें आहे. शरीर हें अनेक साध्या भौतिक मूलद्रव्यांचें मिळून बनले आहे असें त्यायोगें मानण्यांत येऊं लागले. एखाद्या आचाऱ्यानें तयार केलेल्या पदार्थांतील द्रव्यांप्रमाणेच या विलक्षण वस्तूंतील मूल द्रव्यांचीहि यादी करण्यांत येऊं लागलीं. हीं विविध साधीं द्रव्यें या शरीररूपी पुडिंगसाठीं आवश्यक त्या प्रमाणांत घेतलीं, एकत्र मिसळलीं आणि फसफस (ferment) होऊं दिलीं कीं काम झालें. सजीव घटक (living tissue) तयार करणें आतां शक्य झाल्यासारखें दिसूं लागले. त्यांतील कठिणतर निम्मा भाग तर प्रत्यक्ष साध्यच झाला; व तो म्हणजे ते कशाचे बनलेले आहेत हें शोधणें हा होय. हीं द्रव्यें अगदीं साधींच असतात. तीं एकत्र मिसळण्याचें ठरलेलें निम्में काम हें फारसें कठिण नाहीं असें वाटूं लागलें.

तथापि सचेतनाच्या क्षेत्रांत सकृतदर्शनीं दिसणाऱ्या अडचणी सहज सुटल्याचीं व उलट सुलभ वाटणाऱ्या घटनेनें अनुल्लंघनीय अडचणीचें स्वरूप धारण केल्याचीं अनेक उदाहरणें आढळतात. एखाद्या जीवपेशींत (cell) कोणकोणतीं द्रव्यें आहेत हें एकादा विद्यार्थीहि सांगूं शकेल; परंतु हींच द्रव्यें पुनः एकत्र मिसळून त्यांतून पुनः जीवपेशी निर्माण करणें कोणाहि प्राध्यापकाला देखील शक्य नाहीं. आणि जीवपेशीचीं रचना व तिचीं घटकद्रव्यें यथार्थ रीतीनें आकलन झाल्याचें (दुसरी गोष्ट) हेंच तर खरें गमक आहे. घड्याळाचे सारे भाग एकमेकापासून सुटे करण्यानें एखाद्या घड्याळजीचें घड्याळाबद्दलचें ज्ञान सिद्ध होत नाहीं. तो जेव्हां हे भाग पुनः एकत्र जुळवून चालूं घड्याळ तयार करतो तेव्हांच त्याचें कसब आपल्या प्रत्ययास येतें. "कुजत असलेल्या शरीरांतून आपोआप नवनव्या जीवाची उत्पत्ति होते हा जडवाद्यांचा एक भ्रम आहे असें पाश्चरनें दाखवून दिलें आहे. जीवांतूनच जीव निर्माण होतो. अशा निर्मितीच्या सामर्थ्याचा पूर्ण अभाव म्हणजे जिवंतपणाचाच अभाव होय. जीवपेशी निर्माण करण्याचा प्रश्न अजून कोणासहि सोडवितां आलेला नाहीं; वा तो कसा सोडवावा हेंहि दाखवितां आलेलें नाहीं"... "सर्व उत्क्रांतिवाद हा जाणीवरहित शक्तींच्या क्रियाप्रक्रियांतूनच झाला आहे या श्रद्धेनें जीवशास्त्रांत जड यंत्रणेच्या कल्पनेचें अबाधित अधिराज्य स्थापन केलें होतें". "क्रोपॉटकिन् व इतर निसर्गवाद्यांनीं रानटी जीवनांत देखील परस्पर साहाय्य व सहकार्य यांचा फार मोठा वाटा होता असें दाखवून दिलें." पण त्यांचें ऐकतो कोण?

"अचेतन सृष्टीचा विकास ज्याप्रमाणें कांहीं शक्तींच्या योगानें यदृच्छया घडून आला त्याचप्रमाणें जाणीवरहित शक्तींच्या क्रियाप्रक्रियांतून सर्वच प्रगति वा विकास झाला असें डार्विनचें प्रतिपादन होतें. मनुष्य हा देखील अशा प्रकारें यदृच्छेनेंच निर्माण झाला असून त्याला निराळें वस्तुनिष्ठ अस्तित्व नाहीं. मानवाला त्याच्या उद्भवाला जबाबदार असलेल्या शक्तींपेक्षां अधिक योग्यता प्राप्त होणें शक्यच नव्हतें. आणि त्या शक्तींचें महत्त्व इतकेंच कीं, त्यांनीं माणसाला प्राणी या नात्यानें जिवंत रहाण्यास साहाय्य केलें."... "एकाद्या डुकराच्या तोंडाप्रमाणेंच माणसाचें मन हें अन्नप्राप्तीचें साधन आहे. आणि विश्वाचा अर्थ वा सत्याचें स्वरूप आकलन करण्याचें दोहोंचेंहि सामर्थ्य सारखेंच! अर्थात् या चित्रांत मानवी मनाची विश्वांतून हकालपट्टी झाली असल्यास नवल नाहीं!!"

"कोणत्या तरी स्वरूपाची उत्क्रांति झाली हें निश्चित. तथापि वाढत्या ज्ञानामुळें उत्क्रांतीस मान्यता देणारें पण ती सिद्ध करणें कठीण आहे असें प्रतिपादन करणारें तत्त्व आपणांस स्वीकारावें लागतें. उपसरण (convergence) व बहुद्भव (polyphyle) हें तें तत्त्व होय. विविध प्रकारें उत्पन्न झालेले भिन्न भिन्न प्राणिमात्र कालांतरानें एकमेकांच्या इतके जवळ आले कीं, त्यांची उत्पत्ति एकाच सामान्य पूर्वजांपासून झाली असावी असें वाटावें हें तें तत्त्व होय, उपसरण (convergence) चें हें तत्त्व डार्विनप्रणित लोकप्रिय झालेल्या उत्क्रांति तत्त्वाच्या अगदीं उलट आहे. या विशिष्ट तत्त्वांचा "एकाच साध्या स्वरूपांतून (form) विविध स्वरूपें उद्भवलीं" असा आशय आहे."

"उपसरण (convergence) या तत्त्वानें नव्या जीवशास्त्रांत दुसरीहि एक महत्त्वाची भर पडूं शकते. एक तर त्यायोगें डार्विनच्या कल्पनेपेक्षां उत्क्रांति कितीतरी अधिक व्यापक स्वरूपाची होती हें स्पष्ट होतें, व दुसरें म्हणजे, एच्.एफ्. ऑस्बोर्न व अन्य अधिकारी शास्त्रज्ञांनीं म्हटल्याप्रमाणें, उत्क्रांतीच्या मागें हेतु असल्याचा पुरावा वा जीवनाच्या उद्दिष्टाचें चिन्ह त्यांतून सूचित होतें. अनेक निरनिराळ्या जातीचे प्राणी एकाच उच्चतर श्रेणीकडे जाणें, भिन्नभिन्न आरंभ असूनहि त्या सर्वांच्या ठिकाणीं हें उच्चतर स्वरूप प्राप्त करून घेण्याचें सामर्थ्य असणें याचाच अर्थ आपणांस जीवनांतील नियंत्रक शक्तीस डावलून देतां येणार नाहीं असा

आहे. केवळ अंधस्पर्धा किंवा जीवनकलहांतली अधिक हिताचें स्थान अशा कल्पनांनीं हा अर्थ लागणार नाहीं." "लिनॅकस्, बूफाँ, गटे इत्यादि अनेक रचनात्मक विचारवंतांचीहि उत्क्रांतितत्त्वावर श्रद्धा होती. किंवहुना ऑगस्टीनला सुद्धां असाच प्रकारचा विचार मान्य असावासें दिसतें. जीवनावद्दलचा हा दृष्टिकोन बुद्धिवादी व पुराव्यावर आधारलेला आहे. अर्थात् ही कथा आपणांस वाटते त्याहून कितीतरी विस्तृत आहे. जीवनवृक्ष हा एकाद्या ताडासारखा नसून विशाल वटवृक्ष आहे. त्याच्या फांद्या मूळ धरतात व कालांतरानें त्यांचे बुंधे बनतात. मात्र पुष्कळच प्रगति झाली आहे हें मात्र खास!"

"उत्क्रांति हा निश्चितच एक नैतिक दृष्टिकोन आहे. एकाद्या श्लेष्मा (slime) मध्यें सुरू होणाऱ्या सूक्ष्म हालचालीच्या रूपानें प्रकटणारा जीव हा त्याचा पाया असून मानव हें त्याचें शिखर आहे. आकलनशक्ति व निष्ठा हीं जीवनांतच निर्माण झालीं आहेत. त्यांत अत्यंत विशाल प्रगति आहे. आणि निसर्गवादी धर्मशास्त्रानें या प्रगतींत माणसाचा हात नव्हता हें स्पष्ट केलें आहे. तर मग हें कार्य झालें कसें? तें घडवून आणणारी शक्ति लहानलहान बदल करीत गेली कीं तिनें क्रांतिकारी परिवर्तनें केलीं हे आपणास अजून सांगतां यावयाचें नाहीं. विशेष (species) व सामान्य (general) यांतील अंतर अजूनहि नव्या अस्थिमय अवशेपां (fossils) च्या शोधांनीं भरून येईल; कदाचित् तें खरेखुरें वस्तुनिष्ठ अंतरहि असूं शकेल. माणूस केव्हां, कसा व कोठें उत्पन्न झाला हें आपणांस माहीत नाहीं इतकेंच शास्त्र यथार्थतेनें म्हणूं शकतें. आजवर प्रगमनशील मार्गक्रमण झालें आहे, इतकेंच शास्त्र जाणतें. तें किती वेगानें झालें, कोणते टप्पे ओलांडले गेले, बाजूस काय फेकलें गेलें वा कोणते आकस्मिक उत्पात घडले हें अजून कोणासहि सांगतां यावयाचें नाहीं."

विकासाच्या मागें कोणती शक्ति आहे? ती आंधळी आहे का? "हें सर्व केवळ बाह्य परिस्थितीचें अहेतुक दडपणच समजायचें काय? या बाबतींत डार्विनच्या विचारसरणीला मेंडेलनें धक्का दिला. उत्क्रांतीची शक्ति – जिला द् व्हाइसनें अन्यरूपण (mutationism) असें नांव दिलें – ती रोहिकोश (germ-cell) मध्येच असते. आकस्मिक निर्णयानुसार वर्तणारी ती शक्ति आहे. तिचें कार्य कसें घडतें? या स्वयंसिद्ध शक्तीचें स्वरूप समजण्यासाठीं आपणांस या प्रश्नांचे उत्तर द्यावें लागेल. दलदलींतून प्रारंभ होऊन बुद्धि व निष्ठेपर्यंत ती जाऊन पोहोचल्याचें आपण पाहिलें आहे. ही केवळ विस्मयजनक यदृच्छाच म्हटली पाहिजे." "तथापि हें येथेंच संपत नाहीं. ऑस्बोर्नसारख्या उत्क्रांतिवाद्यांनीं विकासाच्या प्रत्येक भागांत निश्चित गतीची दिशा प्रस्थापित केल्याचें आपण पाहिलेंच आहे. ही केवळ आंधळी वाढ नसून स्वभावतः योग्य व नियंत्रित अशी वाढ आहे. म्हणूनच त्यानें तिला ऋजुविकसन (orthogenesis) असें म्हटलें आहे." नंतरच्या शोधांनी असें दाखवून दिलें आहे कीं, "जीवनाचा विकास हा अनपेक्षितरीत्या यदृच्छेनें घडला नसून प्रत्येक नव्या टप्प्यावर अधिकाधिक संवेदनक्षम वनण्याच्या दीर्घकालीन चिकाटीतच त्याचें मूळ आहे." आणि अखेरीस "ग्राफ्टन इलियट स्मिथ व ला ग्रॉस क्लार्क या जीवशास्त्रज्ञांच्या कार्यावरून मानवजात ही एखाद्या धूर्त व हिंस्र पशूपासून निर्माण झालेली नसून संवेदनक्षम, जाणीवयुक्त सहानुभूति व प्रेम अंगी असणाऱ्या प्राण्यांपासून तिची निर्मिती झाल्याचें सिद्ध झालें आहे." श्वाइट्झर म्हणतो कीं, "आपण जेव्हां विविध स्वरूपांतील चेतनाला पुढें जाण्यास साहाय्य करतो तेव्हांच आपलें वर्तन नैतिक असतें. उलट जेव्हां आपण जीवाची हत्या करतो किंवा जगण्याची इच्छा दडपून टाकण्याचा प्रयत्न करतो तेव्हां आपले वर्तन अनैतिक असतें." श्वाइट्झरच्या तत्त्वज्ञानाचा पुढीलप्रमाणें उलगडा करण्यांत आला आहे : "प्राणिसृष्टींत जीवाजीवांचा कलह सुरू आहे. तथापि मानवप्राणी हा त्या कलहक्षेत्राच्या बाहेर पडतो. मानवी सृष्टींत जीवाला अन्य जीवांची जाणीव होते; आणि त्यामुळें एकमेकांशीं कलहप्रवृत्त बनवणारी जीवनलालसा जाणीत असतांनाच तो प्रत्येकाची जगण्याची इच्छा हा एका सामान्य जीवनलालसेचाच भाग म्हणून ओळखूं लागतो. यामुळेंच माणसें जीवनावद्दलचा आदर या नैतिक तत्त्वाच्या आधारावर एकमेकांच्या जीवनाशीं संवादी बनतात." (Last Phase) "रोहिकोश (germ-cell) आणि मूलगामी परावर्तन पावण्याचें त्याचें गूढ सामर्थ्य हें उत्क्रांतीचें मूळ होय. यामुळें एका परिस्थितींत, एकाच प्रकारच्या वातावरणांतील आव्हानाला प्रक्रिया म्हणून पक्षी, पशु व कीटक अशीं तीन निसर्गरूपें आपणांस आढळतात. तथापि रोही (germ) असें परावर्तन कां पावतो? त्यांतून नव्या स्वरूपांतील जीव कां निर्माण होतो? असें होण्याचें एकच कारण दिसतें व तें म्हणजे किरणोत्सर्ग (radiation) हें होय". "(जीवांना) विशिष्ट घडण देणारी प्रवृत्ति प्राणिशास्त्राला कधींच नाकारतां आली नाहीं; उलट अशाच प्रकारची प्रवृत्ति जड सृष्टींतहि आढळते असें आतां म्हणतां येतें. जुनें कोडें आतां दुहेरी स्वरूपांत पुढें आलें आहे आणि त्यामुळें तें सोडवणें अधिकच कठीण झालें आहे. अर्थात् या वाढत्या गुंतागुंतींत एकच समाधानाची गोष्ट आहे व ती म्हणजे जडाचे व जीवाचे गुणधर्म यांत आढळणाऱ्या विशिष्ट व अकल्पित संबंधांविषयींचा पुरावा ही होय. सभोंवतालच्या परिस्थितीशीं



अनुक्रमणिका

जुळणी करण्याच्या प्राण्यांच्या प्रयत्नांच्या बुडाशीं हे संबंध आढळतात. विश्वाचा उत्क्रांति क्रम हा जीवाच्या गुणधर्माशीं अभेद्यपणें निगडित झाल्याचें त्यावरून दिसून येतें. विश्वाची उत्क्रांति व प्राणीसृष्टीचा विकास हा तर्कदृष्ट्या एकमेकांशीं संबंधित आहे हें निर्विवाद! या संबंधाचें स्वरूप अजून स्पष्ट नाहीं इतकेंच! तथापि हे दोन्ही मिळून एकच व्यवस्थित विकासक्रम बनतो; व त्याचें स्वरूप त्यांत हेतुपुरस्सरता आहे असें म्हणतां येण्याजोगे निष्कर्ष सूचित करतात."...

"प्रथम जड होतें कीं चेतन या विषयीं तत्त्वज्ञानांत फार मोठा वाद आहे. खरा मुद्दा असा आहे कीं, प्रथम काहींहि असलें तरी आज ज्यांना जड व चेतन असें म्हणतां येईल असे अस्तित्वाचे दोन प्रकार आढळतात. त्याचा उगम काहीं का असेना, चेतन हें जडाप्रमाणेंच एकाच पद्धतीनें आकलन करतां येईल हें गृहीत धरणें ही मार्क्सवादांतील चूक आहे. जडाचे नियम चेतनसृष्टीला लागू करतां यावयाचे नाहींत हें मार्क्सवादाला समजलें नाहीं. जडाचा अभ्यास हें वस्तुनिष्ठ संशोधन असतें; उलट चेतनेचें आकलन म्हणजे अंतरीची जाणीव होय." "चेतनेचा प्रत्यय हा आत्मनिष्ठ स्वरूपाचा असल्यानें विज्ञानानें देखील त्याचें आकलन होणें शक्य नाहीं. आत्मनिष्ठ प्रत्ययाचें स्वरूपच असें आहे कीं, जडाला लागू पडणाऱ्या संज्ञा त्यास लागू करतांच येत नाहींत..." "आधुनिक विज्ञान आतां अशा एका टप्प्यावर येऊन पोहोचलें आहे कीं, जड व चेतन हें द्वैत आतां अगदीं सूक्ष्म व अवास्तव झालें आहे." "सूक्ष्म गतिशास्त्र (quantum mechanics) अध्ययनांत आतां एकदम अशी अवस्था आली आहे कीं, ज्यायोगें वस्तुनिष्ठ संशोधन करणाऱ्या पदार्थविज्ञानवेत्त्याला संभ्रमच उत्पन्न व्हावा. ज्यांत द्रष्टा व दृश्य वस्तु हीं एकमेकांत मिसळलेलीं आहेत, त्यांना एकमेकांपासून अलग करणें शक्यच नाहीं असें घोटाळ्यांत पाडणारें विश्व त्याच्यासमोर उभें राहिलें आहे. या दोहोंचा संबंध निकटवर्ती आहे. तीं एकमेकांत प्रतिबिंबित झालीं आहेत. त्यांना अलग वा एकजीव करणें आतां अशक्यच आहे.

"या अनिश्चितीच्या क्षेत्रांत आपणांस परिचित असलेले सर्व फॉर्म्युले वा संज्ञा या मुळीं नाहींशाच होतात. शक्ति वा जड या कल्पना इतक्या मूलगामी स्वरूपांत बदलल्या आहेत कीं, त्यांचा मूळ अर्थच नष्ट होतो. शक्तीच जडाच्या रूपानें गोठते तर उलट किरणोत्सर्गरूपानें जडाचें जडत्वच नष्ट होतें. प्रकाशाच्या सूक्ष्म कणांचा 'लाटा' या संज्ञेनें उल्लेख होतो; तथापि त्यांची स्थलकालांतील ये-जा कसल्याहि आधारावांचून सुरू असते. द्रव; घन वा वायुरूपांत देखील ही ये-जा होत नाहीं. यामुळें पाण्याच्या पृष्ठभागावर आढळणाऱ्या लाटांशी त्यांची तुलना करणें अयथार्थच म्हटलें पाहिजे. योग्य अर्थानें बोलायचें झाल्यास त्या संभाव्यतेच्या लाटा होत. अमूर्त 'कार्याचे' (function) बदल वक्ररेषेच्या रूपानें दर्शविणारा तो आपल्या विचारांचा प्रक्षेप आहे."

"विज्ञान हें द्वैत नाहींसें करूं शकत नाहीं. कारण कोणत्याहि वस्तुनिष्ठ अध्ययनांत ज्ञाता व ज्ञेय हे कितीहि जवळ आले तरी एकमेकांपासून अलग राहणेंच आवश्यक असतें. केवळ अंतिम आध्यात्मिक अनुभवांतच हें द्वैत नष्ट होतें व ज्ञाता आणि ज्ञेय हीं एक होतात. विज्ञानाची आज ही अवस्था आहे. जड नष्ट झालें व केवळ शक्ति उरली आहे असें म्हणा किंवा शक्तीच जडरूपानें गोठते असें हवें तर म्हणा!"

"पदार्थविज्ञान, शरीरशास्त्र व मानसशास्त्र हीं आज एकाच निर्णयाला येऊन पोंहोचलीं आहेत कीं, बाह्य जगाचें प्रत्येक वेळीं होणारें अवलोकन ही एक मानसिक रचनाच होय. आणि ती इतकीं मूलगामी असते कीं, तिच्या योगानें अदृष्ट व अमूर्तांतून एक शब्द, रंग, घनता इत्यादींनीं युक्त असें विश्व क्षणार्धांत निर्माण होतें. हें एक प्रकारें सर्जनतेचेंच कृत्य होय. विश्व हें एक शक्ति-लहरींचाच विशाल क्रम होय असें पदार्थविज्ञान सांगतें. आपल्या उपकरणांद्वारा होणाऱ्या अवलोकनानें या क्रमाचाच दोन्ही बाजूस विस्तार होतो व अनंत नव्या रचना निर्माण होतात. यांतीलच एकादी रचना आपण आपल्या प्रभावी इंद्रियाद्वारा – चक्षूंद्वारा – विचारांत घेतो असें शरीरशास्त्र दाखवितें. आपण पहातों व विश्वास ठेवतों. जें दिसत नाहीं त्याचें अस्तित्व आपण नाकारतो. तथापि दृश्य रचनेहून भिन्न पण तितक्याच सामर्थ्यवान दुसऱ्या रचना असूं शकतात; पण चर्मचक्षूंना त्या न दिसल्यामुळें आपण डोळ्यावर कातडें ओढून त्यांचे अस्तित्वच नाकारूं लागतो. अनंत सुप्त शक्तींनीं, अमर्याद शक्तिरूपांनीं भरलेलें हें सभोवतालचें विश्व आहे. वस्तुनिष्ठ अस्तित्वाच्या या विशाल विस्तारांतून आपलीं इंद्रियें एकादीच रचना उचलतात व तेंच सत्य होय असें आपण म्हणूं लागतो. 'दिसतें तसें असतें' या विधानाचा हाच अर्थ आहे; पण मौज अशी आहे कीं, या महान् विश्वांतील जें अल्पसें आपण डोळ्यांनीं व कानांनीं पाहतो, ऐकतो व तें तसें सत्य आहे असें मानतो तेंहि तसें सत्य नसतें! त्या रचनेचे इंद्रिय गोचर परिणाम होतात हें खरें, व हे परिणाम म्हणजे केवळ शक्तिलहरी नसून त्या काय म्हणत आहेत त्याचा आपण केलेला अत्यंत स्वैर व कल्पनारम्य अनुवाद होय. यांत्रिक विचारसरणीच्या युगांत वाटलें त्यापेक्षां आपण बाह्य जगांतून मिळणाऱ्या संदेशांत खूपच ढवळाढवळ करतो; त्याचें स्वरूप बदलून टाकतो. वस्तुतः आपणांभोंवती चोंहोकडे केवळ विद्युतशक्तीवांचून दुसरें कांहीहि

नाहीं. केवळ शक्तीच आहे. घन, द्रव, वायु, पृथ्वी, पाणी, हवा, शरीर, ग्रह, तारे इत्यादि सर्व रचना होत; वस्तुस्थिति नव्हे. वस्तुस्थिति, पदार्थविज्ञानास सिद्ध करतां येण्याजोगें सत्य हें म्हणजे दृष्टिहीन, स्वरहीन, आकारहीन शक्ति होय. रंग, स्वर, गंध यांनीं युक्त अशा विश्वापेक्षां घन विश्व हें अधिक वास्तव नाहीं. तें म्हणजे एका विशिष्ट प्राण्यानें शक्ति-लहरींतून निर्माण केलेली एक रचनाच होय. जिवंत, मानसिक व शारीरिक सामर्थ्यानें युक्त अशा प्राण्याची ती रचना आहे, व त्यासाठीं सभोंवतालच्या उपलब्ध शक्तींतून तो करीत असलेली निवड अत्यंत मर्यादित आहे.

"अशा प्रकारें पदार्थविज्ञानांतून निघणारा सप्रमाण निष्कर्ष शरीरशास्त्र व मानसशास्त्र यांच्या योगानें अधिकच व्यापक व दृढ होतो. तो म्हणजे असा कीं, सभोवतालीं तटस्थतेनें डोळे उघडून पाहिल्यानें आपणास दिसून येणारें घन विश्व हें खरोखर आपण व एक अकल्पित शक्ति यांचें मिश्रणच आहे. आपलें क्षेत्र कोठें संपतें व बाह्य वस्तूंचें कोठें सुरू होतें हें आपण सांगूं शकत नाहीं. आपण व बाह्य जग हें एकमेकांत पूर्णतया गुंतलेले व अविभाज्य आहोंत." यालाच वेदांतांत ब्रह्म व त्याची शक्ति व या दोहोंपासून निर्माण होणारी सृष्टी – हें सर्व अनिर्वचनीय आहे असें म्हणतात. हें अनिर्वचनीयतेचें कोडें उलगडावयास ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान ही जी कोणत्याहि ज्ञानाच्या मुळांशीं असलेली त्रिपुटी तिच्यांतील एकाच पदाचा म्हणजे ज्ञेयाचाच विचार करणें पुरेसें नाहीं. त्यासाठीं ज्ञेयाबरोबरच यांचाहि सम्यक् विचार होणें आवश्यक आहे. म्हणून आमच्या इकडे ज्या शास्त्रांत या तिन्ही पदांचा सम्यक् विचार केलेला असतो त्यालाच "दर्शन" हें सार्थ नामाभिधान प्राप्त होतें.

❋ ❋ ❋

## ३. व्यक्तिस्वातंत्र्य व मानवी मूल्यें संकटांत*

युरोपचा व अमेरिकेचा अर्वाचीन इतिहास म्हणजे आर्थिक, राजकीय, आध्यात्मिक वगैरे क्षेत्रांत तिकडील जनतेनें स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं केलेल्या प्रयत्नांचा इतिहास आहे. एकामागून एक अशा लढाया जिंकत पाश्चात्य जनतेनें हें स्वातंत्र्य देशाच्या निरनिराळ्या क्षेत्रांत संपादन केलें व तें व्यापक केलें. या स्वातंत्र्याच्या प्रयत्नांतूनच अथवा आशयांतूनच आजचें पाश्चात्य ऐहिक जीवनदर्शन व विज्ञानमूलक तंत्रविद्याप्रधान जीवनपद्धति वा सभ्यता यांचा उद्गम व विकास झाला आहे. या दर्शनाचा व जीवनपद्धतीचा वा सभ्यतेचा जन्म पश्चिम युरोपमध्यें झाला असला तरी पूर्वीच्या लेखांत म्हटल्याप्रमाणें या दोन्हीहि वस्तूंचा कमी-अधिक प्रमाणांत साऱ्या विश्वानें आज स्वीकार केला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. या जोडगोळीमुळेंच इंग्लंड, फ्रान्स वगैरे पश्चिम युरोपमधील देशांनीं आशिया, आफ्रिका वगैरे खंडांमध्यें आपलीं अफाट (ज्यांच्यावर सूर्य कधी मावळत नव्हता) साम्राज्यें स्थापन केली होतीं. याचा अपरिहार्य परिणाम म्हणून अंकित देशांतील जनता खुषीनें वा अपखुषीनें या दर्शनाचा व सभ्यतेचा हळूंहळूं स्वीकार करूं लागली होती. पुढें वसाहतवादाची पिछेहाट होऊन या साम्राज्यशाही राष्ट्रांना आपल्या ताब्यांतील देशांना एकामागून एक सोडून जावें लागत असले तरी त्यांनीं आपल्याबरोबर आणलेल्या या दोन गोष्टी स्वतंत्र झालेल्या या देशांत मागें ठेवल्या आहेत. एवढेंच नव्हे तर हे स्वतंत्र झालेले देशच आतां स्वेच्छेनें सुधारणेच्या नांवाखालीं या दोन गोष्टी, विशेषतः विज्ञान व तंत्रविद्या झपाट्यानें आत्मसात् करण्याचा झटून प्रयत्न करीत आहेत. स्वातंत्र्य मिळाल्याबरोबर भारतीय सरकारनें सर्वप्रथम जर कोणती एक गोष्ट हातांत घेतली असेल तर ती भारतीय जीवन योजनाबद्ध पद्धतीनें विज्ञान व तंत्रविद्येच्या पायावर उभारणें ही होय. प्रा. शहा यांनाहि या गोष्टी मान्य आहेत. त्यांची तक्रार एवढीच आहे कीं, "ही प्रक्रिया व्यक्तिस्वातंत्र्याला धोका ठरूं नये म्हणून आवश्यक असणारी हमी, म्हणजे सांस्कृतिक जीवनांत दृढमूल झालेली लोकशाही-परंपरा व अशा परंपरेला पोषक असें इहलोकपर मानवतावादी जीवनदर्शन अजून भारतीय समाजांत दिसत नाहीं". भारतानें विज्ञान व तंत्रविद्येबरोबर पाश्चात्य लोकशाही पद्धतीचाहि स्वीकार केला आहे. अर्थात् 'परंपरा' हा शब्दच दीर्घकालाची अपरिहार्य आवश्यकता सूचित करतो ही गोष्ट प्रा. शहाहि मान्य

* पूर्वप्रकाशन : *नवभारत*, वर्ष ११, अंक १०, जुलै, १९५८.

अनुक्रमणिका

करतील. तेव्हां भारतीय जीवनांत आतांपावेतों पाश्चात्य लोकशाहीची परंपरा दृढमूल झाली नसली तर त्याचा दोष भारतीयांच्या माथी प्रा. शहाहि मारणार नाहींत अशी माझी खात्री आहे.

पण भारतानें एवढी गोष्ट केली कीं भारतीयांचें व्यक्तिस्वातंत्र्य अवाधित व सुरक्षित राहील असा आभास प्रा. शहांच्या लेखानें वाचकांच्या मनांत उत्पन्न होण्याची भीति आहे. वस्तुस्थिति याच्या अगदीं उलट आहे.

**व्यक्तिस्वातंत्र्याला युरोपांतच धोका**

आश्चर्याची गोष्ट अशी कीं, ज्या युरोपमध्यें लोकशाही परंपरा व तिला पोषक असें विज्ञानाधिष्ठित इहलोकपर मानवतावादी जीवनदर्शन हीं दृढमूल झालीं आहेत तेथेंच नेमका व्यक्तिस्वातंत्र्याला व मानवी मूल्यांना मोठा धोका निर्माण झाला आहे. ज्या शंकरानें त्याला जन्म दिला त्या शंकराच्याच मस्तकावर हात ठेवून त्याला भस्म करूं पाहणाऱ्या भस्मासुरासारखीच ही कथा आहे. ज्या व्यक्तिस्वातंत्र्यासाठीं अथवा ज्या व्यक्तिस्वातंत्र्यांतून इहलोकपर मानवतावादी जीवनदर्शन व विज्ञानाधिष्ठित तंत्रविद्येचा जन्म झाला त्यांनींच आतां व्यक्तिस्वातंत्र्याला धोका निर्माण केला आहे व व्यक्तिस्वातंत्र्याचें रक्षण करण्यासाठीं काय करावें हा यक्ष प्रश्न पाश्चात्य विचारवंतांपुढे आज उभा राहिला आहे. आपलें जीवनदर्शन, जीवनपद्धति व आपली सभ्यता यांच्यामध्यें कोणता तरी महान् दोष शिरला आहे याची सूक्ष्म जाणीव पाश्चात्यांना झाली असून तो दोष कोणता व त्याचे निराकरण कसें करावयाचें याची त्यांना मोठी चिंता लागली आहे. अशा परिस्थितींत भारतानें या देशांचें केवळ अंधानुकरण केले व या गोष्टींची आपल्या येथें प्रस्थापना करून त्यांची दीर्घ परंपरा निर्माण केली, कीं येथें व्यक्तिस्वातंत्र्याचें रक्षण होईल ही हमी प्रा. शहा कशाच्या आधारें देत आहेत हें समजत नाहीं.

माणसाच्या स्वातंत्र्याला सांप्रत धोका उत्पन्न झाला आहे तो केवळ फॅसिझम्, नाझिझम् व कम्युनिझम् या नांवानें संबोधिल्या जाणाऱ्या हुकूमशाही राजवटींत किंवा समाजपद्धतींतच झाला आहे असें समजणें चुकीचें होईल. ज्या देशांत लोकशाही राज्यपद्धति अथवा समाजपद्धति अस्तित्वांत आहे तेथेंहि व्यक्तिस्वातंत्र्य आज संकटांत सांपडले आहे हें लक्षांत ठेवणें महत्त्वाचें व जरूरीचें आहे. आधुनिक सभ्यतेचा स्वभावच असा आहे की, लोकशाही देश असोत वा हुकूमशाही देश असोत तेथील आर्थिक, सामाजिक व राजकीय संस्थांचें स्वरूपच व्यक्तिस्वातंत्र्याला मारक बनूं पाहात आहे. या संस्कृति-संकटाला तोंड देऊन जगण्यासाठीं माणसें स्वतःहून आपल्या स्वातंत्र्यावर बंधनें घालीत आहेत असा लोकशाही देशांत आभास निर्माण होतो एवढाच लोकशाही व हुकूमशाही राष्ट्रांत वरवर पाहणाऱ्याला फरक दिसतो. परंतु खोल विचार केला तर लोकशाही व हुकूमशाही देशांतील हा फरक केवळ आभासच आहे असे प्रत्ययाला येतें. आज रशिया किंवा अन्य साम्यवादी देशांतील प्रजा तथाकथित लोकशाही देशांतील जनतेपेक्षां आपण स्वातंत्र्याचा खऱ्या अर्थानें अधिक उपभोग घेत आहोंत असा प्रामाणिकपणें दावा करीत आहेत किंवा करतील.

**धोक्याची मीमांसा**

त्याचें हें असें आहे. माणसानें बाह्यसृष्टीवर आपलें आधिपत्य स्थापन करून आपल्या सुखासाठीं एक नवीन सृष्टी निर्माण केली आहे हें खरें. पण दैवदुर्विलास असा आहे कीं, ज्या सृष्टीचा मनुष्य निर्माता तिचा तो आतां स्वामी राहिला नसून सेवक झाला आहे. एका जगड्व्याळ यंत्राचा तो एक लहानशी चूक बनला आहे. आपण या सृष्टीचे केंद्रबिंदू आहों असा भ्रम आपल्या मनांत उत्पन्न करण्याचा माणसानें कितीहि प्रयत्न केला तरी या सृष्टीपुढें आपण एक क्षुद्र जंतू आहोत या जाणिवेनें तो पिसाळून गेला आहे. मनुष्य हा स्वतःच स्वतःचा मानदंड बनला आहे या उच्च तत्त्वाचा कितीहि डांगोरा पिटला गेला तरी व्यवहारांत त्याची शून्यापेक्षां अधिक किंमत राहिलेली नाहीं. आणि पूर्वी म्हटल्याप्रमाणें या गोष्टीला तथाकथित लोकशाही देशांतील लोकहि अपवाद नाहींत.

व्यक्तीपेक्षां श्रेष्ठ दुसरें कुठलेहि मूल्य नसल्यामुळें तिचा सर्वांगीण विकास हा प्रत्येक सामाजिक संस्थेचा निकष ठरतो या प्रा. शहांच्या सिद्धांताशीं सर्वोदय दर्शन मानणारे सहमत होतील असें मला वाटतें. पण 'मनुष्याशिवाय दुसरी कोणतीहि सर्जनशील शक्ति या विश्वांत नसल्यामुळें तोच सर्व संस्कृतीचा निर्माता व भोक्ता आहे' या प्रा. शहांच्या विचाराशीं ते सहमत होऊं शकतील असें मला वाटत नाहीं. त्यांच्या विचारें 'उपद्रष्टाऽनुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः। परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन् पुरुषः परः।।' एवढेंच नसून कर्ताहि तोच आहे. तसेंच 'विज्ञानाची कार्यपद्धति हीच नवीन ज्ञान मिळविण्याचा एकमेव विश्वासार्ह मार्ग' हा प्रा. शहांचा सिद्धान्तहि 'सर्वोदयांत' श्रद्धा ठेवणाऱ्या मंडळींना मान्य करतां येईल असें मला वाटत नाहीं. बुद्धीसह पंचज्ञानेंद्रियांनीं माणसाला बाह्यसृष्टीचें जें ज्ञान होतें तें पूर्ण नाहीं, एवढेंच नव्हे तर माणसाला केवळ त्याच्या चर्मचक्षूंनींच नव्हे पण सूक्ष्मदर्शी यंत्राच्या साह्यानेंहि जें ज्ञान होतें तें सृष्टीचें सत्य ज्ञान नाहीं. कारण सूक्ष्मांत सूक्ष्म अशीं यंत्रे असलीं तरी त्यांतून पाहाणारे








डोळे 'चर्मचक्षू'च असतात हें विसरतां कामा नये. 'जें अतींद्रिय म्हणोनि व्यवस्थिलें। केवळ ज्ञानदृष्टिचिया भागा। फिटलें तें तुम्ही चर्मचक्षूंपुढें सूदलें। मी कैसेनि देखें'; 'तदेव ब्रह्मत्वं विद्धिनेदं यदिऽसुपासते।' वहिर्मुखता हा ज्यांचा स्वभावधर्म आहे त्या इंद्रियांनीं अंतःसृष्टीचें म्हणजेच सत्यसृष्टीचें ज्ञान होणें शक्य नाहीं. सृष्टीचें सत्य ज्ञान म्हणजेच सृष्टीच्या बुडाशीं असलेल्या तत्त्वाचें ज्ञान इंद्रियें अंतर्मुख झालीं म्हणजें प्रज्ञाचक्षूला होते. इतकेंच काय पण लोकमान्यांनीं म्हटल्याप्रमाणें माणसाला आणखी एखादें सहावें ज्ञानेंद्रिय फुटलें तर त्याला जे सृष्टीचें ज्ञान होईल तें आतांच्या ज्ञानाहून अगदीं निराळेंच असेल. अर्थात् विज्ञानाप्रमाणेंसुद्धां दोन, तीन, चार याप्रमाणें नवीन नवीन परिमाणांच्या (डायमेन्शन्स) शोधावरोवर माणसाच्या बाह्यसृष्टीच्या ज्ञानांतहि विलक्षण वदल होत गेला आहे. श्री. राधाकृष्णन् म्हणतात त्याप्रमाणें आपलीं आजचीं 'परिमाणें' हीं कांहीं माणसाच्या 'प्रज्ञाना'ची अंतिम सीमा नाहींत. तेव्हां प्रा. शहा यांचें दर्शन व सर्वोदयाचें दर्शन यांच्यामध्यें या बावतींत मौलिक भेद आहे हें मान्य केलेंच पाहिजे.

### सर्वोदयाची श्रद्धा

शरीरापासून वेगळा असा आत्मा नाहीं ही प्रा. शहांची श्रद्धा सर्वोदयाची श्रद्धा नाहीं. शरीराहून आत्मा वेगळा असून तो पुराण व सनातन आहे व ईश्वर प्रेममय अथवा प्रेमस्वरूप आहे अशी सर्वोदयाची जिवंत श्रद्धा आहे. अर्थात् हा ईश्वर विश्वाहून वेगळा व बाहेर राहून विश्वाचें नियंत्रण करणारा सगुण आणि शक्तिशाली कोणी 'पुरुष विशेष' आहे असें सर्वोदय मानीत नाहीं. ईश्वर म्हणजे एक सत्, चित् व शिव तत्त्व वा शक्ति असून ती विश्वाच्या अंतर्यामीं किंवा अंतरात्मा आहे – 'ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति' – 'सर्व भूतांच्या अंतरीं। हृदय महाअंवरीं। चिद्‌वृत्तीच्या सहस्रकरीं। उदयला असे जो।'. विश्वाचें नियमन करणारी शक्ति विश्वांत अंतर्भूत आहे हा प्रा. शहांचा सिद्धान्त सर्वोदयालाहि मान्य आहे. मात्र ही शक्ति जड वा भौतिक नसून सचेतन व आध्यात्मिक आहे एवढा प्रा. शहा व सर्वोदयवादी यांच्या सिद्धान्तामध्यें मोठा फरक आहे. शरीरापासून वेगळा असा आत्मा नाहीं हा प्रा. शहांचा सिद्धान्त सर्वोदयवादीहि दुसऱ्या एका अर्थानें मान्य करतील असें मला वाटतें. कारण अखेर एक चैतन्य वस्तूच सर्वत्र भरून राहिलेली असल्यामुळें आत्म्याहून शरीरहि वेगळें नाहीं असेंहि म्हणतां येईल. आत्मा व शरीर हें द्वैत वा द्वंद (dichotomy) सर्वोदयाच्या दर्शनाप्रमाणें अंतिमावस्थेंत शिल्लक उरत नाहीं. 'ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्', 'अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम्', 'आत्मा वा इदमेक एवाग्र आसीन्नान्यात्किंचन मिषत् स ईक्षत लोकान्नु सृजा इति', 'एकमेवाद्वितीयम्', 'तदैक्षत बहुस्याम् प्रजायेयेतिः' 'सूत सूतें गुंतलें। तृण तृणेंचि बांधले। कां आत्मविंवा घेतलें। वाळकें जळीं।। तयापरी देहाकरें। आपणपेंचि दुसरें। देखोनि जीव अविष्करे। आत्म बुद्धि।।' सर्वत्र एकच चैतन्यब्रह्म भरून राहिले होतें तर त्यांत जड-भौतिक जग कसें व केव्हां निर्माण झालें असा प्रश्न येथें विचारला जाणें स्वाभाविक आहे. ब्रह्म व त्याची शक्ति व त्याच्यापासून उत्पन्न होणारी सृष्टि ही एक अनिर्वचनीय गोष्ट असून माणसाच्या बुद्धीला हें कोडें उलगडणें शक्य नाहीं हें मान्य केलें पाहिजे. मात्र द्रष्टा व दृश्य हा भेद ज्या अनुभवांत नाहींसा होतो तो आध्यात्मिक अनुभव माणसाला प्राप्त करतां येईल अशी विद्या व शक्ति त्याच्यामध्यें आहे एवढेंच येथें म्हणतां येईल. तेव्हां अचेतन (matter), जीव (life), मन प्रज्ञान (mind-consciousness) या क्रमानें अचेतनांतून चेतन उत्पन्न झालें असें सर्वोदय मानीत नाहीं. मूळ वस्तू 'चैतन्य' असून अचेतन सृष्टि त्याच्यावर अध्यास आहे किंवा ती त्याचें 'स्फुरण' आहे असें माझ्या अल्पमतीप्रमाणें सर्वोदयवादी सर्वसामान्यपणें मानतात. विश्व ज्या नियमांनीं चालतें ते नियम जड व भौतिक (mechanical अथवा material laws) आहेत असें सर्वोदय दर्शन मानीत नाहीं. माणसाचें 'अध्यात्म' म्हणजे त्याच्या भौतिक जीवनाचा परमोच्च विकासविंदू होय हें सर्वोदयाला अभिप्रेत नाहीं. कारण जें 'भौतिक' तें सारें क्षर वा नाशिवंत म्हणजे वदलणारें होय. या सदा वदलणाऱ्या 'नाशवंत भौतिका'च्या बुडाशीं असलेल्या अक्षर वस्तूंची नित्यता म्हणजे सहजावस्था. तिच्या ठिकाणीं स्थित होणें हा माणसाचा परमोच्च आध्यात्मिक विकास असें सर्वोदय मानतो. अशा रीतीनें सर्वोदयांत 'आत्मानात्म' विचार असल्यामुळें 'येयं प्रेते विचिकित्सा मनुष्येऽस्तीत्येके नायमस्तीतिचैके' या विचिकित्सेचे अथवा 'अयं लोको नास्ति पर इति' या मताचें त्यांत स्वाभाविक महत्त्व आहे. तथापि 'जया ऐहिक धड नाहीं। तयांचे परत्र पुससी काई' हा ज्ञानोबांचा विचार सर्वोदयवाद्यांनाहि मान्य होईल. तेव्हां माणसाच्या पारलौकिक जीवनाच्या केवळ शाब्दिक विचिकित्सेनें माणसानें ऐहिक जीवन नासवणें वरोवर नाहीं ही गोष्ट लक्षांत घेऊन माणसाच्या ऐहिक जीवनाचा विचार करणें योग्य होईल या बावतींत सर्वोदयवादी प्रा. शहांशीं सहमत आहेत किंवा होतील. यासाठीं "व्यक्तीपेक्षां कोठलेंहि श्रेष्ठ मूल्य नाहीं व तोच सर्व संस्कृतीचा निर्माता व भोक्ता असून मानवी जीवनाचें श्रेय हें मनुष्याच्या शारीरिक व आध्यात्मिक म्हणजे बौद्धिक-नैतिक-सौंदर्योपभोगात्मक

इत्यादि शक्तींचा सुसंवादी विकास होईल अशा रीतीनें जीवन जगण्यात आहे. तसेंच ज्या जगांत मनुष्य जन्मतो, जगतो व मरतो व जेथें व ज्याच्या साहाय्यानें मानवाला आपलें श्रेय साधावयाचें असतें तें ज्ञेयविश्व त्यांत अंतर्भूत असलेल्या नियमांनुसार चालतें त्याचा कोणी कर्ता किंवा नियंता नाहीं," हें प्रा. शहांचे तत्त्वज्ञान क्षणभर सत्य मानलें तरी प्रा. शहा म्हणतात त्याप्रमाणें त्यामुळे माणसाची जबाबदारीहि फार मोठी आहे आणि ही जबाबदारी योग्य व न्याय्य रीतीनें पार पाडावयाची तर माणसाला आपल्या स्वतःचें व भोंवतालच्या सृष्टीचें सम्यक् ज्ञान असणें नितान्त जरूर आहे हें सर्वोदयवाद्यांचें मत प्रा. शहाहि मान्य करतील. नदीच्या प्रवाहांत नावेत असून प्रवास करणाऱ्याला आपण स्वतः स्थिर आहोत व किनाऱ्यावरचे वृक्ष धांवत आहेत असें भ्रमात्मक ज्ञान होतें तसें माणसाचें स्वतःच्या व सृष्टीबद्दलच्या ज्ञानाचें होऊं नये.

### मनुष्याचें व्यवच्छेदक लक्षण

मनुष्य व अन्य प्राणी यांच्यामधील व्यवच्छेदक लक्षण हें आहे कीं, इतर प्राण्याप्रमाणें त्याला बाह्यसृष्टीचे ज्ञान तर होतेंच पण त्याच्यापेक्षां अधिक म्हणजे त्याला अंतःसृष्टीचेंहि म्हणजे स्वतःचेही ज्ञान होतें. तें त्याच्याहून भिन्न अशा बुद्धिपर्यंतच्या कोणत्याहि भौतिक साधनानें होणें शक्य नाहीं. माणसामध्यें अंतर्मुख होण्याची एक विलक्षण शक्ति आहे व ही अंतर्मुखताच अंतर्ज्ञानाचें म्हणजे स्वतः स्वतःला जाणण्याचें त्याचें एकमेव साधन आहे. 'कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षदावृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन्' ।

प्रा. शहांच्या तत्त्वज्ञानानुसार शरीरापासून वेगळा असा आत्मा नसल्यामुळे माणसाला बाह्यसृष्टीप्रमाणें अंतःसृष्टीचें म्हणजे स्वतःचें ज्ञान मिळविण्याला विज्ञानाची कार्यपद्धति हाच एकमेव विश्वासार्ह मार्ग आहे व त्यांसाठीं पंचज्ञानेंद्रियें व मन यांच्यापलीकडे माणसाजवळ अंतर्मुखता किंवा प्रज्ञा म्हणून कांहीं साधन आहे असें मानण्याची जरूरी नाहीं असें ते म्हणतील. अर्थात् या बाबतींत प्रा. शहा व सर्वोदयवादी यांच्यामध्यें मौलिक मतभेद आहे. तथापि विज्ञानाच्या कार्यपद्धतीनें माणसाचें तर सोडाच परंतु बाह्यसृष्टीचें माणसाला आज जें ज्ञान झालें आहे तें सर्वसाधारणपणें समजलें जातें तसेंच आहे कीं विलक्षण रीतीनें निराळें आहे हें जाणून घेणें मनोरंजकच काय पण औपनिषदीय अध्यात्मवादी सर्वोदयदर्शन व इहलोकपर विज्ञानाधिष्ठित तंत्रविद्याप्रधान मानवतावादी जीवनदर्शन हीं सम्यक् रीतीनें समजण्याच्या दृष्टीनें उद्बोधक होईल.

⌘ ⌘ ⌘

## ४. शांतीचा व सुखाचा मार्ग*

नीतीला म्हणजे सामाजिक व्यवहाराला विश्वदर्शनाची (cosmology) वा जीवनदर्शनाची आवश्यकता आहे; मग तें जीवनदर्शन धर्मावर आधारलेलें आध्यात्मिक दर्शन असो अथवा विज्ञानावर आधारलेलें भौतिक दर्शन असो. नीति त्रिशंकूप्रमाणें अंतराळांत फार काळ राहूं शकत नाहीं. ही गोष्ट प्रा. शहांनाहि मान्य आहे. कारण त्यांनी आपलें जीवनदर्शन काय आहे हें आपल्या लेखाच्या प्रारंभींच सांगितलें आहे. ज्याला हल्लीं विज्ञानाधिष्ठित बुद्धिवादी मानवतावाद म्हणतात तें हें दर्शन आहे.

भौतिकवादी वैज्ञानिक हा साधारणतः बुद्धिवादी असतो व तो शुद्ध नीतीचा पुरस्कर्ता असतो; तर शुद्ध नीतिवादी हा सामान्यतः भौतिक विज्ञानाला मानणारा असतो. ज्यांत भोळसट समजुतींची (superstitions) भेसळ नसते अशा शुद्ध नीतीला बुद्धिवाद जन्म देतो या बाबतींत दोघांचें एकमत आहे.

### नीतीच्या आधाराची समस्या

प्रथम केवळ जादूटोणा (magic) होता; नंतर जेव्हां माणसाच्या उत्क्रांतींत बुद्धीचा उदय झाला तेव्हां त्याच्या जीवनांत नीति व नंतर ज्यांत जादूटोणा व नीति यांचें मिश्रण आहे असा धर्म यांनीं प्रवेश केला. आणि अन्तीं बुद्धितत्त्वाचा विजय होऊन माणसाच्या जीवनांतून जादूटोण्याची हकालपट्टी झाली व केवळ नीतीचें साम्राज्य प्रस्थापित झाले असें नीतिवाद्यांचें म्हणणें आहे.

* पूर्वप्रकाशन : *नवभारत*, वर्ष ११, अंक ११, ऑगस्ट, १९५८.

अनुक्रमणिका

सामाजिक घटकांचें परस्परावलंबित्व व सोय हा नीतीचा आधार (sanction) आहे असें नीतिवाद्यांचें म्हणणें आहे.

प्रा. शहा म्हणतात : "नैतिक मूल्यांची उत्पत्ति मनुष्याची शरीररचना, त्याचें समूहशीलत्व व परस्परावलंबित्व आणि त्याच्या मनाची घडण यांत शोधली पाहिजे; पण समूहशीलत्वामुळें एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याशीं उदारपणानें वागतोच असा आपला नेहमीच अनुभव आहे का? प्राणिशास्त्र काय शिकवितें?

"जे शक्तिशाली असतात तेच जीवनसंग्रामांत टिकतात व जे दुबळे असतात ते मागें राहतात हें तत्त्व नीतीला पूर्णतया 'शह' देतें. आज आंतरराष्ट्रीय व्यवहारात पूर्ण अराजक माजलें असून त्यांत मानवी संस्कृती पूर्ण खाक होण्याचें भय निर्माण झालें आहे. याचें मुख्य कारण या व्यवहारांत 'बळी तो कान पिळी' या तत्त्वाचें अधिराज्य आहे हेंच होय".

सर्वश्रेष्ठ बुद्धिवादी डेव्हिड ह्यूम म्हणतो, "एक हजार देशबांधवांच्या मृत्यूऐवजीं माझ्या स्वतःच्या बोटाला टोंचून घेणें मी कां पसंत करावें?" माणसाच्या देहापर्यंत – आब्रह्म – सर्व सृष्टि जड असली तरी माणसाच्या हृदयांत सदसद्विवेकबुद्धि आहे असें मानणारें जीवनदर्शनहि अखेर नीतीचा बचाव करूं शकत नाहीं, असा आजचा सार्वत्रिक अनुभव आहे. फ्राईडनें मनोदेवतेचा फुगा अंतर्मनांतील अतृप्त कामवासनांच्या काट्यानें केव्हांच फोडून टाकला आहे. भौतिक निसर्गवाद केवळ धर्माचाच ग्रास करतो असें नाहीं. त्याच्यामुळें नीतीलाहि कांहीं आधार राहत नाहीं. एवढेंच नाहीं तर धर्माप्रमाणें नीतीहि एक भ्रम असून त्यामुळें माणसाचें मन रोगी व विकृत बनतें असें तो सिद्ध करतो. उदारमतवादाची टोलेजंग भव्य इमारत कोसळून पडली हा याचा उत्कृष्ट पुरावा आहे. विरोधविकासवादी वा अन्य कोणत्याहि प्रकारचा भौतिकवाद माणसानें सदासर्वकाळ श्रेष्ठ नैतिक मूल्यांचें त्यागपूर्वक पालन कां करावें या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर देऊं शकत नाहीं. मात्र याचा अर्थ असा नव्हे कीं भौतिकवादी तत्त्वज्ञान्यांमध्ये महान् ध्येयांसाठीं त्याग करणारे पुरुष झाले नाहींत. फक्त त्यांच्या बाबतींत असें म्हणावें लागेल कीं, भगवान बुद्धाप्रमाणें त्यांच्या तत्त्वज्ञानांत व कृतींत सुदैवानें संगति नव्हती. बुद्धधर्मांतील हीनयान पंथाच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें निर्वाणासाठीं चांगली-वाईट सर्व प्रकारची तृष्णा मारली पाहिजे, अथवा ती नष्ट झाली पाहिजे. पण निर्वाणाचा अधिकार प्राप्त झाला असताहि शाश्वत शांतिमध्यें प्रविष्ट होऊन अक्षय आनंदाचा भोग घेण्याचा मोह आवरून आपल्या देशबांधवांना दुःखांतून मुक्त करण्यासाठीं धर्मप्रचार करण्याचें कार्य भगवानानें जीवनाच्या अंतिम क्षणापर्यंत अनेक वर्षे केलें. अर्थात भगवान बुद्धाच्या जीवनांतील या दिव्य अंतर्विरोधाबद्दल सर्व जग सर्वकाळ त्याचें ऋणीच राहील.

सर्वोदय दर्शनांत जीवनाचें अंतिम मूल्य परलोकपर मानलें गेल्यामुळें त्यांत मनुष्याच्या भौतिक जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन थोडासा उदासीनच असतो; तसेंच सामाजिक मूल्यांनाहि ईश्वरी संकेताची अभिव्यक्ति म्हणून किंमत राहते व त्यामुळें इहलोकपर मूल्यांना सर्वोदयवाद्याच्या जीवनांत दुय्यम स्थान असतें अशी प्रा. शहांनीं आपल्या दुसऱ्या लेखांत सर्वोदय दर्शनांतील मूल्यांची टीकात्मक समालोचना केली असून त्याबद्दल आपली नापसंती प्रगट केली आहे. अर्थात आपल्या विज्ञानमूलक बुद्धिप्रधान मानवतावादी जीवनदर्शनांत याच्या अगदीं उलट परिस्थिति आहे व ती प्रशंसनीय व स्वागतार्ह आहे असें प्रा. शहांना सुचवावयाचें आहे हे अगदीं उघड आहे.

### विज्ञानविकासांतून निर्माण झालेली विकृति

पण खरी वस्तुस्थिति काय आहे ती वर निवेदन केलीच आहे. विज्ञानानें भौतिक जीवनांतील सुखसाधनांची फार मोठ्या प्रमाणावर वाढ केली आहे; पण त्याचबरोबर साध्यांत सुधारणा न झाल्यामुळें माणसाच्या मनाचा तोल सुटला असून त्याच्यांत विकृति निर्माण झाली आहे (psychic imbalance). निरर्थकतेचें व निष्फळतेचें भूत आज माणसाला भेडसावित असून जीवनाचा आलेला कंटाळा घालविण्यासाठीं नशेबाजी व युद्धांतील अमानुष व भयंकर कत्तल यासारखे आत्मघातकी खेळ खेळण्याला तो प्रवृत्त झाला आहे. याचें कारण असें आहे कीं, "पदार्थ-विज्ञानशास्त्र हा शब्दच मुळीं पदार्थांची गति वा चलन-वलन (motion) कसें होतें हें जाणण्याची फक्त इच्छा असं सूचित करतो. पदार्थांचें हें चलन-वलन अथवा गतिमानता कोठें व कशासाठीं हा प्रश्न पदार्थविज्ञानशास्त्र अजिबात बाजूला ठेवतें. भूक, भय, तृप्ति व सुरक्षितता यांतून निर्माण होणाऱ्या गरजा अधिक चांगल्या रीतीनें भागविता याव्यात या प्रेरणेंतून मुख्यतः अर्वाचीन विज्ञानाची वाढ झाली आहे. विज्ञानानें मनुष्याला निसर्गावर अमर्याद प्रभुत्व दिलें आहे; पण त्यानें माणसाला स्वतःवरचें प्रभुत्व दिलें नाहीं. परिणामतः विज्ञानाच्या वाढीबरोबर माणसाच्या मनाचा विकास झालेला नाहीं. लोभ व भय हे जे माणसांमधील पाशवी गुण अथवा विकार त्यांच्यातून निर्माण होणारीं जीं साध्यें तीं अधिक पूर्णतेनें सिद्ध करणाऱ्या साधनांची वाढ विज्ञानामुळें झाली. सिद्धीच्या प्राप्तीच्या मार्गावर साधकाला ऋद्धिसिद्धि प्राप्त व्हाव्यात तशीच स्थिति विज्ञानाची आज झाली आहे. विज्ञानाचा व्यवहारांत उपयोग केल्यानें (applied science) पृथ्वीतलावर

सुखाचा स्वर्ग निर्माण झाला आहे पण ऋद्धिसिद्धिपासून प्राप्त होणाऱ्या निरनिराळ्या शक्ती व सुखोपभोग म्हणजे जशी सिद्धि नव्हे व तो साधनेचा खरा हेतूहि नव्हे त्याचप्रमाणें निसर्गाच्या नियमांच्या ज्ञानाच्या व्यावहारिक उपयोगामुळें प्राप्त होणारीं विलक्षण व चमत्कृतिजन्य सुखसोयींचीं साधनें म्हणजे विज्ञान नव्हे व विज्ञानाचा तो खरा हेतूहि नव्हे. शुद्ध विचार, तत्त्वजिज्ञासा, केवळ जाणिवेची अथवा ज्ञानाची वाढ ही खरोखर वैज्ञानिक संशोधनाच्या मागची चोदना असली पाहिजे. विज्ञान म्हणजे एकतेचा शोध. माणसाला विश्वाचा जेवढा म्हणून अनुभव येतो त्या सर्व अनुभवांचा ज्यानें नीट अर्थ लागेल व सम्यक् बोध होईल असें एक सर्वव्यापी तत्त्व विज्ञान गृहित गोष्ट मानतें. जें पिंडीं तेंच ब्रह्मांडीं. मनुष्यमात्रच काय पण सर्व जीवमात्र एक आहे; नव्हे सर्वत्र एकच वस्तू व्यापून राहिली आहे. सचेतनसृष्टीला लागूं होणारा एक भाग व अचेतन सृष्टीला लागूं होणारा दुसरा भाग असे निसर्गाच्या नियमाचे दोन भाग नाहींत. या दोन सृष्टि भिन्न नसून एक पूर्ण वस्तू आहे व तिला लागूं होणारा नियमहि (Law) एकच आहे. 'ऋतं च सत्यं चाभिद्धात्तपसोऽध्यजायत' आत्म व अनात्म मिळून विश्वाचें संपूर्ण ज्ञान होतें. 'ज्ञान विज्ञान सहितम्।' बाह्यतः या वस्तू दोन भासल्या तरी मूलतः त्या एकच आहेत ही गोष्ट सिद्ध होण्याला आजच्या विज्ञानानें मदतच होणार आहे. केवळ अंतर्सृष्टीचें निरीक्षण करून योगी अथवा साक्षात्कारी विश्वाच्या एकत्वाचा सिद्धांत आतांपर्यंत स्वानुभव म्हणून प्रतिपादित असत. आंतां आजचें विज्ञानहि या सत्याला पुष्टि देऊं शकेल.

पण विज्ञानाच्या या मुख्य प्रयोजनाला वैज्ञानिकांकडूनच अद्याप सार्वत्रिक मान्यता मिळत नाहीं तेथें सामान्य जनांच्या हृदयांत या श्रद्धेचा प्रवेश फार दूर आहे हें मान्य केलें पाहिजे.

## विज्ञानाची अपूर्णता

विज्ञान म्हणजे प्राधान्यतः पदार्थविज्ञानशास्त्र व विज्ञानानें होणारें विश्वाचें ज्ञान म्हणजे पदार्थविज्ञानशास्त्राच्या नियमांनीं होणारें ज्ञान. त्यांत प्राणिशास्त्र व मनोविश्लेषणशास्त्रच काय, उच्च/सूक्ष्म पदार्थ-विज्ञान ज्या विश्वाचा विचार करतें तें विश्वहि येत नाहीं या सांप्रदायिक अथवा संकुचित मताचा आग्रह वैज्ञानिक जगांत कायम आहे तोंपर्यंत आजचें विज्ञान संपूर्ण विश्वदर्शन असण्याचा दावा करूं शकणार नाहीं, असें म्हणणें भाग आहे. यंत्रवाद संपूर्ण विश्वदर्शन नाहीं. कारण त्यानें माणसाला येणाऱ्या सर्व अनुभवांचा नीट उलगडा होत नाहीं.

याशिवाय आधुनिक विज्ञानप्रक्रियेंतील सर्वांत मोठा उणेपणा म्हटला म्हणजे ज्ञाता, ज्ञेय व ज्ञात या त्रिपुटींतील तीन पदांपैकी एकच पदाचा म्हणजे ज्ञेयाचा विचार तिच्यांत केला जातो. त्यांत ज्ञाता व ज्ञान यांचा विचार मुळींच होत नाहीं. या उणेपणामुळें तें जडवादी बनलें आहे व म्हणून तें मानवी मूल्यांचा विचार करणारें किंवा तीं निश्चित करणारें शास्त्र होऊंच शकत नाहीं. तें त्याचें प्रयोजनच नाहीं. 'आहार निद्रा भय मैथुनं च' यापेक्षां मानवाची कांहीं निराळीं मूल्यें असूं शकतील किंवा असावींत असा विचार विज्ञान करीत नाहीं. मानवांची ही मूल्यें ठरलेलींच आहेत. फक्त तीं सिद्ध करण्याची साधनें वाढविणें एवढेंच आपलें काम असें विज्ञान मानतें. "आधुनिक विज्ञानानें उत्पादक व विध्वंसक साधनांची निर्मिति प्रचंड प्रमाणांत केलेली आहे. या निर्मितीची प्रभावशीलता निर्विवाद आहे. पण साधन-निर्मिति, मग ती कितीहि प्रभावी असो, ती मानवी साध्यांवर कसलाहि प्रकाश पाडूं शकत नाहीं. अखिल मानवांचे प्रश्न हे जितके साधनप्रधान आहेत त्यापेक्षां अनंतपटीनें अधिक असे ते साध्यप्रधान आहेत." पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, मानवी जीवनाच्या मुख्य समस्या, विशेषतः युद्धाची समस्या सोडविण्याच्या बाबतीत विज्ञान मौन धारण करतें. जडसृष्टीच्या स्वभावाचें विश्लेषण हीच विज्ञानानें आपल्या संशोधनाची मर्यादा मानल्यामुळें व तिचेच नियम जीवाला व मनाला अथवा प्रज्ञानाला लावल्यामुळें माणसाची शक्ति कमालीची वाढली असली तरी त्याचीं मूल्यें मुख्यतः पाशवीच राहिलीं आहेत. त्यामुळें एका अर्थानें त्याच्या जीवनाची पशूंपेक्षाहि भयानक करुणामय शोकांतिका झाली आहे; तो आत्मनाशाला प्रवृत्त झाला आहे.

## नवी महान् क्रांति

पण आज विज्ञानच असें सांगत आहे कीं, बाह्यसृष्टीचें कोणतेंहि कल्पनाचित्र मनावर अवलंबून आहे. कारण मन बाह्य सृष्टीचें केवळ अवलोकनच करीत नाहीं तर अवलोकन करीत असतांना विश्वाची रचना करीत असतें. मन हें उत्तम विश्व-गर्भ आहे. अशा रीतीनें मन हेंच अचेतन-सचेतन सृष्टीचें निर्माता असल्यामुळें पाणी जसें गढूळ किंवा निर्मळ असेल तसें त्यांत पडणारें वस्तूचें प्रतिबिंब अस्वच्छ किंवा स्वच्छ असेल हा नियम मनाला व त्यानें निर्माण केलेल्या सृष्टीलाहि लागू आहे हें अगदीं उघड आहे. रागद्वेषानें मलीन झालेल्या मनाला – अमनस्कः सदाऽशुचिः – व वीतराग मनाला – समनस्कः सदा शुचिः – होणाऱ्या विश्वाच्या ज्ञानांत महदंतर असेल ही गोष्ट आतां गूढ अध्यात्म राहिलें नसून तळहातावरच्या आवळ्याइतकें स्पष्ट विज्ञान

झालें आहे. म्हणून मानव व त्याची संस्कृति यांच्या बचावासाठीं अखेरचें युद्ध लढण्याचें धर्मक्षेत्र अथवा कुरुक्षेत्र कोणतें असेल तर तें माणसाचें मन (psyche) आहे. माणसाच्या इच्छाशक्तीनें होणाऱ्या सर्व कर्मगंगेचें उगमस्थान माणसाचें मानससरोवर आहे. इतकें सांगितल्यानंतर मानवी मूल्यें कोण ठरवितें हें आतां निराळें सांगण्याची जरुरी नाहीं. त्या दृष्टीनें माणसाच्या मनाचें महत्त्व अपरंपार आहे. माणसाच्या उत्क्रांतीचा अथवा आरोहणाचा पुढचा मार्ग या दिशेनें आहे यांत तिळमात्र संशय नाहीं. "भविष्यकाळ अप्लाइड मनोविश्लेषणशास्त्राचा असून त्यामुळें माणसाच्या व्यवहारांत भौतिक क्रांतिपेक्षां कितीतरी पटीनें अधिक खोल व गंभीर क्रांति घडून येणार आहे" असें एच.जी. वेल्सनें एका ठिकाणीं म्हटलें आहे तें अगदीं यथार्थ आहे. पण आजच्या माणसाचें मन शक्तिप्रदान करणाऱ्या भौतिकशास्त्रांनीं इतकें भारून गेलें आहे कीं, त्या क्षेत्रांतील कोणताहि चमत्कार शक्य आहे असें मानणारा माणूस, मानसिक क्षेत्रांतील बदल म्हणजेच हृदयपरिवर्तन व त्यामुळें माणसाच्या जीवनांत व व्यवहारांत विलक्षण बदल घडून येण्याच्या शक्यतेविषयीं कोणी बोलू लागला कीं, त्याचें 'हसें' उडविण्याला किंवा 'टर' करण्याला तयार होतो! पण वस्तुस्थिति अशी आली आहे कीं, या विश्वाच्या व्यापारांत माणसाला कांहीं भवितव्य असेल तर तें याच मार्गानें गेलें तर आहे.

### भौतिक दृष्टिकोनाच्या मर्यादा

'शरीरापेक्षां वेगळा असा आत्मा असतो... व मनुष्य हा मूलतः चांगलाच असतो' हा सर्वोदय दर्शनांतील सिद्धान्त वास्तव कीं अवास्तव, योग्य कीं अयोग्य, आणि आवश्यक कीं अनावश्यक हा वाद एक क्षण बाजूला ठेवला तरी, आज माणसाच्यापुढें 'जगावयाचें कीं मरावयाचें?' असा जो यक्षप्रश्न उभा आहे त्याचें 'जगावयाचें' असें उत्तर मिळावयाचें तर, 'मनुष्य मूलतः संपूर्णतया चांगला किंवा वाईट नसतो तर आनुवंशिक वारसा (Biological heritage) व सामाजिक आणि नैसर्गिक परिस्थिति यांचा तो परिवर्तनशील परिपाक आहे' हें शास्त्रीय सत्य आहे असें मानलें तरी तेवढ्यानें माणसाच्या पुढचा मुख्य प्रश्न सुटत नाहीं. माणूस आज आहे तसाच सदैव राहणार असेल तर आज भौतिक शास्त्रांनींच अशी परिस्थिति निर्माण केली आहे कीं, त्याला 'मरण्याशिवाय' गत्यंतरच नाहीं. आजच्या माणसांत परिवर्तन झाल्याशिवाय त्याच्या जीवनाचा नंदादीप पुढें जळूंच शकत नाहीं. माणसाचें हें जें परिवर्तन व्हावयाचें किंवा होणें जरूर आहे तें कोणत्या दिशेनें हा महत्त्वाचा विचारणीय प्रश्न आहे. या परिवर्तनाला माणसाच्या शरीरांत आतां अवकाश नाहीं, कारण त्याचा पूर्ण विकास झाला आहे. माणसाच्या सध्याच्या शरीरांत कांहीं अकल्पित वाढ झाली तर उत्क्रांतीच्या इतिहासांत कांहीं प्राण्यांच्या बाबतींत घडलें त्याप्रमाणें ती कांहींतरी वेडीवाकडी वाढ होऊन ती त्याच्या मृत्यूचेंच प्रसादचिन्ह ठरेल. पण माणसाच्या मनांत (psyche) परिवर्तन होण्याला अनंत अवकाश आहे. या मुद्यावर सर्वांचें एकमत होईल असें मला वाटतें. पण भौतिक शास्त्रांची आणखी कितीहि वाढ झाली तरी त्याचा माणसाच्या मनाची वाढ किंवा विकास होण्याला विशेष मदत होणार नाहीं, झाला तर अडथळाच होईल. या बाबतीतहि मला वाटतें सर्वांचें एकमत होण्याला सद्यःस्थितींत फारशी अडचण पडूं नये.

माणसाचें मन हेंच जर सर्व विश्वाचें वा वस्तूचें उगमस्थान व आधारकेंद्र आहे (source & sustenance) तर पृथ्वी तसा नरकच काय पण स्वर्गसुद्धां माणसांतच आहे. पण आज माणसाला असली तर नरकाची किंवा फार तर पृथ्वीची जाणीव आहे; स्वर्गाची जाणीव असलेले लोक 'मनुष्याणां सहस्रेषु' प्रमाणें अगदीं विरळाच. येथें 'जेथे महासिद्धींचीं भांडारें। अमृताचीं कोठारें। जिथे गांवीं खिल्लारें। कामधेनूंची।। गंधर्व गात गाणीं। जेथें रंभेऐशिया नाचणीं। उर्वशी मुख्य विलासिनी। अंतोरिया।।' हा स्वर्ग अभिप्रेत नाही हें सांगण्याची जरूरीच नाहीं.

### मानसिक अंतर तोडणें आवश्यक

विज्ञानानें माणसाला पृथ्वीचा स्वर्ग करण्याची शक्ति दिली असतां तो तिचा नरक करूं पहात आहे. याचें कारण विज्ञानानें 'काल व अंतर' जवळ जवळ नष्ट करून भौतिक जग एक केलें असलें तरी त्यानें मानसिक जगांतील अंतर वा भेद तोडलेला नाहीं. ही गोष्ट त्याच्या क्षेत्राच्या तसेंच शक्तीच्या बाहेरची आहे. सामान्यतः आजच्या माणसाची संज्ञा किंवा जाणीव (consciousness) 'मी म्हणजे हा देह' ही असते. त्याच्या सर्व जीवन व्यापाराचे मणी, मी, मी, मीच्या अहंकार सूत्रांत गोवलेले असतात. मी तुझ्याहून वेगळा आहे, मला हें पाहिजे, मला तें पाहिजे, माझी अशी इच्छा आहे, अशा अहंकारमय इच्छा व भावनांचें गाठोडे म्हणजे माणसाचें मन म्हणजेच आजचा माणूस होय. माणसाचा हा 'मी' म्हणजे अहंकार वर्ण, गोत्र, जात, राष्ट्र, संस्कृति, धर्म अशीं नाना गोंडस नांवे व सुंदर सोंगें घेऊन व्यापक स्वरूप धारण करून वावरत असतो. परंतु माणसाच्या अहंकारानें कितीहि व्यापक स्वरूप धारण केले तरी त्याचे अन्न व पोषण, भेद अथवा वेगळेपणा व विरोध/दुरावा हें असून त्याचा अपरिहार्य परिणाम विरोध व संघर्ष हा आहे. आत्मा,

परमात्मा व अध्यात्म दूर ठेवलें तरी आजच्या अणुशक्तीच्या युगांत मानवी संघर्ष व सर्वनाश टाळायचा असेल तर, वर्ण, गोत्र, जात, राष्ट्र, संस्कृति, धर्म वगैरे वाह्य उपाधींचा वा आवरणांचा छेद वा निरास करून माणसाची माणसाकडे पाहण्याची दृष्टि वदलली पाहिजे या विषयीं मतभेद होण्याची मला वाटतें आतां भीति उरलेली नाहीं. भेदाच्या अगर वेगळेपणाच्या ऐवजीं अभेद व एकता, दुरावा/विरोध ऐवजीं परस्परावलंबित्व व विसंवादाच्या ठिकाणी संवादित्व पाहण्याची दृष्टि माणसाला आली पाहिजे. यासाठीं माणसाची देहात्मबुद्धि म्हणजे आजची संज्ञा किंवा जाणीव (consciousness) व्यापक झाली पाहिजे. माणसाचा सर्व व्यवहार सर्वात्मबुद्धीनें झाला पाहिजे. (वासनात्मक) मन जेथें एक आहे तेथें दोन कल्पितें; तर (शुद्ध वा व्यवसायात्मक) मन अथवा बुद्धि म्हणा जेथें दोन आहेत तेथें एक कल्पिते. विश्लेषण हा मनाचा धर्म आहे तर समन्वय हा बुद्धीचा धर्म आहे. म्हणून माणसाचा सर्व व्यवहार या शुद्ध वा व्यवसायात्मक बुद्धीच्या प्रकाशांत झाला पाहिजे. 'बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेवच।'.

सर्व विश्व वा वस्तू खरोखर एकच असतांना ती नाना भासते याचें कारण तिच्यांत भेद आहेत हें नसून पाहणारा माणूस तिच्याकडे निरनिराळ्या भूमिकेवरून पाहतो म्हणून त्याला तिच्यांत भेद दिसतात. परमार्थतः तिच्यांत भेद नाहींत. "यदेवेह तदमुत्र यदमुत्र तदन्विह। मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति।। मनसैवेदमाप्तव्यं नेह नानास्ति किंचन। मृत्योः समृत्युं गच्छति य इह नानेव पश्यति।।" भेदांत मृत्यू आहे या ज्ञानाची निकड 'इहलोकाशिवाय दुसरा लोक नाहीं' असें मानणाऱ्याच्या वाबतींतहि आज विज्ञानानें निर्माण केली आहे. मानव व त्याची संस्कृति यांचे विज्ञानाने निर्माण केलेल्या सर्वविनाशी संहारक शस्त्रास्त्रांपासून रक्षण व्हावयाचें तर माणसानें भेदांत अभेद व अनेकांत एक पहावयाला शिकल्याशिवाय तरणोपाय नाहीं. हें ज्ञान संपादन करणें हा आजच्या विज्ञानयुगांत माणसाचा सर्वश्रेष्ठ पुरुषार्थ ठरला पाहिजे. हें ज्ञान संपादन करण्याची शक्ति माणसांत आहे हा त्याच्यावर प्रसाद आहे. फक्त उत्क्रांतीच्या मार्गावरील हा पुढचा गुणात्मक टप्पा आहे हें ओळखून प्रयत्नपूर्वक जाणीवेनें त्यानें पुढचें पाऊल टाकलें पाहिजे.

या एकत्वाच्या ज्ञानाचा – 'अविभक्तं विभक्तेषु' – परलोकाशीं वा परमार्थाशीं संवंध आहे, त्याचा इहलोकाशी वा स्वार्थाशी कांहीं संबंध नाहीं अशी सामान्य समजूत आहे. भेदाशिवाय व्यवहार शक्य नाहीं हे खरें; पण व्यवहारासाठीं भेद करीत असताहि दृष्टि अभेदावर खिळलेली असली पाहिजे. विश्वामधील निरनिराळीं तत्त्वें व घटना यांच्या मधील संबंध, संवादित्व व परस्परावलंबित्व यांच्यावर भर देण्याला शिकलें पाहिजे; व शिकविलें पाहिजे. अवयव-अवयवी संवंधाचें कधींहि विस्मरण होतां कामा नये. मुलांच्या खेळण्यांत असें एक चित्र किंवा सफेत-काळें ड्रॉइंग असतें कीं, जें एका कोनांतून पाहिलें तर कोणी आग पेटवून त्यावर स्वयंपाक करीत आहे असें दिसतें; तर दुसऱ्या कोनांतून पाहिलें तर जंगलांतील झोपडीसारखें भासतें. हीं दोन्हीहि दृश्यें त्या चित्रांत वस्तुतः नव्हतीं; अनेक रेषा व विंदु यांच्या एकाच मुशीचे ते दोन दृष्टिकोन होते. विश्वाचें असेंच आहे. त्याच्याकडे ज्या दृष्टिकोनांतून आपण पाहूं तसें तें दिसतें आणि विश्वाकडे पाहण्याचे दृष्टिकोन अनेक आहेत हा सामान्य माणसाचाहि सार्वत्रिक अनुभव आहे. म्हणून भेदावर आधारलेला व्यवहार करीत असतांहि अभेदाचें भान ठेवणें जितकें वाटतें तितकें कठिण नाहीं. मात्र प्रत्येकाला वाळपणापासून त्याचें शिक्षण मिळेल अशी समाजांत व्यवस्था झाली पाहिजे.

आज विज्ञानाची जी वाढ होत आहे त्यामुळें असें शिक्षण देणें सुलभ होईल. मात्र पूर्वी म्हटल्याप्रमाणें विज्ञान सत्यार्थानें समजलें पाहिजे. विज्ञानानें माणसाला उपलब्ध करून दिलेलीं सुखाचीं साधनें म्हणजे विज्ञान नव्हे तर वाह्य विश्वांत एकत्वाचा शोध म्हणजे विज्ञान होय. कांहीं वैज्ञानिकांच्या लिखाणावरून व उच्चारांवरून विज्ञानाचें हें सत्यस्वरूप वैज्ञानिक जगांत मान्य होऊं लागलें आहे असें मानण्याला जागा आहे. तथापि हें सत्य केवळ बुद्धीला गोचर होऊन चालत नाहीं. माणसाच्या रोजच्या व्यवहाराचें ते सूत्र वनावयाचें तर त्याच्या हृदयाला प्रत्यक्ष अनुभव यावा लागतो. अंतिम परिमाणांत विज्ञानाला ही गोष्ट शक्य नाहीं. कारण वैज्ञानिक संशोधनाची प्रक्रिया समन्वयात्मक (synthetic) नाहीं. ती मुख्यतः वस्तुभेदावर आधारलेली विश्लेषणात्मक (analytical) आहे. शिवाय विज्ञानांत अखेर ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय अथवा द्रष्टा, दर्शन व दृश्य ही त्रिपुटी शिल्लक राहतेच. भेदाचा पूर्ण निरास होऊन संपूर्ण एकत्वाचा अनुभव त्यांत येऊं शकत नाहीं.

**समतेचे शिक्षण आवश्यक**

माणसाला अशी एकत्वाची अनुभूति आणून देणें समन्वयात्मक योगालाच शक्य आहे. शुद्ध चित्तालाच एकत्वाचा अनुभव येतो. जसजसें चित्त शुद्ध होत जातें तसतशी समत्वाची जाणीव वाढत जाते म्हणून योगामध्ये चित्तशुद्धीचे नियम व प्रक्रिया सांगितलेल्या आहेत; पण मुख्य योग म्हणजे समत्व – समता – 'समत्वं योग उच्यते'. भेद वा विषमता मनाचा धर्म आहे तर अभेद वा समता बुद्धीचा धर्म आहे. काम मनाचा स्वभाव आहे तर माणसाच्या

इच्छा अथवा वासना श्रेष्ठ जीवनाच्या प्रकाशानें धवळून काढून त्या निर्मळ करून घेणें हे बुद्धीचें काम अथवा लक्षण आहे. म्हणून माणसाच्या जीवनांत मन व बुद्धि यांचें ऐक्य असलें पाहिजे व हेंच योगाचें सार आहे. जेव्हां असा हा योग मानवाच्या जीवनांत प्रवेश करील तेव्हांच पृथ्वीवर समतेचें व शांतीचें साम्राज्य प्रस्थापित होईल.

म्हणून वयाच्या ज्या अवस्थेंत माणसाच्या जीवनांत मी इतरांहून वेगळा आहे या जाणिवेचा प्रादुर्भाव होतो, व त्याप्रमाणें त्याचा इतरांशीं व्यवहार सुरू होतो त्याच वाल्यावस्थेपासून एकत्वाची जाणीव करून देणाऱ्या योगाचें शिक्षण माणसाला मिळूं लागलें पाहिजे. भौतिक शास्त्रांची आज जी कमालीची वाढ झाली आहे त्यांचें कारण कित्येक शतकांचा अभ्यास व संशोधन आहे. या अभ्यासाचें व संशोधनाचें फळ म्हणजे माणसानें बाह्य जगावर मिळविलेली सत्ता हें होय. आज सामान्य माणूस या सत्तेचा वारस झाला आहे. योगाचाहि असाच निरलसतेनें, एकाग्रतेनें व सातत्यानें अभ्यास व संशोधन होईल तर बाह्य जगाप्रमाणें आंतल्या जगावरहि माणूस आपली सत्ता कायम करूं शकेल. असें होईल तर व्यक्तीच्या जीवनांतच नव्हे तर समाजाच्या जीवनांत संवादित्व व शांति प्रस्थापित होईल व संघर्ष टळेल.












# उपविभाग ४ : गीता, टिळक आणि गांधी

'नवभारत'च्या ऑक्टोबर १९५०च्या अंकांतील श्री. वा.ल. चिपळूणकर यांचा 'साधनशुचिता' हा लेख वाचल्यावर 'केसरी'चे १६ मे व ३० मे असे दोन्हीहि अंक मागविले व " 'सिद्धावस्था व व्यवहार' प्रकरण पुन्हां एकदां वाचा" हा श्री. तात्यासाहेब करंदीकर यांचा परीक्षणात्मक लेख व 'साधनशुचिता' या विषयावरील प्रा. न.र. फाटक यांच्या व्याख्यानाचा वृत्तान्त अनुक्रमें वाचला. श्री. तात्यासाहेवांनीं आपल्या दीर्घ लेखाच्या अखेरीस वाचकांना अशी विनंती केली आहे कीं, " 'रहस्या'चा विपर्यास करणाऱ्या वावदूकांच्या तर्कटानें दिशाभूल होऊं न देतां त्यांनीं गीता वाचावी आणि 'रहस्या'चा गाढ अभ्यास करावा. विशेषतः 'कर्माकर्म-विचार' आणि 'सिद्धावस्था व व्यवहार' हीं दोन प्रकरणें तर यांनीं मुखोद्गत करावीं". गद्य पाठांतराचा विषय करणें सहसा कठिणच जातें. तथापि श्री. करंदीकर यांनीं उल्लेखिलेल्या या दोन प्रकरणांतच ज्या सिद्धान्ताचें लोकमान्यांनी अतिप्रखर बुद्धिमत्तेनें प्रतिपादन केले आहे त्याचा माझ्या बुद्धिकुहरांत सदा ध्वनि उमटत असला तरी वावदूकांच्या तर्कटाला वळी पडून लोकमान्यांच्या म्हणण्याचा विपरीत अर्थ करण्याचें पाप चुकूनहि पदरीं पडूं नये म्हणून 'गीतारहस्या'तील या दोन प्रकरणांची पुनः एकदां मीं उजळणी केली. अंतःकरणाला आनंद झाला; पण वुद्धीला अधिक प्रकाश मिळाला नाहीं. एवढा खटाटोप करण्याचें कारण इतकेंच कीं, मनाला या विपयाची अवीट गोडी आहे. आणि तीहि एक वौद्धिक कसरत म्हणून नव्हें तर, जीवनधर्म म्हणून आहे. जीवनाचा विचार व आचार या विषयाच्या मुर्शीत घडविण्याचा अल्पसा प्रयत्न मी सदा करीत आलो आहे. व या बावतींत अखंड जिज्ञासूवृत्ति ठेवली आहे. वाद-प्रतिवाद करणाऱ्या पंडितांची आग्रही बुद्धि मी धारण केलेली नाहीं. 'तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया' या गीतावचनांत सूचित झालेली जिज्ञासूची वृत्ति या विपयासंबंधीं माझी आहे. या विपयाचा अभ्यास व मनन करतांना माझ्यासमोर जे प्रश्न उभे राहिले ते 'परिप्रश्न'-पूर्वक वृत्तीनें या विषयाच्या आस्थेवाईक विद्वान् अभ्यासकांसमोर प्रस्तुत लेखांतून मांडण्याचा मी प्रयत्न करीत आहे.

## १. सिद्धावस्था व व्यवहार*

### स्वानुभव कीं आप्तवाक्य?

'गीतारहस्या'च्या अद्वितीय प्रतिपादनशैलीनें भारला गेल्यामुळें माझी कांहीं काल अशी ठाम समजूत झाली होती कीं, गीतेंतील 'तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगी विशिष्यते' हा अविरत कर्माविषयींचा सिद्धान्त व 'यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते। हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते।।' यांतून निघणारा परमावधीच्या शुद्ध बुद्धिविषयींचा सत्य सिद्धान्त यांविषयीं आव्हानपूर्वक संशय घेण्याची कोणाचीहि पात्रता नाहीं. तत्त्वापेक्षां विभूतीला मानणाऱ्या कांहीं धर्मांच्या अनुयायांची अशी श्रद्धा असते कीं, त्यांच्या धर्मसंस्थापकांनीं सांगितलें तेंच अखेरचें सत्य; त्यानंतर कोणीहि कांहींहि नवीन सांगूं शकणार नाहीं. मलाहि श्री. तात्यासाहेब करंदीकरांच्यासारखेंच वाटे कीं, गीतेचा सत्यार्थ सांगणारा 'गीतारहस्य' हाच शेवटचा ग्रंथ! पण महात्मा गांधींनीं या माझ्या समजुतीला चांगलाच धक्का दिला. लोकमान्यांनीं 'कर्मयोग' हें गीतेचें रहस्य काढलें तर गांधीजींनीं 'अनासक्तियोग' असें रहस्य सांगितलें. हा केवळ शब्दांचा भेद नसून त्याच्यामागें वृत्तीचाहि भेद आहे हें गीताभ्यासकांच्या ध्यानीं आल्यावांचून राहणार नाहीं. 'यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते। हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते।।' या श्लोकाच्या अर्थावरील आपल्या टिप्पणींत गांधीजी म्हणतात : "वर-वर वाचला तर हा श्लोक मनुष्याला

* पूर्वप्रकाशन : *नवभारत*, वर्ष ४, अंक ५, फेब्रुवारी, १९५१.

भ्रमांत टाकणारा आहे. गीतेंतील अनेक श्लोक काल्पनिक आदर्शांचा अवलंब करणारे आहेत. त्याची हुबेहुब नक्कल जगांत मिळणें शक्य नाहीं व भूमितीत ज्याप्रमाणें काल्पनिक आदर्श आकृतीची आवश्यकता असते त्याचप्रमाणें त्याची धर्मव्यवहारांत असते. ज्याची अहंता नष्ट झाली आहे व ज्याच्या बुद्धींत लेशमात्रहि मलिनता उरलेली नाहीं त्याच्या बाबतींत हें म्हटलें जाऊं शकतें कीं, तो साऱ्या जगाला नष्ट करो. परंतु ज्यांच्यांत अहंता नाहीं त्याला शरीरहि नाहीं. ज्याची बुद्धि शुद्ध आहे तो त्रिकालदर्शी होय. असा पुरुष केवळ एक परमेश्वरच असूं शकतो. तो करूनहि अकर्ता आहे व मारूनहि अहिंसक आहे. यामुळें मनुष्यापुढें न मारण्याचा व शिष्टाचाराचा, शास्त्राचाच एक मार्ग आहे". संस्कृतांचें आपलें ज्ञान फार अल्प आहे व आपण गुजराती भाषेंतहि पारंगत नाहीं, हें मान्य करूनहि गांधीजी प्रतिज्ञापूर्वक लिहितातः "गीतेचे अर्थ करणारे तो अर्थ स्वतःच्या जीवनांत आणल्याचा क्वचितच दावा करतात; पण माझे हे अनुभवाचे बोल आहेत. कारण गीतेचा जो अर्थ मी समजलों आहे, तो स्वतःच्या जीवनांत आणण्याचा मीं गेली ४० वर्षे सतत प्रयत्न केला आहे असा माझा दावा आहे. गीतेची शिकवणूक आचरणांत आणणाऱ्याला आपोआपच सत्याचें व अहिंसेचें पालन करावे लागतें... या बाबतींतील माझा ४० वर्षांचा अखंड प्रयत्न मला असें सांगतो कीं, संपूर्ण फलत्याग सर्व प्रकारच्या अहिंसेचें सर्वांगीण पालन केल्याशिवाय असंभव आहे असें मीं नम्रपणें सांगूं इच्छितो". उलट, "ब्रह्मात्मैक्यं ही एक शक्य कोटीतील गोष्ट आहे व या अनुभवस्थितींत मीपणाच्या दुजाभावाचा नाश होत असला तरी यांत आत्मनाश नाही हा अध्यात्मांतील सिद्धान्त सत्य आहे" याची ग्वाही लोकमान्यांनीं स्वानुभवावरून दिली नाही; तर, त्यासाठीं साधुसंतांचा अनुभव आपण प्रमाण मानला पाहिजे, असें म्हटलें आहे. तसेंच सिद्धावस्था ही एक काल्पनिक स्थिति नसून ती मनोनिग्रहानें व प्रयत्नाने इहलोकींच प्राप्त होते, या बाबतींतहि लोकमान्यांनी आमच्या शास्त्रकारांचा अनुभव दिला आहे, 'ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम्' या श्लोकार्धाच्या अर्थाविषयींचा लोकमान्य व गांधीजी यांच्यामधील वाद प्रसिद्धच आहे. यांतून लोकमान्यांनीं 'शठं प्रति शाठ्यं' हा व्यवहारार्थ काढला तर गांधीजींनीं 'शठं प्रत्यपि सत्यं' ही व्यवहारनीति प्रतिपादिली.

#### निरपवाद धर्माचरण करणाऱ्या सिद्धाची कल्पना

प्रस्तुतच्या वादाचा मुख्य विषय असा आहे कीं, निरपवाद धर्माचरण व्यक्तीला शक्य आहे कां? आणि तसें तें असलें तरी, समाजहिताच्या आणि धारणेच्या दृष्टीनें तें धर्म्य अतएव इष्ट आहे कां? यावर गांधींजींचे म्हणणें असें की,[1] "देहधाऱ्याला निरपवाद सत्य अगर निरपवाद अहिंसा शक्य नाहीं. ती एक परमेश्वराला शक्य आहे. देहधारी मानव सदा अपूर्णावस्थेंतच राहणार. तथापि, भूमितींतील शून्य व रेषा अशांसारख्या काल्पनिक आदर्श आकृतीप्रमाणें पूर्णावस्थेकडे जाण्याच्या प्रयत्नात मानवाला निरपवाद सत्य व निरपवाद अहिंसा यांसारख्या काल्पनिक आदर्शाची आवश्यकता आहे, व तो डोळ्यांपुढे ठेवून माणसानें सदा प्रयत्न करीत रहावें व परिस्थितीसापेक्ष त्यांत बदल किंवा तडजोड करूं नयें". याच्या उलट, टिळकांचें म्हणणें असें कीं, "पूर्णावस्था व सिद्धावस्था ही एक काल्पनिक स्थिति नसून मनोनिग्रहानें व प्रयत्नानें ती इहलोकींच प्राप्त होऊं शकते. म्हणून निरपवाद सत्याचें अगर निरपवाद अहिंसेचें आचरण माणसाला शक्य आहे. पण अशा पूर्ण पुरुषालाहि परिस्थितिसापेक्ष अपवाद अगर तडजोड त्यांत करावी लागते, नव्हे समाजाचें हित व धारणा डोळ्यापुढें ठेवून त्यानें तसें करणे हें धर्म्य म्हणून इष्टहि आहे. 'तस्मान्नित्यं क्षमा तात पंडितैरपवादिता' – 'यासाठींच बावा, शहाण्या पुरुषानें क्षमेस नेहमीं अपवाद सांगितले आहेत'; 'श्रेयस्तु चानृतं वक्तुं सत्यादिति विचारितम्' – '(त्यावेळीं) सत्यापेक्षां खोटें बोलणें अधिक प्रशस्त, असे विचारान्तीं ठरलेलें आहे'. कारण सत्य बोलणें हें प्रशस्त होय; पण सत्यापेक्षांहि सर्वभूतांचें ज्यांत हित असेल तें बोलावें; कारण सर्व भूताचें ज्यांत अत्यंत हित तेंच खरें सत्य होय. 'सत्यस्य वचनं श्रेयः सत्यादपि हितं वदेत्। यद् भूतहितमत्यन्तम् एतत्सत्यं मतं मम।।' अखेर धर्माचा तरी हेतु काय? लोकव्यवहार चालून उभयलोकीं माणसाचें कल्याण व्हावें हाच होय. – 'लोकयात्रार्थमेवेह धर्मस्य नियमः कृतः। उभयत्र सुखोदर्कः...।।' म्हणून जे ज्ञानी असतील

पुढील उताराहि पहा : "अहिंसा ही व्यापक वस्तु आहे. आपण हिंसेच्या वणव्याच्या मध्यभागी सांपडलेले पामर प्राणी आहों. 'जीवो जीवस्य जीवनम्' हें वचन खोटें नाहीं. मनुष्य एक क्षणभरहि बाह्य हिंसेशिवाय जगूं शकत नाहीं. पाणी पितां, बसतां, उठतां, सर्व क्रिया करतांना, इच्छा असो वा नसो, थोडी तरी हिंसा तो करीतच असतो. त्या हिंसेमधून सुटण्याचा तो महाप्रयास करीत असेल, त्याची भावना केवळ दयेचीच असेल, तो सूक्ष्मांत सूक्ष्म जंतूंचाहि नाश इच्छीत नसेल आणि यथाशक्ति त्याला बचाविण्याचाच प्रयत्न करीत असेल, तर तो अहिंसेचा पुजारी होय. त्याच्या हरएक कार्यामध्यें नेहमीं वाढता संयम राहील; त्याची करुणावृत्ति निरंतर वाढत जाईल; पण कांहीं झालें तरी कोणीहि देहधारी बाह्य हिंसेपासून सर्वथैव मुक्त होऊं शकत नाहीं".

– महात्मा गांधी, 'आत्मकथा', पान ३२५.







अनुक्रमणिका

त्यांनीं या जगांत निरपवाद सत्याचें किंवा अहिंसेचें आचरण करण्याचा आग्रह न धरतां लोकव्यवहार, नीतिधर्म व आपलें कल्याण या बाह्य गोष्टींचा तारतम्यानें विचार करून मग काय करावयाचें तें ठरवावें – 'लोकयात्रा च दृष्टव्या धर्मश्चात्म हितानिच।'."

पूर्णावस्थेत पोंचलेल्या माणसानेंहि स्वतःच्या आचरणांत परिस्थितीसापेक्ष सत्याला व अहिंसेला अपवाद केले पाहिजेत – म्हणजेच खोटें बोललें पाहिजे व हिंसा केली पाहिजे – असें एकदां लोकमान्यांच्या भूमिकेवरून मान्य केलें, कीं मग निरपवाद सत्याचें व अहिंसेचें सदा आचरण करणारा सिद्धपुरुष आम्हांला पहावयाला केव्हां तरी मिळणें शक्य आहे का? आणि तो तसा पहावयाला मिळणें कधींच शक्य नसेल तर मग गांधीजी म्हणतात त्याप्रमाणें असा पुरुष असणें असंभवनीयच असेच कां मानूं नये? असा तर्कशुद्ध विचार शहाण्या माणसाच्या मनांत आल्यावांचून कसा राहील?

### कृतयुग आणण्यासाठीं मग काय केलें पाहिजे?

या प्रश्नाला लोकमान्यांचें असें उत्तर आहे कीं, "सध्यांच्या या अपूर्ण जगात सदा निरपवाद धर्माचरण करणाऱ्या सिद्ध पुरुषाचें दर्शन दुर्लभ असलें तरी तेवढ्यावरून ते सिद्धपुरुष काल्पनिक आहेत असें मानण्याचें कारण नाहीं. ज्या अर्थी गीतादि शास्त्रे माणसाला अशी सिद्धावस्था प्राप्त करून घेणें शक्य आहे असें सांगतात, त्या अर्थी आपण त्यांच्या सांगण्यावर श्रद्धा ठेवली पाहिजे. एवढेंच नव्हे तर, याच शास्त्राप्रमाणें, एके काळीं या जगांत असे सिद्धपुरुष वावरत होते. 'निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः।'. या काळाला कृतयुग असें म्हणतात. 'अहिंसकैरात्मविद्भिः सर्वभूतहिते रतैः। भवेत् कृतयुगप्राप्तिः आशीः कर्मविवर्जिता।।' – आत्मज्ञानी, अहिंसक, सर्वभूतहितार्थ झटणाऱ्या अशा एकान्तधर्माच्या ज्ञानीं पुरुषांनीं जर हें जग भरून जाईल तर काम्य अगर स्वार्थबुद्धीनें केलेलीं सर्व कर्मे या जगांतून नाहीशीं होऊन पुनः कृतयुग प्राप्त होईल. – यावरून अशा प्रकारची स्थिति पूर्वी एकदा होतीं व पुनः ती केव्हांतरी प्राप्त होईल, असें आमच्या शास्त्रकारांचें मत आहे, हें उघड आहे. पाश्चात्य पंडितांचें मत असें आहे कीं, पूर्वी अशी स्थिति नव्हती, पण पुढें मात्र केव्हां ना केव्हां तरी मानवजातीच्या सुधारणेनें ती प्राप्त होणें शक्य आहे".

येथें आणखी एक असा प्रश्न उत्पन्न होतों कीं, जर एक काळ असा होता कीं, या जगातील सर्व माणसें परस्परांशीं धर्मानें वागत होतीं, तर मग या धर्मांतून अधर्माचा उद्भव कसा व कां झाला? हिंदुधर्मश्रद्धेप्रमाणें हा अधर्म वाढत वाढत कलियुगांत त्याचा अगदीं कळस झाला आहे. मानव प्रथम नंदनवनांत वावरत होता; पण त्यानें तेथील बागेंतील ज्ञानफळ खाल्ल्यामुळें त्याचें पृथ्वीवर पतन झालें व तो जन्म-मृत्यूंच्या व सुख-दुःखांच्या भोंवऱ्यांत सांपडला – या ख्रिश्चन धर्मातील भोळ्या समजुतीप्रमाणेंच आपल्या पूर्वजांनी उराशीं बाळगलेली ही कल्पना तर नव्हे ना? उत्क्रांतीचा कायदा व विकासधर्म मानला तर, पाश्चात्य पंडित म्हणतात त्याप्रमाणें अशी पूर्णावस्था निसर्गाच्या नियमांनुसार मानव आपल्या प्रयत्नानें पुढें केव्हां तरी प्राप्त करूं शकेल किंवा करणार आहे, हें म्हणणें बुद्धीला अधिक पटतें अगर पटण्यासारखें आहे. तथापि पूर्वी केव्हां तरी असें युग होतें या बाबतींत मतभेद असला, तरी पुढें केव्हां तरी कृतयुग येणार आहे या बाबतींत सर्वांचें एकमत असेल तर मग मानवाच्या खऱ्या सुखाच्या व हिताच्या दृष्टीनें मुख्य व महत्त्वाचा प्रश्न हाच कीं, तें कृतयुग आणण्यासाठीं त्यानें काय केलें पाहिजे?

आमच्या शास्त्रकारांच्या किंवा 'रहस्य'कारांच्या श्रद्धेप्रमाणें अशा कृतयुगांत सर्व माणसांना पूर्णावस्था प्राप्त झालेली असेल व कोणासहि कसलीहि स्वार्थबुद्धि उरली नसल्यामुळें सर्वच शुद्ध अंतःकरणानें व निष्काम बुद्धीनें सर्वांच्या हितासाठीं झटतील व तेथें सत्य, अहिंसा, क्षमा, दया, शान्ति या नित्य धर्मांना अपवाद करण्याची किंवा मुरड घालण्याची जरूरीच राहणार नाहीं. सर्व माणसांना पुढें केव्हां तरी कृतयुगांत जी पूर्णावस्था प्राप्त होणार आहे ती, लोकमान्य म्हणतात त्याप्रमाणें, पूर्ण पुरुष या अपूर्ण जगांत जे नित्य व सनातन धर्म आहेत त्यांना व्यवहारात नेहमीं अपवाद करीत गेले तर प्राप्त होईल? कीं गांधीजी म्हणतात त्याप्रमाणे, पूर्णावस्थेची कल्पना डोळ्यांपुढें ठेवून अपूर्ण माणसें या अपूर्ण जगांत जे नित्य व सनातन धर्म आहेत त्यांत, परिस्थिति कशीहि असली तरी, अपवाद अगर तडजोड न करतां वागण्याचा प्रयत्न करतील, तर ती पूर्णावस्था निर्माण होईल? पूर्ण अपूर्णाप्रमाणें वागून अपूर्णांना पूर्ण करतील कीं अपूर्ण पूर्णाचें ध्येय डोळ्यांपुढें ठेवून स्वतः तसें वागतील तर पूर्ण होतील – किंवा, गांधीजींच्या श्रद्धेप्रमाणें, पूर्णावस्थेच्या दिशेनें अखंड प्रगति करीत राहतील?

### नित्य नीतिधर्माचें स्वरूप मूळचें अपूर्ण नव्हे

'गीतारहस्य' व विशेषतः त्यांतील 'कर्मजिज्ञासा' आणि 'सिद्धावस्था व व्यवहार' या दोन प्रकरणांच्या वाचनचिंतनानें माझ्या मनांत पुढील विचार येतात : अहिंसा, सत्य, दया, क्षमा, शान्ति हे जर नित्य सनातन धर्म आहेत तर, या धर्मांचा कधीही नाश होणें शक्य नाहीं ही गोष्टहि स्वयंसिद्ध आहे हें मान्य केलें

अनुक्रमणिका

पाहिजे. सत्य या शब्दाचा धात्वर्थ 'असणारें' म्हणजे 'कधीहि नाहीसें न होणारे' अथवा 'त्रिकालाबाधित राहणारें' असा आहे. सर्व सृष्टि उत्पन्न होण्यापूर्वी 'ऋत' व 'सत्य' ही उत्पन्न झाली व त्या सत्यानेंच आकाश, पृथ्वी, वायु वगैरे पंचमहाभूतेंहि आवरून धरली आहेत असा वेदांतून सत्याचा महिमा गाइला आहे – 'ऋतं चं सत्यं चाभीद्धात्तपसोऽध्यजायत'. सत्याप्रमाणेंच अहिंसेचीहि गोष्ट आहे. "अहिंसा परमोधर्मः". हिंसा म्हणजे नुसता जीव घेणें नव्हे, तर दुसऱ्या प्राण्याचें मन किंवा शरीर यांस इजा करणे याचाहि त्यांत समावेश होतो. अर्थात् अहिंसा म्हणजे कोणाहि सचेतन प्राण्यास कोणत्याहि प्रकारे न दुखविणें होय. गांधीजी यालाच विचार, उच्चार व आचार यात संपूर्ण अहिंसा पाळणें असें म्हणत. जो नियम किंवा न्याय सत्य व अहिंसा यांना लागू तोच इतर नित्य व सनातन तत्त्वांना अगर धर्माला लागूं. म्हणून त्याचा येथें अधिक विस्तार करण्याची आवश्यकता नाहीं.

विश्वाची संपूर्ण धारणा व सर्व प्राणिमात्रांचे हित संपादन या कार्याला – मग तें कार्य ईश्वराचें असो वा निसर्गाचें असो – साहाय्य करण्यात निमित्त व्हावें अशी ज्याची इच्छा असेल त्यानें नित्य व सनातन तत्त्वाचें अगर धर्माचें निरपवाद नित्य पालन करण्याचा यथाशक्ति प्रयत्न केला पाहिजे. विश्वधारणेच्या अगर सर्वभूतहिताच्या कार्यात या नित्यधर्माचे स्वतःकडून निरपवाद पालन न झाल्यामुळें माणसाकडून जेवढा प्रत्यवाय किंवा कमीपणा घडेल तेवढा त्याच्या हातून दोष झाला, असें समजलें पाहिजें व माणसानें या दोषाची जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेतली पाहिजे. लोकमान्य लिहितात : "दुष्ट व लोभी लोकांच्या समाजांत अहिंसा, सत्य वगैरे नित्य नीतिधर्म पूर्णपणें पाळतां येत नाहींत हें खरें; पण त्याचा दोष या नित्य धर्मास देणें योग्य नाहीं. सूर्याच्या किरणांनीं एखाद्या पदार्थाची सावली सपाट प्रदेशावर सपाट, आणि उंचसखल जागेवर उंचसखल पडेल. म्हणून ती सावली मुळांतच उंचसखल असली पाहिजे असें ज्याप्रमाणें अनुमान करतां येत नाहीं त्याचप्रमाणें दुष्ट लोकांच्या समाजांत नीतिधर्माचें पराकाष्ठेचें शुद्ध स्वरूप आढळून येत नाहीं म्हणून अपूर्णावस्थेंतील समाजांत आढळून येणारें नीतिधर्माचें अपूर्ण स्वरूपच मुख्य किंवा मूळचें होय, असें म्हणता येत नाहीं. हा दोष समाजाचा आहे, नीतीचा नव्हे".

**अपूर्ण आचरणाची जबाबदारी कोणावर?**

हा दोष नीतीचा नाही, हें लोकमान्यांचे म्हणणें जितकें मनाला पटतें, तितकें हा 'दोष समाजाचा आहे' हें म्हणणें पटत नाहीं. नित्य धर्माचें आचरण माझ्या हातून झालें नाहीं, याचा दोष समाजाच्या दुष्टपणावर टाकून भागेल असें वाटत नाहीं. दुष्ट समाज उलट असा प्रश्न करील कीं, "मला दुष्ट ठरविणारे तुम्हींच कीं नाहीं? व मी दुष्ट असलों तरी तुम्हांला दुष्ट व्हायला मीं थोडेंच सांगितलें आहे? उलट मी दुष्ट असलों तरी तुम्हीं 'सुष्टा'प्रमाणें वागला असतां तर कदाचित् माझा दुष्टपणा टाकण्याला तुमच्याकडून मला मदत झाली असती!" एखाद्या व्यक्तीवर अगर देशावर तो आक्रमक आहे असा ठपका ठेवून त्यावरील आपल्या हल्ल्याचें समर्थन करणाऱ्या नीतीसारखीच ही नीति भासते. शिवाय समाजाच्या दुष्टपणाची जबाबदारी त्या समाजांतील प्रत्येक व्यक्तीवर – मग ती व्यक्ति कितीहि शुद्ध अगर पूर्ण असो किंवा तशी ती स्वतःला समजो – पडत नाहीं का?[२] स्वतःला शुद्ध वा पूर्ण समजून आपण जें दुष्टाचरण करतों, त्याची सर्व जबाबदारी समाजावर, तो समाज दुष्ट आहे असें म्हणून, टाकणें, हें नित्य व सनातन तत्त्वाशीं अगर धर्माशीं कितपत सुसंगत होईल? याच्यापेक्षां सर्व समाजाबरोबर आपणहि अपूर्णच आहों असें मानून यथाशक्ति सुष्ट व्यवहार करून इतरांना सहायक व मार्गदर्शक होणें अधिक विनयाचें व सर्वांच्या अंतिम कल्याणाच्या दृष्टीनें अधिक श्रेयस्कर होणार नाहीं काय? लोकमान्य पुढें म्हणतात : "म्हणून जे पुरुष शहाणे आहेत ते शुद्ध व नित्य नीतिधर्मांशीं तंटा करीत न बसतां, समाज जेणेंकरून चढत्या पायरीस लागून पूर्णावस्थेस पोहोंचेल असे प्रयत्न करीत असतात". नीतिधर्मांशीं तंटा करीत न बसतां, समाज जेणेंकरून चढत्या पायरीस लागून पूर्णावस्थेस पोंहचेल असे प्रयत्न करणें, हें जितकें शहाणपणाचें, तितकेंच समाज दुष्ट आहे असें म्हणून त्याच्याशीं दुष्टपणाचा व्यवहार न करतां सुष्ट व्यवहार करून त्याला पूर्णावस्थेस पोंचण्यास मदत करणें, हें शहाणपणाचेंच केवळ नव्हे तर कल्याणप्रदहि

२ "आणखीं असें कीं, अहिंसेचा पायाच अद्वैतभावना आहे. आणि जर प्राणिमात्रच अभिन्न आहेत तर एकाच्या पापाचा परिणाम दुसऱ्यावर होणारच; त्यामुळेंहि मनुष्य हिंसेपासून सर्वथैव मुक्त राहूं शकत नाहीं. समाजात वावरणारा मनुष्य इच्छा नसतांहि समाजाच्या हिंसेंत भागीदार बनतोच. दोन प्रजांमध्यें जेव्हा युद्ध होतें, तेव्हां अहिंसा मान्य करणाऱ्या व्यक्तीचें कर्तव्य तें युद्ध थांबविण्याचें आहे. तें कर्तव्य जो करूं शकत नसेल, ज्याच्यामध्यें विरोध करण्याची शक्ति नसेल, ज्याला विरोध करण्याचा अधिकार प्राप्त झालेला नसेल, त्याने लढाईच्या कामांत भाग घ्यावा; आणि भाग घेत असताहि त्या कर्मांतून स्वतःला, स्वतःच्या देहाला, त्याचप्रमाणें जगाला सोडविण्याचा त्यानें मनःपूर्वक प्रयत्न करावा."

– महात्मा गांधी : 'आत्मकथा', पान ३२५.

अनुक्रमणिका

नाहीं का? आज हजारों वर्षे शुद्ध व पूर्णावस्थेस पोहोंचलेल्या पुरुषांनीं समाज दुष्ट म्हणून त्याच्याशीं दुष्टपणाचा व्यवहार केला. त्याचा परिणाम समाजांतील दुष्टपणा कमी होण्यांत झाला, कीं वाढण्यांत झाला? समाजांतील असत्य व हिंसा वाढलीं, क्षमा, दया, शांति कमी झाली म्हणून तर कलियुग (?) आलें. एवढेंच नव्हे तर अधर्माचा कळस होऊं पहात आहे! म्हणून निरपवाद नीतीचा व धर्माचा आचार करावा, अशी विचारसरणी कोणी मांडली व त्याप्रमाणें स्वतः वागण्याचा प्रयत्न केला व इतरांनीं तसें वागावें असा उपदेश केला, तर त्यानें सर्वधर्मसंकर केला व सर्व धर्मांची खिचडी करून राजधर्म विघडविला असा आरोप त्याच्यावर करणें कितपत योग्य होईल? समाज पूर्णावस्थेला नेण्याच्या कामांत अशा निरपवाद धर्माचरणानें मदत होईल, असा कोणी आग्रह धरला तर स्वार्थी लोकांचा समाज त्याला वेड्यांत काढील; पण सर्वश्रेष्ठ धर्माच्या दृष्टीनें त्याला वेड्यात काढणें पापच होणार नाहीं का?

### गांधीजीच पहिले वेडे नव्हेत!

'कर्मजिज्ञासा' व 'सिद्धावस्था व व्यवहार' हीं प्रकरणें वाचूनहि, माणसानें कोणत्याहि परिस्थितींत निरपवाद नीतीला अगर धर्माला अपवाद किंवा मुरड घालूं नये असा आग्रह धरणारे गांधीजीच पहिले वेडे पुरुष निघाले, असें दिसत नाहीं. लोकमान्य लिहितात : "यावरून प्रसंगविशेषीं सांगितलेले वरील अपवाद मुख्य व प्रमाण नसून महादेवांनीं पार्वतीस सांगितल्याप्रमाणें 'आत्महेतोः परार्थे वा नर्महास्याश्रयात्तथा। ये मृषा न वदन्तीह ते नराः स्वर्गगामिनः।।' – 'स्वार्थाकरितां, परहितार्थ, किंवा थट्टेनेहि जे पुरुष या जगीं कधीं देखील खोटें बोलत नाहीत त्यांसच स्वर्गप्राप्ति होते'. आपले वचन किंवा प्रतिज्ञा पाळणें यांचा सत्यांतच समावेश होतो. 'हिमालय पर्वत इकडचा तिकडे चळेल किंवा अग्नि थंड पडेल, पण आपला शब्द अन्यथा होणार नाहीं' असे श्रीकृष्ण व भीष्म यांनीं म्हटलें असून भर्तृहरीनेंहि 'तेजस्विनः सुखमसूनपि संत्यजन्ति। सत्यव्रत-व्यसनिनो न पुनः प्रतिज्ञाम्।।' – 'तेजस्वी म्हणजे बाणेदार पुरुष आनंदानें प्राणहि देतील; पण आपली प्रतिज्ञा मोडणार नाहींत' असें सत्पुरुषांचें वर्णन केलें आहे. तसेंच 'द्विः शरं नाभिसंधत्ते रामो द्विर्नाभिभाषते' अशी रामचंद्राच्या एकपत्नीव्रतावरोबरच एकवाणी व एकवचनी व्रताचीहि ख्याति झालेली आहे; आणि हरिश्चंद्रानें स्वप्नांत दिलेलें वचन सत्य करण्यासाठीं डोंबाच्याहि घरीं पाणी वाहिलें अशा पुराणांतून कथा आहेत" तेव्हां आपण जर चुकलों असूं तर, इतर चांगल्या लोकांप्रमाणेंच आपणहि चुकलों आहोंत ('To err in good company'), असें समाधान लोकमान्यांच्या या लिहिण्यावरून गांधीजींनी मानून घ्यावयाला कोणाची हरकत नसावी. लोकमान्यांचा वरील उतारा 'कर्मजिज्ञासा' या प्रकरणातून घेतला आहे. हा निरपेक्ष एकान्तिक धर्माचार यतिधर्म आहे, गार्हस्थ्य किंवा राजधर्म नव्हे असें तेथें प्रतिपादिलेलें नाहीं, हें लक्षांत ठेविले पाहिजे. महादेवांनीं आपली पत्नी पार्वती हिला सांगितलेला धर्म संन्यासी किंवा यति यांसाठीं सांगितला, स्वतःसारख्या गृहस्थासाठीं सांगितला नाही असें मानणें किंवा प्रतिपादन करणें सयुक्तिक ठरणार नाहीं. त्याचप्रमाणें भर्तृहरीनें ज्या सत्पुरुषांचे वर्णन केलें ते सर्व संन्यासी व यति होते, असें अनुमान काढण्यालाहि कांहीच आधार नाहीं. हा नित्यधर्म केवळ संन्यासी किंवा यति लोकांसाठीं नव्हता तर गृहस्थ व राजर्षी यांच्यासाठीहि होता. या गोष्टीला ज्या रामचंद्राचीं व हरिश्चंद्राचीं उदाहरणें येथें दिलीं आहेत ते संन्यासी अगर यती नव्हते तर, केवळ गृहस्थच नव्हे तर राजे पण होते, या पेक्षां अधिक बलवत्तर दुसरा कोणता पुरावा पाहिजे!

### यतिधर्म व गृहस्थधर्म हे भिन्न कां?

मात्र 'सिद्धावस्था व व्यवहार' या प्रकरणांत या विषयाचें विवेचन करतांना कर्मयोगी व संन्यासी अथवा गार्हस्थ्य किंवा राजधर्म व यतिधर्म हे भिन्न असून निरपवाद नीतिधर्म हा यतींच्यासाठीं आहे, कर्मयोगी अथवा राजर्षींच्यासाठीं नाहीं हें लोकमान्यांनीं स्पष्ट केले आहे, हें येथें नमूद केलें पाहिजे. 'सिद्धावस्था व व्यवहार' या प्रकरणांत रहस्यकार लिहितात : "पण आमच्याकडील धर्मग्रंथ पाहिले तर संन्यास व कर्मयोग या दोन धर्ममार्गांमध्यें या बाबतीत भेद केला पाहिजे, ही गोष्ट गीतेसच नव्हे तर मनूसहि पूर्णपणें अवगत व संमत झालेली होती असे आढळून येतें. कारण 'क्रुध्यंतं न प्रतिक्रुध्येत्' – 'रागावणाऱ्यावर उलट रागावूं नये' – हा नियम मनूनें गार्हस्थ्यधर्मात किंवा राजधर्मांत न सांगता फक्त यतिधर्मातच सांगितला आहे; पण यांपैकी कोणते वचन कोणत्या मार्गातलें आहे, किंवा त्याचा कोठें उपयोग करावा इकडे लक्ष न देतां संन्यास व कर्मयोग या दोन्ही मार्गांतील परस्परविरोधी सिद्धान्त सरमिसळ करून एकत्र सांगण्याची हल्लींच्या टीकाकारांनी जी पद्धत पाडली आहे, त्यामुळें पुष्कळदा कर्मयोगांतील खऱ्या सिद्धान्ताबद्दल कसा व्यामोह पडतो, हें आम्हीं मागें पांचव्या प्रकरणांत दाखविले आहे." 'जे पुरुष या जगीं कधीं देखील खोटें बोलत नाहींत त्यासच स्वर्गप्राप्ति होते' असें महादेवानें पार्वतीस सांगितलेलें वचन 'कर्मजिज्ञासा' या प्रकरणांत जेथें उद्धृत केलें आहे तेथें 'पुरुष' असा शब्द आहे. 'यति' असा शब्द महादेवानें योजलेला नाहीं हें लक्षांत ठेवणें

जरूर आहे. आणि वर म्हटल्याप्रमाणें 'रहस्य'कारांनीहि या ठिकाणीं महादेवांनीं निरपवाद सत्याचा जो पुरस्कार केला आहे तो संन्यासी व यति लोकांसाठीं आहे, गृहस्थ व कर्मयोगी लोकांसाठीं नाहीं, असे वाचकांना बजावलेलें नाहीं. यावरून कदाचित् असेंहि अनुमान काढतां येण्यासारखें आहे कीं, गार्हस्थ्यधर्म व यतिधर्म हा भेद प्रथम नव्हता; तो पुढें करण्यांत येऊं लागला. जसें उपनिषदांत म्हटलें आहे कीं, ईश्वरानें प्रथम एकच 'ब्रह्म' म्हणजे ब्राह्मणवर्ण निर्माण केला व नंतर क्षत्र, वैश्य, शूद्र असें वेळोंवेळीं निरनिराळे वर्ण उत्पन्न केले. त्याप्रमाणें जसजशी वर्णांत वाढ होत गेली तशीतशी धर्माला उतरती कळा लागत गेली व सापवाद धर्माचरण हाच धर्म मानण्यांत येऊं लागला असें म्हणावें किंवा जसजशी धर्माला उतरती कळा लागत गेली तसतशी वर्णांत वाढ होत गेली असें समजावें. जसजसा काळ जावूं लागला तसतसे यती थोडे राहिले व जग गृहस्थांनींच भरून गेल्यामुळें यतींचा धर्म मागें पडला व गृहस्थांचा धर्म नित्य व सार्वत्रिक बनला, असें झालें असल्याचा पुष्कळ संभव आहे. कर्मयोगाबद्दल गीतेंतच म्हटलें आहे कीं, मध्यंतरी पुष्कळ काल गेल्यानें तोच योग आज नष्टप्राय झाला आहे : 'स कालेनेह महता योगो नष्टः परंतप'. शंकराचार्यापूर्वी गीतेचा अर्थ ज्ञानकर्मसमुच्चयात्मक असा प्रवृत्तिपर लावणारीं भाष्यें व टीका अनेक झाल्या होत्या; पण काळाच्या उदरांत त्या सर्व गडप होऊन गेल्या व आद्य शंकराचार्यांनीं गीतेचा संन्यासपर लावलेला अर्थ सार्वत्रिक व सर्वमान्य झाला व तो कसा बरोबर नाहीं हें लोककल्याणार्थ दाखविणें हा आपल्या 'गीतारहस्या'चा हेतु आहे, असें लोकमान्यांनीं विनयानें पण अभिमानानें 'विषयप्रवेश' या प्रकरणांत सांगितलें आहे, हें लक्षांत घेणें जरूर आहे. गीतार्थ संन्यासपर न लावतां कर्मपर लावला पाहिजे हें दाखविण्याचें कार्य जसें लोकमान्यांनीं केलें असें समजलें जातें, त्याप्रमाणें नित्यधर्माचें पालन हा केवळ यति किंवा संन्यासी यांचा धर्म नसून तो गृहस्थ व कर्मयोगी यांचाहि आहे हें सोदाहरण दाखविण्याचें महान् कार्य गांधीजींनीं केलें, असें भावी पिढ्या कृतज्ञतापूर्वक मानण्याचाहि संभव आहे.

### गांधीजींचे प्रतिपादन अधिक सुसंगत नाहीं का?

पण ही विचारसरणी 'रहस्य'कारांना 'वाट पुसत' चालणाऱ्यांना कदाचित् मान्य होणार नाहीं. तथापि, स्वार्थपरायण समाजांत सिद्धपुरुषांनीं नित्यधर्माला अपवाद करावेत किंवा मुरड घालावी असा उपदेश ज्या शास्त्रकारांनीं केला आहे त्यांच्या मतेंहि सत्यादि नीतिधर्म नित्य म्हणजे सर्व काळीं एकसारखेच अबाधित असल्यामुळें त्यांना अपवाद करणें हें पारलौकिक दृष्ट्या सामान्यतः थोडें तरी पापच होय व म्हणून या पापाचें क्षालन करून पावन होण्यासाठीं त्यांनीं प्रायश्चित्त सांगितलें आहे. आणि या प्रायश्चित्ताच्या तडाख्यांतून देहधारी ईश्वरी अवतारहि सुटलेले नाहींत, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. 'तत्पावनाय निर्वाप्यश्चरुः सारस्वतो द्विजैः'. लोकमान्यांनीं त्यांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें हीं प्रायश्चित्तें सांगणाऱ्या शास्त्रकारांचें जोरदार समर्थन केलें आहे.

येथें असा प्रश्न विचारावासा वाटतो कीं, जे सिद्ध पुरुष आहेत त्यांनीं, अराजकता माजून लोक उत्सन्न होऊं नयेत व लोकहित साधावें म्हणून, आततायी म्हणजे दुष्ट मनुष्य – मग तो प्रत्यक्ष गुरु असो, म्हातारा असो, पोर असो किंवा विद्वान् ब्राह्मण असो – त्याला बेशक ठार करावा असा ठणठणीत उपदेश एका बाजूला करणारे शास्त्रकारच दुसऱ्या बाजूला 'सत्यादि नीतिधर्म नित्य असल्यामुळें असत्य बोलणारा पुरुष सिद्ध असला तरी त्याला त्याचें पाप लागतेंच व म्हणून त्याबद्दल त्यानें प्रायश्चित्त घ्यावें' असे कसें सांगतात? उघड उघड ही विसंगति नव्हे का? पण श्रुतिस्मृतिवचनें भिन्न भिन्न आहेत व असा एकहि ऋषि नाहीं कीं ज्याचें वचन आपण इतरांपेक्षां अधिक प्रमाण मानावें – 'श्रुतिर्विभिन्ना स्मृतयश्च भिन्नाः नैकः ऋषिर्यस्य वचः प्रमाणम् ।' – असें शहाण्यांनीं सांगून टाकलेलेंच आहे. जे महाजन आहेत तेहि अशा समयीं उपयोगीं पडत नाहींत. मग माणसानें काय करावें? अखेर 'हृदयेनाभ्यनुज्ञातः यो धर्मस्तं निबोधत' या वचनाप्रमाणें स्वानुभव हाच खरा व अखेरचा गुरु नव्हे का?

या विसंगतींतून दुसराहि एक प्रश्न उत्पन्न होतो : सिद्ध पुरुष असो अगर स्थितप्रज्ञ असो, सर्वभूतहितासाठींहि तो खोटे बोलेल अगर हिंसा करील तर त्याला 'पाप' लागतें व त्यानें त्याचें प्रायश्चित्त घेतलें पाहिजे हें तत्त्व मान्य केलें तर, 'सुख दुःख, लाभ-हानि व जयापजय हीं सारखीं मानून लढाईस तयार हो म्हणजे तुला पाप लागणार नाहीं – "सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ। ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि।।' – हें वचन, किंवा 'केवळ शारीरिक कर्मे करीत असला तरी तो पापबद्ध होत नाही' – 'शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ।' हें वचन, किंवा 'यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते। हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते।।' हें वचन या गीतेंतील वचनांची सत्यता व संगति कशी लावावयाची? ज्याला अहंकार नाहीं व फलाशा नाहीं त्याला सुद्धां त्यानें केलेल्या कर्माचें पाप लागतेंच, असें कसें म्हणतां येईल? का गीतेंतील हीं वाक्यें अर्थवादात्मक समजून त्यांचा अक्षरशः अर्थ घ्यावयाचा नाहीं? या आपत्तींतून सुटका करून घ्यावयाची तर वरीलपैकीं

एका श्लोकावरील ('यस्य नाहंकृतो भावः' इत्यादि) आपल्या टिपणींत, "परंतु ज्याच्यांत अहंत नाहीं त्याला शरीरच नाहीं व ज्याची वुद्धि विशुद्ध आहे तो त्रिकालदर्शी आहे आणि असा पुरुष केवळ एक भगवानच आहे" असें जें गांधीजींनीं म्हटलें आहे, तें अधिक सत्य व सुसंगत समजणें योग्य होणार नाहीं का?

## सिद्धांचा आपद्धर्म हा सामान्यांचा नित्यधर्म

सत्यादि नीतिधर्म नित्य म्हणजे सर्व काळीं एकसारखेच अबाधित असल्यामुळे सिद्ध पुरुषहि व्यवहारांत त्यांना मुरड घालून खोटे वोलले तर, पारलौकिक दृष्ट्या, सामान्यतः थोडें तरी पाप त्यांना लागतें; एवढेंच नव्हे तर इहलोकीही त्याचा अनिष्ट परिणाम होणें म्हणजे समाज वाममार्गास लागणे अपरिहार्यच समजलें पाहिजे. इहलोकीच्या दुष्टाचरणाचें फळ परलोकीं माणसाला कसे व किती भोगावें लागतें यासंबंधीचीं नाना प्रकारची वर्णने साधुसंतांनीं व सिद्ध पुरुषांनीं इहलोकीच असताना लिहून ठेवलेली आहेत. त्यांची सत्यता पारखून घेण्याला इहलोकीं कांहीं साधन नाहीं. परलोकाहून परत येऊनहि तीं कोणीं सांगितलेलीं नाहीत! मात्र इहलोकींची स्थिति पहावी तर मूर्तिमंत नरकच पुढें उभा आहे! पूर्वी म्हटल्याप्रमाणें आपल्या शास्त्रांप्रमाणें व समजुतीप्रमाणें कलियुग म्हणजे धर्माचरणाच्या दृष्टीनें अगदीं अनिष्ट युग होय. ज्यांची वुद्धि सम व स्थिर झालेली आहे अशा सिद्धपुरुपांनीं 'सिद्धावस्था व व्यवहार' या प्रकरणांत प्रतिपादिलेल्या व समर्थिलेल्या सापवाद नीतिधर्माचरणाचा धडा घालून देऊन साम्यवुद्धि वाढविण्याचा अभ्यास करण्यांत सामान्य जनांना मदत करण्याची परंपरा अखंड चालूं असूनही अभ्यासानें ज्यांची साम्यवुद्धि वाढली आहे अशा सामान्य जनांची संख्या वाढत चालली आहे व जग पूर्णावस्थेकडे चाललें आहे, असें मानण्यात आज तरी कांहीं आधार नाहीं. असत्य, हिंसा, अधर्म यांचेंच साम्राज्य पृथ्वीवर पसरत चाललें आहे. सिद्धपुरुष आपद्धर्म म्हणून असत्य वोलतात किंवा हिंसा करतात. पण सिद्धपुरुपांचा जो आपद्धर्म तो साधारण माणसांचा नित्यधर्मच वनला आहे. ज्याप्रमाणें 'निष्काम कर्मा'तील 'निष्काम' शब्द गाळला व फक्त 'कर्म' शब्दच राहिला त्याप्रमाणे 'आपद्धर्मा'तील 'आपत्' शब्द गळाला व असत्य वोलणें किंवा हिंसा करणें हाच धर्म झाला.

'ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम्' या भगवान् श्रीकृष्णाच्या उक्तीच्या अर्थाविषयी लोकमान्य व गांधीजी यांच्यामधील वादाचा या लेखांत एकदा उल्लेख आलाच आहे. "राजकारण हा संसारी (worldly) लोकांचा खेळ आहे, 'साधूंचा नाहीं" असें लोकमान्यांनीं या वादांत म्हटलें आहे. भगवानांच्या या उक्तीपासून 'शठं प्रति शाठ्यं' – जशास तसें – हा धर्म प्रामाणिक व न्याय्य असून संसारी माणसानें या धर्माप्रमाणेंच स्वतःचें आचरण ठेवलें पाहिजे असा लोकमान्यांनीं निष्कर्ष काढला आहे. 'शठं प्रत्यपि सत्यं' हा धर्महि प्रामाणिक व न्याय्य आहे हें लोकमान्य मान्य करतात; पण पहिला दुसऱ्यापेक्षां इहलोकींच्या व्यवहाराला अधिक अनुकूल (suited) आहे असा त्यांच्या प्रतिपादनाचा आशय आहे. 'जशास तसें' म्हणजे समर्थांनीं सांगितल्याप्रमाणें, 'धटासी आणावा धट। उद्धटासी उद्धट। खटनटासी खटनट। अगत्य करी।।' – दुष्टास दुष्ट, असत्यास असत्य, हिंसेस हिंसा – हे होय. या जगांतील व्यवहारांत हाच धर्म खरा, माणसाने या धर्माप्रमाणें वागण्यांतच त्याचें हित आहे असें एकदा मानलें कीं, मग दुष्टांनीं भरलेल्या या जगात सत्य, अहिंसा यांचें साम्राज्य कधींकाळीं प्रस्थापित होईल ही आशा व्यर्थ होय. या दुष्ट माणसांच्या जगांत कोणी सुष्ट निघून त्यानें 'शठं प्रति शाठ्यं'च्या ऐवजीं 'शठं प्रत्यपि सत्यं' या नीतिधर्माचा अवलंब केल्याशिवाय या दुष्ट वर्तुळांतून मानवाची मुक्तता कशी होणार? दुष्टाशीं साधुतेनें वागणें चूक आहे या अनुशासनाला जोंपर्यंत समाजांत नीतीची व धर्माची वैठक आहे तोंपर्यंत कलियुगांत अधर्म वाढत जाऊन सर्वसंकर व विनाश झाला तर त्यांत नवल काय?

पण ही स्थिति वदलणार आहे व काहीं कालानें या जगांत पुनः कृतयुग सुरू होणार आहे म्हणजेच सर्व जग साधूंनीं व सत्पुरुपांनीं गजवजून जाणार आहे असे आमचीं शास्त्रें सांगतात व लोकमान्यांची या सांगण्यावर श्रद्धा आहे. कृतयुगांत कोणीहि संसारी असणार नाहीं तर सर्व संन्यासी अगर यतीच राहतील असा अर्थ आमच्या शास्त्रकारांना अभिप्रेत आहे, असें वाटत नाहीं. तेव्हां, पुढें केव्हां तरी संसारी माणसेही सत्यानें व अहिंसेनेंच परस्परांशीं व्यवहार करीत आहेत अशी एक अवस्था येणार आहे, असें लोकमान्यहि मानतात.

## अरविन्द आणि गांधी

श्रीअरविंद घोष यांच्या गीतेवरील निवंधांत 'कुरुक्षेत्र' हें एक प्रकरण आहे. या प्रकरणांत या ईश्वरनिर्मित जगांत सर्वत्र हिंसा कशी भरुन राहिली आहे ह्याचें आपल्या आश्चर्यकारक अशा प्रतिभाशाली आणि तेजस्वी शैलीनें श्री. अरविंद यांनीं प्रतिपादन केलें आहे. 'निर्माता' व 'संहारकर्ता' अशीं एकाच ईश्वराचीं दोन स्वरूपें आहेत : 'यस्य ब्रह्मच क्षत्रं च उभे भवत ओदनः। मृत्युर्यस्योपसेचनं' असें उपनिषदांतून ईश्वराचें वर्णन

केलें आहे. मृत्यु हाच जगाचा कर्ता व धर्ता आहे. 'अशनाया हि मृत्युः ।'. 'कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः'. पण 'कुरुक्षेत्र' या प्रकरणाच्या शेवटीं श्री. अरविंद लिहितात : "याचा अर्थ असा नव्हे कीं, संघर्ष व विनाश हा नियम त्रिकालाबाधित नियम आहे. तसेंच युद्धापेक्षां सुसंवादित्व श्रेष्ठ नाहीं, व मृत्यूपेक्षां प्रेम ही ईश्वराची श्रेष्ठ विभूति नाहीं, असाहि अर्थ नाहीं. पाशवी बलाची जागा आत्मबल, युद्धाची जागा शांति, संघर्षाची जागा सहयोग, हिंसेची जागा अहिंसा, अहंकाराची जागा विश्वैक्य व मृत्यूची जागा अमरत्व घेईल असा प्रयत्न आपण करूं नये, असाहि या म्हणण्याचा अर्थ नाहीं". 'असतो सा सद्गमय। तमसो मा ज्योतिर्गमय। मृत्योर्मामृतं गमय।।' ही मानवी अंतःकरणाची भूक आहे; प्रार्थना आहे. अरविंद पुढें लिहितात : "ईश्वर केवळ संहारकर्ताच नाहीं, तो सर्व भूतमात्रांचा मित्र आहे. 'सुहृदः सर्वभूतानां।' ब्रह्मा, विष्णु, महेश अशीं ईश्वराचीं तीनच स्वरूपें नाहींत; त्याच्याहि पलीकडे एक त्याचें स्वरूप आहे (परस्तस्मात्तु भावोऽन्यः।). तो क्रूर काली व प्रेमळ आणि कनवाळु माताहि आहे. कुरुक्षेत्राचा स्वामी हा मानवाचा सखा व पथदर्शक अवतारी श्रीकृष्ण आहे. तो आपणाला संघर्ष, संहार व गोंधळ यांच्या वजवजपुरींतून काढून दुसरीकडे कोठेंहि ओढून नेत असेल, तो कोणत्या तरी एका पूर्णावस्थेकडे वा ईश्वरी अवस्थेकडे आपणांला आकर्षून नेत असेल. यांत रतिमात्र संशय नाहीं कीं, ती पूर्ण अवस्था, ज्या त्याच्या नाना व्यक्त स्वरूपांचा आपण आग्रह धरीत आलों आहोंत त्यांच्या पलीकडची – परम – अशी श्रेष्ठ अवस्था आहे. पण ती परमावस्था कोठें आहे, ती कशी प्राप्त होईल, ती प्राप्त करून घ्यायला कोणती साधना केली पाहिजे, हें आपण शोधून काढलें पाहिजे".

गांधीजींनीं हेंच तत्त्व थोडक्यांत आपल्या आत्मकथेंत कसें सांगितलें आहे, हें मागें आलेंच आहे. श्री. अरविंद म्हणतात त्याप्रमाणें, जिला हिंसेचा वा असत्याचा विटाळ लागत नाहीं, अशा पूर्णावस्थेचें स्वरूप काय व मार्ग कोणता याचा शोध लावण्यांत गांधीजींनीं आपलें सर्व आयुष्य वेंचलें. आपल्या आत्मचरित्राला त्यांनी 'सत्याचे प्रयोग' असें सार्थ नांव दिलें. जेथें सत्य व अहिंसा यांचेंच साम्राज्य आहे त्या अवस्थेला पोहोंचण्याचा मार्ग सत्याच्या व अहिंसेच्याच पायऱ्यांनीं तयार केलेला असला पाहिजे, असा त्यांचा आग्रह होता. असत्याचा आश्रय घेऊन व हिंसेची ढाल घेऊन सत्य-अहिंसा हीं जोपर्यंत स्वतःचे रक्षण करीत राहतील तोंपर्यंत सत्य व अहिंसा यांचे अनियंत्रित साम्राज्य कधींही प्रस्थापित होऊं शकणार नाहीं. 'सत्यमेव जयते नानृतम्'. साध्य व साधने यांच्यांतील अभेद गांधीजी प्रतिपादीत त्याची गुरूकिल्ली यांत कशावरून नसेल? कारण गांधीजी म्हणत : "कोणत्याही गोष्टीचें अंतरंग समजण्यास तर्कात्मक बुद्धीपेक्षां स्फूर्तिमय प्रज्ञा हीच अधिक श्रेष्ठ होय. "But there are things about which instinct transcends even interpretation". याविषयीं पुढें विचार करू.

⁂ ⁂ ⁂

## २. श्रीअरविंदांची साधना*

मागील लेखाच्या शेवटीं श्रीअरविंद घोष यांच्या गीतेवरील निबंधांतील 'कुरुक्षेत्र' या प्रकरणांतील थोडा मजकूर विषयाच्या संदर्भानें उद्धृत केला होता. या लेखाचा प्रारंभ, त्यांचें म्हणणें ह्या गीतेवरील निबंधांतून थोडें अधिक विस्तारानें मांडून करण्याचें योजिलें आहे. श्रीअरविंद लिहितात :

### वस्तुस्थिति आणि आदर्शनिर्मिति

"आत्मभाव जागृत झाल्यामुळें अध्यात्मजीवन जगण्याची ज्याला इच्छा उत्पन्न होते त्या पुरुषाला हें जग जसें आहे तसा त्याचा स्वीकार करणें व त्यांत व्यवहार करणें कठिण जातें. या जगांत सर्वत्र सत्याचें साम्राज्य, शिवाचा साक्षात्कार व सुंदरतेचें दर्शन घडलें पाहिजे, निदान घडावें, असें त्याला वाटतें. पण आज जग जसें आहे त्यांत त्याला या गोष्टींचा अभावच दिसतो. स्वतः ईश्वराचा जसा शिवावतार आहे तसा रुद्रावतारहि आहे. जीवनाची गंगा संघर्ष व युद्ध यांच्या कांठांमधून रक्ताच्या प्रवाहानें वाहत आहे, असें तो पाहतो. जीवन हें रणक्षेत्र असून ईश्वर ही त्याची अधिष्ठात्री देवता आहे, असें दृश्य कुरुक्षेत्रीं अर्जुनाला दिसतें. जीवन असें आहे ही गोष्ट आपण प्रामाणिकपणें वा

* पूर्वप्रकाशन : *नवभारत*, वर्ष ४, अंक ६, मार्च, १९५१.

अनुक्रमणिका

धैर्यानें मान्य केली नाहीं तर, त्याच्यांत जे विसंवाद (discords) व विरोध (oppositions) आहेत ते समूळ नष्ट करण्याचा उपाय आपण शोधून काढूं शकणार नाहीं. आज जग जसें आहे तसें तें यथार्थानें समजून घेतलें तरच उद्या तें जसें असावें असें आपल्याला वाटतें तसें बनविण्याचा मार्ग शोधून काढण्यांत आपल्याला अधिक यश येईल. जगाच्या आजच्या ज्या स्वरूपाचा आपल्याला उवग येतो त्या स्वरूपांतच त्याच्या अंतिम सुसंवादित्वा (Harmony) ची गुरुकिल्ली असेल. म्हणून जगापासून विषादानें वा वैतागानें आपण दूर जाऊं तर कदाचित या किल्लीला मुकूं.

"जीवनाच्या भौतिकच नव्हे तर, बौद्धिक, सामाजिक, नैतिक व राजकीय अशा सर्वच क्षेत्रांत संघर्षाशिवाय एक पाऊलहि आपण पुढें टाकूं शकत नाहीं. जें अस्तित्वात आहे व जगूं इच्छितें आणि जें अस्तित्वात येऊं इच्छितें व जगूं इच्छितें त्यांच्यात अविरत युद्ध सुरू आहे. अहिंसा (Harmlessness) परमधर्म खरा; पण आज आम्ही व निसर्ग जसें आहोंत त्या स्थितींत केवळ अहिंसेने प्रगति असंभवनीय आहे. आत्मवलाचाच उपयोग करावयाचा म्हटलें तरी, आत्मवल प्रभावी होण्यापूर्वी पाशवी शक्ती या जगांत थैमान घालतात व घालीत राहतीलच. शिवाय खुद्द आत्मवलहि जेव्हा प्रभावी होतें तेव्हा विनाशच करतें. आघात आणि प्रत्याघात या निसर्गाच्या नियमाप्रमाणें आत्मबलाचा उपयोग प्रचंड विनाशक शक्तींना जागृत करून त्यांना कार्यान्वित करतो. स्वतः आपण हिंसेचें प्रत्यक्ष निमित्त झालों नाहीं हें आत्मसमाधान जगांतील हिंसा व विनाश थांबवूं शकत नाहीं. केवळ आपले हात स्वच्छ व आत्मा निष्कलंक राहिल्यानें विश्वांतील संघर्षाचा व विनाशाचा कायदा किंवा धर्म नष्ट होणार नाहीं. त्याचें जें मूळ आहे तेंच मानवजातींतून लुप्त झालें पाहिजे. जगांत जें अशिव अथवा जी दुष्टता (evil) आहे त्याचा प्रतिकार करण्याची अनिच्छा वा असमर्थता व त्या अनिच्छेची व असमर्थतेची जननी जी निष्क्रिय शांती यांमुळे या धर्माची अगर कायद्याची आवश्यकता नष्ट होणार नाहीं. म्हणून संघर्ष व तज्जन्य विनाश यांच्यापासून व्यक्ति दूर राहील तर तिच्या नैतिक जीवनाला मदत होईल. पण त्यामुळें रुद्रावताराचें कार्य थांबणार नाहीं.

"आपण ईश्वराचा शिवावतार व त्याचें कार्य यांवर विचारानें व आचारानें भर देण्याचा प्रयत्न करावा हें स्वाभाविक आहे. संघर्ष व विनाशक संहार हेंच कांहीं सर्वस्व नाहीं. संघर्ष व विरोध याप्रमाणेंच संघवृत्ति व संजीवक सहकार्य हींदेखील तत्त्वें जगांत नांदत आहेत. द्वेषाप्रमाणें प्रेम, व इतरांचा बळी घेण्याच्या ईर्षेप्रमाणेंच आत्मबलिदान करण्याची इच्छा हीदेखील माणसाच्या अंतःकरणांत वसत आहेत. परंतु दुर्दैव असें कीं, आज या शक्तीहि त्यांच्या विरोधी शक्तींच्या कार्यालाच जुंपल्या जात आहेत. इकडे कानाडोळा करून भागणार नाहीं. धर्माच्या अगर देशभक्तीच्या नांवावर आजपर्यंत जगांत केवढा संघर्ष व संहार झाला आहे! या सर्वांवरून जी एक गोष्ट सिद्ध होते ती ही कीं, निसर्गांत असें एक तत्त्व आहे – जें कदाचित् (initial element) आरंभापासूनच असावें – कीं तें तत्त्व कसें जिकावें हें आपण जाणलें नाहीं. तें जिंकणें शक्य नसेल किंवा त्याचें सत्य स्वरूप जाणून घेण्याचा आपण निःपक्षपाती दृष्टीनें प्रयत्न केला नसेल! जर आपल्याला योग्य उपाय शोधून काढावयाचा असेल – मग तो उपाय कोणताहि असो – तर जीवन (Existence) जसें आहे तसें त्याच्याकडे पाहिलें पाहिजे. आणि जीवनाचें प्रत्यक्ष दर्शन म्हणजे ईश्वराचें दर्शन होय. कारण दोघांना वेगळें करतां येणार नाहीं. ज्यानें विश्व निर्मिलें त्याला त्याच्या धर्माच्या, नियमांच्या (laws) जबावदारींतून मुक्त करतां येणार नाहीं. जें 'शिव तें ईश्वरानें केलें आणि जें अशिव तें दुसऱ्या कोणत्यातरी दुष्ट शक्तीनें घडविलें, असें म्हणून चालणार नाहीं. शिवाप्रमाणें अशिवाचा निर्माता ईश्वरच आहे, असें हिंदु धर्म मानतो.

"तेव्हां कुरुक्षेत्रावरील देव-सारथि हा सर्व लोकांचा ईश्वर व सर्व भूतमात्रांचा स्नेही व सर्वज्ञानी आहे. तसाच सर्व लोकांचा क्षय करण्याला प्रवृत्त झालेला तो कालहि आहे. परस्परविरोधी शक्तींचा संघर्ष, विनाश, मृत्यु व दुःख यांनीं गच्च भरलेल्या या विश्वांत मानवाला सर्वसाक्षी ईश्वराचें दर्शन करावयाचें आहे. या कोड्याचें कांहीं तरी उत्तर असलेंच पाहिजे, ही जाणीव माणसानें ठेविली पाहिजे. ज्या अज्ञानांधकारांत जो वावरत आहे त्याच्या पलीकडे ज्ञानप्रकाश असलाच पाहिजे, अशी श्रद्धा त्यानें बाळगली पाहिजे. ज्ञानप्रकाशांत सर्व विसंवाद (discords) एक तर नाहींसे तरी होतील किंवा त्यांच्यामध्यें सुसंवाद (harmony) तरी उत्पन्न होईल, अशी जगांतील सर्व धर्मांची श्रद्धा आहे. व्यक्तीच्या व विश्वाच्या आयुष्यांत मधूनमधून असे संकटप्रसंग (crisis) येतात कीं जेव्हां महान् मानसिकच काय पण शारीरिक व भौतिक संघर्षहि होऊन सर्व प्रकारचा विनाश होतो.

"निसर्गाच्या उत्क्रान्तीमध्यें अशा घोर आणीबाणीच्या संकटकालाची (crisis) आवश्यकता गीता मान्य करते. सदाचार व दुराचार यांमध्यें आणि स्वयंप्रमाण (self-affirming) धर्म व त्याला विरोध करणाऱ्या असत्स्वरूप शक्ती यांमध्यें होणाऱ्या संघर्षाच्या रूपानें होणारा नैतिक लढा गीता मानते. एवढेंच नव्हे तर परस्परविरोधी शक्तींच्या प्रतिनिधिभूत अशा मानवांमध्यें भौतिक पातळीवर होणारें शस्त्रयुद्धहि गीता मान्य करते. आपण हें

अनुक्रमणिका

लक्षांत ठेवलें पाहिजें कीं, गीता ज्या कालांत लिहिली गेली त्या कालीं युद्धें हें मानवी व्यवहाराचें आजच्यापेक्षां अधिकच आवश्यक अंग समजलें जात असे. जीवनाच्या योजनेमधून युद्धाची उचलबांगडी करण्याची कल्पनाच त्या वेळीं खुळचटपणाची गणली जात असे. खरोखरीं, सर्व मानवजातीमध्यें संपूर्ण सद्‌भावना असल्याशिवाय जगांत खरी शांति अशक्य आहे. पण विश्वशांतीच्या व सद्‌भावनेच्या धर्मानें मानवी प्रगतीच्या ऐतिहासिक कालांत माणसाच्या समष्टिरूप जीवनावर एक क्षणहि आपलें साम्राज्य चालविलेलें आढळून येत नाहीं. हेंहि खरें कीं, त्यासाठीं मानवाच्या मनाची नैतिक, सामाजिक व आध्यात्मिक तयारी केलीच गेलेली नाहीं. शिवाय निसर्गाचा विकास होत होत आज निसर्ग ज्या उत्क्रांतीच्या टप्प्यावर उभा आहे, तेथें जर त्याला आपल्या समतोलपणांत बिघाड उत्पन्न होऊं द्यावयाचा नसेल तर, तो निसर्ग सध्यांच्या परिस्थितीच्या मर्यादा उल्लंघूहि देणार नाहीं. आजमितीलाहि मानवी हितसंबधांत फारच विरोध उत्पन्न झाला असतां, घनघोर संग्राम टाळण्याकरितां असा समेट घडवून आणण्याची पद्धति शक्य आहे असें केवळ वाटण्यापलीकडे या क्षेत्रांत आपली प्रगति झालेली नाहीं आणि हा समेट घडवून आणण्यासाठींहि माणसाला आपल्या स्वभावधर्माप्रमाणें, जिला इतिहासांत उपमा नाहीं अशा, आसुरी यादवीची वा कत्तलीची कांस धरणें भाग पडलें आहे. शेवटीं जगांत शांति प्रस्थापित करण्यासाठीं आधुनिक मानवानें शोधून काढलेला सरळ आणि प्रभावी मार्ग कोणता म्हणाल तर दुष्टपणा आणि द्वेष यांनीं भरलेल्या जागतिक युद्धाचा! आज मानवाचे शान्तिस्थापनाविषयक प्रयत्न मानवी स्वभावात मौलिक परिवर्तन घडवून आणण्यावर आधारलेले नाहींत. केवळ बुद्धिगम्य कल्पना, आर्थिक सुख-सोयी, भावविवशता, कींव, युद्धाचें भय या गोष्टींवर ते प्रयत्न आधारलेले आहेत. शिवाय अशा प्रकारचें शांतिस्थापनेचे प्रयत्न साहजिकच राजकीय हेतूंनीं प्रेरित झालेले असतात. अशा प्रकारें घडवून आणलेली शांति डळमळीत आणि अल्पजीवीच ठरणार! परंतु एक असा दिवस खात्रीनें उजाडेल कीं, जेव्हां विश्वशान्तीच्या साम्राज्यासाठीं नैतिक व सामाजिक तयारी पूर्ण झालेली असेल."

श्रीअरविंद यांच्या 'गीताविषयक निबंध' व पुस्तकामधील 'कुरुक्षेत्र' हें सर्व प्रकरण व 'मनुष्य आणि जीवनयुद्ध' या प्रकरणांतील कांहीं प्रांरभींचा भाग यांतील प्रतिपादनाचा वर जो प्रदीर्घ सारांश दिला आहे त्यांतून पुढील महत्त्वाचे मुद्दे निष्पन्न होतात :

(१) जग सत्य, शिव व सुंदर असावें, असें उदारचरित माणसाला वाटतें; पण प्रत्यक्ष जग तसें असल्याचा त्याला अनुभव येत नाहीं. तथापि, असें आदर्श जग निमार्ण करण्याचा मार्ग आपल्याला अविरत उद्योगानें शोधून काढतां येईल. जेथें सर्व विसंवाद व संघर्ष विलीन होऊन जातील, असें ईश्वराचें प्रेममय व ज्ञानमय स्वरूप असलें पाहिजे, अशी श्रद्धा त्यानें बाळगावी.

(२) पण यासाठीं जग जसें आहे, तसें तें यथार्थानें जाणून घेतलें पाहिजे.

(३) जगांत सर्वत्र हिंसा भरली असून जगाचा व जीवाचा विकास संघर्ष व हिंसा अगर युद्ध यांतूनच होत असतो. शिवावताराप्रमाणेंच स्वतः ईश्वराचा संहारकारी रुद्रावतारहि आहे.

(४) आज आत्मबल अगर अहिंसा पाशवी बलाची अगर हिंसेची जागा घेऊं शकत नाही. जगाच्या व जीवाच्या सध्यांच्या विकासावस्थेत आत्मबलहि अखेर अधिक हिंसेलाच जन्म देते व विनाश करते.

(५) आपण ईश्वराच्या शिवावतारावर विचाराने अगर आचारानें भर द्यावा हें स्वाभाविक आहे. पण जोंपर्यंत संघर्षाचें व हिंसेचें मूळ मानवजातींतून आपण काढून टाकूं शकत नाहीं, म्हणजेच आपण मानवाच्या स्वभावांत परिवर्तन करूं शकत नाही तोपर्यंत एखादी व्यक्ती संघर्षापासून दूर राहिली तरी समष्टि त्यापासून मुक्त होणार नाहीं.

(६) मानवी समाजाच्या उत्क्रांतीच्या प्रक्रिये (process) मध्यें गीतेनें युद्ध ही संस्था मान्य केली आहे. तथापि युद्ध ही कांहीं जीवनशास्त्रांतील अपरिहार्य आवश्यकता (Biological necessity) आहे असें नाहीं. पूर्वीपेक्षां आज त्याची आवश्यकता कमी झालेली आहे; युद्ध टाळावें व मानवांनीं सामोपचारबुद्धीनें अगर दुसऱ्या शांततेच्या मार्गांनीं आपले हितविरोध नष्ट करावेत अशी इच्छा व प्रयत्न सुरू आहेत. पण अद्यापि त्याची सर्व मदार युद्धावरच असून त्याची परिणति जागतिक युद्धाच्या ज्वालेंत विश्वशांति भस्म होण्यांत होतें कीं काय, अशी भीति वाटत आहे. तथापि, एक दिवस असा उजाडेलच कीं, जेव्हां मनुष्याचा आध्यात्मिक, नैतिक व सामाजिक विकास इतका झालेला असेल कीं, युद्ध ही संस्था अजिबात नष्ट होऊन विश्वांत सर्वत्र शांतीचें साम्राज्य प्रस्थापित होईल.

अशा प्रकारची मानवजातीची भविष्यकालीन पूर्णावस्था लो. टिळकांनाहि अभिप्रेत होती. त्यांनी म्हटलें आहे : "साम्यबुद्धि वाढविण्याचा अभ्यास प्रत्येकानें केला पाहिजे, आणि या क्रमानें जगांतील सर्व मनुष्यांची बुद्धि पूर्ण साम्यावस्थेस पोहोंचेल तेव्हांच कृतयुगप्राप्ति होऊन मानवजातीचें परमसाध्य जी पूर्णावस्था ती सर्वांस प्राप्त होईल".






कोणत्याहि वस्तूंत सामान्य अगर संपूर्ण बदल घडवून आणावयाचा असेल तर त्या प्रमाणांत तिचें अंतर्बाह्य ज्ञान करून घेतलें पाहिजे, ही गोष्ट सहज मान्य होण्यासारखी आहे. तसें न करतां पूर्वग्रहदोषानें, द्वेषानें अथवा वैतागानें किंवा वैराग्यानें ती मोडून टाकली तर तिचा नाश केल्याचें समाधान मिळेल; पण तिच्यांत बदल केल्याचें श्रेय लाभणार नाहीं. तेंव्हा सत्यासाठीं असत्य, शिवासाठीं अशिव व सौंदर्यासाठीं कुरूपता हीं जाणून घेतलीं पाहिजेत, हें अरविंदांचें म्हणणें मान्यच केलें पाहिजे. जगांत हिंसा नाहींच असें म्हणून अहिंसा प्रस्थापित करतां येणार नाहीं. अहिंसा प्रस्थापित करण्याचा खरा मार्ग म्हणजे जगांत हिंसा आहे हें नागवें सत्य मान्य करून ती नाहींशी करण्याचा मार्ग शोधून काढण्याचा अखंड उद्योग करणें हा होय. गांधीजी नेहमीं म्हणत कीं, "मी स्वप्नसृष्टींत सदा वावरणारा व वरळणारा प्राणी नसून जागृत सृष्टींत व्यवहार करणारा पण माणसाला सत्य, शिव व सुंदर सृष्टि निर्माण करणें शक्य आहे, अशी श्रद्धा बाळगणारा व त्यासाठीं अविरत उद्यमशील राहणारा प्राणी आहे".

### विश्वतत्त्वाचें अनाकलनीय स्वरूप

"असा एक दिवस खात्रीनें उगवणार आहे कीं, जेव्हां माणसाचा आध्यात्मिक, नैतिक, सामाजिक विकास इतका झालेला असेल कीं, त्याचे सर्व व्यवहार संपूर्ण सद्भावनेनें होऊं लागतील व जगांत सर्वत्र शांतीचें साम्राज्य प्रस्थापित होईल" हें अरविंदांचें म्हणणें श्रद्धापूर्वक मान्य केलें तर, मग ओघानेंच ही गोष्टही मान्य करावी लागेल कीं, निदान त्या दिवशीं मनुष्यसृष्टीपुरतें तरी ईश्वराचें रुद्ररूप सर्वस्वीं पालटून त्याला नीलकंठ शंकराचें शिवस्वरूप प्राप्त झालेलें असेल. मानवामानवांत संपूर्ण सुसंवादित्व प्रस्थापित होऊन त्यांचे व्यवहार सद्भावनेनें चालूं लागले तर त्याचा परिणाम पशू, पक्षी वगैरे इतर योनींवर काय होईल, योगसूत्रांत म्हटल्याप्रमाणें ("अहिंसाप्रतिष्ठायां तत्सन्निधौ वैरत्यागः"), संपूर्ण अहिंसावादी माणसापुढें पशुपक्ष्यांचीहि हिंसा गळून पडेल काय हाहि प्रश्न विचारणीय आहे. पण आपण सध्यां मानवजातीच्याच विकासाचा विचार करणें योग्य होईल. कारण आज तरी मानवच नीतिमार्गावर चालून स्वतःचा जाणीवपूर्वक विकास करून घेऊं शकतो. अहिंसेच्या आचरणाचा उपदेश गांधीजी मानवापुरतांच करीत, हें येथें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. जो ईश्वर केवळ शिवस्वरूपांत भविष्यांत कधींकाळीं मानवी सृष्टीचा भर्ता, भोक्ता, महेश्वर व सुहृद् होणार ("भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम्।। सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति।।") त्या ईश्वराच्या स्वरूपाची कल्पना अथवा साक्षात् दर्शन भूतकालीन वा वर्तमानकालीन अवतारी अथवा साक्षात्कारी पुरुषांना झालेलें असेल असें मानणें तर्काला धरून होईल काय? ईश्वराचें सत्यस्वरूप कोणालाच कधीं समजलेलें नाहीं. तें सदा अनाकलनीयच राहिलेलें आहे. ("न मे विदुः सुरगणा प्रभवं न महर्षयः।"). आपले अनुभव 'हें तें नाहीं, हें तें नाहीं', 'नेति नेति' असें सांगून शहाण्यांनीं या बाबतींत समाधान मानलें आहे. कारण ('न तद्भासयते सूर्ये न शशांको न पावकः') परमेश्वराचें स्थान प्रकाशित करण्यास सूर्य, चंद्र किंवा अग्नि यांसारखें कांहीं साधन नसून तें स्वयंप्रकाशित स्वयंवेद्य आहे असें म्हटलें आहे. (स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम). या ईश्वराचें स्वरूप अगम्य आहे. नारदीयसूक्ताचा ऋषि म्हणतो : "(सताचा) विसर्ग म्हणजे पसारा कशापासून अगर कोठून आला हें (यापेक्षां) प्र म्हणजे विस्तारानें येथें कोण सांगणार? कोण तें निश्चयात्मक जाणतो? देवहि या (सत् सृष्टीच्या) विसर्गानंतरचे. मग ती जेथून निघाली ते कोण जाणणार? (सताचा) हा विसर्ग म्हणजे पसारा जेथून झाला किंवा तो निर्मिला गेला अगर न गेला, हें तो परम आकाशांत असणारा या जगाचा जो अध्यक्ष (हिरण्यगर्भ) तो जाणीत असेल किंवा नसेलहि! (कोणी सांगावें?)"

को अद्धा वेद क इह प्रवोचत्
कुत आजाता कुत इयं विसृष्टिः।
अर्वाग् देवा अस्य विसर्जनेन
अथ को वेद यत आबभूव।।

इयं विसृष्टिर्यत आबभूव
यदि वा दधे यदि वा न दधे।
यो अस्याध्यक्षः परमे व्योमन्
सो अंग वेद यदि वा न वेद।।

'परम आकाशांत असणारा या जगाचा अध्यक्ष हिरण्यगर्भ तोसुद्धां ईश्वराचें मूळ स्वरूप जाणींत असेल किंवा नसेंलहि' असें हा ऋषि म्हणतो. एकच पाऊल पुढें जाऊन असें म्हणण्याचा मोह आवरणें कठिण गेलें तर नवल नाहीं कीं, खुद्द हा ईश्वरहि स्वतःचें प्रारंभीचे व अंतीचें स्वरूप जाणतो का? पण अशा वेळीं, याज्ञवल्क्यांनीं गार्गीला म्हटल्याप्रमाणें, हा प्रश्न केला तर प्रश्न करणाराचें टाळकेंच फुटावयाचें!

भगवान् बुद्धासारखे सिद्ध व ज्ञानी पुरुषहि ईश्वराच्या अंतिम व सत्य स्वरूपाविषयीं वादविवाद करण्याचें टाळतात, त्याचें कारणहि कदाचित् हेंच नसेल कशावरून? गांधीजींनींहि ब्रह्मज्ञानाचा काथ्याकूट करीत न बसतां, स्वानुभवानें त्यांना सत्याचें जसजसें स्वरूप प्रगट होत गेलें, तसतसें तें स्वतःच्या व

समाजाच्या सामान्य व्यवहारांतहि आणण्याचा त्यांनीं अखंड उद्योग केला. निदान या सर्व विवेचनापासून विनयानें एवढा तरी बोध घ्यावयाला हरकत नाहीं कीं, कोणत्याही काळचा व कोणत्याही देशींचा कितीहि महान् साक्षात्कारी पुरुष असो त्यानें ईश्वर जो व जसा आहे तो व तसा त्याला जाणला आहे ('या वान्यश्चास्मि तत्त्वतः') व म्हणून या ज्ञानाच्या आधारें त्यानें जे नीतिधर्म व व्यवहारधर्म अनुशासिले ते सर्व देशीं व काळीं सत्य म्हणून बंधनकारक आहेत असा आग्रह कोणीहि धरूं नये. हा आग्रह मानवाच्या प्रगतीला हानिकारक ठरल्याशिवाय राहणार नाहीं. कारण विश्व विकासशील आहे व म्हणून पूर्वीच्या सत्पुरुषांचा याविषयींचा अनुभव पुढच्या मुमुक्षूंना प्रथम दर्शनासाठीं उपयोगीं पडला तरी तो बंधनकारक मानणें चुकीचें ठरेल.

**मोक्षाची वैयक्तिक दृष्टि**

सिद्ध व सत्पुरुष यांच्या माळेंतील साधारणतः शेवटचे मणी म्हणजे आमची संतमंडळी होत. त्यांनीं जाति-गोत्र-वर्गनिरपेक्ष सर्वांना भक्तिमार्गाचें, परमेश्वर प्राप्तीचें व मुक्तीचें द्वार खुलें केलें आणि हे त्यांचे सामान्य जनांवर महान् उपकार होत, यांत संशय नाहीं. श्रीज्ञानेश्वर म्हणतात : "ऐसे माझेनि नामघोषें। नाहींचि करिती विश्वाचीं दुःखें।। अवघें रंका पाड धरूं। नेणती सानेयां थोरां कडसणी करूं। एकसरें आनंदाचें आवारूं। होत जगा।। कही एकाधेनि वैकुंठा जावें। तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें। ऐसें नामघोषगौरवें। धवळलें विश्व।। - (ज्ञानेश्वरी ९.२००-२०३)... 'ते पापयोनीही होतु का। ते श्रुताधीतही न होतु का। परि मजसी तुकितां तुकां। तुटी नाहीं।। (९. ४४९)... येऱ्हवी दैत्यकुळ साचोकारें। परि इंद्रही सरी न लाहे उपरे। म्हणोनि भक्ति गा येथ खरे। जाति अप्रमाण।। (९.४५२)".

पण आध्यात्मिक किंवा धार्मिक क्षेत्रांतील समता (आणि तीहि भक्तिमार्गातील) जीवनाच्या इतर क्षेत्रांत नेण्याची गरज त्या संतांना भासली नाहीं. इतर क्षेत्रांतील आचरणाच्या बाबतींत सर्वांनीं परंपरागत धर्म व सामाजिक रूढी यांचेंच पालन केलें पाहिजे असा त्यांचा कडक दंडक होता. 'तैसा अशेषाही पुरुषार्थी। जो गोसावी हो म्हणे पार्था। तेणें श्रुतिस्मृति माथां। वैसणें घापे।। शास्त्र म्हणेल जें सांडावें। तें राज्यही तृण मानावें। जें घेववी तें न म्हणावें। विषही विरु।।' - ज्ञानेश्वरी (१६.४५९-४६०). धर्मविधी व धार्मिक संस्कार या बाबतींत ब्राह्मण व शूद्र यांच्यामध्यें ते भेद करीत. "तेंचि द्विजासीच ब्रह्मसूत्र। येरा स्तोत्र का नाममंत्र।" रेड्याच्या पाठीवर मारलेल्या काठीचे वळ ज्यांच्या पाठीवर उठले, त्या श्रीज्ञानेश्वरांना, 'सांगे क्षुद्राघटीं आघवीं। पक्वान्नें आहाति बरवी। तीं द्विजें केवि सेवावी। दुर्वळूं जरी जाहला।।' असा प्रश्न करतांना आपण शूद्राचें का असेना, पण एक मानवी हृदय दुखविण्याचा संभव आहे अशी शंका कां वरें आली नाहीं? आज श्रीज्ञानेश्वरांना महान् संत समजून त्यांच्या पायांवर माथा तुकवीत, आपण त्यांना विनयानें पण ठासून असेंच सांगूं कीं, 'महाराज, आपल्या मतें जो धर्म तो आम्हांला अधर्म वाटतो व त्याचें आचरण केलें तर आम्हांला पाप लागेल अशी आमची आज भावना आहे'.

संतांच्या मतें परलोकींचा किंवा मोक्षाचा धर्म निराळा व इहलोकींचा अथवा व्यवहाराचा धर्म निराळा होता. इहलोकींचा सर्व व्यवहारच असा झाला पाहिजे कीं, त्याला प्रत्यक्ष फळ ईश्वरप्राप्ति व मोक्ष आलें पाहिजे, अशी त्यांची शिकवण नव्हती. संसाराचें आध्यात्मिकीकरण करण्याचें त्यांना कधीं सुचलें नाहीं हें मान्य करणें भाग आहे. वैयक्तिक जीवन व सामाजिक जीवन असा भेद त्यांनीं सदैव ठेवला. वैयक्तिक जीवनांत कमालीची अहिंसा, दया, क्षमा उपदेशिणाऱ्या श्रीतुकाराममहाराजांनीं सामाजिक जीवनांत कमालीच्या कठोरतेचें अगर हिंसेचें समर्थन केलें आहे : 'चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती। व्याघ्रही न खाती सर्प तया।। विष तें अमृत आघात तें हित। अकर्तव्य नीत होय त्यास।।' अशी महान् अहिंसेची शक्ति व संतांचें लक्षण सांगणारे तुकोबाच, 'दया तिचें नांव भुतांचे पाळण आणिक निर्दळण कंटकांचें।। परपीडक ते आम्हां दावेदार विश्वीं विश्वंभर म्हणूनिया।।' असे बेधडक सांगतात. या दोन धर्मांत विसंगति आहे हें तुकाराममहाराजांसारख्या सत्पुरुषांना प्रामाणिकपणें वाटत नव्हतें. ईश्वर, त्याचें स्वरूप, त्याचा जगाशीं व माणसाशीं संबंध याबद्दलचे त्यांचे विचार व कल्पना वेदपुराणें व श्रुतिस्मृती यांमधून जशाच्या तशा घेतलेल्या होत्या. त्यांत कांहीं बदल होणें शक्य आहे किंवा झाला पाहिजे असें त्यांना कधींच वाटलें नाहीं. ('दया करणें जें पुत्रासी।। तेचि दासा आणि दासी.') समाजांत आमूलाग्र बदल करणें हा त्यांचा कधींच हेतु नव्हता. व्यक्तींना म्हणजे त्यांच्या आत्म्यांना वांचविणें एवढेंच त्यांचे कार्य होतें व तें त्यांनीं तळमळीनें केलें. हें जग दुःखाचे आलय व अशाश्वत असल्यामुळें ('दुःखालयमशाश्वतम्') त्यांतील जन्ममरणाच्या फेऱ्यातून स्वतःची व इतरांची सुटका करून घेण्याचा मार्ग - परमेश्वरप्राप्तीचा मार्ग - शोधून काढणें हें त्यांचें जीवनकार्य होतें. अर्थात् 'तुका म्हणे गर्भवासीं। सुखें घालावें आम्हासी।।' अशी परमेश्वरापाशीं मागणी करणारे परमकनवाळू तुकारामासारखे कांहीं संत होते हें खरें; पण या त्यांच्या मागणीच्यामागें सर्व








समाजाच्या उद्धाराचा अगर बदलाचा पद्धतशीर प्रयत्न करण्याची दिशा व आशा होती, असें मात्र नाहीं; केवळ प्राणिमात्रांचें दु:ख व पीडा यांचें निवारण करण्याचें कार्य अखंड चालविण्याची मनाची तीव्र तळमळ त्यांत होती : 'न त्वहं कामये राज्यं न स्वर्ग नापुनर्भवम्। कामये दु:खतप्तानां प्राणिनामार्तिनाशनम्।।' इहलोकांतील जीवन हें आत्म्याचें खरें व शाश्वत जीवन नव्हें; मृत्युनंतरचें म्हणजेच परलोकींचें जीवन हें त्याचें खरें व कायमचें जीवन, असें ते मानीत. म्हणून परलोकीं गमन केल्यावर आपल्या आत्म्याचें रक्षण माणसाला कसें करतां येईल याचा स्वानुभवावरून त्याला उपदेश करणें व मार्ग दाखविणें, एवढेंच त्यांचें ध्येय होतें.

याचा अर्थ असा नव्हे कीं, श्रीज्ञानेश्वर किंवा श्रीतुकाराम-महाराजांच्यापेक्षां आम्ही नैतिक व आध्यात्मिकदृष्ट्या श्रेष्ठ आहोंत. आज परिस्थिति बदलली आहे. त्यांच्या काळीं जें शक्य नव्हतें तें आज शक्य झालें असेल किंवा उद्यां होईल. एखादी चांगली कल्पना अथवा विचार, त्यांचा व्यवहारांत अंमल करण्याला तयार असणाऱ्या कांहीं मोठ्या उदारचरित पुरुषांचीच फक्त मार्गप्रतीक्षा करीत असतात, असें मानणें बालिशपणाचें होईल. त्या विचारांचा अंमल करण्याला तयार असणाऱ्या पुरुषांप्रमाणेंच समाजमनाचीहि त्या विचारांचें स्वागत करण्याची हळूंहळूं तयारी व्हावी लागते.

परंतु आज एकट्यादुकट्या व्यक्तीच्या किंवा अनेक व्यक्तींच्या आत्म्यांचें परलोकाच्या दृष्टीनें रक्षण करण्याचा प्रश्न नाहीं, तर संघर्ष व संहार यांपासून समष्टीचें म्हणजे अखिल मानवसमाजाचें रक्षण करण्याचा प्रश्न आपणापुढें उभा आहे. 'येथें नीट जगूं तर दे. मग पुढें परलोकाचा विचार!' – 'जया ऐहिक धड नाहीं। तयांचें परत्र पुससी काई।' – अशी माणसाची स्थिति झाली आहे. युद्धस्थिति ही नित्याची स्थिति होऊं पाहत आहे. मृत्यूच्या भीतीनें मानवाचें जीवन कोमेजून किंवा करपून गेलें आहे. मातेच्या उदरांतून बाहेर येणें आणि मृत्यूच्या मुखांत प्रवेश करणें येवढेंच जणूं मानवाचें जीवन बनलें आहे. मुखानें शांति व मनानें युद्ध, निदान हातानें युद्धाची तयारी करणाऱ्या राजकारणी पुरुषांच्या जाळ्यांत मानवी जीवन सांपडलें आहे, इच्छा नसूनही ('बलादिव नियोजितः') सर्व विश्व युद्धाच्या खाईकडे खेंचलें जात आहे असें वाटतें. 'शान्ति' 'शान्ति' असा मानवाच्या अंतःकरणगव्हरांतून वर आलेला निनाद आकाशांत सर्वत्र घुमत आहे. सर्व कर्मांच्या आदी व अंतीं 'शांतिः शांतिः शांतिः' असा त्रिवार पाठ करणारे, शांति हें आत्म्याचें स्वरूप (शांतोऽयमात्मा) व शांति हेंच जीवनाचें लक्ष्य अशी ज्यांची शिकवणूक असे जे 'सर्वभूतहिते रत' ऋषी, त्यांनीं विश्वव्यापाराचीं सूत्रें आपल्या हातांतून कायमचीं खालीं ठेविलीं कीं काय, अशी आर्तस्वरानें सर्व मानवजात पृच्छा करीत आहे. जगांत आज सर्व अशांति पसरली आहे. या भूतलावर मानव व त्याची संस्कृति राहते किंवा नाहीं, हें मानवाला विश्वशांति स्थापण्यांत जितपत यश होईल, त्यावरच अवलंबून आहे.

**आधीं संकल्प, नंतर त्याची सिद्धि**

आत्मा एक संकल्प करतो पण त्याची सिद्धि हजारों वर्षांनीं होते. या संकल्पसिद्धीसाठीं असंख्य आत्मे खपतात, किंवा एकच संकल्प अनेक आत्मे एकाच वेळीं करतात व त्याच्या सिद्धीसाठीं मानवाच्या पिढ्यानपिढ्या प्रयत्नशील राहतात. काम किंवा संकल्प हा आत्म्याचा गुण आहे. संकल्पाशिवाय आत्मा ही कल्पनाच अशक्य आहे. 'ईश्वर म्हणाला : प्रकाश होवो आणि प्रकाश झाला' असें बायबलांत म्हटलें आहे. आत्मा प्रथम एकाकीच होता. "मी अनेक व्हावें – 'बहुःस्याम्" – अशी त्यानें इच्छा केली आणि विश्वाची उत्पत्ति झाली, असें उपनिषदांत सांगितलें आहे. उपनिषदांत दुसऱ्या एका ठिकाणीं म्हटलें आहे : 'आत्मा हा सत्यकाम, सत्यसंकल्प आहे म्हणजे तो जें इच्छितो तें घडतें' या केवळ कविकल्पना नाहींत. आत्म्याचा व निसर्गाचा अभ्यास व सूक्ष्म संशोधन यांच्यांतून हे सिद्धान्त निष्पन्न झाले आहेत. भौतिक जगांत कोणताहि संकल्प केव्हां व कोणत्या स्वरूपांत उद्‌भूत होतो हें आपल्याला सांगतां येत नाहीं. प्रारंभी जगांत त्या संकल्पाची सिद्धि स्वप्नवत्, असंभवनीय वाटते. पण शनैः शनैः त्याची सिद्धि शक्य कोटीतील आहे, हें मानवी मनाला पटूं लागतें व अखेर एक दिवस तो संकल्प सिद्ध होतो.

आधुनिक जगांतील अणुबॉम्ब, हैड्रोजन बॉम्ब, रॉकेट्स यांच्याइतक्याच प्रभावी वाय्वस्त्र, अग्न्यस्त्र इत्यादि अस्त्रांचीं आपण महाभारतांत वर्णनें वाचतो. महाभारतांत कल्पतरूचें वर्णन केलें आहे. या गोष्टी त्या वेळीं प्रत्यक्ष होत्या असें जरी आपण ऐतिहासिकदृष्ट्या सिद्ध करूं शकलों नाहीं तरी, ही गोष्ट तितकीच सत्य आहे कीं, त्या कालच्या मानवाने या गोष्टींचा संकल्प केला होता व त्यांचा विचार केला होता आणि या गोष्टी प्रत्यक्षांत आणण्याचा प्रयत्न करणाऱ्या व्यक्ती सर्व कालखंडांत होत्या. हजारो वर्षांपूर्वी माणसानें केलेल्या संकल्पांना अगर वासनांना आज फळ आलें आहे. 'देव आकाशांत विमानांतून संचार करीत आहेत' हें वर्णन पुराण ग्रंथांतून सर्वसामान्य आहे. आज माणसें विमानाने हवेंतून प्रवास करीत आहेत.

त्याचप्रमाणें 'सत्यमेव जयते', 'पाप नाशच करील (Evil shall bring destruction), 'तत्संनिधौ वैरत्यागः' (अहिंसक योग्याच्या सान्निध्यांत प्राणिमात्र वैरत्याग करतील) – असेही

संकल्प माणसानें केले आहेत. माणसाच्या सुकृताचा व दुष्कृताचा जगावर सारखाच परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं हें अपरिहार्यच आहे. ही श्रद्धा, धर्मभोळेपणा अगर आंधळेपणा नाहीं. ही डोळस श्रद्धा असून शास्त्रीय सत्य आहे. 'Law, i.e. the rationalized explanation of any phenomenon is ultimately Will – whether good or bad, wise or crude, regular or spasmodic.' म्हणून माणसानें सत्य व शिव संकल्प करावेत व 'सत्य संकल्पाचा दाता भगवान्' या श्रद्धेनें त्यांच्या सिद्धीसाठीं उद्योगशील रहावें.

तेव्हां ईश्वराच्या रुद्र व शिव अशा दोन्ही स्वरुपाची मानवाला आज प्रतीति येत असली तरी या विश्वाचें अंतिम स्वरूप सत्य, शिव व सुंदर आहे आणि भक्तिक्षेत्रांत ज्ञानेश्वरांनीं वर म्हटल्याप्रमाणें, 'कहीं एकाधेनि वैकुंठा जावें। तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें।', शाश्वत अगर दीर्घकाल सुखाचा लाभ व्हावा म्हणून ब्रह्मलोकाला किंवा स्वर्गलोकाला एखाद्यानें जाण्याऐवजीं सर्वांसाठी हा इहलोकच ब्रह्मलोक अथवा स्वर्गलोक वनवावा हासुद्धां मानवी आत्म्याचा एक असाच संकल्प आहे. येशूचें 'पृथ्वीवर ईश्वराचें राज्य' वा गांधीजींचे 'रामराज्य' स्थापन करण्याचे मनोरथ वरील संकल्पसिद्धीच्या प्रयत्नांतीलच प्रयत्न समजले पाहिजेत. मात्र न्याय, नीति, 'पृथ्वीवर ईश्वराचें राज्य' वा 'रामराज्य' या तत्त्वांची व कल्पनांची सत्यता जीवसृष्टींतील फक्त मानव कोटींतच संभवते, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. गायीला आत्मा नाहीं, असें सर्व धर्म व ज्ञानी मानतात असें नाहीं. तथापि, गाईला आत्मा असला तरी त्याला मानवाच्या आत्म्याप्रमाणें 'स्वातंत्र्य' नाहीं, हें सर्वच मानतात. सर्व गाई सारख्याच आहेत. गाईचा आत्मा समष्टिरूप असून तो भौतिक सृष्टींतील नियमांनीं व धर्मांनीं बांधला गेलेला आहे. गाईची उत्क्रांति अथवा विकास या नियमांनीं नियमित व निश्चित झाला आहे. याचा अर्थ असा नाहीं कीं, माणसाचा आत्मा भौतिक नियमांचें व धर्मांचें उल्लंघन करून आपला विकास करूं शकतो. मनुष्य जें कांही करूं शकतो तें हें कीं, आपल्या आत्मस्वातंत्र्यानें तो या नियमांचें व धर्मांचें उदात्तीकरण (sublimation) करून तो एक नैतिक व आध्यात्मिक सृष्टि निर्माण करूं शकतो.

पण ब्रह्मप्राप्तीपासून अगर ईश्वरप्राप्तीपासून मिळणारा शाश्वत आनंद अथवा स्वर्गप्राप्तीपासून मिळणारें अशाश्वत सुख यांसाठीं या धर्माचें पालन करणें अवश्य आहे हें जितकें सर्वमान्य आहे, तितकें या जगांतील सुखासाठींही तसेंच करणें जरूर आहे, हें मान्य नाहीं. उलट, तसें करण्यानें या जगांतील सुख मिळणें शक्य नाहीं, इतकेंच नव्हें तर सृष्टिव्यापार चालविण्यासाठीं या धर्माला अपवाद करणें जरुर आहे अशी शास्त्रांची व सत्पुरुषांची शिकवणूक आहे, अशी सर्व जनांची सामान्य समजूत आहे. पण तींच शास्त्रें व सत्पुरुष असें सांगतात कीं, या पृथ्वीवर पुन्हां कृतयुग अथवा सत्ययुग येणार म्हणजेच पृथ्वीवर 'ईश्वराचें राज्य' अथवा 'रामराज्य' होणार आहे व तेव्हां सर्व माणसें परस्परांशीं धर्मानें व्यवहार करूं लागणार आहेत. अशा प्रकारची स्थिति, माणसानें कसलाहि प्रयत्न न करतां, एक दिवस आपोआप येणार ही गोष्ट बुद्धीला व तर्काला पटत नाहीं. एक दिवस माणसें धर्मानें व्यवहार करूं लागणार तर त्यासाठीं प्रयत्न केले पाहिजेत व या प्रयत्नांना योग्य फल यावयाचें तर त्याचा सम्यग् मार्ग शोधून काढला पाहिजे. या शोधांत कदाचित् शेंकडों, हजारों वर्षे जातील व मानवाच्या अनेक पिढ्या खपतील!

### अरविन्दांच्या साधनेचें साध्य

या मार्गाचा शोध करण्यासाठीं अरविंदांनीं चाळीस वर्षे एक स्थान व सव्वीस वर्षें स्थिर एकान्तवास पत्करला (अरतिर्जनसंसदि।). त्यासाठीं त्यांनीं दिव्य योगसाधना केली. ईश्वराचें साक्षात् दर्शन घ्यावयाचें या वेडानें भारावून गेलेल्या श्रीअरविंदांनीं सर्वसंगपरित्याग करून पाँडिचरीचा रस्ता धरला. परंतु अन्य ईश्वर-दर्शनेच्छूंप्रमाणें स्वतःला शांति व आनंद मिळावा येवढेंच अरविंद यांच्या योगसाधनेचें लक्ष्य नव्हतें. त्यांनीं ४० वर्षे दीर्घ तप केलें तें, ज्याचा लाभ झाला म्हणजे दुसरें कोणतेंही सुख त्यापेक्षां अधिक श्रेष्ठ वाटत नाहीं (यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः।) अशा आत्यंतिक सुखाचा स्वतःला लाभ व्हावा या स्वार्थबुद्धीनें नव्हे. जीवन व त्याचा सर्व कर्मव्यापार यांचा आधार व प्रेरक तत्त्व एक आध्यात्मिक चेतना आहे अशी श्रीअरविंद यांची सानुभव श्रद्धा होती. सामान्य माणूस या चेतनेचें ग्रहणशील वाहन कसें बनूं शकेल, या चेतनेच्या जाणिवेनें त्याची सर्व कर्मचेष्टा सहजपणें कशी होईल व त्याचें जीवन तिच्यामुळें अंतर्बाह्य कसें रूपांतरित होईल, याच्या शोधार्थ त्यांची सर्व योगसाधना होती. हें घडून येईल तर, पृथ्वीवरील घनदाट अज्ञानांधकाराचे ज्ञानप्रकाशांत रूपांतर होऊन तिच्यावर ईश्वराचें राज्य सुरू होईल. एका किंवा अनेक व्यक्तींनीं योगारूढ होऊन साक्षात् ईश्वराचें सान्निध्य, साधर्म्य वा सायुज्यस्थिति प्राप्त करण्यानें अखिल मानवजातीचा प्रश्न सुटत नाहीं किंवा तिचें शाश्वत कल्याण होत नाहीं. स्वर्गारोहण करून ईश्वरप्राप्ति करणें यांत खरें रहस्य नाहीं, तर ईश्वरालाच या पृथ्वीवर आणलें पाहिजे, अवतरविलें पाहिजे; आणि तेंहि मधूनमधून होणाऱ्या अंशावतार अथवा पूर्णावतार यांच्या रूपानें नव्हे. त्याचप्रमाणें एखाद्यादुसऱ्या प्रिय भक्ताच्या घरी ईश्वर पाणी भरीत आहे यानें योगी अरविंदांचें








समाधान होण्यासारखें नव्हतें. त्यांना, घरोघर सामान्य माणसांच्या रूपानें सर्वत्र ईश्वर वावरत आहे अशी स्थिति इहलोकीं निर्माण करावयाची होती. साहजिकच आहे कीं, जर सर्व मानवांत सद्भावना नांदून पृथ्वीवर शांतीचें साम्राज्य प्रस्थापित करावयाचें व कृतयुगाला पुनः प्रारंभ करावयाचा तर ईश्वर अथवा चिच्छक्ति सार्वत्रिक होणें जरूरच आहे. म्हणून केवळ एखाद्या व्यक्तीनें आरोहण करून त्या चेतनाशक्तिस्वरूपाशीं तादात्म्य पावणें पुरेसें नाहीं. आजपर्यंत पुष्कळांनीं तसें करून आपलें मन शुद्ध केलें आहे व एकांत अनेकत्व, अनेकत्वात एकत्व याचा अनुभव घेतलेला आहे. तथापि, सामान्य माणसाचें मन अद्यापि अशुद्ध व मलानें वरवटलेलेंच राहिलें आहे. म्हणून ती शुद्ध चेतनाशक्ति भूतलावर सामान्य जगाच्या व्यवहाराच्या पातळीवर अवतीर्ण करण्याचें रहस्य साध्य झालें पाहिजे, तरच सामान्य माणसांचीं मनें उंच व व्यापक होतील, त्यांच्या व्यवहारांत सुसंवादित्व (harmony) उत्पन्न होऊन व्यवहार समतेच्या पायावर सुरू होईल. तेव्हांच जगांतील सर्व विसंवाद (discords) नष्ट होऊन त्या सर्वांचें एका सुसंवादित्वांत परिवर्तन होईल. तदनंतर ईश्वर केवळ आपल्या शिवस्वरूपानेंच जगावर राज्य करील व मानवाचें 'सत्य-शिव-सुंदर' विश्वाचें स्वप्न साकार होईल. ईश्वराला संपूर्ण शिव, सुंदर वनावयाचें तर प्रथम माणसाला तसें बनलें पाहिजे. कारण जसा माणूस तसा त्याचा देव. माणसाच्या उत्क्रांतीबरोबर किंवा विकासावरोबर त्यांच्या देवाचीहि उत्क्रांति वा विकास होणें अपरिहार्यच आहे. माणसाशिवाय अन्य जड-व-जीवसृष्टीनें स्वानुभवावरून ईश्वराच्या स्वरूपाविषयीं कांहीं माहिती जमवून ठेविली माहीं. कारण तिला जाणीव नाहीं. ईश्वराचें अस्तित्व व त्याचें स्वरूप याविषयींचें ज्ञान फक्त माणसाच्याच नैतिक व आध्यामिक जाणिवेतून जगाला झालेलें आहे. या जाणिवेंत असा बदल होईल तसा ईश्वरांतही होईल हें मान्यच केले पाहिजे.

श्रीअरविंद यांनीं आपल्या अवतारकार्याची समाप्ति ५ डिसेंबरला केली. २४ नोव्हेंबर १९३६ या दिवशीं त्यांना साक्षात् ईश्वरदर्शन वा सिद्धि प्राप्त झाली असें मानलें जातें व त्या दिवसापासून त्यांच्या आश्रमांत व आसमंतात् लोकांना एका अद्भुत अवस्थेच्या चेतनाशक्तीचा अनुभव येऊं लागला असें श्रद्धेनें सांगितलें जातें. अनेक वर्षांपासून २४ नोव्हेंबर हा सिद्धिदिवस म्हणून स्वतः अरविंद व त्यांचा शिष्यवृंद साजरा करीत हें प्रसिद्धच आहे. परंतु ही गोष्ट सत्य मानली तरी, तेवढ्यानें श्रीअरविंद यांचें अवतारकार्य पूर्ण झालें असें मात्र म्हणतां येणार नाहीं. कारण केवळ वैयक्तिक सिद्धि मिळविणें इतकेंच त्यांचे उद्दिष्ट नव्हतें, तर सामूहिक सिद्धीचा मार्ग शोधून काढणे हे त्यांचें मुख्य जीवन-कार्य होतें. श्रीअरविंद यांच्या आश्रमांत वास करणाऱ्या वा त्यांच्याशीं प्रत्यक्षाप्रत्यक्ष संबंध ठेवणाऱ्या कांहीं माणसांच्या जीवनावर त्यांनीं प्राप्त करून घेतलेल्या शक्तीचा प्रभाव पडणें अपरिहार्यच होतें व तो त्याप्रमाणे पडला असें कबूल करण्यास कांहींच हरकत नाहीं. परंतु त्यांच्या या प्रभावापासून सामान्य माणूस वंचितच राहिला, हेंहि तितकेंच मान्य करावे लागेल. या जन्मीचें अपुरें राहिलेलें काम पुरे करण्यासाठीं ('अनेकजन्मसंसिद्धः') योगी अरविंद भारतांत पुन्हां जन्म घेणार नाहींत, हे कोणी सांगावें? मानवजातीच्या भविष्यकालीन पूर्णावस्थेविषयीं अचल श्रद्धा आणि संकल्प, तद्नुसार नित्य नीतिधर्माचें निरपवाद पालन करण्याचा अखंड प्रयत्न करण्याची आवश्यकता इत्यादि गोष्टीविषयीं श्रीअरविंदांची साधना व विचार यांचें संक्षिप्त दिग्दर्शन केलें. या प्रश्नाविषयीं गांधीजींच्या विचारांचे दिग्दर्शन पुढील लेखांतून करावयाचें योजिले आहे.

※ ※ ※

## ३. अनासक्तियोग*

मानवसमाजांतून युद्ध ही संस्था अजिबात लोप पावून जगांत संपूर्ण शान्ति नांदावयाची तर माणसा-माणसांमधील रोजचा व्यवहार संपूर्ण सद्भावनेनें झाला पाहिजे, हें अगदीं उघड आहे. पण यासाठीं मानवजातीला पशुजीवनाच्या पातळीवरून जरा वरच्या पातळीवर नेणें जरूर आहे. कारण तसें झालें तरच माणसाचें मन उन्नत म्हणजेच उदार होईल. ही गोष्ट कशी घडून येईल, याविषयीं नाना मतें असून नाना देशींच्या व कालांच्या धर्मावतारी पुरुषांनीं व संतमहात्म्यांनीं त्यासाठीं नाना साधना

* पूर्वप्रकाशन : *नवभारत*, वर्ष ४, अंक ७, एप्रिल, १९५१.

अनुक्रमणिका

सांगितल्या आहेत. 'नवभारता'च्या मागील मार्च १९५१ च्या अंकांतील लेखांत योगी अरविंदांच्या साधनेचा परामर्श घेण्याचा मी अल्पसा प्रयत्न केला व त्या विषयीचें माझें मत मी तेथें दिलें आहे. या लेखांत गांधीजींच्या साधनेचा विचार करण्याचें मीं योजिलें आहे.

गांधीजींवरील आपल्या मृत्युलेखांत श्री. जवाहरलालजी लिहितात : "एक व्यक्तिच काय सर्व राष्ट्रच्या राष्ट्र भावनेनें भारलें जाऊन तिनें वा त्यानें एखादें विशिष्ट उदात्त अगर महान् कृत्य केल्याचीं उदाहरणें जगाच्या इतिहासांत आढळतात. पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, गांधीजींच्या प्रेरणेनें अखिल भारत उच्च पातळीवरून वागला इतकेंच नव्हे तर, तो दीर्घकाळपर्यंत तसा वागत होता. तो एक चमत्कारच म्हटला पाहिजे. ज्या अद्‌भुत विभूतीनें या कालाला जन्म व रूप दिलें तिच्या जीवनाचा विचार केल्याशिवाय हा चमत्कार कसा व कां घडला हें समजणें कठीण आहे. विराट वामनानें ज्याप्रमाणें आपल्या दोन पादांनीं पृथ्वी व स्वर्ग व्यापून टाकावा त्याप्रमाणें गांधीजींच्या जीवनानें भारताचें अर्ध-शतकाचें जीवन अंतर्बाह्य व्यापून टाकलें होतें. आणि गांधीजींचें हें विराट स्वरूप वामनाप्रमाणेंच शरीराचें नव्हतें तर मनाचें व आत्म्याचें होतें".

गांधीजींची हत्या झाली त्या दिवशीं सायंकाळीं या देशांतील व परदेशांतील अनेक लहानमोठीं माणसें बिर्लाभुवनामध्यें जमलीं होतीं. त्या प्रसंगीं एक उपस्थित सज्जन म्हणाले : "उद्यां सर्व भारत शोकसागरांत बुडून जाईल!" जवळच त्या वेळचे भारताचे गव्हर्नर-जनरल लॉर्ड माउन्टबॅटन बसले होते. ते म्हणाले, "नव्हे, सर्व जग उद्यां शोक करील!"

**गांधींच्या आकर्षणाचें इंगित**

पृथ्वीवरील दूरदूरच्या देशांतील सामान्य माणसांनाहि, आपल्या प्रियजनाच्या मृत्यूचें दुःख व्हावें तसें गांधीजींच्या मरणाचें दुःख झालें व धक्का बसला. याचें कारण काय असावें बरें? राजकारणाच्या क्षेत्रांतील त्यांचे प्रयत्न कोट्यावधि स्त्री-पुरुषांचें जीवनमान सुधारण्यावर केंद्रित झाले होते हें खरें. पण एवढ्या एका गोष्टीनें गांधीजींबद्दल जगांतील सामान्य माणसाला वाटणाऱ्या असामान्य आकर्षणाची बरोबर उपपत्ति लागत नाहीं. नीतिधर्माच्या क्षेत्रांतील गांधीजींच्या प्रयत्नांचें लक्ष्य या कोट्यावधि स्त्री-पुरुषांच्या जीवनांतील सद्सद्विवेक बुद्धि जागृत करून ती व्यापक व तीव्र करावी हें होतें. हें त्यांच्याबद्दलच्या प्रेमाचें व आकर्षणाचें मुख्य कारण होय. शारीरिक व भौतिक सुखाची गोडी व इच्छा साधारणतः सर्वच माणसांना असते; पण पुष्कळ वेळां वरच्या वर्गाच्या लोकांपेक्षां सामान्य जनांना नैतिक जीवनाची गोडी व भूक अधिक असते, नव्हे त्यासाठीं प्रयत्न करण्यास ते अधिक तयार असतात. पण लोकसंग्रहाचा व लोकधारणेचा पुरुषार्थ करूं इच्छिणाऱ्या श्रेष्ठ पुरुषाचें या गोष्टीकडे दुर्लक्ष होतें. तथाकथित सुशिक्षित व्याजपूर्ण (sophisticated) लोकांपेक्षां सामान्य जनच वेडे होऊन गांधीजींसारख्या संतपुरुषाच्या मागें अधिक लागतात, याचें तरी कारण हेंच होय. आपल्या शारीरिक व भौतिक गरजा भागविण्यासाठीं जनता राज्यसंस्थेकडे पाहते. पण आपल्या स्वयंस्फूर्त नैतिक जीवनाची भूक भागविण्यासाठीं ती गांधीजींसारख्या नीतिमान् विभूतीकडेच धांव घेते. व्यापकता हा नीतीचा स्वभावधर्म असल्यामुळें अशा नीतिमान् पुरुषांच्या आकर्षणाला व प्रभावशक्तीला राष्ट्राच्या सरहद्दीची मर्यादा नसते. म्हणूनच परदेशी कापडाचा बहिष्कार व होळी करणाऱ्या गांधीजींचें लँकॅशायरचे कामगार प्रेमानें हार्दिक स्वागत करीत आहेत, असा आश्चर्यकारक देखावा जगानें पाहिला!

मनुष्य हा मूलतः नीतिमान् आहे. अखेर शरीर हें वस्त्रापेक्षां आणि जीवन द्रव्यापेक्षां श्रेष्ठ आहे, याचें स्मरण सामान्य माणसालाहि सदैव असतें. सामान्य माणसेंहि नैतिक व आध्यात्मिक जीवनाच्या उच्च पातळीवर जाण्याचा प्रयत्न करीत असतात. व्यवहारी विद्वानांना व अहमंन्य पंडितांना त्यांच्या विद्वत्तेची अगर पांडित्याची धुंदी डोळ्यांवर आल्यामुळें सामान्य माणसांची ही धडपड दिसत नाहीं, एवढेंच. सर्वसाधारण माणसाला शरीरापलीकडची जाणीव असणें शक्य नाहीं, म्हणून श्रेष्ठ, नैतिक व आध्यात्मिक जीवनाची त्या गांवढळाला चव कोठली, या समजुतीने "न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम्" या वचनाचा विपर्यास करून ते त्याला शारीरिक कर्मांतच रत ठेवणें हा आपला धर्म मानतात.

परंतु संतांची गोष्ट निराळी असते. आपल्या भोंवतालच्या कोट्यावधि दीन-दुबळ्या जनतेच्या स्नेहानें व सहानुभूतीनें त्यांचें अंतःकरण ओथंबलेलें असतें ('जे का रंजले गांजले। त्यांसी म्हणें जो आपुले। तोचि साधू ओळखावा। देव तेथेंचि जाणावा।'). या गरीब जनतेच्या अंतःकरणांत नैतिक जीवनाबद्दल ज्या अव्यक्त आकांक्षा व अनिर्दिष्ट आशा असतात त्यांची संतमहात्म्यांना तिच्यावरील अथांग प्रेमामुळें प्रतीति येते. त्या बिचाऱ्या मूक जनतेच्या नैतिक वैफल्याला ते वाचा फोडतात व स्वतःच्या विचार-उच्चार-आचारांनीं तिच्या सुप्त आशा आकांक्षांना व्यक्त रूप देतात. अगदीं पतित समजल्या जाणाऱ्या माणसाच्या ठिकाणींहि सुप्त स्वरूपांत सत्प्रवृत्ति असते, असें गांधीजींसारखे संत मानतात आणि स्वतःच्या श्रद्धेनें व सदाचारानें तिला आवाहन करून त्या माणसाच्या मनांत चांगुलपणाबद्दल आकर्षण उत्पन्न करतात.





संतांच्या प्रेरक संपर्कानें साधीं माणसेही साधू होतात. ('अपि चेत्सुदुराचारो। भजते मामनस्य भाक्। साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः।।')

जो नीतिधर्म सर्व लोक आचरूं शकतील असाच नीतिधर्म संत आपल्या जीवनांत स्वतः आचरून दाखवितात. लोक जेव्हां गांधीजींना 'महात्मा' म्हणून संबोधीत तेव्हां गांधीजींना संकोच व शरम वाटे. ते म्हणत : "मी महात्मा नाहीं. तुमच्यासारखाच एक सर्वसाधारण मनुष्य आहें. मी जें करीत आहे तें विशेष काहीं नसून, मनांत आणलेत तर तुम्हीहि तसें करूं शकाल. कारण जें एक मनुष्य करूं शकतो तें सर्व माणसें करू शकतात". जेव्हां गांधीजी असें म्हणत तेव्हां लोकांना वाटे की, ते विनयानें तसें म्हणत आहेत. पण वास्तविक गोष्ट अशी होती कीं, तें सत्य होतें व त्याच्यामागे आत्मप्रतीति होती. म्हणूनच खरा प्रश्न असा आहे कीं, सामान्य जनतेविषयी आपली श्रद्धा काय आहे?

### जनतेची सेवा करण्याकरितांच राजकारण

जगांतील दीन-दुबळ्या, दलित, गांजलेल्या लोकांनाहि – आणि आज अशांचीच बहुसंख्या आहे – पृथ्वीवरील विपुलतेचा वाटा मिळावा, त्यांची सामाजिक अन्यायापासून मुक्तता व्हावी अशी आपली खरोखर तळमळ आहे का? पशुजीवनाहून श्रेष्ठ जीवन जगण्याची शक्ति व बुद्धि सर्वसाधारण माणसांमध्यें आहे, फक्त अनुकूल परिस्थितीचा लाभ त्यांना झाला पाहिजे अथवा करून दिला पाहिजे, असें मनापासून मानण्याइतकी सत्यनिष्ठा अगर ईश्वरनिष्ठा आपल्यामध्यें आहे का? सामान्य जनाची तशी सेवा आपल्या हातून होईल इतकें आपलें त्याच्यावर प्रेम आहे का? चंपारण्यातील अडाणी शेतकऱ्यांनीं गांधीजींचे नांव पूर्वी कधीं ऐकलें नव्हतें. मग प्रत्यक्ष दर्शन, परस्परसंबंध व सेवा यांचा प्रश्नच नाहीं. अशी परिस्थिती असतांनाही जेव्हां गांधीजींनीं चंपारण्यांत प्रथम प्रवेश केला तेव्हां या शेतकऱ्यांनीं गांधीजींबद्दल गाढ भक्ति व जसा आपल्या आईवर तसा गांधीजींच्यावर विश्वास प्रगट केला. या आश्चर्यकारक घटनेबद्दल गांधीजी लिहितात : "शेतकऱ्यांच्या या भेटींत मी प्रत्यक्ष परमेश्वराचें, अहिंसेचें व सत्याचें दर्शन घेत होतों, असें म्हणणें यत्किंचितहि अतिशयोक्तीचें नाहीं. तें अगदी वास्तविक सत्य आहे. आणि ही कृपा माझ्यावर व्हावी असा माझा कोणता अधिकार होता याचा जेव्हां मी विचार करतों तेव्हां या लोकांवरील माझे प्रेम, असेंच माझे मन मला त्याचें उत्तर सांगतें. आणि हें प्रेम म्हणजे माझ्या अहिंसेवरील अचल श्रद्धेचाच आविष्कार होय". विश्वांतील सच्छक्तीवर संतांची अचल श्रद्धा असल्यामुळेंच त्यांचें प्राणिमात्रांवर अथांग प्रेम असतें, व त्यांच्या शाश्वत हिताची तळमळ त्यांना लागलेली असते. त्यासाठी ते असीम त्यागाचें असिधाराव्रत घेतात व आत्मार्पणांत जीवनाची कृतार्थता मानतात.

नीतीचा व धर्माचा माणसाच्या ऐहिक जीवनाशीं जर कांहीं संबंध असेल तर, 'हें धर्माचें अगर नीतीचें क्षेत्र आणि हें राजकारणाचें क्षेत्र' असा भेद करतां येत नाहीं. कारण, आज राजकारणानें आपला व्याप एवढा वाढविला आहे कीं, त्याचा जनतेच्या जीवनाच्या सर्व क्षेत्रांत प्रवेश झाला आहे. म्हणून ज्याला जनतेची सर्वांगीण सेवा करावयाची आहे त्याला आज राजकारण केल्याशिवाय गत्यंतरच उरलेलें नाहीं. गांधीजींनी स्वतःच्या व देशाच्या जीवनांत राजकारण आणि नीति अथवा धर्म यामध्यें सांचेबंद फरक करणें या गोष्टीचा इन्कार केला. हा त्यांनीं 'अव्यापारेषु व्यापार' केला असें जे म्हणतात ते सांप्रतच्या सामाजिक जीवनाच्या सत्य स्वरूपाबद्दलचें आपलें गाढ अज्ञान प्रकट करतात.

जनतेच्या शारीरिक गरजा पुरविण्याची योग्य व्यवस्था करणें हें तर शासनसंस्थेचें काम आहेच; पण हें तिचें मुख्य ध्येय नव्हे. सामान्य स्त्री-पुरुषांना आपला नैतिक विकास साधतां येईल अशी त्यांच्या जीवनांत अनुकूल परिस्थिति निर्माण करणें हें शासनसंस्थेचें परमोच्च ध्येय होय.

ईश्वराचें म्हणजे सत्याचें दर्शन करणें हें गांधीजींच्या जीवनाचें ध्येय होतें हें खरें; पण त्याकरितां त्यांनीं जनतेची सेवा ही आपली साधना केली होती. 'साधने'च्या या विशिष्ट स्वरूपामुळेंच आपणांस राजकीय क्षेत्रांत पदार्पण करावें लागलें, असें गांधीजींनीं आपल्या आत्मकथेंत लिहिलें आहे. याचा परिणाम असा झाला कीं, गांधीजींना प्रस्थापित सत्तेशीं, व व्यवहारांत आणि विशेषतः राजकारणांत नीतिधर्माला मुरड घातली पाहिजे असें गीताधारें प्रतिपादन करणाऱ्या आपल्या विद्वान् देशबांधवांशीं झगडा करावा लागला. गांधीजींना सत्तेशीं जो संघर्ष करावा लागला त्याचा विचार प्रस्तुत स्थळीं कर्तव्य नाहीं.

### नीतिधर्माच्या पात्रांतून वाहणारें मानवजीवन

'ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम्।' या श्लोकार्थाच्या अर्थाबद्दल लोकमान्य व गांधीजी यांच्यामधील प्रसिद्ध वादाचा 'नवभारता'च्या फेब्रुवारी १९५१ च्या अंकांतील पहिल्या लेखांत ओझरता निर्देश केलेला आहे. राजकारण हा संसारी लोकांचा खेळ आहे, साधुसंतांचा नाही आणि म्हणून राजकारणाच्या आखाड्यांत 'शठं प्रति शाठ्यं' – 'जशास तसें' – हा न्यायच नीति म्हणून आचरणांत आणला पाहिजे; येथें 'शठं प्रति

सत्यम्' ही नीति कामाची नाहीं असें लोकमान्यांचें म्हणणें. याच्या उलट राजकारण हें संसारी माणसाइतकेंच साधूंचेंहि क्षेत्र आहे व या क्षेत्रांतील साधूंनीं 'शठं प्रत्यपि सत्यम्' हा नीतिधर्म आचरून सामान्य लोकांना पुरुषार्थाचा मार्ग दाखवावा असें गांधीजींचें म्हणणें. लोकमान्यांच्या मतें हे दोन्हीहि नीतिधर्म सारखेच प्रामाणिक व पवित्र आहेत; पण पहिला व्यवहार्य आहे. गतानुगतिक रूढ नीतिधर्माचें पालन करण्यांतच समाजाचें कल्याण आहे व कोणत्याहि उन्नत प्रगतिशील नीतीधर्माचें पालन करणें सामान्य जनाच्या आवाक्याबाहेरचें आहे असें प्रामाणिकपणें मानणाऱ्या माणसाला गांधीजींचा मार्ग अव्यवहार्य वाटणें स्वाभाविक आहे.

पण वरील दोन्हीहि मार्ग सारखेच श्रेष्ठ आहेत, हें लोकमान्यांचे म्हणणें मात्र बुद्धीला पटत नाहीं. पहिल्यापेक्षां दुसरा अधिक श्रेष्ठ आहे हें थोड्या विचाराअंतीं सहज पटण्यासारखें आहे. 'जशास तसें' हा जड किंवा भौतिक सृष्टींतील अनुल्लंघनीय नियम आहे. तथापि, त्यानें मनुष्य सर्वस्वीं बांधला गेला आहे असें मानणें योग्य होणार नाहीं. कारण मनुष्य पशुहि नाहीं व केवळ पंचभूतात्मक शरीरहि नाहीं. त्याला शरीराहून श्रेष्ठतर असें मन व आत्मा आहे. त्याला जीवनावरील व विश्वावरील अधिकार अध्यात्मामुळें म्हणजेच मानसिक सामर्थ्यामुळें प्राप्त झाला आहे. अमकें बरोबर आणि तमकें चूक, असा भेद मनुष्य बुद्धीमुळेंच करूं शकतो. पशु व मनुष्य यांच्यामध्यें हाच फरक असून या बुद्धीमुळेंच मनुष्य पशूपेक्षां निराळा व म्हणून श्रेष्ठ होय. ('प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये। बंधं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी।।') जें जीवनच केवळ निसर्गनियमांच्या वा भौतिक शास्त्रांच्या आधारें चालतें अथवा बांधलें गेलेलें आहे तें, सत्यार्थानें, मुळीं मानवी जीवनच नव्हे. जेव्हां माणसाचें जीवन नीतीच्या व धर्माच्या पात्रांतून वाहूं लागतें तेव्हांच तें मानवी जीवन या पदवीला पात्र होतें. माणसाच्या जन्माबरोबरच नीतीचा व धर्माचा जन्म झाला आहे, असें जे म्हटले जातें तें याच अर्थानें. म्हणूनच 'शठं प्रति शाठ्यं' ही सृष्टीची नीति मानवी जीवनांत 'शठं प्रत्यपि सत्यं' या श्रेष्ठ नीतीच्या रूपानें प्रगट होते, किंवा झाली पाहिजे. या साठींच मानवी जीवनाची कृतार्थता अखेर नैतिक व आध्यात्मिक मूल्यांनींच मापावयाची असते.

मात्र, हीं नैतिक व आध्यात्मिक मूल्यें म्हणजे विशिष्ट कालीं व देशीं प्रचलित अगर रूढ असलेले धर्मविधी अथवा संस्कार आणि नीतिधर्म वा नियम (moral and religious codes) नव्हते हें नीट लक्षांत ठेवणें जरूर आहे. येथें नैतिक व आध्यात्मिक मूल्यें म्हणजे सत्य, सौंदर्य, शांति, सुसंवादित्व या कल्पना अभिप्रेत आहेत. यांच्या शोधाचा व प्राप्तीचा प्रयत्न यांतच मानवी पुरुषार्थ व पूर्णता आहे. या शोधांत व प्रयत्नांत मानवाला मदत करणें हें धर्मविधी व नीतिनियम यांचें खास कार्य आहे. हे विधी व नियम म्हणजे पूर्णतेच्या दिशेनें परिस्थितीची सुधारणा होण्याला मदत करणारी व्यवहार अथवा वर्तनपद्धति (behaviour pattern) होती. पण दुर्दैव असे की, मानव नैतिक व आध्यात्मिक मूल्यांपेक्षा रूढ नीतिनियम व धार्मिक विधी यांनाच अधिक महत्त्व देतो व जीं साधनें आहेत त्यांनाच साध्य बनवितो! सर्व कालीं, सर्व देशीं, सर्व मानवांनीं कसें वागावें हें अचूक सांगण्याची शक्ती या विधींत व नियमात आहे असा त्यांच्या वतीने दावा केला जातो. इतकेंच नव्हें तर, त्यांचा प्रवर्तक वा जनक कोणी तरी देव, संत, महात्मा अगर शान्तिशाली विभूति आहे अशी लोकांची दृढ श्रद्धा असते. वेद अपौरुपेय आहेत व चार वर्ण व चार आश्रम स्वतः परमेश्वरानेंच निर्माण केले आहेत (चातुर्वर्ण्यम् मया सृष्टम्), ही समजूत याचेंच उदाहरण होय. या श्रद्धेमुळें अगर समजुतीमुळें, रूढ नीतिनियमांत कांहीं दोप असेल किंवा तो कालाने उत्पन्न झाला असेल असें मानून त्याप्रमाणें त्यांत सुधारणा करण्याला समाज साधारणतया तयार होत नाहीं. अस्पृश्यतानिवारणासारख्या कार्याला विरोध करणारेहि कांहीं सदाचारी व परोपकारी पुराणपुरुप दिसतात याचें कारण तरी हेच. या विधिनियमांपैकीं पुष्कळसे विधी व नियम विशिष्ट परिस्थितींतील खास समाजरचनेला लागू असतात किंवा नीट समजेनासे होतात. असें असल्यामुळे विशिष्ट कालीं व विशिष्ट परिस्थितींत ज्या विधींनी व नियमांनीं समाजाचें सर्वसाधारण स्वास्थ्य व सुसंवादित्व टिकविण्याला मदत केली तेच विधी व नियम निराळ्या कालीं व अवस्थेंत समाजाचे आरोग्य विघडवितात व त्यांची अवनति करतात. म्हणून सत्य, सौंदर्य, शांति, सुसंवादित्व हीं सनातन नैतिक मूल्यें साध्य समजून कालपरिस्थितीप्रमाणें धर्मविधी व नीतिनियम यांच्यांत कधी कधीं क्रांतिकारक बदल करावे लागतात. हे कार्य संतांच्या किंवा साधुपुरुषांच्या रूपानें अवतीर्ण झालेल्या गांधीजींसारख्या नीतिमान् विभूती मधूनमधून करीत असतात.

आज समाजाचें सर्वसाधारण स्वास्थ्य बिघडले असून निष्फळतेच्या व निराशेच्या रोगानें मानवी जीवनाला कायमचें ग्रहण लागतें कीं काय, अशी भीति वाटूं लागली आहे. हा रोग शारीरिक नसून मानसिक आहे. माणसानें आपल्या वाढत्या संघटनेच्या आणि यंत्रविज्ञानाच्या जोरावर निसर्गावर एकामागून एक अचाट विजय मिळविले असून जणूं त्याच्या गुलामगिरींतून आपली मुक्तता करून घेतली आहे! पण दुर्दैव असें कीं, माणसानें



अनुक्रमणिका

ज्या प्रमाणांत निसर्गावर विजय मिळविले आहेत त्या प्रमाणांत स्वतःवर विजय मिळविले नाहींत व त्यामुळें त्याचे विचार व भावना जुन्याच राहिल्या आहेत व त्यांतून निर्माण होणारे तात्त्विक व व्यावहारिक निर्णय व पद्धति यांच्यामध्यें विशेष फरक झालेला नाहीं. याचा परिणाम असा झाला आहे कीं, विज्ञानानें त्याला जी विपुलता प्राप्त झाली आहे तींत सर्वांना सारखे वाटेकरी करून जगांत शांति व समता प्रस्थापित करण्याच्या कामांत तो अयशस्वी झाला आहे. माणसामाणसांतील व समाजामधील शोषण, संघर्ष, द्वेष व हिंसा हीं कमी होण्याऐवजीं वाढत आहेत. दोन जागतिक युद्धें झालीं. "प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य" अशा पवित्र्यांत मोठमोठ्या राष्ट्रांचे प्रतिनिधी राष्ट्रसंघांत शांतीसाठीं वाद करीत आहेत, आपआपले शंख फुंकून विरोधी पक्षाचीं अंतःकरणें विदीर्ण करून टाकण्याचा प्रयत्न करीत आहेत. मानवसंस्कृति महान् संकटांत सांपडली आहे. श्रीअरविंदांच्या शब्दांत बोलावयाचें तर "जोंपर्यंत संघर्षाची जागा सहकार, हिंसेची जागा अहिंसा व युद्धाची जागा शांति घेणार नाहीं आणि ईश्वर केवळ प्रेमस्वरूप आहे असें समजून मानव त्याला भजणार नाहीं, तोंपर्यंत युद्ध व मानवाचा सर्वनाश टाळणें शक्य दिसत नाहीं". युद्धापासून होणारा हा सर्वनाश कसा टाळावयाचा ही 'समस्यांची समस्या' आज मानवापुढें उभी आहे. अशा परिस्थितींत 'तस्माद्युध्यस्व भारत' या वचनावर, तो ईश्वराच्या अधिकृत वाणींतून निघालेला शस्त्रयुद्धाचा आदेश होय, अशी ज्यांची श्रद्धा आहे, ते मानवाची ही समस्या सोडविण्याला कशी मदत करूं शकतील?

### अनासक्तियोग आणि सत्य-अहिंसापालन

"युद्ध कर पण 'विगतज्वर' 'अनासक्तीनें' कर" अशी भगवान् श्रीकृष्णाची आज्ञा आहे असें यावर कोणी म्हणेल. पण त्यासंबंधी गांधीजी लिहितात : "गीतेचा कृष्ण मूर्तिमान् शुद्ध संपूर्ण ज्ञान आहे, परंतु काल्पनिक आहे. येथें कृष्ण नांवाच्या अवतारी पुरुषाचा निषेध नाहीं. केवळ संपूर्ण कृष्ण काल्पनिक आहे. त्याच्यावर मागाहून संपूर्णवताराचें आरोपण करण्यांत आलें आहे". गांधीजींनीं गीतेचा जो सुबोध अनुवाद केला आहे, त्याला 'अनासक्तियोग' असेंच नांव दिलें आहे. अनासक्तियोगाच्या प्रस्तावनेंत गांधीजी लिहितात : "ईश्वरस्वरूप बनल्याशिवाय मनुष्याला चैन पडत नाहीं. शांति मिळत नाहीं. ईश्वरस्वरूप बनण्याचा प्रयत्न हाच एक खरा पुरुषार्थ आहे व तेंच आत्मदर्शन आहे. गीताकारांनीं या विषयाचे प्रतिपादन करण्यासाठीं नव्हे, तर जो आत्मार्थी आहे त्याला आत्मदर्शनाचा एक अद्वितीय उपाय दाखविण्याच्या हेतूनें गीता लिहिली आहे. तो अद्वितीय उपाय 'कर्मफलत्याग' हा आहे; पण फलत्यागाचा कोणी असा अर्थ करूं नये कीं, त्यागी पुरुषाला फळ मिळत नाहीं. अशा अर्थाला गीतेंत कोठेहि आधार नाहीं. अशा फलत्यागाचा खरा अर्थ असा आहे कीं, फलाच्या ठिकाणीं आसक्तीचा अभाव..." आसक्त पुरुष पुष्कळ वेळां कर्तव्यभ्रष्ट होतो व नीती-अनीतीचा विवेक सोडून देऊन फलप्राप्तीसाठीं वाटेल त्या साधनांचा उपयोग करूं लागतो व त्यालाच धर्म मानतो. अशा पुरुषालाच साधारणपणें जग शहाणा व व्यवहारी समजतें. गांधीजी पुढें लिहितात : "व्यापार इत्यादि लौकिक व्यवहारांत धर्माचें रक्षण करणें शक्य नाहीं, अशा ठिकाणीं धर्माला स्थान असूं शकत नाहीं, धर्माचा उपयोग फक्त मोक्षप्राप्तीसाठीं केला जाऊं शकतो, धर्माच्या ठिकाणीं धर्म व अर्थाच्या ठिकाणीं अर्थ शोभतात, असें सर्वसाधारण मानलें जातें. गीताकारांनीं हा भ्रम दूर केला आहे. त्यांनीं मोक्ष व व्यवहार यांच्यामध्यें असा भेद केला नाहीं. नव्हे, त्यांनीं धर्माला व्यवहारांत आणलें आहे. जो धर्म व्यवहारांत आणतां येत नाहीं तो मुळीं धर्मच नाहीं, ही गोष्ट गीतेंत सांगितली आहे अशी माझी समजूत आहे. सारांश, गीतेच्या मताप्रमाणें आसक्तीशिवाय जीं कर्मे होत नाहींत तीं सर्व त्याज्य होत. या मताप्रमाणें खून, खोटें, व्यभिचार इत्यादि कर्मे आपोआपच त्याज्य ठरतात. या विचारसरणीप्रमाणें गीतेची शिकवणूक जे व्यवहारांत आणूं इच्छितात त्यांना आपोआपच सत्याचें व अहिंसेचें पालन करावें लागतें. फलासक्ति नसेल तर माणसाला असत्य बोलण्याचा अगर हिंसा करण्याचा मोह होणार नाहीं".

### महान् शब्दांचे विकासशील अर्थ

जर गीतेला अहिंसा मान्य होती किंवा अनासक्तीमध्यें अहिंसेचा सहजच समावेश होतो, तर मग गांधीजी म्हणतात त्याप्रमाणें गीताकारांनीं उदाहरण म्हणून का होईना भौतिक युद्धाचें रूपक कां घेतलें असा प्रश्न स्वाभाविकच उत्पन्न होतो. या प्रश्नाला गांधीजींचें उत्तर असें : "गीतेच्या काळीं अहिंसा धर्म मानला जात असतांनासुद्धां भौतिक युद्ध ही सर्वमान्य गोष्ट असल्यामुळें गीताकाराला असल्या युद्धाचें उदाहरण घेतांना संकोच वाटला नाहीं, वाटावयाचें कारणहि नव्हतें. पण फलत्यागाच्या महत्त्वाचें मूल्यमापन करीत असतांना गीताकाराच्या मनांत कोणता विचार होता, त्यानें अहिंसेची कोणती मर्यादा धरली होती याचा आपणाला विचार करण्याचें प्रयोजन नाहीं. कवि महत्त्वाचें सिद्धान्त जगापुढें मांडतो म्हणून, तो नेहमीं स्वतः सांगितलेल्या सिद्धान्ताचें महत्त्व संपूर्णपणें ओळखतो अथवा ओळखल्यानंतर तो पूर्णपणें भाषेंत व्यक्त करूं शकतो, असें होत नाहीं. यांतच काव्याचा व कवीचा

महिमा आहे. कवीच्या अर्थाला अंतच नसतो. ज्याप्रमाणें मनुष्याचा, त्याचप्रमाणें महाकाव्याच्या अर्थाचाहि विकास एकसारखा होत असतो. तसेंच गीतेच्या अर्थाविषयीं सुद्धां आहे. गीताकारानें स्वतः रूढ महान् शब्दांचा अर्थ विस्तारिलेला आहे. गीताकालापूर्वी कदाचित् यज्ञांत पशुहिंसा मान्य गणली असेल. परंतु गीतेच्या 'यज्ञा'त तिचा गंधसुद्धां नाहीं. त्याचप्रमाणें गीतेंतील 'संन्यास' या शब्दाच्या अर्थाविषयीं आहे. गीतेंतील संन्यासी अतिकर्मी आहे; तथापि तो अति अकर्मीसुद्धां आहे. याप्रमाणें गीताकारानें महान् शब्दांचा अर्थ व्यापक करण्याला आपणांला शिकविलें आहे. भौतिक युद्ध संपूर्ण फलत्यागी पुरुषाच्या हातून घडणें शक्य आहे, असे तात्पर्य गीताकाराच्या भाषेंतील अक्षरांतून खुशाल निघो; पण गीतेच्या शिकवणीची पूर्णपणें अंमल बजावणी करण्याचा सुमारें चाळीस वर्षेपर्यंत मी सतत प्रयत्न करीत असतां, मला तरी नम्रपणें असें वाटत आलें आहे कीं, सत्य आणि अहिंसा यांच्या संपूर्ण पालनाशिवाय संपूर्ण फलत्याग मनुष्याच्या बाबतीत असंभवनीय होय. गीता सूत्रग्रंथ नाहीं. गीता एक महान् धर्मकाव्य आहे. म्हणून गीतेंत असलेल्या महान् शब्दांचे अर्थ प्रत्येक युगांत बदलतील आणि विस्तार पावतील; पण गीतेचा मूलमंत्र कधीहि बदलणार नाहीं. गीता विधिनिषेध मुळींच दर्शवीत नाहीं. एकाच्या बाबतींत जे विहित असेल, तें दुसऱ्याच्या बाबतींत निषिद्ध ठरेल. एका काळीं किंवा एका देशांत जें विहित असेल ते दुसऱ्या काळीं व दुसऱ्या देशांत निषिद्ध होईल. सर्व कालीं निषिद्ध अशी गोष्ट फलासक्ति होय. विहित गोष्ट अनासक्ति होय".

## 'विजेत्यांनाहि रडविलें आहे'!

'ज्याप्रमाणें मनुष्याचा, त्याचप्रमाणें महाकाव्याच्या अर्थाचाहि विकास एकसारखा होत असतो'. मनुष्याचा विकास म्हणजे त्याच्या मनाचा विकास. मन मोठें होणें, उदार होणे. मानवी जीवनांतील नैतिक नियमांची माणसाच्या मनाला जसजशी अधिकाधिक व्यापक प्रतीती येते तसतसें त्याचें मन मोठें व उदार होतें. असे होतें तेव्हां माणसाचा विकास झाला असें आपण म्हणतो. माणसाच्या मनांतील प्रेमभावनेला शुद्ध व व्यापक करणें हें नीतीचें कार्य आहे. ज्या प्रमाणांत या प्रेमभावनेची व्यापकता वाढत जाईल त्या प्रमाणांत मानवाच्या जीवनांतील विरोध वितळत जाऊन त्याचा व्यवहार अधिकाधिक सद्भावनेने होऊं लागेल.

गीतेची मुख्य शिकवणूक अनासक्ति असून जो या शिकवणुकीप्रमाणें व्यवहार करूं इच्छितो त्याला आपोआपच सत्य व अहिंसेचें पालन करावें लागते असें गांधीजींचे म्हणणें आहे. यावर मुख्य आक्षेप असा घेतला जाईल कीं, गांधीजींनीं हा जो गीतेचा अर्थ लावला आहे त्याला खुद्द गीतेंत कांहीं आधार नाहीं. दयेनें व्याप्त, 'कृपयाविष्ट' झाल्यामुळें, 'मी आतां लढणार नाहीं' असें म्हणून अर्जुनानें धनुष्य खालीं ठेवलें तेव्हां श्रीकृष्णानें त्याला पुन्हां युद्धाला प्रवृत्त करण्यासाठीं गीता सांगितली व त्याचा योग्य तो परिणाम होऊन अर्जुनानें युद्ध केलें अशी सार्वत्रिक समजूत आहे. त्यामुळें गीतेंत सांगितल्याप्रमाणें अनासक्तीनें व्यवहार करणाऱ्या माणसाला आपोआप सत्य व विशेषतः अहिंसा पाळावी लागते ही गोष्ट लोकांना सहजासहजीं कशी पटावी? पण गांधीजी लिहितात : "महाभारतकारानें भौतिक युद्धाची आवश्यकता नव्हे, तर त्याची निरर्थकता सिद्ध केली आहे. विजेत्यांना रडविलें आहे, त्यांना पश्चात्ताप करायला लावलें आहे; दुःखाशिवाय त्यांच्या वांट्याला कांहींहि आलें नाहीं असें दाखविलें आहे. या महाग्रंथामध्यें गीता शिरोमणीच्या स्थानीं आहे. तिचा दुसरा अध्याय भौतिक युद्धव्यवहार शिकविण्याऐवजी स्थितप्रज्ञाचीं लक्षणें सांगतो. स्थितप्रज्ञाचा भौतिक युद्धाशीं कोणताहि संबंध नाहीं हें त्याच्या लक्षणांवरूनच माझ्या मतें सिद्ध होते". गांधीजी म्हणतात त्याप्रमाणें, अहिंसेची शिकवण गीतेच्या कांही अंतिम सिद्धान्तांतून निघूं शकते, असें कबूल करावें लागेल.

## युद्धांविषयींचा गीताकालीन दृष्टिकोन

गीतेच्या कालांत अहिंसा हा परमधर्म मानला जात असताहि युद्ध ही सर्वमान्य वस्तु होती हें गांधीजींनाहि मान्य आहे. त्या वेळचा हिंदुसमाज, चार वर्ण व चार आश्रम यांनीं नियमित झालेला होता. समाजांतील दुर्बल व दलित वर्गाचें रक्षण करणें व धर्माची व न्यायाची प्रस्थापना करण्यासाठीं लढणें – शस्त्रयुद्ध करणें – हें क्षत्रियांचें मुख्य कर्तव्य होतें. युद्धसंस्थेला विरोध करणें हा त्या कालीं मुळीं प्रश्नच उद्भवत नव्हता. युद्ध ही एक अपरिहार्य म्हणून क्षम्य गोष्ट मानली जात असे; एवढेंच नव्हे तर ती एक अगदीं स्वाभाविक, कीर्तिकर व धर्म्य वस्तु मानली जात होती. जो क्षत्रिय युद्धापासून परावृत्त होईल त्याला पाप लागेल अशी क्षत्रियांची व समाजांतील इतर वर्णांची धार्मिक श्रद्धा होती. त्या कालीं मानवसमाजाची नैतिक, सामाजिक व आध्यात्मिक प्रगति इतकी झाली नव्हती कीं, युद्धसंस्थेशिवाय न्यायाची व शांतीची संस्थापना करण्याची कल्पना अगर श्रद्धा तो बाळगूं शकला असता. इतकेंच काय पण, भविष्यांत कधीं काळीं अशी स्थिति येईल किंवा ती यावी या कल्पनेनेंहि त्या कालच्या सामान्य माणसाला स्पर्श केला नव्हता. असें म्हणणें म्हणजे त्याचा अपमान करणें नव्हे. कारण नैतिक मूल्यें सर्व








कालीं एकच असलीं तरी नैतिक नियम व आचार कालाबरोबर बदलतात. शिवाय माणूस, त्याचें समाजांतील स्थान व कार्य यांविषयींच्या प्राचीन व अर्वाचीन कल्पनेंत मोठें अंतर आहे. पूर्वी अध्ययन-अध्यापन, राज्यकारभार व संरक्षण, उत्पादन व विभाजन, श्रम आणि सेवा यांसारख्या समाजासाठीं कराव्या लागणाऱ्या कामांत विचारपूर्वक भेद केला जात असे, व हीं कामें मुख्यतः जन्माप्रमाणें व पुष्कळ वेळां गुणांप्रमाणे निरनिराळ्या वर्णांना वांटून दिलीं जात. मनुष्य हा मुख्यतः आध्यात्मिक प्राणी असून आध्यात्मिक क्षेत्रांत व्यक्तिशः प्रगति करणें व पूर्णता पावणें हें त्याचें ध्येय मानलें जाई. या हेतूनेंच त्याच्या वैयक्तिक व सामाजिक कार्याची आंखणी केली जाई. त्यासाठीं योग्य तीं साधनें व संपत्ति त्याला मिळेल अशी व्यवस्था करणें हें समाजाचें व राज्यसंस्थेचें कर्तव्य मानलें जाई. अन्य कर्माप्रमाणें युद्धाची नीति व रीति ही व्यक्तीच्या आध्यात्मिक विकासाला पोषक होईल अशी ठरविली गेली होती. निदान लोकांची तशी प्रामाणिक समजूत होती. युद्ध न करण्यापेक्षां, 'पाप' न लागतां युद्ध कसें करतां येईल हा अर्जुनाचा मुख्य प्रश्न होता. उलट अर्वाचीन काळीं समाजाचा एक घटक म्हणून मुख्यतः माणसाकडे पाहिलें जातें. माणसाच्या सामाजिक जीवनाचा विकास हें त्याचें मुख्य ध्येय मानलें जातें. अमुक एका जातीच्या अगर वर्णाच्या माणसानें अमूक एक काम केलें पाहिजे, असा निर्बंध आज उरलेला नाहीं. इतकेंच नव्हे तर, एकाच माणसाला अनेक वर्णांचीं कामें करावीं लागतात. उदा. युद्ध करणें हें फक्त क्षत्रियांचें कर्म आहे, असें आज कोणीहि मानीत नाहीं. प्रत्येक नागरिकानें – यांतून स्त्रियासुद्धां वगळलेल्या नाहींत – राष्ट्रासाठीं लढणें हें त्याचें अगर तिचें कर्तव्य मानलें जाते.

या दोन समाजपद्धतींपैकीं प्राचीन आर्यसमाजपद्धति श्रेष्ठ कीं अर्वाचीन समाजपद्धति श्रेष्ठ हा वाद व्यर्थ आहे. माणसाप्रमाणें समाजाचाहि विकास होतो हें तत्त्व मान्य केलें तर, आजची समाजपद्धति श्रेष्ठ असून ती माणसाच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीनें अनुकूल आहे, हें विचारांतीं पटण्यासारखें आहे. पण या समाजपद्धतींत एक मोठें भय अगर धोका आहे. सबंध समाजाची गर्भित (potential) व क्रियाशील (active) शक्ति चांगल्या किंवा वाईट कामाला लावली जाऊं शकते. म्हणूनच पूर्वीची युद्धें व आतांची युद्धें यांच्या स्वरूपांत व परिणामांत मोठें अंतर पडलें आहे. आजच्या युद्धांत राष्ट्राचे सर्वच्या सर्व मनुष्यबळ व द्रव्यबळ कामाला लागतें व कोणत्याहि दोन राष्ट्रांतील युद्ध जागतिक युद्धाचें स्वरूप धारण करतें. याचा परिणाम असा झाला आहे कीं, आज मानव व त्याची संस्कृति यावर एक महान् संकट आलें असून त्यांत त्यांचा विनाश होतो कीं काय अशी भीति वाटूं लागली आहे. म्हणून आज युद्ध अपरिहार्य आहे किंवा धर्म्य आहे हा विचार मागें पडला असून युद्ध ही संस्था मानवी समाजांतून नाहींशीं कशी होईल व जगांत शांति स्थापन होऊन सर्व मानवांना सुख कसें मिळेल हा विचार प्रामुख्यानें पुढें आला आहे. मानवी समाजाच्या प्रगतीच्या मार्गावरील युद्ध हा एक टप्पा असेलहि. पण आजचे विचारवंत युद्ध ही एक रानटी संस्था आहे असें मानूं लागले आहेत.

### गांधीजींचा प्रगमनशील गीतार्थ

माणसाच्या विचाराबरोबर त्याचे नीतिनियम व धर्माचारहि बदलतात. हे नवीन नीतिनियम व धर्माचार सर्वमान्य असलेल्या धर्मग्रंथांत पूर्वी सांगितले आहेत, निदान त्यांना त्यांत आधार आहे, असें दाखविण्याकडे महाजनांची स्वाभाविक प्रवृत्ति असते. कारण यामुळें सामान्य जनांची या गोष्टींना सहज व चटकन् मान्यता मिळते. बदलत्या कालाला अनुरूप असा नवीन अर्थ निघण्याची शक्यता हा या ग्रंथांचा महिमा अथवा विशेष असतो. ज्या धर्मग्रंथांच्या अर्थाचा माणसांच्या विकासाबरोबर विकास होत नाहीं ते धर्मग्रंथ मागें पडले तर त्यांत नवल काय? हाच न्याय माणसाच्या देवालाहि लागूं आहे. "वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि। तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही।।" हें आत्म्याविषयींचें वचन विचारांना व तत्त्वांनाही लागूं आहे. तथापि, निरनिराळ्या देशांतील व कालांतील कवी व सत्पुरुष गीतेसारख्या महान धर्मग्रंथांच्या विचारांत व अर्थात सुसंगति शोधण्याचा प्रयत्न करतात, यावरून माणसाच्या आत्म्याप्रमाणें समाजाचाही विकास होतो ही गोष्ट त्यांना अभिप्रेत आहे हे सिद्ध होतें. त्यांनीं पूर्वी धर्मयुद्धाचें समर्थनहि 'परित्राणाय साधूनाम् विनाशाय च दुष्कृताम्' या हेतूनेंच केवळ केलें असलें पाहिजे. म्हणून गीतेंतील अनासक्ति हा जो मुख्य सिद्धान्त त्याचा जो अर्थ गांधीजींनी लावला आहे तो आजच्या प्रगमनशील विचाराला अनुरुप असाच आहे असें मान्य केलें पाहिजे. गीतेची अनासक्तीची शिकवणूक व्यवहारांत आणावयाची तर माणसाला अहिंसेचें पालन केलें पाहिजे असें गांधीजींचें स्वानुभवाचें सांगणें आहे. माणसामाणसांमधील सर्व व्यवहार अहिंसेनें होतील तरच समाजांतून युद्ध ही संस्था कायमची नष्ट होईल. 'युद्ध नको, शांति हवी' असा केवळ मंत्र जपल्यानें युद्ध थांबून शांति स्थापन होणार नाहीं. श्रीअरविंदांनीं म्हटल्याप्रमाणें त्यासाठीं मानवी समाजात क्रांतिकारक बदल झाला पाहिजे. त्याच्या स्वभावात जी दुष्टता आहे ती कमी होत जाऊन सज्जनता

अनुक्रमणिका

वाढत गेली पाहिजे. ती जीवनाच्या सर्व क्षेत्रांत – विशेषतः राजकीय क्षेत्रांत – प्रकट झाली पाहिजे. जेव्हां तत्त्ववेत्ते राजे होतील तेव्हांच आदर्श राज्यसंस्था अस्तित्वात येईल असे प्लेटोनें म्हटलें आहे. आजच्या लोकशाहीच्या कालांत आपआपले व्यवसाय करणारे सर्व सामान्य नागरिकच राजे आहेत. तेव्हां या सामान्य नागरिकांनाच शिक्षणानें तत्त्ववेत्त्याची दृष्टि येईल तेव्हां आदर्श लोकशाही निर्माण होईल. व्यक्तीच्या जाणिवेंत व बुद्धींत परिवर्तन झाल्याशिवाय युद्धासारख्या जटिल समस्या सोडविण्याचा प्रयत्न करणें फोल होय, असें श्रीअरविंदांनीहि म्हटलें आहे व यासाठींच त्यांची योगसाधना होती. गीतेंत म्हटल्याप्रमाणें ('उद्धरेदात्मनात्मानं') प्रत्येकानें स्वतःचा उद्धार स्वतःच केला पाहिजे. गांधींच्या चळवळीचाहि हृदयपरिवर्तन हाच आत्मा होता. माणसाच्या विचारांत एक मौलिक परिवर्तन घडवून आणणें हें एक महान् कार्य असून तें करूं इच्छिणाऱ्या पुरुषामध्यें सर्वच माणसांत सत्प्रवृत्ति सुप्त स्वरूपांत कमीअधिक प्रमाणांत असते व सदाचारानें ती जागृत होते, अशी श्रद्धा असावी लागते. हीच धर्मश्रद्धा विश्वाची धारणा व सुव्यवस्था (ऋत व सत्य) यांचा आधार आहे. जगामध्यें कोणत्याहि सत्कृत्याचा नाश होत नाहीं. बीजरूपानें तें राहतें व वाढतें. 'नहि कल्याणकृत् कश्चिद् दुर्गतिं तात गच्छति।' या श्रद्धेनें गांधीजींसारख्या धार्मिक वृत्तीच्या पुरुषाचा जीवन-व्यापार चालतो.

पण या वृत्तीचा संपूर्ण विजय होऊन समाजातील सर्व व्यवहार सद्भावनेनें होऊं लागण्यापूर्वी जगांत जी दुष्टता व पाशवी शक्ति वावरत आहे तिचा प्रतिकार कसा करावयाचा हा खरा प्रश्न आहे. सशस्त्र युद्धाचे सर्व अनर्थ टाळून दुष्टतेचा यशस्वी प्रतिकार करण्याची शक्ति आपल्या सत्याग्रहांत आहे असा गांधीजींचा दावा असून सत्याग्रहाचें शास्त्र गीतेंतील शिकवणुकीला अनुसरून आहे, असें आत्मविश्वासपूर्वक त्यांचें सांगणें आहे. सत्याग्रहाचा उगम प्रेमांत अगर अहिंसेंत असून देहधाऱ्याला सत्य व अहिंसा यांचें पालन केल्याशिवाय अनासक्ति संभवत नाहीं, असा आपला अनुभव त्यांनीं नमूद करून ठेवला आहे. हें सत्याग्रहाचें शास्त्र नवीन असून त्याची शक्ति व व्यापकता याचें आपल्यालाहि अद्याप संशोधन करावयाचें आहे, असें ते नेहमीं म्हणत. या शास्त्राच्या आधारें नवीन नीतीची व धर्माची स्थापना करणें हें त्यांचें जीवनकार्य होतें. अशा पुरुषाला ("तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ") पूर्वीचे विधी अगर निषेध उपकारक होण्याऐवजी अपकारकच होण्याचा अधिक संभव आहे. गांधीजींच्या मागें सत्याग्रहशास्त्राच्या संशोधनासाठीं जे आपलें जीवन समर्पण करतील त्यांना गीता व त्यावरील आतांपर्यंतचीं भाष्यें व टीका किती उपयोगी पडतील, हें अनुभवानेंच ठरणार आहे.

❊ ❊ ❊



अनुक्रमणिका

हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून
मे.पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले



अनुक्रमणिका